अनु. डॉ. शरावती शिरगांवकर



रोमिला थापर

# अशोक आणि मौर्यांचा ऱ्हास

# अशोक आणि मौर्यांचा ऱ्हास

## (डॉ. रोमिला थापर लिखित
## As'ok and The Decline of Mourya's
## या पुस्तकाचा अनुवाद)

अनुवादिका

डॉ. सौ. शरावती शिरगावकर




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# निवेदन

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाची इतिहास, ललितकला विज्ञान आदी विषयांवरील पुस्तके भाषांतरित करून प्रसिद्ध करण्याची एक योजना आहे. या योजनेत आजवर मंडळाने काही ग्रंथ प्रकाशित केले आहेत आणि काही प्रकाशनाच्या वाटेवर आहेत. डॉ. रोमिला थापर लिखित " As 'ok & the Decline of Maurya 's " या पुस्तकाचे 'अशोक आणि मौर्यांचा ऱ्हास ' या नावाने प्रसिद्ध होत असलेले प्रस्तुत पुस्तक याच योजनेतील एक पुस्तक होय. इंडियन कौन्सिल ऑफ हिस्टॉरिकल रिसर्च या संस्थेच्या भाषांतर योजनेखाली डॉ. सौ. शरावती शिरगावकर यांनी प्रथम हे भाषांतर केले व मंडळाने ते प्रकाशनार्थ स्वीकारले.

डॉ. शिरगावकर सध्या श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी कला व वाणिज्य महाविद्यालयाच्या प्राचार्या आहेत. आपले अन्य व्यवसाय सांभाळून त्यांनी हे महत्त्वाचे पुस्तक मराठीत आणलें याबद्दल मंडळातर्फे त्यांचे आभार. या पुस्तकामुळे इतिहासातील काही महत्त्वाच्या घटनांची माहिती इतिहासावर प्रेम करणाऱ्या मराठी वाचकांना उपलब्ध होणार आहे.

**सुरेंद्र बार्लिंगे**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

४२, यशोधन,
मुंबई– ४०० ०२०
दिनांक : ७ एप्रिल, १९८८

# अनुवादिकेचे निवेदन

अशोक अँड डिक्लाइन ऑफ मौर्याज हा डॉ. रोमिला थापर यांचा गाजलेला ग्रंथ. भारतीय इतिहास अनुसंधान परिषदेने उत्कृष्ट ऐतिहासिक ग्रंथांचे विविध भारतीय भाषांमध्ये अनुवाद करण्याची योजना आखली. या योजनेनुसार मला डॉ. थापर यांच्या या गाजलेल्या ग्रंथाचा मराठी अनुवाद करण्याची संधी मिळाली.

या ग्रंथाचे वाचन झालेले होतेच. ग्रंथ आवडलेला होता. प्रत्यक्ष अनुवादाचे काम सुरू केल्यानंतर एका वेगळ्याच प्रकारच्या आनंदाचा अनुभव येऊ लागला. ऐतिहासिक कल्पनाशक्ती म्हणजे काय हे अधिक उत्कटतेने अनुभवाला येऊ लागले. जणू कालयंत्रात बसून आपण अडीच हजार वर्षे भूतकाळात गेलेल्या आहोत असे कित्येकदा वाटे.

या ग्रंथाच्या अनुवादाचे परीक्षण डॉ. म. के. ढवळीकर यांनी केले, काही उपयुक्त सूचनाही केल्या, त्यासाठी मी त्यांची ऋणी आहे. भारतीय इतिहास अनुसंधान परिषदेचे एकेकाळचे अध्यक्ष डॉ. अ. रा. कुलकर्णी यांनी मला हा अनुवाद करण्याची संधी दिली यासाठी त्यांचीही मी आभारी आहे. या मराठी अनुवादाच्या प्रकाशनाची जबाबदारी महाराष्ट्र साहित्य संस्कृती मंडळाने घेतली म्हणून मंडळाचे अध्यक्ष डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांचीही मी आभारी आहे. या पुस्तकाच्या मुद्रणाचे काम शिल्पा आर्टसचे श्री. जयसिंग नलावडे यांनी केले. त्यांचेही मी आभार मानते. या पुस्तकातील नकाशे व छायाचित्रे तयार करण्याची जबाबदारी श्री. रामचंद्र द. शिरगावकर यांनी घेतली व इतरही अनेक प्रकारांनी सहकार्य केले. त्याबद्दल मी कृतज्ञता व्यक्त करीत आहे.

प्राचीन इतिहासाचे अभ्यासक, मराठी भाषेतून इतिहासाचे अध्ययन करणारा विद्यार्थीवर्ग यांना या अनुवादित ग्रंथाची अभ्यासाच्या कामी मदत होईल अशी आशा आहे. जिज्ञासू वाचकांनी या अनुवादाविषयी आपली मते व्यक्त केल्यास त्यांचे निश्चितच स्वागत होईल

२५ जून १९८८

**शरावती रा. शिरगावकर**

# प्रस्तावना

अशोकाच्या कारकिर्दीने इतिहासकारांचे लक्ष वेधून घेण्यास सुरुवात केली, या गोष्टीस एक शतकाहूनही अधिक काळ लोटला आहे. १८३७ मध्यें जेम्स प्रिन्सेप यांनी प्रथम अशोकाच्या कोरीव लेखांवरील आपले काम एका संशोधन लेखमालेच्या रुपाने प्रसिद्ध केले. परंतु १९०१ पर्यंत अशोकावरील प्रबंध पुढे आलेला दिसत नाही. या वर्षी व्हिन्सेंट स्मिथ यांनी या विषयावरचा अधिक तपशीलवार अभ्यास ग्रंथरुपाने मांडला.[१]

स्मिथच्या ग्रंथाच्या वारंवार निघणाऱ्या आवृत्त्यांमुळे या विषयाला लोकप्रियता लाभली आणि १९२५ मध्ये डी. आर. भांडारकर यांनी अशोकाच्या कारकिर्दीच्या इतिहासावरील आपली कारमायकल व्याख्याने प्रसिद्ध केली. पाठोपाठ १९२८ मध्यें जे. एम. मॅकफेल यांचे छोटेसे पुस्तक प्रसिद्ध झाले. पुढे आर. के. मुकर्जी यांचा ग्रंथ १९२८ मध्ये प्रसिद्ध झाला. १९३० मध्ये लुई द, ला वाले पुसँ यांचे मौर्यांवरील एक पुस्तक प्रसिद्ध झाले. यानंतर १९४६ मधील बी. एम्. बारुआ यांच्या प्रबंधाचा अपवाद सोडल्यास इंग्रजीमध्ये अशोकावरील एकही ग्रंथ १९५० पर्यंत बाहेर पडला नाही. भारताच्या इतिहासातील या विशिष्ट काळासंबंधीचे इतिहासकारांचे औत्सुक्य मावळले असे येथे सुचवावयाचे नाही उलट मोठ्या प्रमाणावर संशोधन चालू होते. पण ते मौर्यांची राजव्यवस्था, नाणी, आज्ञालेखांचा भाषाशास्त्रीय अभ्यास इत्यादी विषयांवर. बारुआंचे पुस्तक म्हणजे या सर्व संशोधनाचे संकलन करून केलेला अद्ययावत अभ्यास.

नीलकंठ शास्त्री आणि त्यांचे सहकारी यांनी केलेला नंद व मौर्य यांच्या-विषयीचा सखोल अभ्यास १९५२ साली ग्रंथरुपाने बाहेर पडला. अशोकाचा बौद्धधर्माशी संबंध, याविषयीचा बी. जी. गोखले यांचा ग्रंथ १९५५ मध्ये प्रसिद्ध झाला. या विषयावरील पुस्तकांची एक लाटच १९५६ मध्ये आली. त्या सर्वांमध्ये पी. एगरमाँट यांचे पुस्तक सर्वात अधिक उपयुक्त आहे याच वर्षी एफ्. कर्न यांचे पुस्तक प्रकाशित झाले बुद्धाच्या निर्वाणाला २५०० वर्षे झाली त्यावर्षी बुद्धजयंती साजरी करण्यासाठी ए. सी. सेन यांनी एक लहानसे परिचयवजा पुस्तक प्रसिद्ध केले. अगदी अलीकडे डी. सी. सरकार यांनी अशोकाच्या कोरीव लेखांवर एक पुस्तक प्रसिद्ध केलेले आहे. या विषयावरील प्रकाशनांची जरी ही प्रचंड यादी असली तरी मला असे वाटते की उपलब्ध साहित्याचा पुन्हा अर्थ लावण्यास

१. ग्रंथांच्या नावांसाठी ग्रंथसूची पाहावी.

अजूनही वाव आहे. (याच्या कारणांची चर्चा मी पहिल्या प्रकरणात केलेली आहे.) या माझ्या ग्रंथात मी पुन्हा अर्थ लावण्याचा प्रयत्न केलेला आहे.

स्थलनामांसाठी शब्दोच्चारांच्या खुणांचा वापर करण्यात सुसंगतेचा काहीसा अभाव वाचकांना जाणवेल. संस्कृत आणि पाली या भाषांमधील कमी परिचित असलेल्या नावांपैकी जी अधिक रुढ आहेत त्यांचें लिप्यंतर करण्याचा मी शक्य तितका प्रयत्न केलेला आहे. परंतु आधुनिक स्थलनामांच्या बाबतीत मात्र मी आजच्या व अधिक रूढ असलेल्या नावांमधील अक्षरे (शब्दोच्चारांच्या ज्या खुणांचा वापर होतो त्याच्याशी ती सुसंगत नसली तरी) कायम ठेवली आहेत कारण ती सहजपणे ओळखता यावीत उदाहरणार्थ– सांची ऐवजी सान्ची असे वापरणे मला निष्कारण पांडित्याचे वाटते. संस्कृत व पाली शब्दांच्या बाबतीत या दोनही भाषांमधील शब्द एकाच भाषेत आणण्याचा प्रयत्न न करता मी शक्यतो प्रामुख्याने मूळची रुपे ठेविली आहेत.

विद्वत्वृत्ती व शिष्यवृत्ती यांच्या रुपाने विविध संस्थांकडून अर्थसहाय्य मिळाले म्हणूनच प्रामुख्याने मी हा अभ्यास पूर्ण करू शकले. यासाठी इंटरनॅशनल फेडरेशन ऑफ युनिव्हर्सिटी वुमेन (क्रॉस्बी हॉल विद्वत्वृत्तीसाठी), लंडन विद्यापीठ (विल्यम लिंकन शेली या इतिहासाच्या शिष्यवृत्तीसाठी) आणि युनिव्हर्सिटी कॉलेज, लंडन (सर विल्यम मेयेर शिष्यवृत्तीसाठी) या संस्थांविषयीची कृतज्ञता मला व्यक्त केली पाहिजे.

माझे संशोधन चालू असताना अनेक विद्वानांची व सहकाऱ्यांची, चर्चा व काही साधनसाहित्याचे भाषांतर या दोन्हीमध्ये मला मदत झालेली आहे. डॉ. अल्विन, प्रा. दवे, डॉ. गुदकुंबर आणि डॉ. मार यांचे विशेष करून मी आभार मानते. या पुस्तकाची टंकलिखित प्रत वाचून त्यात सुधारणा सुचविल्या म्हणून मी माझे मातापिता, स्नेही, प्रा. जे. डी. बर्नाल, डॉ. सर्जी हॉरविट्झ, डॉ. अँथनी मिचेलिस आणि श्रीमती गट्रूड वेंग्राफ यांची आभारी आहे. श्री. जे. एफ् हॉरबिन यांनी या पुस्तकासाठी नकाशे काढले म्हणून त्यांचे आभार मानण्यात मला आनंद आहे. दि स्कूल ऑफ ओरिएंटल अँण्ड आफ्रिकन स्टडीज, दि कॉमनवेल्थ रिलेशन्स ऑफिस लायब्ररी आणि दि ब्रिटिश म्युझियम लायब्ररी या संस्थांचे ग्रंथपाल आणि कर्मचारी वर्ग यांचीही मी ऋणी आहे. माझे या पुस्तकाचे लेखन चालू होते त्या संपूर्ण काळात प्रा. ए. एल्. बॅशॅम यांच्या मार्गदर्शनाबद्दल व त्यांनी केलेल्या सहानुभूतीपूर्ण मदतीबद्दल त्यांच्याविषयीची कृतज्ञता मी व्यक्त करू इच्छिते.

लंडन १९६०

**आर. थापर**

# अनुक्रमणिका



## परिशिष्टे

# १ : पार्श्वभूमी आणि आधारसाहित्य

भारतीय इतिहासात ख्रिस्तपूर्व पाच शतकांमध्ये झालेल्या घडामोडी व बदल यांच्या उलटसुलट प्रवाहांमधून ज्या विशेष कर्तृत्ववान व्यक्ती उदयाला आल्या त्यांच्यामध्ये अशोकाची गणना होते. आपल्या विजयामुळे दारुण दुःखाची निर्मिती झालेली पाहून त्या विजयाविषयी खंत करणारा विजेता, एक संत, साधू आणि सम्राट यांचा संगम, राजकीय विचारवंत, मानवी जीवनाविषयी क्वचितच आढळणारा समंजसपणा दाखविणारा राजा अशा विविध रूपांमध्ये तो अनेकांना दिसतो. त्याची आणखीही काही रूपे दिसू शकतील. त्याच्याविषयीच्या लोककथांवर शतकानुशतके जी पुटे चढवली गेली आहेत त्यांतूनच आपल्यापुढे आजचे अशोकाचे चित्र उभे राहते. त्याची काळजीपूर्वक छाननी केली तरच त्याच्या सत्यस्वरूपाचे काहीसे रेखाटन करता येण्याजोगे आहे.

स्वतःच्या कालाविरुद्ध उभ्या ठाकणाऱ्यांपैकी अशोक एक होता असे काही वेळा म्हटले गेले आहे. हे मत चुकीचे आहे असे आम्हाला वाटते. अनेक परींनी तो स्वतःच्याच काळाचा प्रतिनिधी होता हे आपण पुढे पाहूच. त्याला थोरवी प्राप्त होण्याचे विशेष कारण म्हणजे त्याला स्वतःच्या काळाची समज होती व तत्कालीन भारतीयांच्या गरजा कोणत्या होत्या याची जाण होती. काही लोक समजतात त्याप्रमाणे तो एखाद्या संकुचित धर्मपंथाचा उपासक नव्हता, त्याच्या अंतिम उद्दिष्टांमध्ये जीवनाच्या धार्मिक व लौकिक या दोनही अंगांचा समावेश होता.

यापूर्वी अशोकाविषयी जे अभ्यास झालेले आहेत त्यांचा आढावा घेतला तर, त्याचे बौद्धधर्माशी असलेले नाते सांगताना, त्याच्या कारकिर्दीच्या आठव्या वर्षी त्याने चालविलेल्या कलिंगाच्या मोहिमेत, त्या लोकांविषयी जे क्रौर्य दाखवले गेले त्याची त्याला स्वतःलाच खंत वाटून त्याने एकाएकी बौद्ध धर्म स्वीकारला, असे वर्णन करण्याकडे कल दिसतो. यानंतर बौद्धधर्मातील नीतितत्त्वांवरची अढळ श्रद्धा हेच राजाच्या जीवनाचे एकमेव उद्दिष्ट बनले. एक साधू व सम्राट, असे स्मिथने त्याचे वर्णन केले आहे. फ्रित्झ केर्न याने अशोकाच्या कृतींमागच्या अंतः-प्रेरणांचे पृथक्करण करण्याचा प्रयत्न केला आहे. संन्यास घेऊन अगर अन्य मार्गांनी जीवनातून मुक्ती मिळवावी अशी या कालखंडातील भारतीयांमध्ये सार्वत्रिक इच्छा होती असा त्याचा समज आहे. हा समज आणि ऐहिक व पार-लौकिक जीवनाविषयीच्या धर्मकल्पना यांच्या आधारे फ्रित्झ केर्नने हा प्रयत्न केला

आहे. ऐहिक बंधनातून स्वतःला मुक्त करून घेण्याची इच्छा व त्याचवेळी राजा या नात्याने आपले प्रजानन व समाज यांविषयींच्या जबाबदारीची जाणीव या दोहोंचा अशोकाच्या मनात संघर्ष चालू असावा या समजुतीने फित्झ केर्नेने विस्तृत वर्णन केले आहे.

या विषयीच्या आमच्या पृथक्करणावरून आम्हाला असे दिसते की, बौद्ध धर्माचे अशोकाला आकर्षण वाटत होते, परंतु हा प्रकार काहीसा विक्षिप्तपणाचा किंवा एका रात्रीत साक्षात्कार होऊन मतांतर झाल्याचा असा नव्हता. आम्हाला असे वाटते की तत्कालीन समाजाच्या संदर्भात बौद्धधर्म हा केवळ दुसरा एखादा धर्म नव्हता. वैयक्तिक श्रद्धेपासून सामाजिक कल्पनांपर्यंत जीवनाच्या विविध अंगांमध्ये बदल घडवून आणू पाहणाऱ्या एका जास्त व्यापक चळवळीचा तो परिणाम होता. मोठ्या प्रमाणावर आविष्कृत झालेले ते एक सामाजिक–बौद्धिक आंदोलन होते. समकालीन विचार व जीवन यांत ते प्रतीत होत होते. इतरांपेक्षा थोडेसे जास्त कल्पक धोरण असणाऱ्या कोणत्याही राजाला इतक्या महत्त्वाच्या नव्या चळवळीशी मिळतेजुळते घेणे भागच होते. अशी ही परिस्थिती म्हणजे अशोकासारख्या कर्तृत्ववान महत्त्वाकांक्षी राजाला एक आदर्श साधनच होते. धर्मासंबंधीच्या त्याच्या व्यक्तिगत श्रद्धा कोणत्याही असोत, परंतु ज्या राज्य-कर्त्याला स्वतःची राजकीय आणि आर्थिक सत्ता दृढ करावयाची होती त्याला ती परिस्थिती विशेष उपयुक्त होती.

इतिहासाच्या प्राचीन कालखंडातील व्यक्तीचा अभ्यास करीत असताना, खाजगी जीवनातील तिचे स्वरूप आणि मुत्सद्दी म्हणून ती वठवीत असलेली भूमिका या दोन गोष्टींमधील भिन्नता कशी जाणावयाची ही एक अतिशय अवघड समस्या इतिहासकारापुढे असते. अर्वाचीन इतिहासावर ठसा उमटवणाऱ्या मुत्सद्यांच्या चरित्रांवरून असे आढळते की काहींच्या बाबतीत या दोन गोष्टी परस्परांपासून भिन्न असतात. म्हणूनच अगदी प्राचीन काळाचा अभ्यास करताना, सर्व उपलब्ध पुराव्यांचा संदिग्धपणाने उपयोग करावा लागत असल्याने मनस्वी गोंधळ उडणे साहजिक आहे.

गेल्या पन्नास वर्षांमध्ये सम्राट अशोकासंबंधी जे अभ्यासपूर्ण लिखाण झाले आहे त्यात असा गोंधळ अनेकवार झालेला दिसतो. त्याचे जीवन आणि घटना यांची संगती लावताना, त्याच्या स्वतःच्या कोरीव लेखांपेक्षा धार्मिक ग्रंथांनाच समकालीन विश्वसनीय पूरक पुरावे म्हणून महत्त्व दिले गेले ही खरोखरच फार दुर्दैवाची गोष्ट आहे. धार्मिक ग्रंथांमध्ये, प्रामुख्याने बौद्ध

धर्मग्रंथांमध्ये, अशोक स्वतःच बौद्धधर्मीय बनला या वस्तुस्थितीचा फायदा उठवण्याची इच्छा होणे स्वाभाविक होते. त्यामुळे त्याला पावित्र्याचा पुतळा बनवून टाकण्यात आला आहे. परंतु त्याच्या स्वतःच्या आज्ञा व कोरीव लेख त्याच्या या चित्राला पुष्टी देणारे नाहीत.

त्याच्या कोरीव लेखांचा काळजीपूर्वक अभ्यास करणाऱ्यास, त्यांचे दोन गट असल्याचे जाणवते. यांपैकी लहान गटातील लेख म्हणजे एक सर्वसाधारण बुद्धानुयायी या दृष्टीने आपल्या बौद्ध संघाला उद्देशून केलेल्या घोषणा आहेत. राजाने स्वतः केलेला बौद्धधर्माचा स्वीकार, त्याचे बौद्ध संघाबरोबर असलेले संबंध यांचे त्या लेखांमध्ये वर्णन आहे. या ठिकाणी तो काहीसा असहिष्णू व पूर्णपणे श्रद्धाळू बौद्धधर्मानुयायी दिसतो, कारण संघाशी मतभेद असणाऱ्या भिक्षूंना व भिक्षुणींना संघव्यवस्थेतून हाकलून द्यावे, असे एका लेखात तो जाहीरपणे निक्षून सांगतो. पुढच्या एका लेखात, ज्या ग्रंथांशी सर्व सच्च्या बौद्धांचा परिचय असला पाहिजे अशा विविध धर्मग्रंथांसंबंधी तो काहीसा सौम्यपणाने बोलतो.

मोठ्या गटात असलेल्या कोरीव लेखांचे वर्णन, सर्वसामान्य जनतेला उद्देशून राजाने काढलेले जाहीरनामे, असे करता येण्याजोगे असल्याने ते जास्त महत्त्वाचे आहेत. या गटात दीर्घ व लघू शिलालेखांमधील आज्ञापत्रे व स्तंभलेखांमधील आज्ञापत्रे यांचा समावेश होतो. त्याच्या सुप्रसिद्ध **धम्म**विषयक धोरणाचे स्पष्टीकरण यांमधून मिळते. धर्म या संस्कृत शब्दाचे प्राकृत रूप म्हणजे **धम्म**. हा शब्द एका विशिष्ट भारतीय संदर्भात वापरला जात असल्याने त्याचे इंग्रजीत भाषांतर करणे अवघड आहे. नीती, पावित्र्य, सदाचार यांसारख्या विविध शब्दांनी त्याचे भाषांतर केले गेले आहे.[1] मौर्यकालीन भारताच्या पार्श्वभूमीवर विचार करता, या धोरणामध्ये जो विचार आहे त्यातच अशोकाचे खरे यश आहे.

यापूर्वीच्या इतिहासकारांनी अशोकाच्या **धम्म** या शब्दाचा अर्थ सर्वसाधारणपणे बौद्धधर्माला पर्यायी शब्द असा लावून, अशोकाला बौद्धधर्म हाच राज्यधर्म करावयाचा होता असे सूचित केलेले आहे. तो स्वतः जरी बौद्धधर्माचा निस्सीम उपासक असला व मुक्तीचा तोच एकमेव मार्ग आहे अशी त्याची खात्री असली तरी बौद्धधर्म हाच राज्यधर्म बनवण्याचा त्याचा हेतू नसावा असे दाखवून देण्याचा

---

१. आम्ही स्वतः त्याचे भाषांतर सद्गुण या शब्दाने करतो. पाचवे प्रकरण पाहा.

आमचा उद्देश आहे. केवळ आपले सर्व प्रजानन बौद्धधर्माला अनुकूल व्हावेत असे त्याचे धम्मविषयक धोरण नसावे, तर त्याच्या या धोरणात सामाजिक जबाबदारीची जाणीव जास्त असावी. सामाजिक वर्तन, एका मनुष्याची दुसऱ्या मनुष्याशी होणारी वर्तणूक यांचे महत्त्व मोठे वाटावे अशा प्रकारची मनोवृत्ती विकसित करण्याचे त्याचे धोरण होते. माणसाच्या प्रतिष्ठेला मान्यता मिळावी व सामाजिक व्यवहारात मानवतावादी वृत्ती असावी म्हणून हे आर्जव होते.

या धोरणाची छाननी करताना, ज्या परिस्थितीत हे धोरण आकाराला आले तिचे पृथक्करण करणे आवश्यक आहे. राजाच्या स्वतःच्या मनातच या धोरणाची काही अंशी जोपासना झाली. परंतु तत्कालीन समस्या सोडविण्याचा तो एक चांगला मार्ग आहे हे राजाने जाणले म्हणून या समस्या आणि तत्कालीन परिस्थिती यांच्या प्रकाशातच अशोकाने केलेल्या कामगिरीचे मूल्य आणि महत्त्व खरेपणाने जोखता येणे शक्य होईल.

पूर्वी जेथे लहान राज्ये आणि प्रजासत्ताके होती त्या विस्तृत प्रदेशावर आता साम्राज्यसत्ता निर्माण झाली होती. या राजकीय परिस्थितीचा प्रथम विचार केला पाहिजे. अशोकाचा आजोबा चंद्रगुप्त मौर्य याने अशोकाच्या राज्यारोहणापूर्वी सुमारे अर्धशतक मौर्यांची राज्यव्यवस्था सुरू केलेली होती. तौलनिक दृष्ट्या भारतात हा नवीनच प्रकार होता. मौर्यांच्या पूर्वी नंदांच्या राजघराण्याचे साम्राज्य होते. परंतु मौर्यांच्या साम्राज्याइतके ते विशालही नव्हते व त्या साम्राज्यातील लोकसमूह आणि संस्कृती यांच्यात तितकीशी विविधताही नव्हती. मगध हेच नंदसाम्राज्याचे केंद्र होते आणि गंगेचे खोरे व त्याच्या आजुबाजूचा प्रदेश यांतील लोकांचाच त्यात समावेश होत होता. सांस्कृतिक दृष्ट्या ते आर्य तरी होते किंवा आर्य संस्कृतीशी त्यांचा परिचय तरी झालेला होता. मौर्य साम्राज्यात याहून कितीतरी जास्त भिन्न घटक होते, काही आर्यांनी व्यापलेल्या भारताबाहेरचेही होते, यामुळे पूर्वीच्या काळापेक्षा जास्त राजकीय गुंतागुंती निर्माण होत गेल्या.

ही वस्तुस्थिती स्पष्ट करताना, धम्माच्या विकासात जो व्यक्तिगत घटक होता तिकडे दुर्लक्ष करता येण्याजोगे आहे असे सुचवण्याचा आमचा हेतू नाही. अशोकाच्या स्वतःच्या श्रद्धा आणि त्याच्या भोवतालची परिस्थिती यांचाही या धोरणाला आकार देण्यात हातभार लागलेला आहे. धार्मिक विचारांच्या बाबतीत मौर्यकुटुंब निःसंदेहपणे समावेशक प्रवृत्तीचे होते. चंद्रगुप्ताने जैन धर्म अंगिकारलेला होता असे सांगितले जाते आणि अशोकाचा पिता बिंदुसार याचा आजीविकांकडे

ओढा होता. हे दोन्ही पंथ सनातनधर्मापेक्षा वेगळे होते व ब्राह्मणी धर्मकल्पकांना विरोध करणारे होते. यामुळे, अशोकाने स्वतः ब्राह्मणी धर्मविचारांना पाठिंबा दिला नाही व बौद्धधर्मियांना आश्रय देणे पसंत केले यात आश्चर्य वाटण्याजोगे काही नाही. काही ग्रीक कल्पनांचीही दखल घेतली गेली असावी व या बौद्धिक मंथनात त्यांचे परीक्षण झालेले असण्याची शक्यता आहे.

वैश्विक गूढ उकलण्याच्या प्रयत्नाचे शतक असे इ. स. पू. सहाव्या शतकाचे वर्णन करता येईल. ग्रीसमधील पायथागोरस आणि चीनमधील कन्फ्यूशियस यांच्याशी ज्यांची तुलना करता येईल असे विचारवंत भारतात होते. धार्मिक श्रद्धा आणि तत्त्वचिंतन या दोहोंमुळे निर्माण झालेल्या विविध पंथांचे अस्तित्व हीच, हा काळ प्रखर वादविवाद आणि चर्चा यांचा काळ असल्याची साक्ष आहे. या काळात केवळ आर्यांच्या प्रचलित नीतिमूल्यांनाच आव्हान दिले गेले असे नाही तर नव्याने विकसित झालेल्या प्रत्येक विचारसरणीला कठोर टीकेच्या कसोटीला उतरावे लागले. पूर्वकालीन चार्वाकपंथीयांच्या अधिभौतिकवादाने उपनिषदांतील अधिक गूढ अध्यात्मवादाशी स्पर्धा केली. हा कालखंड शंकांचा होता, उत्तर वैदिक काळापासून (इ. स. पू. ९०० पासून) हळूहळू विकसित झालेल्या ब्राह्मणी सत्तास्थानांवर नव्या शक्तींचे हल्ले होऊ लागले होते. पुरोहितांच्या अधिकारांविषयी, इतकेच नव्हे तर ते करीत असलेले समारंभ आणि धर्मविधी यांच्या सामर्थ्याविषयीही शंका उपस्थित केल्या जाऊ लागल्या. बौद्धकालात व बौद्धोत्तर कालात जातिव्यवस्थेमध्ये जी ताठरता आली तिची लक्षणे या काळापासून आकार घेऊ लागली होती. त्या जातिव्यवस्थेवरही हल्ले होऊ लागले, परंतु बऱ्याच वेळा हे हल्ले उघड नसत. ब्राह्मणी धर्माशी जरी चारही जातींच्या निष्ठा निगडित असल्या तरी कमी दर्जाच्या मानल्या जाणाऱ्या जातींचा कल साधारणतः नवीन धर्मपंथाकडे झुकू लागला. वैश्य या तिसऱ्या जातीच्या बाबतीत ही परिस्थिती विशेषत्वाने दिसते. तत्त्वतः जरी त्यांचा समावेश उच्च दर्जाच्या द्विजांमध्ये [1] होत असला तरी दैनंदिन जीवनातील व्यवहारात ब्राह्मण व क्षत्रिय या पहिल्या दोन जातींना जे अधिकार प्राप्त होत असत त्यातून त्यांना वगळण्यात येऊ लागलेले होते.

अशा प्रकारे एका बाजूस समाजजीवनासंबंधीच्या विचारांमधील ताठरता व ऐहिक जीवनावर नियंत्रण ठेवण्याचा आग्रह (ही गोष्ट कालांतराने ख्रिस्तोत्तर

---

१. नैसर्गिक जन्म व उपनयनविधी यांमुळे झालेला जन्म असा दोनदा जन्माला आलेला तो द्विज.

पहिल्या काही शतकांत साध्य झाली.) यांच्या आधारे ब्राह्मणधर्म स्वतःला प्रस्थापित करू पाहात होता तर त्याचवेळी दुसऱ्या बाजूस बंडखोर गट ब्राह्मण-धर्माचा हा जोर परतवून लावण्याचा प्रयत्न करीत होते. या गटांमध्ये बौद्धधर्म अग्रगण्य होता. हा संघर्ष हिंसक असण्याची शक्यता नव्हती, कारण बंडखोरांपैकी कोणत्याही गटाने कोणत्याही प्रकारचे धार्मिक युद्ध पुकारलेले नव्हते. हा संघर्ष नेहमी सामाजिक तणावांच्या आणि राजकीय विरोधाच्या स्वरूपात दिसतो.

मौर्यकाळाच्या आधीच्या काही शतकांमध्ये मूलभूत स्वरूपाचे काही निश्चित आर्थिक बदल घडून आलेले होते व वर उल्लेखिलेल्या सामाजिक व राजकीय प्रवृत्ती त्यांच्यापासून अलग नव्हत्या. पूर्ववैदिककालातील आर्यांची अर्ध-भटकी, पशुपालनाची अर्थव्यवस्था बदलून तिच्या जागी आता स्थिर कृषि-ग्रामीण अर्थ-व्यवस्था आली होती. तिच्याबरोबर जमिनीवरील कर, ग्रामीण शासक या तदनुषंगिक गोष्टीही अस्तित्वात आल्या होत्या. बौद्धकालाने या गोष्टींबरोबरच विस्तृत प्रमाणावरील व्यापाराची सुरुवात आणि व्यापाराशी संबंधित असलेल्या सामाजिक वर्गाचे, वैश्यांचे वाढते महत्त्वही पाहिले. व्यापारामुळे वैश्यांची आर्थिक स्थिती सुधारली. त्यामुळे ब्राह्मणांनी व क्षत्रियांनी, विशेषतः ब्राह्मणांनी स्वतःच आपल्याकडे घेतलेल्या अन्याय्य अधिकारांविरुद्धच्या त्यांच्या भावना जास्तच तीव्र बनल्या. व्यापारी श्रेणींच्या स्थापनेमुळे शहरी जीवनास एका नव्या घटकाची ओळख झाली. शहरी जीवन फार मोठ्या प्रमाणात या घटकावर अवलंबून राहू लागले. यातून एका नव्या शक्तीचा उदय झाला. समाजातील जास्त वरच्या दर्जाच्या गटांना आपले पूर्वीचे स्थान टिकवून धरण्यासाठी या शक्तीशी मिळते घेणे भाग पडले.

एका विवक्षित मर्यादेपर्यंत या आर्थिक बदलांचा राजकीय पद्धतीवर परिणाम होणे अपरिहार्य होते. राज्याला आर्थिक उत्पन्नासाठी कृषिनिष्ठ अर्थ-व्यवस्थेवर अवलंबून राहावे लागते. या वस्तुस्थितीमुळे नोकरशाही आणि सुसंघटित शासनयंत्रणा यांचा विकास करण्याची गरज भासली. सर्व देशासाठी समान शासन लागू करण्याच्या प्रवृत्तीमुळे व्यापारात सुधारणा झाली. साम्राज्यरचनेचा आकार आणि व्याप्ती यांमुळे बलिष्ठ केंद्रित नियंत्रण अपरिहार्य ठरले. ही भव्य इमारत सुस्थितीत राखावयाची होती. त्यामुळे राजकीय पद्धतीत सरकारी यंत्रणा व अधिकार यांच्यावर फार मोठ्या प्रमाणावर भर देणे भाग पडले.

भारतातील मौर्यकालीन समाज विविध संस्कृतींनी युक्त होता, या समाजा-तील सर्व घटक सर्वसाधारण विकासाच्या दृष्टीने भिन्न भिन्न पातळीवर होते व



लौरिया–नंदनगड येथील सिंहशीर्ष असलेला अशोकस्तंभ

आर्थिक, सामाजिक आणि धार्मिक प्रेरणांमुळे त्यांची परस्परांवर प्रतिक्रिया होत होतां असे दिसते. सर्व साम्राज्य सुरक्षित राखण्यासाठी सर्वांना एकत्र बांधून ठेवणारे समान सूत्र असले पाहिजे आणि वस्तू व सेवा यांची हालचाल होत राहिली पाहिजे याची निश्चित जाणीव या कालखंडातील कोणत्याही बुद्धिमान राजकारणपटूला होणे स्वाभाविक होते. सामाजिक जबाबदारीवर भर देणाऱ्या धम्माच्या धोरणाचा उपयोग, अशा समान बंधनासाठी करावयाचा होता.

मौर्यकालापासून इतिहासाच्या अभ्यासासाठी भरपूर आधारभूत साहित्य उपलब्ध होऊ लागते. तत्पूर्वीच्या भारतीय इतिहासातील कालखंडासाठी, दूरवर स्थलांतरित झालेल्या व विखुरलेल्या साधनांमधून पुराव्याचे कण टिपण्यासाठी पराकाष्ठेचा शोध घ्यावा लागतो. परंतु मौर्यकालापासून समकालीन अगर नंतरच्या काळातील लिखित आधारांमधून तौलनिकदृष्टचा भरपूर माहिती मिळते.

अशोक मौर्याच्या कारकिर्दीबाबत विशेषत्वाने माहिती मिळते, कारण धार्मिक वाङ्मय, नाणी इत्यादी साधनांमधून मिळणाऱ्या पूरक पुराव्यांखेरीज सर्व देशभर शिलांवर आणि स्तंभांवर कोरलेले राजाचे स्वतःचे आज्ञालेख उपलब्ध, झालेले आहेत. कालसी, मानसेहरा, शाहबाजगढी, गिरनार, सोपारा, येर्रागुडी, धौली आणि जोगडा या ठिकाणी सापडलेलं चौदा दीर्घ शिलाशासने, बैराट, रूपनाथ, सहस्राम, ब्रह्मगिरी, गविमठ, जतिंग–रामेश्वर, मास्की, पाल्कीगुंडु, राजूल–मण्डगिरी, सिद्दपूर, येर्रागुडी, गुज्जर व झांशी येथे सापडलेली अनेक शिलाशासने व कोरीव लेख यांचा त्यांत समावेश होतो. अलाहाबाद, दिल्ली–टोप्रा, दिल्ली–मीरत, लौरिया–अरराज, लौरिया–नंदनगढ आणि रामपूर्वा या ठिकाणी सात स्तंभशासने सापडलेली आहेत. इतर कोरीव लेख, बराबर गुहा (तीन कोरीव लेख) रुम्मिनदेइ, निगलि–सागर, अलाहाबाद, सांची, सारनाथ आणि बैराट या ठिकाणी सापडले आहेत. अलीकडे कंदहार येथे एक ग्रीक आणि अॅरेमिक लघुलेख सापडला आहे.[१]

'पियदस्सि' हे बिरुद कोणासाठी वापरले आहे याची निश्चिती होईपर्यंत या कोरीव लेखांचे महत्त्व समजण्याजोगे नव्हते, कारण मास्कीच्या आज्ञालेखाचा एक अपवाद सोडला तर इतर शिलाशासनातून कोठेही राजाचे नाव दिलेले नाही. मास्कीचे शिलाशासन १९१५ मध्येही बराच काळपर्यंत सापडलेले नव्हते. या

---

१. या लेखांचे भाषांतर पाचव्या परिशिष्टात, समाविष्ट केलेले आहे. या जागांची केलेली भौगोलिक निश्चिती तिसऱ्या परिशिष्टात दिली आहे.

विषयावरचे पहिले प्रकाशन प्रिन्सेपने केले, त्यालाच आज्ञालेखामधील लिपीचा शोध लावण्याचे श्रेय आहे.

बौद्धधर्माविषयी देणाऱ्या उल्लेखांमुळे प्रिन्सेपने 'देवानम् पियदस्सि' या शब्दांची सांगड श्रीलंकेच्या राजाबरोबर घातली. परंतु यामध्ये अर्थातच काही निश्चित उणिवा होत्या. उदाहरणार्थ आज्ञालेखांचा लेखक असा दावा करतो की भारतामध्ये विहिरी खणण्याचे व रस्ते बांधण्याचे काम आपण केले; परंतु श्रीलंकेचा राजा भारतात अशी कामे करण्यासाठी कशी आज्ञा देऊ शकेल असा प्रश्न पडतो. यानंतर १८३७ मध्येच दीपवंस आणि महावंस या श्रीलंकेच्या इतिहासासंबंधीच्या, बौद्ध भिक्षूंनी रचलेल्या दोन प्राचीन सनावळ्या श्रीलंकेमध्ये अभ्यासिल्या गेल्या. या ग्रंथांमध्ये अशोकाला 'पियदस्सि' हे बिरुद लावले असल्याचे प्रिन्सेपच्या निदर्शनास आणले गेले. यामुळे अशोक हाच या आज्ञालेखांचा लेखक, हा दुवा या नव्या व अचूक पुराव्यामुळे मिळाला.

शहरांच्या जवळ किंवा महत्त्वाच्या व्यापारी व प्रवासी मार्गांवर अगर धार्मिक केंद्रे आणि धार्मिक महत्त्वाच्या जागांचे परिसर अशा मोक्याच्या जागांवर हे लेख कोरून ठेवले गेले. या लेखांचा हेतू अर्थातच हे आज्ञालेख शक्य तितक्या जास्तीत जास्त लोकसमूहांपर्यंत जाहीरपणे पोहोचावेत हाच होता. दीर्घ आज्ञालेख शिलांवर कोरण्यासाठी नेहमीच मोठी व सपाट शिला लागत असे. काही महत्त्वाच्या घटनांच्या स्मृतीसाठी स्तंभ उभारले गेले असावेत. दुर्दैवाने काही स्तंभ त्यांच्या मूळच्या जागेपासून हलवले गेले आहेत. टोप्रा व मीरत येथील स्तंभ फिरोजशहा तुघलक[1] याच्या कारकिर्दीत दिल्लीला आणण्यात आले. त्यावरील लिपी ज्ञात नसल्याने त्या चमत्कृतिजनक वस्तू म्हणून मानल्या जात असत. अलाहाबादचा स्तंभ मुळात कौशांबीला असावा असे मानले जाते.[2] बैराटचा कोरीव लेख कनिंगहॅमने कलकत्त्याला हलवला.[3] यामुळे वस्तूंच्या परिसराच्या संदर्भात अभ्यास करण्यास प्रतिबंध होतो व पुरातत्त्वशास्त्राच्या दृष्टीने ही खेदजनक बाब आहे.

ह्यूएन्त्संग या चिनी बौद्ध यात्रेकरूने, इसवी सनाच्या सातव्या शतकात भारतात प्रवास करीत असताना, राजगृह, श्रावस्ती व इतर ठिकाणी पाहिलेल्या

---

१. इलियट–डाऊसन, **हिस्ट्री ऑफ इंडिया,** व्हॉल्युम तीन, पृ. ३५०, तळटीप.

२. **सीआयआय,** व्हॉ. एक, पृ. एकोणीस.

३. उपरोक्त पृ. पंचवीस.

स्तंभांचा उल्लेख आपल्या वृतांतामध्ये केलेला आहे. यांपैकी काही स्थापत्य-शास्त्राच्या दृष्टीने महत्त्वाचे होते तर काहींवर राजाचे आज्ञालेख होते. यांच्यापैकी कोणताच स्तंभ अजूनपर्यंत सापडलेला नाही.[1] कदाचित आणखीही काही न सापडलेले स्तंभ असू शकतील. इसवी सनाच्या चौथ्या शतकात, बौद्धधर्मग्रंथ गोळा करण्यासाठी भारतात हिंडणाऱ्या फा-हियान या दुसऱ्या एका चिनी भिक्षूने सांकस्या येथील शीर्षसिंह असलेल्या स्तंभाचे व पाटलिपुत्राच्या परिसरातील एका कोरीव स्तंभाचे वर्णन केलेले आहे.[2] यांपैकी कोणताही स्तंभ अजूनपर्यंत सापडलेला नाही. आज्ञालेखांचा मार्गदर्शन करण्याचा हेतू लक्षात घेता अशी बरीच शक्यता दिसते की दगडाखेरीज लाकडासारख्या नाशवंत वस्तूंचाही उपयोग आज्ञालेख कोरण्यासाठी केला गेला असावा व ते आज्ञालेख मौर्यसाम्राज्याच्या सर्व भागात गेले असावेत. इतर प्रकारचे पृष्ठभागही अनेक प्रती करण्यासाठी नक्कीच वापरले असावेत पण ते आता नष्ट झालेले आहेत.

उत्तरेतील मानसेहरा व शाहबाझगढी येथील दोन दीर्घ शिलाशासने पर्शियन अॅरेमिक यापासून बनलेल्या खरोष्ठी लिपीमध्ये कोरलेली आहेत, कंदहारमध्ये अगदी अलिकडे सापडलेला लेख द्वैभाषिक असून ग्रीक व अॅरेमिक भाषांमध्ये कोरलेला आहे, बाकीचे सर्व, दख्खनच्या दक्षिण भागातीलही लेख ब्राह्मी लिपीत आहेत. संस्कृत व प्राकृत लिखाणासाठी वापरण्यात येणारी भारतातील ही ज्ञात असलेली सर्वांत प्राचीन लिपी आहे. सम्राटाचे आज्ञालेख आपल्या सर्व साक्षर, प्रजाजनांनी वाचावेत अशी त्याची इच्छा होती हेच स्थानिक लिपीच्या वापरावरून दिसून येते. कंदहारच्या कोरीव लेखाचा अपवाद सोडल्यास प्रत्येक आज्ञालेखातील भाषा ही अशोककालीन प्राकृत आहे. स्थूलमानाने तिचे पूर्वेकडची व पश्चिमेकडची प्राकृत भाषा असे प्रादेशिक भेद आहेत. संस्कृतसारख्या सस्कृतीच्या भाषेऐवजी प्राकृतसारख्या लोकभाषेचा वापर अशोकाने सातत्याने करावा ही गोष्टही या ठिकाणी लक्षात घेण्याजोगी आहे.

अशोकाचे नसलेले, परंतु मौर्यकालाशी प्रत्यक्ष संबंध असलेले असे इतर कोरीव लेख आहेत, त्यांच्यापैकी तक्षशिला येथील 'प्रियदर्शि' कोरीव लेखाचा

---

१. दि लाईफ ऑफ ह्यूएन त्संग बाय शमन हुइलि, बुक तीन (भाषां. बील पृ. ९३)

२. गाइल्स, ट्रॅव्हल्स ऑफ फा-हियान् पृ. २५, ४८.

उल्लेख करता येईल.[1] तक्षशिलेच्या उत्खननात मौर्योत्तर पातळीवर सापडलेला ॲरेमिकमधील हा कोरीव लेख सिर्कप येथील एका घराच्या भिंतीत बसवलेला आढळला. 'प्रिय...' या राजप्रतिनिधीमुळे वा राज्यपालामुळे ज्याची भरभराट झाली अशा रोमैदौतें या एका उच्चपदस्थ अधिकाऱ्याच्या गौरवार्थ हा लेख कोरलेला आहे. राजप्रतिनिधीसाठी वापरलेल्या बिरुदावरून, अशोक स्वतःसाठी वापरीत असलेले 'प्रियदर्शि' हे बिरूद सूचित होत असले तरी या लेखातील उल्लेख अशोकासंबंधीच असेल याची खात्री देता येत नाही.[2]

लंपक किंवा लंघन (जलालाबादजवळ काबूल नदीच्या उत्तरेकडील तीरावरचे ठिकाण) येथे सापडलेला एक अर्धवट कोरीव लेख हा अशोकाच्या आज्ञालेखाचा एक भाग असावा असे साधारणतः मानले जाते.[3] हा ॲरेमिकमध्ये लिहिलेला असून प्रादेशिक भाषेचा वापर करण्याच्या अशोकाच्या धोरणात हे बसण्याजोगे आहे. या लेखातील तीन शब्दसमुच्चयांवरून अशोकाच्या आज्ञालेखाचाच तो भाग असावा असे दिसते.

गोरखपूर जिल्ह्यातील सोहगौरा येथील ताम्रपटावरील कोरीव लेख व बोग्रा जिल्ह्यातील महास्थान येथील कोरीव लेख हे दोन्ही अशोककालीन प्राकृतात असून इ. स. पू. तिसऱ्या शतकातील ब्राह्मी लिपीत कोरलेले आहेत.[4] दुष्काळामध्ये मदतीसाठी कोणते उपाय योजावेत यासंबंधीचा मजकूर या लेखांमध्ये आहे. आम्हाला असे वाटते की मौर्यांच्या सुरवातीच्या काळातील हे लेख असावेत व बहुधा ते चंद्रगुप्ताच्या कारकिर्दीत लिहिले गेले असावेत. त्याच्या कारकिर्दीतील एका दुष्काळाच्या उल्लेखाला जैन ग्रंथावरून पुष्टी मिळते. तसेच सोहगौरा ताम्रपटावरील चिन्हे व जो आहत नाणी मौर्यांच्या सुरवातीच्या काळातील मानली जातात त्यांच्यावरील चिन्हे परस्परांशी बरोबर जुळतात. याशिवाय अशोकाचा नातू दशरथ याचे नागार्जुनी टेकडीतील तीन गुहालेख आणि मौर्यांचा प्रासंगिक उल्लेख असलेला इ. स. १५० मधील रुद्रदामनचा जुनागडचा शिलालेख यांचा उपयोग या कालासाठी आधारभूत साहित्य म्हणून करता येण्याजोगा आहे. या पुस्तकात त्यासंबंधीची विस्तृत चर्चा पुढे होईलच.

---

१. मार्शल, **तक्षशिला**, व्हॉ. एक. पृ. १५

२. दुसरे प्रकरण पाहा.

३. हेनिंग, **बी एस् ओ एस्**, तेरा, १९४९, भाग एक, पृ. ८०

४. सिरकार, **सिलेक्ट इंस्क्रिप्शन्स**.... पृ. ८२, ८५

पुरावे मिळण्याच्या दृष्टीने धार्मिक आधारग्रंथांमध्ये बौद्ध वाङ्मय सर्वात जास्त महत्त्वाचे आहे. भारतीय बौद्ध ग्रंथांमधील जातककथा या केवळ मौर्यकालाशी प्रत्यक्षपणे संबंधित आहेत म्हणून उपयोगाच्या आहेत असे नाही, तर बौद्धकालातील सामाजिक आणि आर्थिक परिस्थितीचे सर्वसाधारण चित्र त्यांच्यामधून उभे राहते म्हणून त्या उपयोगी आहेत, कारण मौर्यकालातील परिस्थितीतही तेच ठळक प्रवाह चालू राहिले. बौद्धकल्पनांचा राजकीय क्षेत्रात कितपत प्रभाव पडलेला होता हे ठरवण्याच्या दृष्टीने 'दीघ निकाय'सारखे बौद्ध धर्मग्रंथांचे काही विभाग महत्त्वाचे आहेत. उदाहरणार्थ चक्रवर्तिन (विश्वाचा सम्राट) ही संकल्पना म्हणजे राजकीय कल्पना आहे का, या प्रश्नाचा निर्णय. असे निर्णय घेण्याची प्रक्रिया वरवर दिसते त्यापेक्षा जास्त गुंतागुंतीची आहे कारण अशा आधारांची अजून कालनिश्चिती झालेली नाही हे अवधान मनात सतत बाळगावे लागते. चक्कवत्तिसीहनादसुत या ग्रंथातील एका चक्रवर्तीची हकिगत अशोकपूर्व असावी आणि तिच्यामुळे अशोकाला साम्राज्यसत्तेची प्रेरणा मिळाली असावी की उलट अशोकाच्या राजकीय सामर्थ्यामुळे बौद्ध विचारवंतांना चक्रवर्तिन या कल्पनेची स्फूर्ती मिळाली असावी हा एक वादग्रस्त मुद्दा आहे.[१]

श्रीलंकेमधील सनावळ्या, विशेषतः **दीपवंस** व **महावंस** यांचाही आधारसाहित्य म्हणून उपयोग करता येण्याजोगा आहे, कारण अशोकाने बौद्धधर्माच्या प्रसारासाठी, विशेषतः तो श्रीलंकेमध्ये नेण्यासाठी जी कामगिरी केली तिचे सविस्तर वर्णन हे ग्रंथ देतात. परंतु सनातनी बौद्धदृष्टिकोनातून अशोकाचे वर्णन करणाऱ्या श्रीलंकेच्या बौद्धभिक्षूंनी या सनावळ्या लिहिलेल्या आहेत. त्यामुळे येथेही काळजी घेणे जरूर आहे. इ. स. पू. तिसरे शतक ते इ. स. चे चौथे शतक या कालात **दीपवंसांची** रचना झाली आहे व **महावंस** हा अधिक पद्धतशीर ग्रंथ इसवी सनाच्या पाचव्या शतकात लिहिला गेला आहे असे मानले जाते.[२] सुमारे इ. स. च्या दहाव्या शतकात लिहिल्या गेलेल्या **वंसत्थपकासिनी** या महावंसांवरील टीकाग्रंथामध्ये इतरांकडून दुर्लक्षित झालेल्या अगर इतर वाङ्मयातून लुप्त झालेल्या मौर्यांविषयींच्या अनेक आख्यायिका समाविष्ट करण्यात आलेल्या आहेत. अर्थात यांच्यावरील कोणताही ग्रंथ आमच्या कालखंडाला समकालीन नाही त्यामुळे त्या ग्रंथांमधील कल्पना व स्वरूप यांत फरक पडलेला असणार हे उघडच आहे, परंतु

---

१. **दीघ निकाय**, तीन, पृ. ५८ तळटीप.

२. गायगर, **दि दीपवंस अँड महावंस**, पृ. २६ तळटीप; **गायगर महावंस**, पृ. अकरा.

या ग्रंथांमधून सुरुवातीच्या अनेक कथा जतन करून ठेवल्या असाव्यात. कारण या ग्रंथांचा संबंध परकीय परंपरांशी असल्याने राजकीय वा सामाजिक दडपणात मूळ कथांमध्ये विशेष बदल करून त्याचे स्वरूप बदलण्याची गरज त्यांना भासली नसावी.

**दिव्यावदान** व तत्सम ग्रंथांमधून अशोकाभोवती रचलेल्या कथा आहेत. या ग्रंथांचे जतन भारताबाहेर व प्रामुख्याने तिबेटी व चिनी ग्रंथांमधून केलेले आढळते. त्यांच्यामधील पुराव्यांचा सर्वस्वी वापर करता येणे शक्य नाही, कारण बौद्ध भिक्षूंनी त्यांची पुनर्रचना केलेली आहे आणि अशोकावर बौद्धधर्मीचा किती प्रभाव पडला होता हे स्पष्ट करण्यासाठी या कथांचा उपयोग करून घेण्यात आलेला आहे यात शंका नाही. वाङ्मयातील याच विशिष्ट गटातील आणखी एक आधार म्हणजे सोळाव्या शतकाच्या शेवटी तारानाथ या लामाने लिहिलेला तिबेटचा इतिहास. मौर्यांशी संबंधित असलेल्या काही ऐतिहासिक आख्यायिका यात विपर्यस्त स्वरूपात देण्यात आलेल्या आहेत.

या कालखंडावरील लौकिक वाङमयातील सर्वांत महत्त्वाचा एकमेव आधार म्हणजे कौटल्याचे "अर्थशास्त्र." अर्थशास्त्र हा इसवी सनाच्या तिसऱ्या शतकातील ग्रंथ आहे म्हणून मौर्यकालासाठी आधार या दृष्टीने त्याचा उपयोग करता येणार नाही असे एक मत मांडले गेले आहे. पण आमचा असा विश्वास आहे की मूलतः हे लिखाण मौर्यकालीनच होते.[1] त्याचा लेखक, चंद्रगुप्त मौर्याचा पंतप्रधान अगर सल्लागार होता. जरी या ग्रंथाचे संपादन व पुनर्लेखन नंतरच्या शतकांमधून झालेले असले तरी त्याचा मुख्य भाग आणि सुरवातीच्या प्रकरणापैकी अनेक प्रकरणे निश्चितपणे चंद्रगुप्ताच्या काळात वा त्या सुमारास लिहिली आहेत.

नंतरच्या काळात लिहिल्या गेलेल्या मजकुरातून मूळ मजकूर वेगळा काढणे तितकेसे सोपे नाही. परंतु अर्थशास्त्रात वापरलेल्या संज्ञा व अशोकाच्या आज्ञालेखांमधील संज्ञा याच्यातील साम्य, मौर्य राज्यकर्त्यांना या ग्रंथाचा परिचय होता हेच सूचित करते. त्या कालातील प्रचलित आर्थिक व राजकीय विचारांचे स्पष्ट, पद्धतशीर पृथक्करण व त्याहून विशेष म्हणजे तत्कालीन परिस्थितीतील त्यांचा व्यावहारिक उपयोग या ग्रंथामध्ये स्पष्ट केलेला आहे, यातच या ग्रंथाचे महत्त्व आहे. अशोकाच्या शासकीय उपाययोजनांमध्ये आपण या दोहोंमधील निकट साम्य पाहू शकतो.

पुराणांमध्ये मौर्यराजांच्या वंशावळया समाविष्ट केलेल्या आहेत. धार्मिक

---

१. पहिले परिशिष्ट पाहा.

शिकवण देणाऱ्या आख्यायिकांचे हे संग्रह आहेत. याच्यामध्ये काही जुन्या आख्यायिका आहेत हे निश्चित, परंतु एकंदरीत पुराणांची रचना बरीच उशीराची म्हणजे सुमारे इसवी सनाच्या चौथ्या शतकापासूनची आहे. वारंवार नकलून काढलेली हस्तलिखिते आणि त्यात समाविष्ट होत गेलेला प्रक्षिप्त मजकूर याच्यामुळे राजवंशावलीमधील राजकर्त्यांच्या क्रमाबाबत बराचसा गोंधळ उडतो.

इतर वाङ्मयीन साधनांमध्ये, या काळात अगर त्या सुमारास भारताला भेट देणाऱ्या प्रवाशांच्या मतांची माहिती मिळते. ग्रीक व लॅटिन भाषांमधील प्राचीन वाङ्मयातून हे वृत्तांत गोळा केलेले आहेत. यामध्ये सेल्युक्स निकेटरचा (इराण आणि बाबिलोन येथे राज्य करणाऱ्या अलेक्झांडरचा वारस) मित्र मेगॅस्थिनिस याचा वृत्तांत सर्वात महत्त्वाचा आहे. त्याने चंद्रगुप्ताच्या दरबाराला भेट दिली होती आणि पाटलीपुत्र या राजधानीच्या शहरी तो काही काळ राहिलेला होता. दुर्दैवाने त्याचे मूळचे लिखाण उपलब्ध नाही. वेगवेगळ्या प्राचीन ग्रंथांमध्ये त्यातून उद्धृत केलेले उतारे फक्त शिल्लक राहिले आहेत. स्ट्रॅबो आणि डायोडोरस (दोघेही इ. स. पू. पहिल्या शतकातील) तसेच ॲरियन (इसवी सनाच्या दुसऱ्या शतकातील) यांच्यासारख्या पुढील काळातील ग्रीक लेखकांनी मेगॅस्थिनिसच्या लिखाणातील उतारे दिले आहेत. इसवी सनाच्या पहिल्या शतकात लिहिणाऱ्या प्लिनीने आपल्या लॅटिन ग्रंथात मेगॅस्थिनिसच्या वृत्तांताचा उपयोग केलेला आहे. यामुळे साहजिकच उताऱ्यांच्या रूपाने मिळणाऱ्या या वृत्तांताची विश्वसनीयता काहीशी कमी होते. कारण मूळ ग्रंथामधील उतारे देत असता लेखकाच्या व्यक्तिगत पूर्वग्रहांचा काही ना काही भाग निःसंशयपणे त्यात शिरण्याचा संभव असतो.

वाङ्मयीन पुराव्याचा विचार करीत असता ते कशा प्रकारे हाताळावेत यासंबंधी काही विचार मांडणे जरुरीचे आहे. अनेक समकालीन साधने कालौघात नष्ट तरी झालेली असतात किंवा प्रकाशात तरी आलेली नसतात. हे लक्षात ठेवले पाहिजे. अनेक अज्ञात कालविभागांची परिश्रमपूर्वक अभ्यासाने छाननी करून अगर नवे संशोधन करून जुळणी करावी लागते. काही साधनांच्या साहित्यिक शैलीमुळे समस्या निर्माण होतात. उदाहरणार्थ, अर्थशास्त्राची रचना सूत्रबद्ध पद्धतीने झालेली आहे. कमीत कमी शब्दांचा वापर केलेला आहे. त्यामुळे साहजिकच वाक्यांचे अर्थ लावताना गोंधळ उडतो.

अतिप्राचीन काळातील लिखाणामधील विशेष संज्ञांचे भाषांतर कसे करावयाचे, ही सर्वच इतिहासकारांपुढे निर्माण होणारी समस्या आहे. संदर्भानुसार

शब्दांचे अर्थ वेगळे होतात आणि कालागणिक व समाजागणिक शब्दांचे गर्भितार्थ बदलतात. उदाहरणच द्यावयाचे झाल्यास धर्म या शब्दाचा अचूक पारिभाषिक शब्द इंग्रजीमध्ये नाही आणि इसवी सनपूर्व तिसऱ्या शतकापासून त्या शब्दाचा गर्भितार्थ कितीतरी बदलत आलेला आहे.

लिखाणाच्या अस्सलपणाविषयीची समस्याही तितकीच महत्त्वाची आहे. या बाबतीत इतिहासकारांना भाषाशास्त्रज्ञांची मदत होते. याशिवाय संपूर्ण खात्री पटवण्यासाठी वापरता येण्याजोगे एकमेव साधन म्हणजे इतर साधनांमधून मिळणारा उपोद्बलक पुरावा. या ठिकाणी मेगॅस्थिनिसने केलेले पाटलिपुत्र शहराचे वर्णन आपल्याला उदाहरणादाखल घेता येईल. तो म्हणतो, 'या शहराभोवती लाकडी तटबंदी होती.' पुरातत्त्वीय उत्खननामुळे पटना शहराजवळच्या लाकडी तटबंदीचे अस्तित्व सिद्ध झाले आहे. जेव्हा असा उपोद्बलक पुरावा उपलब्ध होऊ शकत नाही तेव्हा उपलब्ध माहितीची चिकित्सापूर्वक छाननी करून खोटया वाटणाऱ्या माहितीपासून संभाव्य सत्य वेगळे काढण्याचा प्रयत्न करीत राहणे हाच मार्ग इतिहासकारांपुढे राहतो.

लिखाण कोणत्या उद्देशाने झालेले आहे याचे भान विशेष करून राखले पाहिजे. जर ते लिखाण एखाद्या विशिष्ट मताच्या प्रचारासाठी झाले असेल तर असे भान राखण्याकडे दुर्लक्ष करूच नये. अशोकाची बौद्धधर्मावरील निष्ठा दाखविण्यासाठी जे बौद्धग्रंथ लिहिले गेले आहेत त्यावरून अशोक संपूर्णपणे बौद्धसंघाच्या[१] आहारी गेलेला होता यावर आपल्याला विश्वास ठेवावा लागतो. पण त्याचे स्वत:चे आज्ञालेख दुसरेच काही सूचित करतात.

ग्रीक लोक भारताला परके होते, त्यामुळे त्यांनी या देशाकडे व येथील चालीरीतींकडे परक्याच्या नजरेने पाहिलेले आहे, ही गोष्ट ग्रीक साधनांच्या बाबतीत लक्षात ठेवली पाहिजे. त्यांच्या लिखाणात काहीसा भीतियुक्त आदराचा व गोंधळाचा भाग दिसतो. परंतु त्याचा फार गंभीरपणाने विचार करण्याची गरज नाही. परकीयांच्या नजरेतून लिहिलेल्या माहितीचा ते उपयोग करीत असल्याने एखाद्या प्रश्नाची तात्त्विक बाजू आणि व्यावहारिक बाजू यांची गल्लत होण्याची काही वेळा शक्यता आहे. मेगॅस्थिनिसचे भारतातील सात जातींचे वर्णन, हा मुद्दा स्पष्ट करणारे आहे.

---

१. 'संघ' याचा शब्दश: अर्थ 'समाज' असा आहे. भिक्षूंचा दर्जा ठरवण्याच्या बौद्धांच्या पद्धतीला दिलेली ती एक अधिकृत संज्ञा आहे. सुरुवातीच्या काळात त्याची घटना बरीचशी लोकशाही स्वरूपाची होती.

मौर्यकालासंबंधीच्या वस्तुरूप साधनांमध्ये आपल्याला बऱ्याच मोठ्या प्रमाणावर नाणकशास्त्रीय पुरावा मिळतो. पुरातत्त्वीय पुराव्यांमध्ये उत्खननातून प्रतीत होणारे कलाकौशल्य व कलावस्तू मिळतात. पहिल्या प्रकारात प्रामुख्याने चांदी व तांबे यांची नाणी व चांदीच्या चिपांची नाणी मोडतात. बॅक्ट्रियन ग्रीकांच्या आगमनापर्यंतच्या मौर्यकाळात ही नाणी व्यवहारात वापरली जात असावीत असे दिसते. वायव्य भारत, गंगेचे खोरे आणि दख्खनच्या पठाराचा उत्तर परिसर या भागांमध्ये प्रामुख्याने ही नाणी वापरली जात.[१] भारतातील उपलब्ध असलेल्या नाण्यांपैकी ही सर्वांत प्राचीन असून त्यांवरील प्रतीके ही अधिकृत चिन्हे होती, हे आता बऱ्याच अंशी निश्चितपणे सांगता येणे शक्य झाले आहे.

तक्षशिला येथे दीर्घकाल उत्खनन केले गेले. गेल्या पंधरा वर्षांमध्ये वायव्य भारतात व गंगेच्या खोऱ्यात चालू असलेल्या उत्खननांची त्यात भर पडत आहे. अनेक ठिकाणी मौर्यपूर्व थरापर्यंत उत्खनन केलेले आहे. इतर अनेक वस्तूं-प्रमाणेच मातीच्या भांड्यांच्या प्रकाराचाही सांस्कृतिक क्रम निश्चित करण्यास उपयोग होतो. या प्रकारामध्ये, अगदी दक्षिणेकडचा भाग अपवादादाखल सोडला तर इतर भागांमध्ये सर्वत्र सापडलेला, उत्तरेकडील काळ्या चकचकीत भांड्याचा प्रकार नजरेला विशेष सुखावणारा आहे.

पुरातत्त्वीय पुराव्याप्रमाणेच संबंधित वस्तूही पुराव्यासारख्या असतात. काही इतिहासकार त्यांना कलांचे अवशेष असे नाव देतात. यामध्ये शीर्षासाठी जना-वरांच्या प्रतिकृतीचा उपयोग केलेले स्तंभ असून त्यांच्यापैकी काहींवर आज्ञालेख कोरलेले होते. यांमध्ये रामपूर्वा, लौरिया–नंदनगढ येथील एकच सिंहाकृती असलेल्या स्तंभशीर्षांचा समावेश होतो. बसाढ येथील कोरीव कामविरहित स्तंभही याच प्रकारात मोडतो. रामपूर्वा येथील दुसऱ्या एका स्तंभावर एकच वृषभ असून त्यावरही कोरीवकाम नाही. सारनाथ व सांची येथील स्तंभशीर्षांवर चार सिंह आहेत. एका स्तंभशीर्षावर हत्ती आहे, तो बहुधा संकिस्य येथील स्तंभावरील असावा. धौली येथील शिळेत कोरलेला हत्ती व कालसी येथील शिलापृष्ठावर रेखाटलेला हत्ती या दोनही कृती अशोककालीन असाव्यात असे मानले जाते.

इतके विविध प्रकारचे पुरावे उपलब्ध असल्यामुळे अनेक इतिहासकारांना मौर्य-कालावर लिहिण्याचा मोह व्हावा यात आश्चर्य वाटण्याजोगे काही नाही. हे ऐति-

१. गुप्ता, **बिब्लिओग्राफी ऑफ द होर्डस ऑफ पंचमार्कड कॉईन्स इन एन्शंट इंडिया.**

हासिक संशोधन विपुल प्रमाणावर झालेले असले तरी इतर इतिहासकारांच्या, नवे अर्थ लावण्याच्या प्रयत्नांना त्याचा प्रतिबंध होऊ नये असे आम्हास वाटते. कारण मौर्यकालासंबंधी अजूनही अनुत्तरित राहिलेल्या अनेक प्रश्नांची उत्तरे मिळवण्यात त्यामुळे यश मिळू शकेल. इतिहासासंबंधीच्या दृष्टिकोणांत वैविध्य असल्यामुळे, ज्ञात घटनांचा संपूर्ण साधार पुनरार्थ लावता येईल असा आम्हाला विश्वास वाटतो. हे वैविध्य असणे शक्य आहे असे नव्हे तर त्याची आवश्यकताही आहे, कारण इतिहास हा एक जिवंत अभ्यासविषय आहे, आणि जर कोणतेही पृथक्करण साधार केलेले असेल तर असे प्रत्येक नवे पृथक्करण त्या विषयासंबंधीच्या ज्ञानात भरच घालते. केवळ इतिहासाच्या पद्धतीच्या मर्यादितही महत्त्व देण्याच्या पद्धतीत फरक पडला तरी खरे पृथक्करण करणे शक्य आहे.

अशोक राज्यावर येण्यापूर्वीच्या घटनांची पुनर्रचना केल्यामुळे उपयुक्त पार्श्वभूमी मिळेल व वर्णनातही सातत्य राखले जाईल. कौटल्य या ब्राह्मणाने नंदाचा उच्छेद केल्यानंतर त्या जागी मौर्य आले असे पुराणांनी वर्णन केले आहे.[१] मौर्यांचा उदय तौलनिक दृष्टचा काहीशा अनिश्चित व हलक्या परिस्थितीमधून झाला असावा असे दिसते. त्यामुळे त्यांच्या कुळाविषयी विविध आख्यायिका निर्माण झाल्या असाव्यात. एका नंद राजाची पत्नी व पहिल्या मौर्याची आजी वा आई मुरा हिच्या नावावरून या कुळाचे नाव मौर्य पडले असे एक आख्यायिका सांगते.[२] जरी पुराणांनी मौर्यांचे वर्णन शूद्र प्रायास्त्व अधार्मिकाः, 'प्रामुख्याने शूद्र व अधार्मिक' असे केलेले असले तरी या दोन राजघराण्यांचा संबंध पुराणे जोडीत नाहीत. त्याचे संभाव्य कारण हेच दिसते की नंदघराणे शूद्र होते.[३] जरी प्राचीन युरोपीय लेखकांनी चंद्रगुप्त हलक्या कुळातील मनुष्य होता असे वर्णन केलेले असले तरी त्यांना ज्ञात असलेल्या शेवटच्या नंदराजाशी, धनानंदाशी ते त्याचा संबंध जोडीत नाहीत.[४]

बौद्ध लेखकांनी बुद्ध ज्या जमातीमधील होता त्या शाक्य जमातीशी या राजघराण्याचा संबंध जोडण्याचा प्रयत्न केला आहे.[५] ज्या प्रदेशातून ते आले

---

१. पार्गिटर, **डायनॅस्टिज ऑफ दि कलि एज्**, पृ. २६

२. धुंडिराज, **कॉमेंट्री ऑन दि प्ले मुद्राराक्षस.**

३. पार्गिटर, **डायनॅस्टिज् ऑफ दि कलि एज्**, पृ. २५.

४. जस्टिन, पंधरा, ४.

५. **वंसथ्थपकासिनी**, व्हॉ. एक, पाच पृ. १७९, १८०.

त्या प्रदेशात मोर (संस्कृतमध्ये मयूर व पालीमध्ये मोर) विपुल होते आणि तेथील दगडही मोरांच्या मानांसारखे दिसत असे आपल्याला सांगितले गेले आहे. म्हणून ते मोरीय (मौर्य शब्दाचे पाली रूप) या नावाने ओळखले जाऊ लागले. शाक्यांशी संबंध जोडण्याचा हा प्रयत्न लक्षात घेण्याजोगा आहे. कारण त्यामुळे अशोक व त्याचे पूर्वज यांचा सामाजिक दर्जा उंचावतो. शिवाय यामुळे, अशोकाचा समजला जाणारा मुलगा व श्रीलंकेमध्ये प्रथम बौद्धधर्म नेणाऱ्या धर्मप्रचारकांपैकी एक, महिंद याचे आणि बुद्धाचे जास्त निकटचे नाते दाखविता येते.

चंद्रगुप्त उत्तरापथ प्रदेशातील; जर तो तक्षशिलेचा नसेल तर कदाचित गांधारचा असावा असे एक मत मांडण्यात आलेले आहे.[१] त्याचे सुरवातीचे शिक्षण, त्याचे लष्करी शिक्षण व त्याचे जोडलेले मित्र हे सर्व प्रामुख्याने या प्रदेशाशी संबंधित आहेत. मौर्यांनी केलेली खरोष्ठी जाणणाऱ्या लीपिकांची नेमणूक व अखमोनीय परंपरा अनुसरणारे कारागीर या गोष्टी या संबंधाच्या आणखी काही निदर्शक आहेत. आमचे असे मत आहे की तो जरी उत्तरेकडच्या प्रदेशातील असला तरी मगधाशीही त्याचे काही निकट संबंध असावेत व त्यामुळेच तो नंदांचे उच्चाटन इतक्या सहजपणे करू शकला.

इ. स. १५० मधील रुद्रदामनचा जुनागड येथील शिलालेख असे सांगतो की पुष्पगुप्त हा वैश्य, मौर्यराजा चंद्रगुप्त याचा प्रांतिक राज्यपाल होता.[२] पुष्पगुप्त हा चंद्रगुप्ताचा मेहुणा असावा असा उल्लेख असल्याचेही एके ठिकाणी सूचित केले गेले आहे.[३] चंद्रगुप्ताने आपल्या साम्राज्याच्या पश्चिम भागाचा राज्यकारभार पाहण्यासाठी आपल्या मेहुण्याला नेमावे हे व्यवहार्य दिसते. यावरून असेही सुचवता येईल की मौर्यांचे कुळ वैश्य असावे. कारण जरी ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या नावाच्या शेवटी गुप्त हे उपपद वापरले जात असले तरी त्याचा उपयोग वैश्य मोठ्या प्रमाणावर करीत असत. मौर्यांचे कुळ हे तौलनिक दृष्ट्या हलके होते असे सांगणाऱ्या आख्यायिकेशीही हे जुळण्यासारखे आहे.

पुराणे असे सांगतात की, चाणक्य याही नावाने ओळखला जाणारा कौटल्य चंद्रगुप्ताला या देशाचा राजा नेमील.[४] अनेक आधारांवरून आपल्याला असे माहीत

---

१. वाल्आ, आयसी, व्हॉ. दहा, पृ. ३४.

२. एप. इंड, व्हॉ. आठ, पृ. ४२, तळटीप.

३. कीलहॉर्न, एप. इंड, व्हॉ. सात पृ. ४६, नं. ७.

४. पार्गिटर, डायनॉस्टिज ऑफ दि कलि एज. पृ. २५.

आहे की कौटल्य हा नंतर चंद्रगुप्ताचा मंत्री झाला. मगधाच्या सिंहासनासाठी चंद्रगुप्ताच्या सुरवातीच्या प्रयत्नांमागे विचित्र प्रेरणा होती. आणि या संबंधात कौटल्याने केलेल्या कामगिरीवर पुढच्या अनेक शतकांमध्ये अनेक कथा रचल्या गेल्या आहेत.[1] एक राजकारणी व्यक्ती म्हणून झालेला चंद्रगुप्ताचा उदय आणि अलेक्झांडरची स्वारी यांचाही संबंध जोडला जातो. प्राचीन ग्रंथांमध्ये दोघांची एक भेट झाल्याचे सांगितले आहे.[2] अलेक्झांडर परतल्यानंतर वायव्य भारतात निर्माण झालेल्या अराजकामुळे चंद्रगुप्ताला त्या भागात आपले स्थान त्वरेने व परिणामकारक रीतीने प्रस्थापित करता आले.

पुराणे असे सांगतात की मौर्य राजघराणे एकूण १३७ वर्षे टिकेल. राजा म्हणून चंद्रगुप्ताला २४ वर्षे, बिंदुसाराला २५ वर्षे आणि अशोकाला ३६ वर्षे अशी यादी त्यात दिली आहे. यानंतरची यादी अनेक कमी महत्त्वाच्या राज्यकर्त्यांच्या नावांमुळे लांबली आहे.[3] **महावंसाने** राजांची यादी पुढीलप्रमाणे दिली आहे. चंद्रगुप्त २४ वर्षे, बिंदुसार २८ वर्षे, राजाविरहित काळ ४ वर्षे, नंतर अशोक ३७ वर्षे.[4] **दीपवंस** या ग्रंथानेही हीच यादी दिली आहे.[5]

बुद्धाच्या मृत्युदिनाच्या अगर बौद्ध वाङ्मयात ज्याला **परिनिर्वाण** असे संबोधले आहे त्याच्या आधारे मौर्यांचा कालानुक्रम दिलेला आहे. श्रीलंकेमधील

---

१. **वंसथ्थपकासिनी**, व्हॉ. एक, पाच पृ. ८१, तळटीप.

२. प्लुटार्क, **लाईफ ऑफ अलेक्झांडर**, बासष्ट, पृ. ४०३ टार्न, (**अलेक्झांडर दी ग्रेट**, पृ. २७५) यांच्या मते ही आख्यायिका खोटी असावी. आम्हाला असे वाटते की ही भेट झाली असावी पण तिला तात्कालिक महत्त्व नसावे.

३. **राजतरंगिणी** या काश्मिरच्या इतिहासग्रंथात शकुनि हा अशोकाचा पितामह असल्याचे सांगितले आहे. (एक, १०२). याला इतर कोणत्याही साधनांमध्ये पुष्टी मिळत नाही. या इतिहासग्रंथात सुरवातीच्या राजांचा दिलेला वृत्तांत इतका गोंधळात टाकणारा आहे की इतर काही पुरावा मिळाल्याखेरीज हे विधान मान्य करणे कठीण आहे.

४. **पाच**, १६.

५. **पाच**, ९७.

बखरी असे सांगतात की बुद्धाच्या मृत्यूनंतर २१८ वर्षांनी अशोक सिंहासनावर आला.[1] इ. स. पू. ५४४, ४८६ व ४८३ ही तीन वेगवेगळी वर्षे बुद्धाच्या परिनिर्वाणाचे वर्ष म्हणून मोठ्या प्रमाणावर मानली जातात. यापैकी इ. स. पू. ५४४ हे पहिले वर्ष म्हणजे नंतरच्या काळात रचलेली कथा आहे व ती इतर कोणत्याही पुराव्याशी जुळत नाही. श्रीलंकेमधील बखरींनी ते वर्ष इसवी सनाच्या अकराव्या शतकात स्वीकारले.[2] या शतकापूर्वीच्या बखरकारांनी इतर दोन वर्षांपैकी एकाचा उपयोग केलेला दिसतो. कँटनच्या बिंदुयुक्त नोंदीशी इ. स. पू. ४८६ हा काळ जुळत असला तरी साधारणत: इ. स. पू. ४८३ हाच काळ जास्त करून मान्य केला जातो.[3]

फ्लीटचे असे मत आहे की इ. स. पू. ४८३ हा काळ मानण्याचे मूळ भारतात आहे आणि महिंदाच्या आगमनामुळे श्रीलंकेमध्ये तो काळ ज्ञात झाला.[4] या तीन कालाखेरीज इतर कालही सूचित केले आहेत पण त्यांना पुरेसा आधार नाही.

आमच्या दृष्टिकोनातून इ. स. पू. ५४४ या काळाची दखल घेण्याची जरूरच नाही. वर उल्लेखिलेल्या पुराव्यावरून हिशेब केला तर चंद्रगुप्ताचा काळ इ. स. पू. ३८२ हा मिळेल. परंतु तो स्वीकारला तर अलेक्झांडरबरोबर त्याची भेट होणे शक्य नाही. तसेच सेल्युकस निकेटरशीही त्याचा संबंध येणे शक्य नाही. या संबंधाचा आमच्याजवळ निश्चित पुरावा आहे. याशिवाय अशोकाच्या तेराव्या शिलाशासनात दिलेली ग्रीक राजांची नावेही जुळणार नाहीत. त्यामुळे इतर दोन संभाव्य कालावर आधारित कालानुक्रमाचा हिशेब करणे आम्हाला भाग आहे.

---

१. **महावंस**, पाच २१, **दीपवंस**, सहा १.

२. फ्लीट, **जेआरएएस.** १९०९, पृ. ३२३. तळटीप.

३. बुद्धाच्या परिनिर्वाणाच्या प्रत्येक वर्धापनदिनी एक बिंदु देऊन पुढील वर्षातील घटनांच्या नोंदी ठेवल्या जात असे सांगितले जाते. अशा नोंदी करण्याची प्रथा इ. स. ४८९ पर्यंत कँटनमध्ये चालू होती. या बिंदूंची संख्या त्यावेळेपर्यंत ९७५ पर्यंत गेलेली दिसते. त्यावरून इ. स. पू. ४८६ हा परिनिर्वाणाचा काळ मिळतो. (हिस्ट्री अँड कल्चर ऑफ दि इंडियन पीपल व्हॉ. दोन, **दि एज ऑफ इंपिरिअल युनिटी** पृ. ३६)

४. **जेआरएएस्** १९०९ पृ. ३२४, तळटीप.

श्रीलंकेतील बखरींमधील पुराव्यांवरून आपल्याला मौर्यांचे पुढील काळ मिळतात.[1] चंद्रगुप्ताने आपली कारकीर्द इ. स. पू. ३२१ मध्ये सुरू केली. त्याच्या मागून इ. स. पू. २९७ मध्ये बिंदुसार गादीवर आला आणि चार वर्षांच्या राजाविरहित कालखंडानंतर इ. स. पू. २६५ मध्ये अशोकाचा राज्याभिषेक झाला. इ. स. पू. ४८३ हे परिनिर्वाणाचे वर्ष आधारभूत धरून हा हिशेब केलेला आहे. जर आपण इ. स. पू. ४८६ हे वर्ष परिनिर्वाणाचे वर्ष म्हणून मान्य केले तर प्रत्येक बाबतीत हा काळ तीन वर्षे आधीचा मिळतो. अशा प्रकारे चंद्रगुप्ताच्या राज्यरोहणाच्या, इ. स. पू. ३२४ व इ. स. पू. ३२१ अशा दोन संभाव्य कालांचा विचार करणे आम्हाला भाग आहे.[2] यामुळे बिंदुसाराच्या बाबतीतही इ. स. पू. ३०० वा इ. स. पू. २९७ हे दोन पर्यायी काल मिळतात. परंतु अशोकाच्या राज्यारोहणाच्या बाबतीत आपल्याला अनेक संभाव्य तिथी मिळतात कारण बिंदुसाराची कारकीर्द किती वर्षांची होती याविषयी वेगवेगळ्या आधारांमध्ये एकमत होत नाही. २८, २७ व २५ वर्षे असे तीन पर्याय सांगितले आहेत. यांचा मागोवा घेतला व चार वर्षांचा राजाविरहित काळ लक्षात घेतला तर अशोकाच्या बाबतीत इ. स. पू. २७१, २६९, २६८ व २६५ ही संभाव्य वर्षे मिळतात.

इ. स. पू. २७१ हे वर्ष मान्य करता येत नाही कारण अशोकाच्या कारकिर्दीतील वेगवेगळ्या घटनांशी त्याचा मेळ बसत नाही. उदाहरणार्थ ज्या पाच ग्रीक राजांशी अशोकाचा संपर्क होता, त्यांची नावे सांगितलेल्या तेराव्या शिलाशासनातील पुरावा. इतरांच्या पुराव्यांचा परामर्ष घेत असता एगरमाँटने आपल्या अलिकडच्या पुस्तकात एक नवा पुरावा प्रकाशात आणला आहे, तोही लक्षात घेतला पाहिजे.[3] बौद्धधर्मीयांना पवित्र वाटणाऱ्या वेगवेगळ्या स्थळांच्या

---

१. **दीपवंस**, पाच, ८०–८२.

२. अनेक जैन ग्रंथांच्या आधारे इ. स. पू. ३१३ हे वर्षही सूचित केलेले आहे. यामध्ये हेमचंद्राचे **परिशिष्टपर्वन** व नंतरच्या काळातील एक इतिहासकार ट्रोगस याचा पुरावा यांचा समावेश होतो. महावीराच्या मृत्यूनंतर १५५ वर्षांनी चंद्रगुप्त गादीवर आला. या विधानावर (परिशिष्टपर्वन, आठ, ३३९) जैनांची मान्यता आधारलेली आहे. परंतु दुर्दैवाने महावीराच्या मृत्यूचा निश्चित काळ माहीत नाही. शिवाय इ. स. पू. ३१३ या वर्षाचा इतर ज्ञात पुराव्यांशी मेळ बसत नाही हेही आपणास पाहावयाचे आहे.

३. **दि क्रॉनॉलॉजी ऑफ दि रेन ऑफ अशोक मोरीय** पृ. १६५.

तीर्थयात्रेसाठी अशोक गेला आणि या तीर्थयात्रेपूर्वी एक सूर्यग्रहण होते, असे आपल्याला दिव्यावदानात सांगितलेले आहे.[1] रुम्मिनदेइ स्तंभावरील कोरीव लेखावरून हे स्पष्ट होते की अशोक त्याच्या एकविसाव्या वर्षी यात्रेला गेला होता. बौद्धधर्मीयांच्या यात्रेची जी विशिष्ट स्थळे आहेत त्यातील रुम्मिनदेइ (लुंम्बिनी) एक असून त्याच वर्षी त्याने या स्थळाला भेट दिली. ग्रहणाचा काळ इ. स. पू. २४९ असा निश्चित करण्यात आला आहे.[2] राजाच्या तीर्थयात्रेच्या तयारीला लागणारा पुरेसा वेळ लक्षात घेतला तर हे ग्रहण तीर्थयात्रेपूर्वी एक वा दोन वर्षे लागले असावे. या पुराव्यावरून अशोकाचा काळ इ. स. पू. २६६ वा २६५ असावा असे मानणे शक्य नाही. म्हणून आता इ. स. पू. २६९–२६८ या दरम्यानच्या काळात केव्हातरी अशोकाचे राज्यारोहण झाले असे म्हणावे लागते.

आपल्याला आता पुढीलप्रमाणे कालानुक्रम मिळतो.

१) इ. स. पू. ४८६ हे परिनिर्वाणाचे वर्ष गृहीत धरले तर

| | |
|---|---|
| चंद्रगुप्त | इ. स. पू. ३२४ |
| बिंदुसार | इ. स. पू. ३००. मृत्यू इ. स. पू. २७२ (२८ वर्षे कारकीर्द) |
| राजाविरहित काल ४ वर्षे | |
| अशोक | इ. स. पू. २६९–२६८ |
| १३ वे शिलाशासन | इ. स. पू. २५६–२५५ |
| ग्रहण | इ. स. पू. २४९ |

२) इ. स. पू. ४८३ हे परिनिर्वाणाचे वर्ष गृहीत धरले तर.

| | |
|---|---|
| चंद्रगुप्त | इ. स. पू. ३२१ |
| बिंदुसार | इ. स. पू. २९७. मृत्यू इ. स. पू. २७२ (२५ वर्षे कारकीर्द) |
| राजाविरहित काल ४ वर्षे | |
| अशोक | इ. स. पू. २६८ |

दोन्ही कालानुक्रमांच्या पद्धतीनुसार इ. स. पू. २६९–२६८ या अशोकाच्या राज्यारोहणाच्या वर्षाचा मेळ बसतो. जर बुद्धाच्या मृत्यूनंतर २१८ वर्षांनी अशोक सिंहासनावर आला असला व वरील विवेचनावरून आपण जाणतो की अशोकाने

१. सहव्हीस. पृ. ३८०.

२. दुसरे प्रकरण पाहावे.

इ. स. पू. २६९–२६८ मध्ये राज्यारोहण केले, तर इ. स. पू. ४८३ पेक्षा इ. स. पू. ४८६ हेच वर्ष परिनिर्वाणाचे जास्त संभाव्य वर्ष दिसते. याशिवाय पुराणांमधील कालानुक्रमानुसार बिंदुसाराने २५ वर्षे राज्य केले असे गृहीत धरले आणि परिनिर्वाणाचे वर्ष इ. स. पू. ४८६ हे गृहीत धरले तरीही चंद्रगुप्ताचा काळ इ. स. पू. ३२१ याच निष्कर्षाप्रत आपण येतो. पुराणांनी राजाविरहित कालाचा उल्लेख केलेला नाही याची नोंद आपल्याला या ठिकाणी केली पाहिजे.[1] पुराणे या राजघराण्याची एकूण वर्षे आणि व्यक्तिगत राज्यकर्त्यांच्या कारकिर्दीची वर्षे देतात त्यामुळे ही नोंद झाली नसावी. राजाविरहित कालाची नोंद या यादीत नाही. चंद्रगुप्ताच्या जीवनक्रमाच्या दृष्टीकोनातून पाहिले तरी त्याच्या राज्यारोहणाचे जास्त संभाव्य वर्ष इ. स. पू. ३२१ हेच दिसते. तो इ. स. पू. ३२६–३२५ च्या सुमारास अलेक्झांडरला भेटला व याच सुमारास नंदराजाविरुद्ध त्याने बंड पुकारले असे मानले जाते. स्वतःचे स्थान प्रस्थापित करण्याच्या दृष्टीने एखाद्या वर्षात त्याने पुरेसे सैन्यबळ गोळा केले असावे या गोष्टीची शक्यता फारच कमी दिसते. चार ते पाच वर्षांचा काळ लागला असावा हाच संभव जास्त दिसतो.

अलेक्झांडर परतल्यानंतर व विशेषतः इ. स. पू. ३२३ मध्ये त्याचा मृत्यू झाल्यानंतर ग्रीकांची सिंधूच्या खोऱ्यातील सत्ता बरीच कमकुवत झाली. यामुळे उत्तरेकडील राजे स्थानिक राजकारणात गुंतले तर चंद्रगुप्ताने आपले स्थान पूर्वेकडच्या भागात पक्के केले. उत्तरेकडील राज्यांचे सतत विघटन होत राहिल्याने चंद्रगुप्ताला ती राज्ये जिंकून स्वतःच्या मुलखाला जोडण्याची संधी नक्कीच मिळालेली असणार. तेथून बहुधा त्याच्या हालचाली दक्षिणेच्या रोखाने मध्य भारतात सुरू झाल्या असाव्यात. आणि इ. स. पू. ३१३ च्या सुमारास अवंतीच्या आसपासचा मुलुख व्यापला असावा. इ. स. पू. ३०५ मध्ये उत्तरेकडे सरकून त्याने सेल्युकस निकेटर विरुद्ध मोहीम काढली असावी व इ. स. पू. ३०३ मध्ये तह होऊन या युद्धाचा शेवट झाला.

मगधाच्या आजूबाजूच्या प्रदेशातील खेड्यांवर लहान प्रमाणावर हल्ले चढवून मगध मिळवण्याची प्रत्यक्ष प्रक्रिया सुरू झाली असे दिसते. या संदर्भात आपल्याला एक सुप्रसिद्ध कथा ऐकावयास मिळते. ताटामधील भात कडेकडेने खाण्याऐवजी एकदम भातातच मध्यावर हात घालणाऱ्या मुलाला त्याची आई रागावली. यावरून नंदाच्या राज्याचे कडेचे भाग आधी जिंकावेत व नंतर मध्याला

---

१. पार्गिटर, **डायनॅस्टिज ऑफ दि कलि एज्** पृ. २७.

हात घालावा अशी कल्पना चंद्रगुप्ताला सुचली.[1] या साम्राज्याची उभारणी व संघटन प्रामुख्याने शस्त्रसामर्थ्यावर झाले. चंद्रगुप्ताने सैन्याला कसे महत्व दिले होते ते प्राचीन ग्रंथ सांगतात आणि मौर्यांच्या एकूण सैन्य बळाविषयी वेगवेगळे आकडे देतात. असे असले तरी सैन्य उभारणीचा हेतू लक्षात घेता ते सैन्य खूप मोठे असण्याची शक्यता आहे. सेल्युकसशी झालेल्या तहामुळे वायव्य भारतातील काही मुलुख मिळाले. हे मुलुख नेमके कोणते या विषयी खात्री नाही परंतु गेड्रोशिया, अरकोशिया, अरिया आणि पॅरोपॅमिसादे हे भाग जोडले गेले असावेत असे मत मांडण्यात आले आहे.[2]

चंद्रगुप्त भारताच्या ऐक्यासाठी झटत होता, असे विधान काही इतिहासकारांनी केलेले आहे. असे विधान करणे हा पूर्वग्रहाचा परिणाम आहे. त्या कालात संपूर्ण उपखंडात राष्ट्रीयत्वाची जाणीव नव्हती. त्यामुळे असा मुलुख राज्य म्हणून टिकवून धरणे केवळ शासकीय व सैनिकी बळावरच अवलंबून होते. चंद्रगुप्त हा धूर्त राजकीय बुद्धिमत्तेचा पुरुष होता यात शंकाच नाही. अलौकिक बुद्धिमत्ता आणि व्यापक सारासार विवेक असलेल्या सल्लागाराची जोड त्याच्या महत्त्वाकांक्षेला मिळाल्याने तो सुदैवी ठरला.

चंद्रगुप्ताच्या दरबारात पाश्चात्यांच्या राबता बराच असावा असे दिसते. इ. स. पू. ३०३ मध्ये सेल्युकसशी झालेल्या तहामुळे जे विवाहसंबंधातून मित्रत्वाचे नाते निर्माण झाले त्यामुळे सेल्युकसची मुलगी आपल्या परिवारासह पाटलिपुत्राच्या दरबारात उपस्थित राहत असण्याची शक्यता आहे किंवा मौर्यांच्या अधिकाऱ्यांच्या बायका या नात्याने काही ग्रीक स्त्रिया तेथे राहात असाव्यात मेगॅस्थिनिसची पाटलिपुत्राला भेट आणि कदाचित परस्परांच्या दूतांची जा ये सोडली तरी एरवीही नजराण्यांची वारंवार देवघेव होत असल्याचा उल्लेख आहे. या नजराण्यांमधून कडक मादक द्रव्येही पाठवली जात.[3] पाटलिपुत्राच्या नागरी शासनयंत्रणेत परकीय लोकांच्या हितसंबंधांची काळजी घेणारे एक खास मंडळ होते. यावरून तेथे बऱ्याच मोठ्या संख्येने परकीय लोक राहात असावेत असे दिसते.

१. परिशिष्टपर्वन, आठ, २९०–६.

२. स्मिथ, अर्ली हिस्ट्री ऑफ इंडिया, पृ. १५९.

३. ॲथिनियस, एक, ३२, १८ डी.

चंद्रगुप्ताने आपल्या कारकिर्दीच्या अखेरच्या काळात जैनधर्म स्वीकारला अशी एक आख्यायिका परिशिष्टपर्वनमध्ये आलेली आहे.[1] याच ग्रंथात मगधामध्ये सतत बारा वर्षे दुष्काळ पडल्याचा उल्लेख आहे. सोहगौरा व महास्थान येथील दोन्ही लेखांमध्ये दुष्काळाच्या बाबतीत सावधगिरीच्या उपाययोजनांचा जो उल्लेख आहे त्यांचा वरील उल्लेखाशी मेळ बसतो. जैन आख्यायिका पुढे असे सांगते की चंद्रगुप्ताने आपला मुलगा सिंहसेन (बहुधा बिंदुसाराचे दुसरे नाव) याच्यासाठी राज्यत्याग केला आणि भद्रबाहू या जैन साधूबरोबर तो म्हैसूरमधील श्रवण-बेळगोळा येथे गेला. कर्मठ जैनांच्या पद्धतीने, प्रामुख्याने अनशनव्रत घेऊन तो मरण पावला.

पित्याच्या मृत्यूनंतर इ. स. पू. २९७ मध्ये मौर्यांच्या सिंहासनावर आरूढ झालेल्या बिंदुसाराच्या नावाने बौद्ध बखरकरांच्या कल्पनाविलासाला भरपूर वाव दिला आहे. त्याच्या नावात समाविष्ट असलेल्या शब्दांवर कोटी करून त्याच्या जन्मासंबंधी सांगितलेली एक चमत्कारिक कथा आपल्याला ऐकावयास मिळते. चंद्रगुप्ताच्या रोजच्या अन्नात विषाची सौम्य मात्रा मिसळून कौटल्याने त्याला विषप्रतिबंधक बनवल्याचे वर्णन आहे.[2] त्याच्या गर्भवती असलेल्या पट्टराणीने एके दिवशी चंद्रगुप्ताच्या अन्नातील एक घास घेतला. तिला प्रतिबंध करण्यास कौटल्यास फार उशीर झाला, मुलाचे प्राण वाचविण्याचा एकमेव मार्ग म्हणजे राणीचा शिरच्छेद हे त्याने जाणले आणि त्याने तिचे डोके उडवले. एका शेळीच्या गर्भाशयात राणीचा गर्भ ठेवला. हे मूल जन्माला आले तेव्हा त्याच्या अंगावर ठिपके होते म्हणून त्याला बिंदुसार (बिंदु = ठिपका, सार = गंध वा अर्क) हे नाव पडले.

प्राचीन ग्रीक ग्रंथांमधून बिंदुसार 'अमित्रोखातिस' या नावाने ओळखला जातो. अमित्रखाद (शत्रुभक्षक) अगर अमित्रघात (शत्रूला ठार मारणारा) या संस्कृत शब्दांचा ग्रीक अपभ्रंश अमित्रोखातिस असावा.[3] पहिल्या ॲंटिओकसने आपला राजदूत म्हणून डेमॅकसला सॅंड्रोकोट्टसचा मुलगा अमित्रोखातिस याच्याकडे पाठविले होते असा उल्लेख स्ट्रॅबोने केला आहे. टॉलेमी दुसरा फिलॅडेल्फस

---

१. आठ, पृ. ४१५ तळटीप, आणि पृ. एकशेएकवीस.

२. वंसत्थपकासिनी, एक, पाच, पृ. १८७.

३. स्ट्रॅबो, दोन, उतारा २९ पृ. ७०.

(इ. स. पू. २८५–२४७) या इजिप्तच्या राजाकडून एक दूत पाठवला गेला असे प्लिनी सांगतो.[1] हा दूत बिंदुसाराच्या किंवा अशोकाच्या कारकिर्दीत मौर्यांच्या दरबारात होता. इसवी सनाच्या तिसऱ्या शतकातील ॲथिनियस लिहितो की, सिरियाच्या पहिल्या ॲंटिओकसला अमित्रोखातिसने पत्र लिहून मधुर मद्य, सुकी अंजीरे आणि भारतीय दरबारासाठी एक तत्वज्ञानी यांची मागणी केली, असे हेगेसँडरने नमूद केले आहे.[2]

अतिप्राचीन बौद्धग्रंथांमध्ये बिंदुसाराविषयी फारशी माहिती नाही. बौद्धधर्मा-विषयी राजाला उत्साह नसल्यामुळे कदाचित असे झाले असावे. त्याच्या दरबारात एक आजीविक भविष्यवेत्ता होता. अशोक जन्माला आला त्यावेळी, तो राजा होईल असे भाकित त्याने वर्तविले होते. यावरून बिंदुसाराला आजिविकांविषयी जास्त आस्था असावी असे दिसते.[3]

'शत्रूंना ठार करणारा' असे बिंदुसाराला संबोधलेले आहे त्यावरून त्यांच्या कालखंडात अनेक मोहिमा झाल्या असाव्यात असे सूचित होते. त्याच्या कारकिर्दी-विषयी लिखित पुरावे नाहीत त्यामुळे त्याच्या विजयासंबंधीचा तर्क निष्कासनाच्या प्रक्रियेनेच करावा लागतो. मौर्यांनी दक्षिण भारत केव्हा जिंकला यासंबंधीचा काळ अनिश्चित आहे. चंद्रगुप्ताने दक्षिणेकडे मोहीम काढल्याचा उल्लेख कोणत्याही साधनांमध्ये नाही. तामिळ वाङ्‌मयात मौर्यांनी दक्षिण भारत जिंकल्याचा उल्लेख आहे पण त्यात कोणत्याही विशिष्ट राजाचा उल्लेख नाही. एका प्राचीन ख्रिस्ती ग्रंथात, मेगॅस्थिनिसने तगबेन नदीच्या दुसऱ्या तीरावर काही साधू पाहिल्याचा एकमेव उतारा उद्धृत केलेला आहे. मॅकक्रिडलच्या मते ती तुंगभद्रा नदी असावी.[4] जरी हे मत अचूक असले तरी त्यावरून चंद्रगुप्ताचे साम्राज्य त्या भागापर्यंत विस्तारले होते या निष्कर्षाप्रत येण्याची जरुरी नाही. एक प्रवासी म्हणून कदाचित मेगॅस्थिनिसने मौर्यसाम्राज्याच्या बाहेरच्या भागातही प्रवास केला असेल. पुढच्या काळातील फा–हियान व ह्यूएन्त्संग यांच्यासारख्यानी खरोखरच असा प्रवास केला. शिवाय मेगॅस्थिनिसच्या बाबतीत असेही म्हणता

---

१. हिस्ट, नॅच. बुक चार, सी. १७, (२१).
२. ॲथिनियस, तीन, ४४४ आणि चौदा, ६५२–३.
३. दिव्यावदान, सहव्वीस, पृ. ३७० तळटीप.
४. उतारा चोपन्न, स्युडो–ओरिजेन, फिलॉसॉफिया, २४. मॅकक्रिडलने उद्धृत केलेले. पृ. १२०.

येईल की साधूच्या विलक्षणपणाचे त्याला विशेष आकर्षण असल्याने तो त्यांना पाहण्यास उत्सुक असावा यात शंका नाही. चंद्रगुप्ताच्या उत्तरेकडील हालचाली चालू असतानाच दक्षिण विजयासाठी त्याला अवधी मिळणे असंभवीय दिसते.

अशोकाने आपल्या आज्ञालेखांमध्ये फक्त एका मोहिमेचा, कलिंगयुद्धाचा उल्लेख केला आहे.[1] जर दक्षिणेकडे त्याने एखादी मोहीम काढली असती तर त्याने तिचा उल्लेख केला असता. तरीही त्याचे आज्ञालेख आजच्या म्हैसूरपर्यंत, इतक्या दक्षिणेकडे आढळतात. बिंदुसाराने सोळा राज्ये जिंकून आपले साम्राज्य एका समुद्रापासून दुसऱ्या समुद्रापर्यंत वाढविले, असे तारानाथ लिहितो.[2] याचा अर्थ द्वीपकल्पाचा उत्तर भाग, असे सूचित होते. जर चंद्रगुप्ताने राज्यत्याग केल्याची व तो जैन साधू झाल्याची आख्यायिका खरी असेल तर आपल्या साम्राजाच्या बाहेरच त्याने प्रवास केला असण्याची शक्यता जास्त दिसते. एक भ्रमंती करणारा साधू या दृष्टीने त्याची साम्राज्यातील उपस्थिती बिंदुसाराला त्रासदायक ठरली असती.

इ. स. पू. २७३–२७२ या कालाने बिंदुसाराचा मृत्यू पाहिला आणि त्याच्या. मुलांमध्ये सिंहासनासाठी संघर्ष सुरू झाला. तो चार वर्षे चालू होता आणि इ. स. पू. २६९–२६८ मध्ये बिंदुसाराचा उत्तराधिकारी म्हणून अशोकाच्या डोक्यावर राजमुकुट ठेवण्यात आला.



---

१. तेरावे शिलाशासन, ब्लोख, ले एंस्क्रेपसिओं द अशोक, पृ. १२५ तळटीप.

२. गेशिश्टे देस बुधीझमुस् इन इंडिअन, पृ. ८८–८९.

# २ : पूर्वायुष्य, राज्यारोहण आणि अशोकाच्या कारकिर्दीचा कालानुक्रम

अशोकाच्या जन्माविषयी अनेक विलक्षण अनुमाने करण्यात आलेली आहेत. त्यांपैकी सर्वात जास्त संभाव्य असलेले एक अनुमान असे सूचित करते की एक ग्रीक राजकन्या अशोकाची आजी अगर आई असावी. सेल्यूकस् आणि चंद्रगुप्त यांच्यामध्ये झालेल्या करारात जे विवाहविषयक कलम होते ते कागदोपत्री न राहता प्रत्यक्षात आले असेल तरच ही शक्यता आहे.[१] सिल्वा लेव्ही लिहितो, (सेल्यूकसने)—त्याच्याशी (चंद्रगुप्ताशी) विवाहसंबंध जोडून मैत्री केली. त्यामुळे एका ग्रीक राजकन्येचा मौर्यांच्या अंतःपुरात प्रवेश झाला यात शंका नाही.[२] ग्रीक ग्रंथ सँड्रोकोट्टस व अमित्रोचतेस यांच्याविषयी माहिती देतात पण अशोकाविषयी नाही. परंतु जरी असा वैवाहिक स्नेहसंबंध जोडला गेला असला तरी बिंदुसार हा ग्रीक राजकन्येचा मुलगा व म्हणून अशोक तिचा नातू, किंवा बिंदुसाराने ग्रीक राजकन्येशी विवाह केला व अशोक तिचा मुलगा, असे सिद्ध करणारा अजून तरी कोणताही पुरावा नाही. तरीही जर आपण आणखी मागच्या वस्तुस्थितीचा मागोवा घेतला आणि असे गृहीत धरले की सेल्यूकसने स्वतः सरदार घराण्यातील इराणी स्त्रीशी केलेल्या विवाहापासून ही राजकन्या झाली होती, तर वरील अनुमान विचारात घेण्याजोगे आहे.

अशा मैत्रीचा संभव विचारात घेताना साधारणतः असे सुचविले जाते की सेल्यूकसने मौर्यघराण्यात एक राजकन्या दिली. सेल्युकिड घराण्यात मौर्यांनी आपली राजकन्या दिलेली असण्याचीही तितकीच शक्यता आहे. या दोहोंपैकी कोणत्याही प्रकाराने मैत्री झालेली असेल तर सेल्यूकिड राजे आणि अशोक यांच्या नातेसंबंधाचा आपल्याला शोध घेता येईल. इ. स. पू. २६१ मध्ये मरण पावलेला पहिला अँटिओकस हा अशोकाचा चुलत (वा मामे) आजोबा झाला असता. जर अशोकाची आजी वयाने साधारणतः आपल्या भावाएवढी असेल व अशोकाच्या बालवयात ती जिवंत असेल तर डरायस व अलेक्झांडर यांनी गाजविलेल्या पराक्रमाच्या कथा सांगून त्याला तिने स्फूर्ती दिली असेल. दुसरा अँटिओकस व अशोक हे आतेमामेभाऊ झाले असते. परंतु अशोकाने या नात्यांचा कोठेही

---

१. पहिले प्रकरण पाहावे.
२. लेंद सिविलीझात्रीस, पृ. ४८.

उल्लेख केलेला नाही. जर अशी नाती असती तर त्याने तसा उल्लेख केला असता. निदान दुसऱ्या अँटिओकसकडे शिष्टमंडळ पाठविल्याचे ज्या आज्ञालेखात सांगितले आहे तेथे तरी असा उल्लेख केला असता.[1] किंवा ग्रीक ग्रंथकारांनी तसा काही ना काही उल्लेख केला असता. अनेक इतिहासकारांनी अशा नातेसंबंधांची कल्पना निकालात काढली आहे. आम्हाला असे वाटते की जितका सूचित केला जातो तितका प्रत्यक्ष नातेसंबंध नसावा, परंतु काही ना काही संबंध राहिला असण्याची शक्यता आहे. अशोकाच्या धर्मविषयक कल्पनांमध्ये तो पुसटसा दिसून येतो.

अशोकावदान, दिव्यावदान आणि वंसत्थपकासिनी या ग्रंथांमधून अशोकाच्या आईसंबंधी जास्त खात्रीलायक माहिती देणारे पुरावे दिलेले आहेत. यांपैकी पहिल्या ग्रंथात तिला सुभद्रांगी असे संबोधलेले असून, चंपा येथील ब्राह्मणाची ती मुलगी, असे तिचे वर्णन आहे.[2] राजवाड्यातील कारस्थानामुळे तिला राजापासून दूर राहावे लागले परंतु शेवटी ती राजाकडे जाऊ शकली आणि तिला मुलगा झाला. त्यावेळी 'मी दुःखमुक्त म्हणजे अशोक आहे.' असे ती म्हणाली, असे वर्णन आहे. जेव्हा त्यांना दुसरा मुलगा झाला तेव्हा ती त्याला 'दुःख नष्ट झाले' अशा अर्थाने 'वीताशोक' असे म्हणाली.

श्रीलंकेतील ग्रंथांमध्ये या राणीला 'धर्मा' असे म्हटले आहे.[3] दिव्यावदानामधील उल्लेख अशोकावदानातील उल्लेखाशी बराचसा जुळणारा आहे. त्यात तिला जनपदकल्याणी असे संबोधलेले असून त्याच ग्रंथात इतरत्र तिचा सुभद्रांगी असा उल्लेख आहे व चंपा येथील ब्राह्मणाची ती कन्या, असेच वर्णन आहे.[4]

तरुण अशोक दिसण्यात अत्यंत कुरूप होता व आपल्या पित्याला आवडत नव्हता अशी आख्यायिका आहे. परंतु त्याच्या इतर गुणांनी त्याने आपल्या पित्यावर नक्कीच छाप पाडली असावी. कारण त्याच्या पित्याने या तरुण राजपुत्राची उज्जयिनीच्या राज्यपालासारख्या महत्त्वाच्या जागेवर नेमणूक केलेली होती. बहुतेक सर्व वृत्तांतामधून असे सांगितलेले आहे की उज्जयिनीहून तो सरळ पाटलिपुत्राला गेला, त्यावरून असे दिसते की उज्जयिनीचा राज्यपाल म्हणून त्याची नेमणूक होण्यापूर्वी तक्षशिलेमध्ये त्याचे वास्तव्य असावे. राज्यपालपदावर नेमणूक

---

१. तेरावे शिलाशासन
२. प्रझिलस्की, ला लेजांद द लँपेरर अशोक, पृ. ३२०
३. वंसत्थपकासिनी, चार, पृ. १२५, पाच, पृ. १८९, १९३
४. सहव्वीस, पृ. ३६९.

झाल्यामुळे तक्षशिलेत तो काही काल होता, असे काही ग्रंथांमध्ये वर्णन आहे. **महावंस** असे सांगतो की तो उज्जयिनीला राज्यपाल होता तर त्यानंतरच्या कालातील **अशोकसूत्र** व **कुणालसूत्र** हे ग्रंथ असे सांगतात की गांधारमध्ये तो या पदावर होता. आम्हाला असे वाटते की काही खास हेतूने त्याला तक्षशिलेला पाठविण्यात आले होते व तेथील कामगिरी त्याने चांगल्या रीतीने पूर्ण केल्यानंतर त्याच्या कामाचे मोल जाणून त्याला उज्जयिनीला राज्यपाल म्हणून नेमण्यात आले.

उच्चपदावरील अधिकाऱ्यांच्या जुलमी कारभाराला प्रजा त्रासलेली असल्यामुळे, बिंदुसाराच्या कारकिर्दीत तक्षशिलेत एक बंड उद्भवले असे **अशोकावदान** सांगतो.[1] 'मौर्यांचा अंमल सुरू होईपर्यंत तक्षशिला हे तुलनेने स्वतंत्र राज्य होते ही वस्तुस्थिती लक्षात घेतली तर पाटलिपुत्राच्या नियंत्रणाखाली राहणे त्या राज्याला त्रासदायक वाटले असावे, म्हणून असे बंड होणे पूर्णपणे संभवनीय आहे.'[2] सांस्कृतिक दृष्टया पश्चिमेकडील भागांशी तक्षशिलेचा निकटचा संपर्क होता आणि इराणी वंशाची प्रजा आपल्या सुटकेसाठी अजूनही इराणकडे पाहात असणे संभवनीय होते. शिवाय केंद्रीकरणाची प्रक्रिया चालू असताना दूरच्या शहरांच्या बाबतीत मौर्यांनी कडक धोरण अवलंबिले असेल. ही कथा पुढे असे सांगते की अशोकाला त्याच्या पित्याने या बंडाचा उपशम करण्यासाठी पाठविले आणि प्रजेचा संताप फारसा वाढू न देता ते काम त्याने यशस्वी रीतीने पार पाडले.

या आख्यायिकेच्या विश्वसनीयतेला पुष्टी देणारा एकच पुरावा आतापर्यंत मिळालेला आहे, तो म्हणजे तक्षशिलेतील सिरकप येथील एका घराच्या भिंतीत बसवलेला एक ॲरामिक लेख.[3] या लेखातील मजकुराचे वाचन झालेले आहे. रोमेदौते या उच्चपदस्थ अधिकाऱ्याला राजप्रतिनिधी वा राज्यपाल प्रियदर्शि याच्यामुळे बढती मिळाल्याचे त्यात सांगितले आहे. 'प्रियदर्शि' हे वाचन अनिश्चित आहे. प्रिद्र या अक्षरानंतरचा भाग स्पष्ट नाही. या शब्दाचा अर्थ प्रियदर्शि असा लावण्यात आला आहे. हा कोरीव लेख इ. स. पू. तिसऱ्या शतकाच्या प्रथमार्धा-

---

१. प्रझिलस्की, **ला लेजांद द लँपेरर अशोक** पृ. २३२.

२. मार्शल, **तक्षिला**, व्हॉ. एक, पृ. २१.

३. **एप्. इंड.** व्हॉ. एकोणीस, पृ. २५ तळटीप.

तील असावा असे अनेक विद्वानांना वाटते.[१] हा लेख ॲरामिकमध्ये कोरलेला आहे. या भागाचे एकेकाळी अखमोनीय इराणशी अत्यंत निकटचे संबंध होते व त्यामुळे इराणी संस्कृतीचा अजूनही तेथे प्रभाव जाणवत असल्याचे हे निदर्शक आहे.

अशोकाचा मुलगा कुणाल याच्या संदर्भातही हीच कथा सांगितलेली आहे. त्यामुळे ही घटना बिंदुसाराच्या कारकिर्दीत घडली की अशोकाच्या, यासंबंधी शंकेला काही जागा निर्माण झाली आहे. जर कोरीव लेखातील तो शब्द आपण मानतो त्याप्रमाणे खरोखरच प्रियदर्शि असेल तर तो लेख अशोकासंबंधीच असणार याविषयी शंकेला थोडीही जागा नाही. कारण प्रियदर्शि हे त्याचेच नाव होते आणि इतर कोणीही मौर्य ते वापरीत नव्हते हे आपल्याला माहीत आहे.[२] अशा स्थितीत बंडाची ही घटना अशोकाच्या कारकिर्दीत घडली आणि कुणालाला तक्षशिलेला पाठवण्यात आले, हा कथेत झालेला बदल म्हणजे अशोकाशी निगडित असलेल्या कथेचे हेतुपुरस्सर अनुकरण तरी असावे किंवा **अशोकावदनाच्या** लेखकाचा काही गोंधळ झाला असावा.[३]

तक्षशिलेच्या प्रजाजनांचा क्रोध निवळल्यानंतर उज्जयिनीला जाण्यापूर्वी अशोकाने तेथे काही महिने घालविले असावेत. अशोकासारखे गुण आणि अभिरूची असणाऱ्या तरुणाला त्या काळातील तक्षशिला म्हणजे अतिशय आकर्षक शहर वाटत असणार. संरक्षणाच्या दृष्टीने महत्त्वाचे असे राजकीय राजधानीचे शहर, एवढेच या नगराचे महत्त्व नव्हते. मुख्य वायव्य राजमार्गावरील ते शहर होते. तो मार्ग सरळ पश्चिमेकडे जात होता आणि बहुरंगी संस्कृती असलेले ते एक व्यापारी केंद्र होते. याशिवाय विद्येच्या अनेक मोठ्या केंद्रांपैकी ते एक होते.

अशोकाने उज्जयिनीत राज्यपाल म्हणून जो काळ घालवला त्याविषयी श्रीलंकेच्या ग्रंथांमधून आपल्याला बरीच माहिती मिळते. ही माहिती प्रामुख्याने त्याच्या व्यक्तिगत जीवनाविषयी आहे. विदिशेमध्ये एका स्थानिक व्यापाऱ्याच्या कन्येची, सौंदर्यवती देवीची व अशोकाची भेट झाली व तो तिच्या प्रेमात पडला असे वर्णन आहे.[४] **दीपवंसमध्ये** त्यांच्या विवाहाचा उल्लेख नाही परंतु त्याला महिंद व संघमित्ता ही दोन मुले झाली असल्याचा उल्लेख आहे. या दोघांचाही

---

१. सरकार, **सिलेक्ट इन्स्क्रिप्शनस...** पृ. ८१.

२. दुसरे परिशिष्ट पाहावे.

३. प्रझिलस्की, **ला लेजांड द लँपेरर अशोक** पृ. १०६.

४. **महावंस**, तेरा, ६–९, **दीपवंस** सहा, १५–१६.

समावेश श्रीलंकेला पाठविलेल्या बौद्धभिक्षूंच्या शिष्टमंडळात झालेला होता. देवी-संबंधीची कथा बरीचशी खरी असावी कारण अशोकाच्या जीवनांतील घटनांच्या अनुक्रमात त्यामुळे कोणतीही विसंगती दिसत नाही.

श्रीलंकेतील एका ग्रंथात विदिशामहादेवी आणि एक शाक्यानी असा देवीचा उल्लेख केला आहे.[१] विदिशेत येऊन स्थायिक झालेल्या, शाक्य कुळातील एका माणसाची ती मुलगी असे तिचे वर्णन केलेले असल्याने याच ग्रंथात तिला शाक्य-कुमारी असेही संबोधलेले आहे. यामुळे तिचा संबंध बुद्धाच्या कुळाशी जोडता येण्यासारखा आहे कारण तोही शाक्य कुळातीलच होता. देवी आणि शाक्यकुल यांचा संबंध श्रीलंकेतील बखरकारांच्या कल्पनेतून निर्माण झालेला असण्याचा संभव आहे. श्रीलंकेमधील बौद्धधर्माचा पहिला प्रचारक म्हणून ज्ञात असलेला महिंद आणि बुद्धाचे कुल यांच्यात काही दुवा शोधण्याचा त्यांनी प्रयत्न करणे हे साहजिकच होते. देवीचा शाक्यांशी संबंध जोडण्याचा प्रयत्न करण्यापेक्षा ती केवळ विदिशेमधील एका स्थानिक व्यापाऱ्याची कन्या होती हे ग्राह्य मानणे जास्त संयुक्तिक आहे असे वाटते.

ज्यावेळी अशोक राजा झाला त्यावेळी देवीने पाटलिपुत्राला जाण्याऐवजी विदिशेतच राहणे पसंत केले असेही एका कथेत सांगितलेले आहे.[२] त्या काळापर्यंत विदिशा हे बौद्धधर्माचे एक केंद्र झालेले होते. देवी एक धर्मनिष्ठ बौद्ध असल्याने तिने विदिशेतच राहणे पसंत केले असावे असेही एक अनुमान काढले गेलेले आहे.[३] अशोकाने बौद्धधर्माचा स्वीकार करणे व महिंदाने भिक्षू होणे या गोष्टींना ती कारणीभूत होती असे मानले जाते. तिने विदिशेमध्ये मागे राहण्यामागची इतरही काही तितकीच खात्रीलायक कारणे सुचविता येणे शक्य आहे. ती एका व्यापाऱ्याची कन्या होती. त्यामुळे तिचा सामाजिक दर्जा राजमंडळाइतका उच्च नव्हता. तिचा व अशोकाचा विधिवत विवाह झालेला नसल्याने पट्टराणीची कर्तव्ये करू देण्यास तिला प्रतिबंध केला गेला असता. अशोकाच्या राज्यारोहणाच्या वेळी पट्टराणीचा मान मिळविण्यास योग्य अशा उच्च घराण्यातील राजकन्येशी त्याने विवाह करावा अशी अपेक्षा असावी आणि त्याने जेव्हा असंधिमित्ताशी विवाह

---

१. महाबोधीवंस पृ. ११६.

२. महावंसमध्ये अशोकाची पट्टराणी म्हणून देवीचा उल्लेख नसून असंधिमित्ता हिचा उल्लेख आहे. पाच, ८५.

३. सेन, अशोक, पृ. ३२.

केला तेव्हा ती चांगल्या तऱ्हेने पूर्ण झालीही असावी. असंघिमित्ता हे देवीचे नंतरचे अधिकृत नाव असावे हेही संभवत नाही. तसे असते तर अशोक व देवी यांच्या संबंधाचे बरेच विस्तृत वर्णन करणाऱ्या श्रीलंकेतील बखरींनी तसे अवश्य सांगितले असते.

त्या कालाशी संबंधित असणाऱ्या वाङ्मयावरून विदिशा हे बौद्ध धर्माचे महत्वाचे केंद्र असावे असे दिसते. विदिशागिरी येथील विहार देवीच्या प्रयत्नाने बांधला गेला असावा असे मत मांडले गेलेले आहे. सांची व भिलसा येथे बांधण्यात यावयाच्या अनेक स्मारकांपैकी कदाचित हे पहिले स्मारक असावे.[1] दुसरे एक मत असे मांडले जाते की, या भागाशी अशोकाच्या स्मृती निगडीत असल्याने या भागात बौद्धधर्मासाठी बांधकामे करण्यात अशोकाने जास्त आस्था दाखविली.[2]

अशोक आणि देवी यांची कन्या संघमित्ता हिच्यासंबंधीच्या विश्वसनीयतेविषयी काही इतिहासकारांना संशय आहे.[3] तिला दीक्षा देण्यात आली तेव्हा ती अठरा वर्षांची होती असे **महावंस** सांगतो.[4] श्रीलंकेच्या राणीला दीक्षा देण्यासाठी म्हणून ती श्रीलंकेला गेली अशी जी कथा आहे तिच्यात काही अतिशयोक्तीचा भाग आहे हे निश्चितच दिसते. संघमित्ता ही महिंदाची बहीण असेल व तिच्या आईच्या धर्मपरायणतेमुळे तिचे असे विलक्षण नाव (बौद्ध संघाची मैत्रीण) ठेवण्यात आले असेल, परंतु म्हणून तिच्या भावाला दीक्षा देण्यात आली तेव्हा तीही भिक्षुणी झाली व श्रीलंकेच्या स्त्रियांना दीक्षा देण्यात तिने अतिशय महत्वाची कामगिरी बजावली असेलच असे नाही. संघमित्तेविषयी आणखीही एक कथा आहे. अशोकाचा पुतण्या अग्निब्रह्म याच्याशी तिने लग्न केले व त्यांना सुमन हा मुलगा झाला.[5] अशोकाचा सर्वात मोठा भाऊ सुमन हा या मुलाचा चुलत आजोबा. त्याचे नाव या मुलाला ठेवण्यात आले असावे. परंतु अशोकाने आपल्या मुलीचा विवाह तिच्या सख्ख्या चुलत भावाशी लावून दिला असणे शक्य नाही. कारण नित्याच्या

---

१. मुकर्जी, **अशोक**, पृ. ८.

२. सेन, **अशोक**, पृ. ३२.

३. स्मिथ, **अशोक**, पृ. ४८.

४. पाच, २०५.

५. **महावंस**, पाच, १७०, अग्निब्रह्म जर अशोकाचा भाऊ सुमन याचा मुलगा असेल तर त्याच्या मुलाचे, आजोबाच्या मृत्यूनंतर आजोबाचे नाव ठेवले असेल.

अंतर्वैवाहिक नियमांनुसार सख्ख्या चुलत भावंडांचा विवाह वर्ज्य आहे. जर तिचा जन्म विवाहबाह्य संबंधातून झाला असेल तरच ही गोष्ट शक्य होती. अग्निब्रह्म हा अशोकाचा भाचा होता असे म्हणता येईल. त्यामुळे तो अशोकाच्या पत्नीचाही भाचा होतो. म्हणजेच संघमित्ताशी त्याचा नातेसंबंध नसणार. याच पुराव्यामुळे देवी ही अशोकाची राणी नव्हती हेही सिद्ध होते. संघमित्तेच्या विवाहाच्या कथेत विसंगती आहे. त्यामुळे ती श्रीलंकेला गेली होती ही कथाही खोटी ठरते. ती, तिचा पती व तिचा मुलगा या तिघांना दीक्षा देण्यात आली असे आपल्यांला सांगण्यात आले आहे. काही श्लोकांनंतर असे सांगण्यात आले आहे की दीक्षाविधीच्या वेळी ती अठरा वर्षांची होती. म्हणजे सोळाव्या वर्षी तिचा विवाह झालेला असणारच. इतका लहान मुलगा असताना तिला भिक्षुणी होण्यास अनुमती मिळणे असंभवनीय आहे.

महिंदाशी अशोकाचे नेमके नाते कोणते या बाबतीतही काही मतभेद आहेत. महिंद हा अशोकाचा अनौरस पुत्र होता असे श्रीलंकेतील बखरी सांगतात, तर चिनी यात्रेकरू ह्यूएन्त्संग असे सांगतो की महिंद हा अशोकाचा धाकटा भाऊ होता व वीताशोक आणि विगताशोक अशा विविध नावांनी तो संबोधला जाई.[१] स्मिथने दुसरे मत मान्य केले आहे. श्रीलंकेतील भिक्षूंनी ही कथा रचून महिंदाची व पर्यायाने श्रीलंकेची प्रतिष्ठा जास्त वाढविण्याचा आणि एक प्रयत्न केला आहे असे त्याला वाटते.[२] आमचे असे मत आहे की श्रीलंकेतील आख्यायिकेत सत्याचा बराच मोठा अंश असू शकेल. जरी महिंद धाकटा भाऊ असला तरी श्रीलंकेला गेलेल्या शिष्टमंडळाचे नेतृत्व करण्यातील त्याची प्रतिष्ठा होती तीच राहिली असती. तो अशोकाचा मुलगा आहे असा खास शोध लावण्याला काहीच महत्त्व नाही. तो अशोकाचा अनौरस मुलगा असल्याने पाटलिपुत्राच्या राजमंडळात उपेक्षित जीवन जगण्यापेक्षा धार्मिक संघात राहणे जास्त बरे, असे त्याला वाटले असण्याची अगदी शक्यता आहे. देवानम्पिय तिस्स या श्रीलंकेच्या राजावर प्रभाव पाडण्यासाठी अशोकाने महिंदाला श्रीलंकेला पाठविले असण्याची शक्यता आहे. श्रीलंकेच्या या राजाला भारतीय राजाविषयी खूपच आदर वाटत असावा असे दिसते. श्रीलंकेचा राजा देवानम्पिय तिस्स याला आपल्याविषयी वाटत असणारा सुहृद्‌भाव वाढ-विण्यासाठी जरी नाही तरी टिकविण्यासाठी अशोकाने एखाद्या सामान्य भिक्षूला श्रीलंकेला पाठविण्याऐवजी स्वतःच्या मुलाला पाठविले.

---

१. वॅटर्स, ऑन युआन च्वांग्ज ट्रॅव्हल्स इन इंडिया. व्हॉ. दोन, पृ. ९३.
२. अशोक, पृ. ५०.

श्रीलंकेच्या बखरींमधील महिंदाच्या कथेवरून अशोकाने राज्यपाल या नात्याने किती वर्षे काम पाहिले ते काहीसे सूचित होते. **महावंस** असे म्हणतो की दीक्षाविधी झाला तेव्हा महिंद वीस वर्षांचा होता व ही घटना अशोकाच्या कारकिर्दीच्या सहाव्या वर्षी घडली.[1] म्हणजे अशोकाला राज्याभिषेक झाला तेव्हा महिंद चौदा वर्षांचा होता. राजपुत्रांमध्ये वारसासाठी संघर्ष सुरू झाला तेव्हा तो दहा वर्षांचा होता. यावरून असे दिसते की राज्यपाल म्हणून अशोकाने बराच काळ काम पाहिले असावे. महिंदाचा जन्म लवकरात लवकर म्हणजे अशोक वीस वर्षांचा असताना झाला असे जर गृहीत धरले तर अशोक सिंहासनारूढ झाला तेव्हा तो कमीत कमी चौतीस वर्षांचा असला पाहिजे. त्याचे वडील व आजोबा यांच्या कारकिर्दी दीर्घ होत्या या पुराव्याशी या गोष्टीचा मेळ बसतो.

प्रत्यक्ष राज्यारोहणाचा विचार करताना अशोक हा युवराज नव्हता आणि सिंहासनासाठी राजपुत्रांमध्ये संघर्ष झाला या मुद्यावर सर्वसाधारणपणे एकमत झालेले दिसते. **दिव्यावदानात** असे सांगितले आहे की आपल्या सुसीम या मुलाची राजा म्हणून नियुक्ती व्हावी अशी इच्छा बिंदुसाराने मृत्युसमयी व्यक्त केली होती. पण त्याच्या मंत्र्यांनी सुसीमऐवजी अशोकाला गादीवर बसविले.[2] बिंदुसाराचा मुख्यमंत्री राधागुप्त याचा अशोकाला पाठिंबा होता असेही ही कथा सूचित करते. ज्यावेळी बिंदुसाराचे निधन झाले त्यावेळी अशोक उत्तरापथाचा राज्यपाल होता व त्याचे मुख्य ठिकाण तक्षशिला हे होते असे आपल्याला आढळते. तक्षशिला येथे उद्‌भवलेल्या उठावाचा उपशम करण्यात सुसीमला यश आले नाही म्हणून हा उठाव मोडून काढण्यासाठी व सुसीमला बाजूला सारण्यासाठी अशोकाला तेथे पाठविण्यात आलेले होते.[3] ज्यावेळी सिंहासन रिकामे पडले त्यावेळी अशोकाने राधागुप्ताच्या मदतीने ते हस्तगत केले. बिंदुसार मृत्यू पावला त्यावेळी अशोक एका प्रांताचा राज्यपाल होता ही गोष्ट सर्वच ग्रंथांमध्ये सांगितलेली आहे. परंतु त्या प्रांताचे नाव मात्र सर्व ठिकाणी एकच नाही. आपल्या ज्येष्ठ भावाला ठार करण्यास अशोक कारणीभूत होता असे **महावंस** सांगतो. याच ग्रंथात इतरत्र व

---

१. पाच, २०४, २०९.

२. सहवीस, पृ. ३७२, ३७३.

३. दक्षिणेकडील आख्यायिकेमध्ये सुसीम या भावाचा सुमन या नावाने उल्लेख केलेला आहे. **महावंस**, पाच, १५०.

दीपवंसमध्ये असे सांगितले आहे की बिंदुसाराला विविध स्त्रियांपासून झालेल्या नव्याण्णव मुलांना अशोकाने ठार केले.[1]

वरील माहितीचा विचार करताना नव्याण्णव ही भावांची संख्या काल्पनिक दिसत असल्याने ग्राह्य मानण्याजोगी नाही. बिंदुसाराच्या मृत्यूच्या वेळी किंवा त्यापूर्वी काही थोडा काळ सिंहासनासाठी राजपुत्रांमध्ये संघर्ष सुरु झाला. त्यात अशोक गुंतला आणि आपल्याला विरोध करणारे भाऊ त्याला बाजूला सारणे भाग पडले हीच ऐतिहासिक वस्तुस्थिती वरील सर्व माहितीमधून दिसून येते. चार वर्षांचा मध्यंतरकाल व त्या काळात निश्चित झालेला वारस यासंबंधी ही हकिगत आहे. आपले स्थान पक्के झाले अशी अशोकाची खात्री झाल्यानंतरच इ. स. पू. २६९ मध्ये त्याने स्वतःला अधिकृत रीतीने राज्याभिषेक करवून घेतला.

तारानाथच्या म्हणण्यावरून असे दिसते की अशोकाने आपल्या सहा भावांना यमसदनास पाठविले.[2] चंपारणचा राजा नेमित, त्याला त्याच्या विधिवत विवाह झालेल्या स्त्रियांपासून झालेले सहा मुलगे व एका वणिक्कन्येशी असलेल्या विवाहबाह्य संबंधातून झालेला अशोक हा मुलगा यांची गोंधळात टाकणारी कथा या हकिगतीत दिसते. नेमिताविरुद्ध बंड करणाऱ्या खाश्व व नेपाळ येथील लोकांचा अशोकाने पराभव केला आणि पाटलिपुत्र हा मुलुख त्याला बक्षिसी म्हणून मिळाला. नेमित एकाएकी मरण पावला व राज्याच्या अधिकाऱ्यांनी अशोकाला सिंहासनावर बसविले. या गोष्टीस इतर भावांनी विरोध केला म्हणून अशोकाने त्यांना ठार केले व त्यांचा मुलुख बळकाविला. नव्याण्णव या संख्येपेक्षा सहा ही संख्या अर्थातच सत्याच्या जवळची आहे. श्रीलंकेतील ग्रंथांनुसार सर्वात धाकटा भाऊ तिस्स हाच फक्त बचावला. त्याच्याविषयीच्या कथेची चर्चा आपण नंतर करू.[3]

दिव्यावदानात असे वर्णन आहे की, बिंदुसार जिवंत असतानाच पिंगलवत्स या आजीविक साधूने अशोक हाच बिंदुसाराचा सर्वात कर्तबगार मुलगा आहे असे स्पष्ट मत दिले व तोच सिंहासनारूढ होईल असे भविष्य वर्तविले.[4] अशोकाला

---

१. उपरोक्त, २०, ४०, दीपवंस, सहा, २१, २२.

२. गेशिश्ट देस बुधीझमुस् इन् इंडिअन, सहा, पृ. २८.

३. महावंस, पाच, १५०.

४. सहव्वीस पृ. ३७१.

मंत्र्यांचाही पाठिंबा असावा असे दिसते. मगधाचा राजा बिंबिसार (याने अशोकाच्या आधी तीनशे वर्षांपूर्वी राज्य केले होते) या भारतीय राजाविषयीची एक कथा, इत्सिंग या चिनी बौद्ध यात्रेकरूने नमूद करून ठेवलेली आहे.[1] बिंबिसाराने स्वप्नामध्ये कापडाचा एक तुकडा व अठरा विभागात विभागलेली एक काठी पाहिली. या राजाला समकालीन असणाऱ्या बुद्धाने राजाला या स्वप्नाचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे सांगितले. काठीचे अठरा विभाग, बुद्धाच्या स्वतःच्या तत्वज्ञानाच्या, त्याच्या मृत्यूनंतर होणाऱ्या अठरा विचारधारा दर्शवितात. त्याच्या स्वतःच्या परिनिर्वाणानंतर शंभर वर्षांनी अशोक नावाचा राजा सिंहासनावर येईल व संपूर्ण जंबुद्वीपावर[2] राज्य करील व सर्व विचारधारा एकत्र करील. अशोकाच्या मृत्यूनंतर काही शतकांनी बौद्ध जगतात ही आख्यायिका प्रचलित झाली असावी हे स्पष्टपणे दिसून येते.

श्रीलंकेतील साधनांपैकी एका ग्रंथात अशोकाच्या राज्यारोहणाची कथा पाहून अधिक खुलवून सांगितली आहे.[3] बिंदुसाराची पत्नी, अशोकाची आई म्हणजे राणी धम्मा.[4] ती गर्भवती असताना तिला चंद्र आणि सूर्य तुडविण्याचे, ताऱ्यांशी खेळण्याचे, अरण्ये खाण्याचे डोहाळे लागले. नगरातील अनुभवी लोकांना या लक्षणांचा अर्थ काय असावा, हे विचारण्यात आले. धम्मा आजीविक पंथाची उपासक होती, त्यामुळेच कदाचित तिच्या डोहाळ्यांचा अर्थ एका आजीविक साधूला सांगता आला असावा. त्याने असा अर्थ लावला की, सूर्य व चंद्र तुडविण्याचे तिचे डोहाळे म्हणजे तिचा मुलगा भारतातील लोकांना जिंकील व संपूर्ण भूमीवर राज्य करील. इतर इच्छा असे दर्शवितात की त्याला नाराज करणाऱ्या भावांना तो ठार मारील. हाच ग्रंथ पुढे असे सांगतो की अशोकाला

१. ताकासुसु आवृत्ती (१८९६) पृ. १३–१४.

२. सनातन हिंदू विश्वविषयक कल्पनांमध्ये पृथ्वीच्या दक्षिणभागातील खंडाला जंबुद्वीप असे नाव दिलेले आहे.

या भागात मानवी वस्ती होती व याचा दक्षिण भाग म्हणजे भारत.

३. **वंसथ्थपकासिनी**, एक, पृ. १८९.

४. त्याच्या आईचे धम्मा हे नाव कुतूहलजनक आहे. त्याचे स्वतःचे धम्माशोक हे नाव तो धम्माचा मुलगा होता हे ओळखण्यासाठी पडले असावे. सारीपुत्त यांसारखी नावे अशीच पडलेली आहेत. मुळात या नावाचा व त्याच्या पावित्र्याचा काही संबंध नसावा.

शंभर भाऊ होते आणि एकाच भावाला सोडून त्याने सर्वांना ठार केले. याच साधूने असेही भविष्य वर्तविले की, अशोक शहाण्णव पाखंडी धर्मपंथांचा नाश करील व स्वतःला बौद्ध धर्माच्या कार्यासाठी वाहून घेईल.

तक्षशिलेतील बंडाची परिस्थिती हाताळण्यात दिसलेली त्याची कर्तबगारी व उज्जयिनीमधील त्याची राज्यपाल म्हणून यशस्वी झालेली कारकीर्द यामुळे अशोकाला, शासनकर्ता या दृष्टीने त्याच्या स्वतःच्या सुप्त गुणांची जाणीव झाली. त्यामुळे त्याचा सिंहासनासाठी प्रयत्न करण्याचा निश्चय झाला असण्याचा संभव आहे. आजीविक पक्षाच्या साधूचे त्याच्या राजपदासंबंधीचे भाकित, त्याची आई सुभद्रांगी हिला राजापासून दूर ठेवण्यात आल्याची कथा, यासारख्या विविध आख्यायिकांवरून तो राज्याचा रीतसर वारस नव्हता हे स्पष्ट दिसते. स्वतःच्या ज्येष्ठ भावाला अगर इतर भावांना ठार करणे ही कदाचित राजप्रासादातील क्रांतीची नांदी असावी. बौद्ध साहित्यातील भ्रातृहत्येच्या कथेचा उगम यात असावा. बौद्धग्रंथांमधून संख्येच्या बाबतीत जी अतिशयोक्ती केलेली आहे ती समजण्याजोगी आहे. कारण बौद्धधर्माचा स्वीकार करेपर्यंत, नीतीमत्तेचा अंशही नसलेला माणूस, असे अशोकाचे वर्णन करण्याचा प्रयत्न या ग्रंथामधून होणे स्वाभाविकच आहे. पाचव्या शिलाशासनात अशोक आपल्या अधिकाऱ्यांना असे सांगतो की, आपली नित्याची कर्तव्ये पार पाडीत असतानाच त्यांनी त्याचे भाऊ, बहिणी व इतर नातेवाईक यांच्या कुटुंबियांच्या सुखसोयींची काळजी घ्यावी.[1] यावरून त्याचे भाऊ जिवंत असले पाहिजेत हे सूचित होते, परंतु यावर एक आक्षेप असा आहे की यातील उल्लेख केवळ भावांच्या कुटुंबियांसंबंधी आहे. आम्हाला असे वाटते की हा मुद्दा निष्कारण ताणलेला आहे.

महावंसात असे सांगितले आहे की जरी अशोकाने नव्याण्णव भावांचा वध केलेला असला तरी त्याचा सर्वात लहान भाऊ तिस्स याला त्याने जीवदान दिले.[2] तिस्स या त्याच्या सख्ख्या भावाला पुढील काळात राजपालक करण्यात आले. श्रीलंकेतील ग्रंथांमध्ये जरी त्याला तिस्स या नावाने संबोधिलेले असले तरी इतर

---

१. पाचवे शिलाशासन (शहाबाझगढी मजकूर) ब्लोख, ले एंन्स्क्रेपसिओं द अशोक पृ. १०५.

२. पाच, ४५०.

साधनांमध्ये वीताशोक, विगताशोक[1], सुदत्त आणि सुगत्र[2] अशा विविध नावांनी संबोधिलेले दिसते. त्याने सुरवातीचे आयुष्य ख्यालीखुशालीत घालविले व भोवतालच्या जगाची त्याला फिकीर नव्हती असे सांगितले जाते. अशा परिस्थितीत बौद्धधर्माची शिकवणूक मृत्यूच्या भीतीवर इतका भर का देते हे त्याला आकलन होण्याजोगे नव्हते. त्याला धडा शिकविण्यासाठी अशोकाने त्याला काही दिवस सिंहासनावर बसविले आणि नंतर तो राजमुकुट बळकाविण्याचा प्रयत्न करीत असल्याचा आरोप त्याच्यावर ठेवून, सात दिवसानंतर त्याचा वध करावा अशी त्याला शिक्षा दिली. बौद्धभिक्षूंना संभाव्य मृत्यूची कशी जाण असते याची जाणीव त्याला या सात दिवसांत झाली व त्याने ऐषआरामाचा त्याग केला, असे वर्णन करण्यात आलेले आहे. त्याने आपल्या जुन्या सवयी सोडून दिल्या, राजप्रासादाचा त्याग केला आणि तो अर्हत[3] झाला. **महावंस** सांगतो की अशोकाने तिस्स या आपल्या भावाला उपराजा किंवा उपराजपालक म्हणून नेमले परंतु महाधम्म-रक्खित या प्रचारकाचा प्रभाव पडल्याने त्याने धार्मिक श्रद्धेने संन्यस्त जीवन पत्करले.[4] यानंतर तो एकविहारिक या नावाने ओळखला जाऊ लागला. ही कथा वस्तुस्थितीवर आधारलेली असण्याचा संभव आहे. परंतु या कथेत सूचित झाली आहे तितकी साधी परिस्थिती नसेलही. कोणत्याही राजाच्या मार्गात धाकटे भाऊ आडवे येऊ शकतात, विशेषतः अशोकासारख्या मनस्वी राजाला तो संभव जास्त वाटला असावा. अशा परिस्थितीत, भिक्षू होऊन सिंहासनावरच्या हक्काचा त्याग केल्याने अशोकाच्या हातून आपल्याला जीवदान मिळू शकेल, हे त्याच्या धाकट्या भावाला उमगले असावे. अशा भावांना भिक्षू बनण्याची सक्ती करण्याची युक्ती जगातील इतर भागांतही अपरिचित नाही.

---

१. **दिव्यावदान,** अठ्ठावीस, पृ. ४१९ व अठ्ठावीस पृ. ३७०.

२. **प्रझिलस्की, ला लेजांद द लॉंपेरर अशोक,** पृ. २७० तळटीप; **दि ए–यु–वँग–च्वान** हा ग्रंथ त्याचा उल्लेख सो-त-तो (सुदत्त) असा करतो. **दि फेन–पिए–कुन्‍ना–ते–हुन** या ग्रंथात त्याचा उल्लेख सिअ–का–तु–टु (सुगत्र) असा आहे.

३. या शब्दाचा अक्षरशः अर्थ योग्य असा होतो. बौद्धधर्मीयांच्या संज्ञेनुसार ज्या व्यक्तीने निर्वाण प्राप्त करून घेतले आहे व पुनर्जन्माच्या चक्रातून जी मुक्त झाली आहे, अशा व्यक्तीला अर्हत म्हणण्यात येते.

४. **महावंस,** पाच ३३.

थेरगाथेवरील टीकेत ही कथा वेगळ्या स्वरूपात दिसते.[१] आपले सर्वसाधारण नित्य जीवन व्यतीत केल्यानंतर वीताशोकाने आपल्या डोक्यावर एक करडा केस पाहिला. वृद्धापकाळ जवळ येत चालला असल्याचा विचार करून तो मठामध्ये जाऊन राहिला व पुढे त्याने साहजिकच अर्हतपद प्राप्त करून घेतले. या कथेशी साम्य असलेल्या कथा इतर बौद्ध ग्रंथांमधूनही आढळतात.[२] इसवी सनाच्या चौथ्या शतकात लिहिणाऱ्या फा–हियानने हीच कथा निराळ्या रूपात सांगितली आहे आणि त्याचा देशबांधव ह्यूएन्त्संग याने दोन शतकांनंतर त्याच रूपातील कथेची पुनरुक्ती केलेली आहे.[३] महेंद्र हा अशोकाचा धाकटा भाऊ होता व तो दुराचारी तरुण होता असे त्याचे वर्णन आहे. आपल्या भावाचे दुर्वर्तन सहन न झाल्याने अशोकाने त्याची खरडपट्टी काढली. अतिशय शरमिंदा होऊन या तरुण माणसाने क्षमायाचना केली आणि चिंतन करण्यासाठी त्याने एका अंधाऱ्या गुहेत आश्रय घेतला. त्यानंतर तो अर्हत झाला. अशोकाने त्याला परत यावे व आपल्या कुटुंबियांसमवेत राहावे म्हणून सांगितले. परंतु एका टेकडीवर एकांतात राहणे त्याने पसंत केले. याचा परिणाम म्हणून अशोकाने त्याच्यासाठी पाटलिपुत्र येथे एक टेकडी तयार केली. त्यामुळे विजनवासात राहूनही तो जवळ असल्यासारखा वाटला असता.

अशोकाच्या धाकट्या भावासंबंधी आणखी एक हकिगत **अशोकावदानात** देण्यात आलेली आहे.[४] बौद्धमठांमधून राहणाऱ्या सर्व निर्ग्रंथांना[५] ठार मारावे अशी राजाने आज्ञा केली, कारण त्याला ते पाखंडी वाटत होते. गैरसमजुतीमुळे त्याचा धाकटा भाऊही निर्ग्रंथ समजला जाऊन मारला गेला. यामुळे आपल्या आज्ञेतील मूर्खपणाची अशोकाला जाणीव झाली व ती आज्ञा मागे घेण्यात आली. या प्रसंगातील वर्णनाचा भाग जरी बाजूला सारला तरी तो प्रसंग विचारात

---

१. कोलंबो आवृत्ती, १९१८, पृ. २९५, तळटीप.

२. **मज्झिम निकाय**, दोन, ७४.

३. गाइल्स, **ट्रॅव्हल्स ऑफ फा–हियान**, पृ. ४५, वॅटर्स, **ऑन युआन च्वांग ट्रॅव्हल्स इन इन्डिया**, व्हॉ. दोन, पृ. ९४.

४. प्रझिलस्की, **ला लेजांद लँपिरर अशोक**, पृ. २७८.

५. अक्षरशः याचा अर्थ बंधमुक्त असा होतो. मुळात ते जैनपूर्व काळातील साधूंच्या पंथांचे अनुयायी होते. नंतरच्या काळात ही संज्ञा साधारणतः जैन साधूंसाठी वापरली जाऊ लागली.

घेण्याजोगा आहे. सम्राटाला बौद्धधर्माविषयी असलेल्या कळकळीचे चित्रण करण्याच्या प्रयत्नात बखरकारांनी असे दाखविले आहे की सनातनी बौद्धधर्मीयांखेरीज इतरांच्या बाबतीत तो असहिष्णु होता. आपल्या मार्गापासून दूर जाणाऱ्यांविषयी अशोकाने घेतलेला हा संशय आणि त्याच्या स्वतःच्या आज्ञालेखांमधून सहिष्णुतेसाठी त्याने केलेले आवाहन यांचा परस्परांशी मेळ बसत नाही.

आपल्या भावाला निर्वाणाच्या मार्गावर ठेवण्याची अशोकाची इच्छा ही त्याच्या चारित्र्यात नंतर निर्माण झाली असावी. तरुण वयात अशोक अत्यंत दुष्ट होता यावर बौद्धग्रंथांच्या आधारे आपल्याला विश्वास ठेवावा लागतो.[1] उदाहरणार्थ, त्याच्या अंतःपुरातील स्त्रियांनी तो दिसायला अत्यंत कुरूप आहे, असे सांगितले म्हणून त्या सर्वच्या सर्व पाचशेजणींना त्याने जाळले, त्यामुळे त्याला चण्डाशोक (क्रूरकर्मा अशोक) हे नाव मिळाले, असे वर्णन आपल्याला मिळते. अशी कृत्ये राजाने स्वतः करणे योग्य दिसत नाही म्हणून त्यासाठी वेगळा नोकरवर्ग नेमावा असा सल्ला राधागुप्त या त्याच्या मंत्र्याने दिला. पृथ्वीवर नरक निर्माण करण्याच्या कल्पनेचे मूळ या सल्ल्यामध्ये होते. एक खास क्षेत्र त्यासाठी वेगळे राखण्यात आले. अजाण लोकांना सापळ्यात अडकविण्यासाठी व त्याना भयानक यातना देण्यासाठी माणसे व मंत्री यांची योजना करण्यात आली. फा–हियानने या कथेची पुनरुक्ती करून पुढे असे स्पष्ट केले आहे की नरकतुल्य अशा या जागांना अशोक स्वतः भेटी देई व छळ करण्यासाठी स्वतःच्या पद्धती शोधून काढण्यापूर्वी तो तेथील पद्धतींचे निरीक्षण करी.[2] अशोकाच्या ‘नरकाची’ जागा दाखविणारा एक स्तंभ आपण प्रत्यक्ष पाहिल्याचा दावा ह्यूएन्त्संगने केला आहे.[3]

अशोकाने बरीच वर्षे विषयोपभोगात घालविली म्हणून त्याला कामाशोक म्हणत असे वर्णन तारानाथने केले आहे.[4] यानंतरचा त्याचा काही काळ अत्यंत दुष्ट कृत्ये करण्यात गेला त्यामुळे त्याला चण्डाशोक हे नांव प्राप्त झाले. अखेरीस त्याने केलेला बौद्धधर्माचा स्वीकार व त्याचे सद्वर्तन यामुळे त्याला धम्माशोक म्हणण्यात येऊ लागले. दुसऱ्या एका साधनानुसार असे दिसते की, या ‘नरकात’

---

१. प्रझिलस्की, ला लेजांद द लँपेरर अशोक, पृ. २३५.

२. गाइल्स, ट्रॅव्हल्स ऑफ फा–हियान, पृ. ५६.

३. वॅटर्स ऑन युवान च्वांग्ज ट्रॅव्हल्स इन इंडिया, व्हॉ. दोन, पृ. ८९.

४. गेशिश्ट देस बुधीझमुस् इन् इंडिअन, सहा, पृ. २८.

यातना भोगाव्या लागूनही एक भिक्खू स्थिरचित्त राहिला, त्यामुळे अशोकाचे कुतुहल जागृत झाले. भिक्खूच्या या कृत्यामुळे अशोकाच्या प्रत्यक्ष बौद्धधर्म-स्वीकारास चालना मिळाली.[१] **राजतरंगिणीमध्ये** (बाराव्या शतकातील काश्मीरची एक बखर) यांपैकी एकही कथा आलेली नाही.[२] या ठिकाणी, अशोक हा जिनाच्या (म्हणजे बुद्धाच्या) तत्वाचा उपासक होता आणि स्तूप व भव्य चैत्य बांधण्यात मग्न होता, असे त्याचे साधे वर्णन आहे.[३]

एका अत्यंत दुष्ट असलेल्या माणसाचे जीवन अकस्मात सदाचारी झाले हे जे अशोकाचे चित्रण झाले आहे ते बौद्ध लेखकांच्या कल्पनाविलासातून झालेले आहे असे आपल्याला निःशंकपणाने म्हणता येईल. धर्मांतरापूर्वी अत्यंत नालायक असलेला मनुष्य असे त्याचे वर्णन केल्याने एक सदाचारी बौद्ध या दृष्टीने साहजिकच त्याची योग्यता वाढली. त्याचे प्रत्यक्ष धर्मांतर घडून येण्याशी संबंधित असलेल्या घटनांबाबत वेगवेगळ्या साधनग्रंथांचा परस्परांशी मेळ बसत नाही. शिवाय जर या भिक्षूंच्या म्हणण्याप्रमाणे दुष्टपणा त्याच्या अंगात खोलवर भिनलेला असेल तर त्याच्या तरुण वयाच्या सुरवातीच्या ज्या हकिगती आहेत त्यात कोठे ना कोठे त्याची चुणूक दिसली असती. स्वतःच्या नव्याण्णव भावांना ठार मारून स्वतः राजा होणे, निरपराधी माणसांना छळण्यासाठी यातनागृह बांधणे याबाबतच्या कथांमध्येच त्याचा क्रूरपणा अचानक दिसून येतो. तितक्याच अचानकपणे त्याचे धर्मांतर झालेले आहे व क्रौर्याची सर्व लक्षणे नाहीशी झालेली आहेत.

राजाच्या निकटच्या कुटुंबियांपैकी काही जणांचा उल्लेख विविध साधनां-मधून आलेला आहे. त्याच्या कारकिर्दीत बराच दीर्घ काळ असंधिमित्ता ही पट्टराणी होती. **महावंस** या ग्रंथात तिची बरीच माहिती मिळते.[४] अशोकाच्या मृत्यूच्या

१. प्रझिलस्की, ला **लेजांद व लॅपेरर अशोक**, पृ. २३७ तळटीप.

२. एक, १०२–४.

३. बुद्धपूर्वकालात स्तूप म्हणजे केवळ स्मशान असलेले टेकाड असे. बुद्धाच्या मृत्युनंतर त्याचे पार्थिव अवशेष अशा टेकाडावर बंदिस्त जागी ठेवण्यात येऊ लागले. कालांतराने असे टेकाड व बुद्धाचा अगर इतर अनेक साधुवृत्तीच्या व्यक्तींचा मृत्यू यांचे साहचर्य निर्माण झाले. चैत्य म्हणजे एक पवित्र बंदिस्त जागा, अशा ठिकाणी बौद्धांनी आपली प्रार्थनागृहे उभारली.

४. पाच, ८५, वीस, २.

आधी चार वर्षे ती मरण पावली व तिच्या मृत्यूनंतर तिस्सरख्खा हिला पट्टराणीचा मान मिळाला. बोधिवृक्षाची नासधूस होण्यास ती जबाबदार असल्याने बौद्ध ग्रंथांमधील तिचा उल्लेख आदरपूर्वक करण्यात आलेला नाही.[१] अवदानमध्ये आलेल्या कथांवरून असे दिसते की तिस्सरख्खाबरोबर अशोकाचा विवाह त्याच्या उतारवयात झाला असावा व त्यामुळे तो बराचसा तिच्या आहारी गेला असावा.[२] अलाहाबाद येथील एका स्तंभावर राणीचा आज्ञालेख कोरलेला आहे. त्यामध्ये त्याच्या कारुवाकी या दुसऱ्या एका राणीचा उल्लेख असून तिने दिलेल्या धार्मिक व उदार देणग्यांचे वर्णन आहे.[३] तीवर या राजपुत्राची ती माता असल्याचे यात वर्णन आहे. कोरीव लेखांमध्ये केवळ या एकाच राजपुत्राचा नावाने उल्लेख आहे. स्तंभावर ज्या ठिकाणी हा लेख कोरलेला आहे त्यावरून तो अशोकाच्या कारकिर्दीच्या शेवटी प्रसृत करण्यात आला असावा असे दिसते.[४] कारुवाकीने दिलेल्या कोणत्याही दानाचा उल्लेख नोंदण्याची आज्ञा या लेखाद्वारे **महामत्तांना** (अधिकारी) दिलेली आहे. कारुवाकी हे तिस्सरख्खाचे स्वतःचेच नाव असावे व पट्टराणी झाल्यानंतर तिसरख्खा हे नाव देण्यात आले असावे असेही एक अनुमान करण्यात आले आहे.[५] कारुवाकी दुसरी राणी असल्याचा उल्लेख आणि तिस्सरख्खा ही दुसरी पट्टराणी होती ही वस्तुस्थिती यांचा मेळ बसू शकतो. तिच्या सर्व देणग्यांची नोंद केली जावी ही तिची मागणी तिच्या स्वभावाला साजेशी अशीच आहे.

**दिव्यावदानामध्ये** आणखी एका राणीचा उल्लेख, पद्मावती ही अशोकाची तिसरी राणी म्हणून करण्यात आलेला आहे.[६] अशोकाला बौद्धधर्माविषयी कितीही प्रेम असले तरी अनेक विवाह करण्याचा राजघराण्यांचा मान त्याने सोडून दिलेला दिसत नाही. जरी पद्मावती कधीच पट्टराणी नव्हती तरी ती कुणाल या युवराजाची माता होती. तो 'धर्मविवर्धन' या नावाने संबोधिला जाई. असंधिमित्ताला मूल न झाल्याने पद्मावतीचा मुलगा युवराज असल्याचे जाहीर

---

१. **महावंस**, वीस, ३–६.

२. प्रझिलस्की, **ला लेजांद द लँपेरर अशोक** पृ. २८५.

३. राणीचा आज्ञालेख पाहावा.

४. **कॉर्पस इन्स्क्रिप्शनम् इंडिकारम्**, व्हॉ. एक (कनिंगहॅम आ.) पृ. ३८ आणि चित्रफलक बावीस.

५. या अनुमानाबद्दल मी प्रा. बॅशॅम यांची ऋणी आहे.

६. सत्तावीस, पृ. ४०५.

करण्यात आले असावे असे दिसते. धर्मविवर्धन ह्या अशोकाचा मुलगा होता व गांधारमध्ये त्याची राज्यपाल म्हणून नेमणूक करण्यात आलेली होती असे फा-हियान सांगतो.[१] जालुक या अशोकाच्या आणखी एका मुलाचा उल्लेख **राजतरंगिणीमध्ये** आहे परंतु त्याच्या मातेचे नाव दिलेले नाही.[२] अशोकाच्या दोन मुलींची आपल्याला माहिती मिळते. श्रीलंकेतील बखरींमधील संघमित्ता ही त्यांपैकी एक. तिचा उल्लेख आपण यापूर्वीच केलेला आहे. दुसरी चारुमती हिचा विवाह देवपाल या क्षत्रियाशी झालेला होता.[३] अशोकाच्या नातवांपैकी ज्या दोघांचा उल्लेख वारंवार येतो ते म्हणजे कुणालाचा मुलगा संप्रति[४] आणि दशरथ.[५] येथपर्यंत आपण आपल्याला ज्ञात झालेल्या अशोकाच्या कुटुंबियांची नुसती नोंद केली. त्यांचे प्रामाण्य आणि महत्त्व यासंबंधीची सविस्तर चर्चा, वर्णन करण्यास याहून जास्त योग्य अशा ठिकाणी करण्यात येईल.

अशोकाचा कालानुक्रम अजूनही अनिश्चित राहिलेला आहे ही खरोखरच दुर्दैवाची गोष्ट आहे. प्राचीन इतिहासातील इतर कालखंडांप्रमाणेच या सम्राटा-संबंधीही याहून जास्त अचूक कालनिर्णय व्हावयास पाहिजे असे प्रस्तुत इतिहासकाराला वाटणे अगदी न्याय्य आहे. कोरीव लेखांचा काल निश्चित करण्यासाठी त्या लेखां-मधील वर्षाचा उल्लेख चालू वर्षाचा आहे की पूर्ण झालेल्या वर्षाचा आहे हे कोणत्या पद्धतीने निश्चित करावे हाच मूलभूत प्रश्न निर्माण होतो.

बऱ्याच आज्ञालेखांमधून आलेल्या **वसाभिसितेन**, 'अभिषिक्त वर्ष', या शब्दप्रयोगात, कोरीव लेखाचा काल निश्चित करण्याचे सूत्र मिळते. उदाहरणार्थ तिसऱ्या शिलाशासनात पुढीलप्रमाणे एक संपूर्ण शब्दसमुच्चय आढळतो.

**द्वादस वास्साभिसितेन मया इदम आज्ञापितम्**... माझ्या राज्यारोहणाला बारा वर्षे झाली तेव्हा मी अशी आज्ञा दिली.[६]

याचा अर्थ संपूर्ण बारा वर्षे किंवा मूळ अभिषेकानंतर अकरा वर्धापन दिन होऊन गेल्यानंतरचे बारावे चालू वर्ष असा घेता येईल. पहिला विकल्प हाच सर्वात

१. गाइल्स, **ट्रॅव्हल्स ऑफ फा-हियान**, पृ. १२.
२. एक, ११८-२०.
३. एस्. लेवी, **ल नेपाल** व्हॉ. एक, पृ. २६३ ३३१, व्हॉ. दो , पृ. १-३, ३४४.
४. प्रझिलस्की, **ला लेजांद द लॅंपेरर अशोक** पृ. २९७.
५. **विष्णु पुराण**, चोवीस, सरकार, **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स** पृ. ७९
६. तिसरे शिलाशासन, गिरनार, ब्लोख, **ला एन्स्क्रेपसिओ द अशोक** पृ. ९५

जास्त तर्कशुद्ध वाटतो. परंतु पाचव्या स्तंभशासनात पुढीलप्रमाणे विधान केलेले असल्यामुळे शंका निर्माण झालेली आहे.

**याव सडुवीसतीवस्साभिसित्तेन मे एताये अन्तलिकाये पंनविसती बन्धन-मोख्लानि कतानि**

या उताऱ्याचे भाषांतर साधारणपणे असे आहे–

'मला अभिषिक्त होऊन सव्वीस वर्षे होईपर्यंतच्या कालात मी पंचवीस वेळा कैद्यांची सुटका करण्याची आज्ञा दिली.'[1]

वरील भाषांतरावरून असे दिसते की पंचवीस वर्षांच्या काळात पंचवीस वेळा कैद्यांची मुक्तता केल्यानंतर चालू होणाऱ्या सव्विसाव्या वर्षी हा आज्ञालेख लिहिला. म्हणून **वस्साभिसित्तेन** हा शब्दप्रयोग अभिषेकाच्या वर्षाच्या नंतरच्या वर्षाला उद्देशून असावा. यामुळे काही इतिहासकारांचा असा दृष्टिकोन आहे की कोरीव लेखांमधील काल चालू वर्षाचा होता.[2] राजाचा राज्याभिषेकदिन किंवा जन्मदिन यासारखी महत्त्वाची घटना राजवर्षात साजरी करण्यासाठी साधारणपणे कैद्यांची मुक्तता केली जाई असे विधान केले जाते. तेव्हा अशोकाच्या कारकिर्दीच्या सहव्विसाव्या वर्षी पंचवीस वेळा कैद्यांना सोडण्याचे प्रसंग आले असावेत असे गृहीत धरणे तर्कसंगत वाटते.

अगदी अलीकडे, पाचव्या स्तंभशासनातील या परिच्छेदाचा दुसरा एक अर्थ सुचविण्यात आलेला आहे. तो असा :

मी अभिषिक्त होऊन सव्वीस वर्षे झाली त्या काळात (माझ्या राज्याभिषेकापासून) (त्याच्या वर्धापनदिनापर्यंत) मी पंचवीस वेळा कैद्यांना बंधमुक्त केलेले आहे.[3]

वरील भाषांतर सुस्पष्ट आहे. राज्याभिषेकाचा सव्विसावा वर्धापन दिन होऊन गेल्यानंतर हा आज्ञालेख लिहिला हा मुद्दा त्यात स्पष्ट झालेला आहे. कैद्यांना बंधमुक्त करण्याच्या प्रसंगांची पंचवीस ही संख्या मोघम आहे.

कंदहार येथील द्वैभाषिक आज्ञालेख प्रकाशात आल्यानंतर, आज्ञालेख प्रसृत करताना चालू वर्ष वापरले आहे की पूर्ण वर्ष वापरले आहे या प्रश्नाचा उलगडा

---

१. पाचवे स्तंभशासन, ब्लोख, **ला एंस्क्रिपसिओं द अशोक**, पृ. १६७.
२. मुकर्जी, **अशोक**, पृ. १८४ न. ६; एगरमाँट, **दि क्रॉनॉलॉजी ऑफ दि रेन ऑफ अशोक मोरिय**, पृ. ६४
३. हे भाषांतर मला प्रोफेसर बॅशॅम यांनी सुचविले आहे.

झाला आहे व त्याविषयीचा अखेरचा निर्णय घेतल्याने तो संपला आहे. या आज्ञालेखातील ग्रीक मजकुराची सुरुवात पुढील वाक्याने होते.

'दहा वर्षे पूर्ण झाल्यानंतर प्रियदर्शन राजाने माणसांना धर्मश्रद्धा दाखविली.'[1]

याच आज्ञालेखातील ॲरामिक मजकुरात असेच वाक्य आहे.[2] या आज्ञा-लेखावरून, अशोकाने आपल्या आज्ञालेखामध्ये पूर्ण होऊन गेलेल्या वर्षाचा उल्लेख केलेला आहे, हे स्पष्ट होते.

अशोकाच्या कारकिर्दीच्या कालानुक्रमाचे तपशीलवार पृथक्करण करताना, त्याच्या राज्याभिषेकाचे वर्ष कोणते, हा पहिला प्रश्न पडतो. बिंदुसाराचा मृत्यू आणि अशोकाचे राज्यारोहण यांच्यामधील त्या चार वर्षांच्या प्रसिद्ध मध्यंतर-कालाशी साहजिकच हा प्रश्न संबंधित आहे. या बाबतीत साधनग्रंथांमध्ये मतभेद आहेत. श्रीलंकेतील बखरी सांगतात की असा एक मध्यंतरकाल होता, तर पुराणांनी मौन स्वीकारले आहे.[3]

अशोक हा प्रत्यक्ष वारस नव्हता, बिंदुसाराच्या मृत्यूनंतर तो आणि त्याचे भाऊ यांच्यामध्ये सिंहासनासाठी संघर्ष झाला ही आख्यायिका जर आपण स्वीकारली तर असा एक मध्यंतरकाल होऊन गेला, हे म्हणणे अगदी तर्काला धरून दिसते. आपले स्थान पक्के करण्यासाठी अशोकाला लागलेला चार वर्षांचा काळ हा काही फार मोठा होता असे नाही. जरी अनेक इतिहासकारांच्या मते ही आख्यायिका आणि मध्यंतरकालाची अपरिहार्यता या गोष्टी शंकास्पद असल्या तरी बिंदुसाराच्या मुलांमध्ये राजपदासाठी संघर्ष झाला ही आख्यायिका आम्ही का मान्य केली आहे याची आमची कारणे यापूर्वीच या प्रकरणात आम्ही दिलेली आहेत.[4]

---

१. कंदहार कोरीव लेख पाहावा. **जर्नल एशियाटिक**, १९५८, व्हॉ. दोनशे सेहेचाळीस, पृ. २–३.

२. तत्रैव, पृ. २२२.

३. **महावंस**, पाच, २२, **दीपवंस**, सहा, २१, २२, पार्गिटर, **डायनॅस्टिज ऑफ दि कली एज्**, पृ. २७–२८.

४. स्मिथने मध्यंतरकाल मान्य केला आहे पण वारसायुद्ध मान्य केलेले नाही. **अशोक** पृ. २० थॉमसला मध्यंतरकालाविषयीच शंका आहे. **कॅब्रिज हिस्ट्री ऑफ इंडिया**, व्हॉ. एक, पृ. ५०२, ५०३

महावंस म्हणतो की, 'त्या प्रसिद्धाने (अशोकाने) स्वतःसाठी सार्वभौमत्व मिळविल्यानंतर चार वर्षांनी पाटलिपुत्र नगराचा राजा म्हणून स्वतःला अभिषेक करून घेतला.'[१] चार वर्षांच्या विलंबाला एगरमाँटने आक्षेप घेतला आहे. काही झाले तरी बुद्धाच्या मृत्यूनंतर २१८ वे वर्ष हे अशोकाच्या राज्याभिषेकाचे वर्ष आहे ही श्रीलंकेच्या आख्यायिकेतील कल्पना मान्य केली पाहिजे, हे त्याचे मुख्य समर्थन आहे. बुद्धाच्या मृत्यूनंतरचे २१८ हे वर्ष मान्य करावयाचे असल्याने नव्या राजांची नावे घुसडणे, कारकिर्दीची वर्षे कमी जास्त करणे यांसारख्या अनेक लबाड्यांमुळे अशोकाला चार वर्षांचा अनभिषिक्त राजपदाचा काल बहाल करावा लागला.[२]

एका विशिष्ट पद्धतीत चपखलपणे बसविण्यासाठी श्रीलंकेच्या बखरकारांनी वेगवेगळी उलटापालट केली असा दोषारोप करावयाचा असेल तर अशा प्रकारच्या दोषारोपातून पुराणांचीही मुक्तता होण्यासारखी नाही. जर केवळ चार वर्षांच्या अंतराचा हिशेब करण्यापुरताच हा मामला असता तर इतरांच्या कारकिर्दींमध्ये हा कालखंड सहजपणे असा विभागता आला असता की या मुद्याकडे कोणाचेही लक्ष गेले नसते. आम्हाला असे वाटते की चार वर्षांचा हा मध्यंतरीचा कालखंड केवळ काळाच्या हिशेबाचा मेळ बसावा म्हणून घुसडण्यात आलेला नसून तो परंपरेने चालत आलेला आहे. अशोकाचे राज्यारोहण ज्या परिस्थितीत झाले ती पाहता हा कालखंड बिनचूक असण्याचा संभव आहे. प्रत्यक्षात हा कालखंड नेमका तीन वर्षे व काही थोडे महिने होता की बरोबर चार वर्षे होता हे निश्चित करणे कठीण आहे कारण बिंदुसाराचा मृत्यु त्याच्या राज्यारोहणाच्या वर्धापनदिनीच झाला असेल असे नाही व अशोकाचे राज्यारोहण त्या वर्धापनदिनाच्या महिन्यात व त्याच दिवशी झाले असेल असे नाही. आमच्या तर्कानुसार मध्यंतरकाल हा चार वर्षांना थोडे कमी महिने असावा आणि ही आख्यायिका ऐतिहासिक वास्तवतेवर आधारलेली असावी. प्रस्तावनेमध्ये चंद्रगुप्त मौर्य व बिंदुसार यांच्या कारकिर्दींचा आम्ही मागोवा घेतलेला आहे. तद्नुसार बिंदुसाराचा मृत्यु इ. स. पू. २७२ मध्ये झाला.[३] वरीलप्रमाणे मध्यंतरकाल मानला तर अशोकाच्या राज्यारोहणाचे वर्ष इ. स. पू. २६९–६८ हेच होय या निर्णयाप्रत आपण येतो.

---

१. पाच, २२.

२. **दि क्रॉनॉलॉजी ऑफ दि रेन ऑफ अशोक मोरीय** पृ. ८६, १४४ तळटीप १६१.

३. पहिले प्रकरण पाहावे.

अशोकाच्या बौद्धधर्मस्वीकाराच्या प्रश्नाला इतिहासकारांनी खूपच महत्त्व दिलेले आहे. काहींच्या मते स्वतःच्या कृत्यामुळे कलिंगयुद्धात झालेली अपरंपार हानी पाहून सम्राट हादरला व लगेच ही बौद्धधर्मस्वीकाराची नाटयमय घटना घडली.[१] कलिंग युद्धापूर्वीच धर्मांतराची घटना घडली असे दाखविण्याचा प्रयत्न एगरमौंटने केला आहे.[२] या मताबाबत सहजपणे उपस्थित करता येण्याजोगी शंका म्हणजे अहिंसावादी बौद्धधर्माचा नव्यानेच स्वीकार करणारा अशोक एवढया मोठया प्रमाणावरील युद्धात पडला असता का ? एगरमौंटच्या या दृष्टिकोनामुळे असे सूचित होते की एक तर अशोकाने स्वतःच्या मर्जीनुसार मध्यममार्गाचा तऱ्हेवाईक अर्थ लावला असावा किंवा त्याने केलेला बौद्धधर्माचा स्वीकार म्हणजे तीव्र भावनेच्या उद्रेकामुळे अकस्मात झालेले हृदयपरिवर्तन अशा अर्थाने ते धर्मांतर नसावे.

त्याच्या कारकिर्दीत बौद्धधर्माचा स्वीकार त्याने नेमक्या कोणत्या क्षणी केला हे निश्चितपणे सांगण्याचा प्रयत्न करणे म्हणजे प्रत्यक्षात जे झाले ते फुगवून सांगण्यासारखे आहे. नंतरच्या काळामधील परिस्थितींचा निश्चितपणे रंग चढलेल्या बौद्धांच्या पूर्वग्रहयुक्त हकिगती जरी आपण बाजूला ठेवल्या तरी ज्या कालखंडात वेगवेगळया प्रभावी धर्मपंथांमध्ये जबरदस्त परस्परविरोध निर्माण झालेले होते त्या कालखंडात नव्या धर्माचा स्वीकार करताना जुन्या श्रद्धा सोडून देणे भाग पडत होते असे सांगणारा या कालखंडातील कोणताही खरा पुरावा आपल्याजवळ नाही. हिंदु व बौद्ध यांच्यात या कालखंडात काही ना काही विरोध निश्चितपणे असणार, परंतु नंतरच्या शतकांमधून हिंदू व मुसलमान यांच्यामध्ये जे तीव्र धार्मिक शत्रुत्व दिसून येते तशा प्रकारचे शत्रुत्व हिंदु भारताच्या इतिहासात कधीच नव्हते, असेच दाखवणारा पुरावा आहे. इस्लाम वा ख्रिस्ती धर्माचा स्वीकार करण्यासाठी काही विशिष्ट धार्मिक विधी केला जातो तसा विधी, बौद्धधर्मसंघटनेत प्रवेश करण्याची इच्छा नसणाऱ्या पण सर्वसाधारण बौद्धधर्मानुयायी होऊ इच्छिणाऱ्यांच्या बाबतीत केला जात नसे ही वस्तुस्थितीच असे सूचित करते की धर्मांतराच्या प्रत्यक्ष विधिबाबत फार मोठा आग्रह धरला

---

१. हे सर्वसाधारणतः ग्राह्य मानले जाणारे मत आहे. उदाहरणादाखल आम्ही पुढील उल्लेख करतो, **दि एज ऑफ दि नंदाज् अ‍ॅण्ड मौर्याज्** पृ. २००

२. **दि क्रॉनॉलॉजी ऑफ दि रेन ऑफ अशोक मोरीय**, पृ. ६९ तळटीप.

जात नसे. बौद्धांच्या जीवनाकडे पाहणाऱ्या दृष्टिकोनाला सर्वसाधारणपणे मान्यता व बौद्ध भिक्षूंचा परामर्ष घेणे यातच सर्वसामान्य माणसाच्या दृष्टीने बौद्धधर्म सामावलेला असल्याने त्याची त्याच्या धार्मिक आचरणावर विशिष्ट अशी मर्यादा पडत नसे.

आज्ञालेखांवरून एक लक्षात येण्याजोगा मुद्दा असा दिसतो की पुढील काळात अशोकाची बौद्धधर्माविषयीची कळकळ उत्तरोत्तर वाढत गेली.[1] सुरवातीच्या आज्ञालेखामध्ये आपण नुकताच एका नव्या धर्माचा स्वीकार केलेला आहे, अशा प्रकारचे चित्र तो उभे करीत नाही. नव्या धर्मांतरितांमध्ये साधारणतः आढळून येणारा फाजील उत्साह वा फाजील अभिमान कोठेही प्रतीत होत नाही. सुरवातीचे आज्ञालेख जरी त्याच्या 'धर्मांतरां'नंतर प्रसृत केलेले असले तरी त्यामधून सम्राटाला स्वतःला अभिप्रेत असणारे व्यक्तिमत्व व मानवतावाद आहे, केवळ बौद्धधर्माची शिकवणूक नाही.

'धर्मांतराशो' निगडीत असलेल्या दोन कथा बौद्धग्रंथ देतात. यांपैकी एक-श्रीलंकेतील बखरींमध्ये सांगितलेली आहे व तो निग्रोधाच्या व्यक्तित्वाभोवती केंद्रित झालेली आहे.[2] सिंहासनासाठी झालेल्या संघर्षामध्ये अशोकाने आपला ज्येष्ठ भाऊ सुमन याला ठार मारले होते. सुमनला त्याच्या मृत्यूनंतर झालेला मुलगा म्हणजे निग्रोध. अशोकाच्या राज्यारोहणाच्या वर्षीच निग्रोधाचा जन्म झाला. वयाच्या सातव्या वर्षी एका खास संकेतानुसार तो भिक्खू बनला, त्याने सम्राटापुढे प्रवचन केले. आपल्या पुतण्याच्या शिकवणुकीने सम्राट इतका प्रभावित झाला की त्याने बौद्धधर्माचा अंगिकार केला. ही कथा अतिशयोक्त आहे, हे सहज लक्षात येते. एगरमांटने स्पष्टपणे असे सुचविले आहे की सात वर्षे हे निग्रोधाचे वय महत्वाचे आहे, आपल्या राज्याभिषेकानंतर सात वर्षांनी अशोकाचे धर्मांतर झाले ही वस्तुस्थिती नोंदणे हाच याचा अर्थ आहे.[3] असे असूनही आम्ही यापूर्वी दाखवून दिल्याप्रमाणे अशोकाच्या इतिहासात धर्मांतराची नेमकी वेळ सांगण्याची काही गरज नाही. निग्रोधाच्या सातव्या वर्षी अशोकाचे धर्मांतर झाले या घटनेची नोंद करण्यापुरताच केवळ हा प्रश्न असता तर

---

१. कलिंग लेख व दुफळीबाबतचा लेख यांची तुलना करावी. ब्लोख, **ला एंस्क्रेपसिओं द अशोक**, पृ. १३६–४३, १५२–१५३.

२. **महावंस**, पाच, ३७–७२, **दीपवंस**, सहा, २५–९९.

३. **दि क्रॉनॉलॉजी ऑफ दि रेन ऑफ अशोक मोरीय**, पृ. ८६ तळटीप.

बखरकारांनी निग्रोध या व्यक्तीचे वर्णन याहून जास्त खुलवून केले असते. या कथेमध्ये, अशोक व निग्रोध यांच्यातील संबंध सुधारले, हे दाखविण्याचा हेतू आहे असे म्हणणे जास्त सयुक्तिक आहे. कोणत्याही पुरुष नातेवाईकांकडून सिंहासनावरील आपल्या स्थानाला धोका नाही, याविषयी सातव्या वर्षी अशोकाची खात्री झाली. त्याने निर्बंध सैल केले असावेत व त्यामुळे राजघराण्यात निग्रोधाचे स्वागत झाले. आता हा मुलगा सिंहासनाचा प्रत्यक्ष वारस नसल्याने पुढच्या काळात तो बौद्धभिक्षू झाला असावा.

अशोकाला धर्मांतरास प्रवृत्त करणाऱ्या घटनांविषयी एक वेगळीच कथा **दिव्यावदानात**[1] सांगितलेली आहे व या कथेची ह्यूएन्त्संगने पुनरावृत्ती केली आहे.[2] गिरिक याच्या सल्ल्यानुसार अशोकाने पाटलिपुत्र येथे एक तुरुंग उभारला. ह्यातील कैद्यांचा भयानक छळ केला जात असे. श्रावस्तीमध्ये पूर्वी व्यापारी असलेल्या समुद्र नावाच्या एका भिक्षूला एकदा या तुरुंगात टाकण्यात आले होते. परंतु त्याच्या अद्भुत शक्तीमुळे त्याने स्वतःचे संरक्षण केले. हे ऐकल्यानंतर अशोकाने त्या भिक्षूची भेट घेतली. त्या भिक्षूने एका पाठोपाठ एक केलेले चमत्कार पाहून सम्राट इतका प्रभावित झाला की लवकरच तो बौद्ध धर्माचा उपासक बनला. सुरवातीचा दुष्टपणा, चमत्कारांमुळे साक्षात्कार, शेवटी धर्मांतर इत्यादी, विकृत कथांचे नेहमीचे सर्व विशेष या कथेत आहेत. ऐतिहासिक पुरावा जमविण्याच्या दृष्टीने तिच्यातून काही विशेष पदरात पडत नाही.

**अशोकावदानात** वरील कथांहून वेगळी कथा आलेली आहे. एका विभागात असे सांगितले आहे की समुद्र नावाचा एक बारा वर्षांचा व्यापाऱ्याचा मुलगा अशोकाला बौद्धधर्माचा परिचय करून देण्यास कारणीभूत ठरला.[3] दोन कथांचे हे विसंगत मिश्रण असावे. समुद्र हा अशोकाच्या 'नरकातील' यातनांतून सुरक्षित राहिलेला भिक्खु होता.[4] त्याच्या शैशवावरून असे सूचित होते की निग्रोधाच्या कथेचा प्रभाव या कथेवर पडला असावा. ह्यूएन्त्संगच्या वृत्तांतात नोंदलेली धर्मांतरासंबंधीची आख्यायिका सांगते की सात वर्षांच्या एका श्रमणाने[5]

---

१. सहवीस. पृ. ३७४–८२.

२. वॅटर्स, **ऑन युआन च्वांगज् ट्रॅव्हल्स इन इंडिया**. व्हॉ. दोन. पृ. ८८.

३. प्रझिलस्की, **ला लेजांद द लॅंपेरर अशोक**, पृ. २३७ तळटीप.

४. **उपरोक्त** पृ. १५४.

५. बौद्ध भिक्षूसाठी वापरण्यात येणारी संज्ञा.

राजाचे धर्मांतर केले. अशोक बौद्धधर्माविषयी कळकळ दाखवितो हे पाहून त्याला सतावणाऱ्या पाचशे ब्राह्मणांना एका तरुण श्रमणाने उदरस्थ केले असे वर्णन एका कथेत आहे. अशा प्रचंड भोजनानंतर अशोकाला कुक्कुटाराम या मठाला भेट देण्यासाठी आमंत्रण देण्यात आले. त्या ठिकाणी आता त्या पाचशे ब्राह्मणांचे भिख्खूमध्ये रूपांतर झाल्याचा चमत्कार अशोकाने पाहिला.[१] या कथावर स्थानिक लोककथांचा प्रभाव पडलेला दिसतो. त्यामध्ये पुराणकथा व परीकथा यांचो वैशिष्टये निश्चितपणे दिसून येतात.

कलिंगयुद्ध आणि कलिंगविजय या अशोकाच्या कारकिर्दीतील पहिल्या प्रमुख घटनेचा काळ निश्चितपणे सांगता येतो. तेराव्या शिलाशासनात असे स्पष्टपणे म्हटले आहे की, ही घटना अशोकाच्या कारकिर्दीच्या नवव्या वर्षी म्हणजे इ. स. पू. २३० मध्ये घडली.[२] अशोकाला वाटणारी खंत आणि कलिंगामध्ये झालेल्या हानीविषयीचा पश्चाताप या आज्ञालेखात व्यक्त झालेला आहे. हा सूर म्हणजे क्षणिक भावनेने हेलावून गेलेल्या माणसाची खंत नाही तर आपल्यामुळे हे दुःख निर्माण झाले आहे याची ज्याला पूर्ण जाणीव आहे अशा माणसाचा सार्थ पश्चाताप आहे.

ज्या वेळी अशोक बौद्धधर्मीय झाला त्या वेळेशी कलिंगयुद्धाच्या काळाचा संबंध आहे. काही इतिहासकार धर्मांतराची घटना युद्धापूर्वीची मानतात तर काही युद्धानंतरची मानतात. एगरमाँटने पहिले मत प्रतिपादन केले आहे व त्यासाठी तो तारानाथच्या ग्रंथातील पुराव्याचा आधार मानतो.[३] तारानाथने आपल्या ग्रंथात नागांचा उल्लेख केला आहे. या नागांनी म्हणजे समुद्रातील आत्म्यांनी अशोकाची राने चोरून त्याला मनस्ताप दिला. पुरेसे सामर्थ्य मिळविल्यानंतर अशोकाने त्यांना जिंकले. नाग म्हणजे कलिंगमधील समुद्रावरून हिंडणारे लोक. अशोकाने पुरेसे सामर्थ्य मिळविणे म्हणजे त्याचे बौद्धधर्मांतर व नागावर विजय म्हणजे कलिंगयुद्ध, असा अर्थ एगरमाँटने लावलेला आहे. त्याने लावलेल्या या घटनांच्या क्रमावर विसंबून राहणे शंकास्पद आहे. कारण तारानाथ पुढे असे म्हणतो की या युद्धात अशोकाने संपूर्ण जंबुद्वीप जिंकले, पण प्रत्यक्षात मात्र फक्त

---

१. प्रझिलस्की, **ला लेजांद द लाँपेरर अशोक**, पृ. ४१३–४१८.

२. ब्लोख, **ले एन्स्क्रेपसिओं द अशोक** पृ. १२५ तळटीप.

३. **दि क्रॉनॉलॉजी ऑफ दि रेन ऑफ अशोक मोरीय**, पृ. ८८ गेशिष्ट देस बुधीझमुस् इन् इंडिअन, सहा पृ. ३१–३३.

कलिंगचा मुलुख जिंकलेला आहे. अशोकाने सामर्थ्य मिळविणे म्हणजे त्याने बौद्ध धर्माचा स्वीकार करणे हे समीकरण कोणत्याही स्थितीत अतिशयोक्तीचे आहे. या तिबेटी कथेने, फार तर कलिंगयुद्धाचे खरे कारण सुचविले आहे असे म्हणता येईल. ते असे की दक्षिण भारताकडे जमीन व समुद्र यावरून जाणाऱ्या मार्गावर अशोकाला नियंत्रण ठेवण्याची इच्छा होती व या मार्गावर अडथळे आणणाऱ्या कोणत्याही शत्रुवत् सत्तेला जिंकणे त्याला भाग होते. थॉमससारख्या दुसऱ्या काही इतिहासकारांच्या मते कलिंगयुद्धानंतर लगेच अशोकाने बौद्धधर्माचा स्वीकार केला. ही घटना त्याच्या कारकिर्दीच्या नवव्या वर्षी घडली. इतकेच नाही तर त्याने बौद्धसंघामध्ये प्रवेश केला. राज्यारोहणाच्या अकराव्या वर्षाच्या शेवटी तो क्रियाशील बौद्ध बनला व ठिकठिकाणी हिंडू लागला.[1] धर्मांतराच्या दृष्टीने कलिंग युद्धाच्या अखेरीचा काळ म्हणजे निश्चितच एक अतिशय नाट्यपूर्ण क्षण असणार. परंतु धर्मांतर मात्र अशा नाट्यमय पद्धतीने झालेले नाही हे स्पष्ट आहे. कारण जर ते तसे अविस्मरणीय पद्धतीने झाले असते तर श्रीलंकेच्या भिक्षूंनी त्याचे खुलवून वर्णन केले असते. परंतु श्रीलंकेच्या बखरींमध्ये कलिंगयुद्धाचा उल्लेख नाही.

अशोकाच्या आज्ञालेखाच्या आधारेच त्याच्या धर्मांतराच्या प्रश्नावर प्रकाश टाकता येण्यासारखा आहे. आपण बौद्धमतानुयायी असल्याची कबुली अशोकाने एका लघु शिलालेखात दिलेली आहे असे मानले जाते. त्यातील संबंधित मजकूर पुढीलप्रमाणे आहे.

अधिकानी अध्यातियानी वस्सानि य हकं उपासके नो तु खो बाधं प्रक्कंते हुसं एकं सवच्छरं सातिरेके तु खो संवच्छरे यं मया संघे उपयीते बाधं च मे पक्कंते[2]

'मी अडीच वर्षांहून जास्त काळ एक सामान्य बौद्ध होतो. परंतु एक वर्षांपर्यंत मी काही फारशी प्रगती केली नाही. आता एक वर्षाहून जास्त काळ मी भिक्षूंच्या संघाकडे आकृष्ट झालो आहे व जास्त उत्साही बनलो आहे.'

सुरवातीला आपल्याला आपुलकी वाटत नव्हती. याची या आज्ञालेखात कबुली आहे. एगरमांटने जो तारानाथच्या पुराव्याचा हवाला दिला आहे तो याच्याविरुद्ध जाणारा आहे. अशोकाने केलेला बौद्धधर्माचा स्वीकार ही एक

---

१. केंब्रिज हिस्ट्री आफ इंडिया, व्हॉ. एक. पृ. ४९५–९६.
२. ब्रह्मगिरी लघु शिलाशासन ब्लोख, ले एंस्क्रेपसिओं व अशोक, पृ. १४५–६.

सावकाश होणारी प्रक्रिया आहे, या आम्ही पूर्वी केलेल्या कल्पनेला दुजोरा देणारा आहे. कलिंग युद्धानंतर तीन वर्षांमध्ये जर एखाद्या विशिष्ट वेळी हे धर्मांतर झाले असते तर तेराव्या शिलाशासनात अशोकाने त्याचा निश्चित उल्लेख केला असता. संघाकडे तो जास्त आकृष्ट होत होता याचा अर्थ तो बौद्ध धर्मगुरूंकडून बौद्ध धर्माची तत्वे शिकत होता असा करता येईल. विविध धर्मपंथांमध्ये परस्परांविषयी समंजसपणा असावा याविषयी अशोकाला विशेष आस्था होती हे लक्षात ठेवले पाहिजे. बुद्धाच्या शिकवणुकीची याहूनही जास्त स्पष्ट कबुली भब्र येथील आज्ञा-लेखात दिलेली आहे.[१] दुर्दैवाने या लेखात कालाचा उल्लेख नाही परंतु आम्हाला असे वाटते की, तो त्याच्या कारकिर्दीच्या उत्तर कालातील असावा व कदाचित दुष्काळीसंबंधीचा आज्ञालेख प्रसृत केला त्याच सुमारास हाही लिहिला असावा. भब्रच्या आज्ञालेखात त्याने बौद्धधर्माचा स्वीकार केल्याचे व बुद्ध, धम्म (या ठिकाणी बुद्धाची शिकवणूक असा अर्थ) संघ यावर श्रद्धा असल्याचे सांगितले आहे. हा आज्ञालेख सर्वसामान्य प्रजाजनांसाठी अगर त्याच्या प्रशासकांना आज्ञा देण्यासाठी लिहिलेला नसून खास स्थानिक बौद्ध धर्मगुरुंसाठी लिहिलेला होता. या ठिकाणी त्याने स्वतःचा उल्लेख 'मगधाचा राजा' असा केलेला आहे व केवळ याच प्रसंगी त्याने त्या बिरुदाचा वापर केलेला आहे. त्याच्या आज्ञालेखांचा अभ्यास करताना प्रजाजनांसाठी असलेले आज्ञालेख व केवळ संघासाठी लिहिलेले आज्ञालेख असा फरक करणे अत्यंत महत्वाचे आहे. पहिल्या प्रकारात प्रजेला उद्देशून आज्ञा करणारा राजा, अशी भूमिका त्याने घेतली आहे व दुसऱ्या प्रकारात (ज्यामध्ये भब्र येथील आज्ञालेखाचा समावेश होतो) त्याची स्वतःची धार्मिक मते जाहीर केलेली आहेत.

ज्याप्रमाणे युरोपमधील कॅथॉलिक धर्मगुरुंनी पवित्र रोमन सम्राटाला आपला ऐहिक जगताचा प्रमुख म्हणून मान्यता दिली होती त्याचप्रमाणे अशोकच मगधाचा राजा, असा उल्लेख करून बौद्धभिक्षूंनी त्याला आपला ऐहिक जगतातील नेता म्हणून मान्यता दिलेली असणे शक्य आहे. या ठिकाणी सम्राट आपली बौद्ध धर्मावरील श्रद्धा जाहीरपणे व्यक्त करतो आणि धर्मग्रंथामधील जे विशिष्ट भाग धर्मगुरूंना परिचित असावेत अशी त्यांची अपेक्षा आहे ते तो उघृत करतो. पवित्र रोमन सम्राटाशी केलेली त्याची तुलना विशिष्ट मर्यादेपर्यंतच होऊ शकते. कारण युरोपच्या बाबतीत कॅथॉलिक पंथ हा राज्यधर्म होता तर अशोकाच्या बाबतीत बौद्धधर्म हा राज्यधर्म नव्हता.

१. उपरोक्त, पृ. १५४.

आपल्याला असे सांगितले गेले आहे की राज्याभिषेकानंतर दहा वर्षांनी म्हणजे इ. स. पू. २५९–२५८ मध्ये तो...संबोधि येथे गेला.[1] **अयाय संबोधिम्** या संज्ञेचा, अशोकाला ज्ञानाचा साक्षात्कार झाला,[2] असा अर्थ लावता येईल किंवा त्याने बोधिवृक्षाची यात्रा केली असाही अर्थ लावता येईल.[3] **दीपवंसमध्ये संबोधि** हा शब्द प्रामुख्याने बोधिवृक्ष अशा अर्थानेच वापरला आहे हे अलिकडच्या एका ग्रंथात दाखवून दिलेले आहे, त्यामुळे या आज्ञालेखातील या संज्ञेच्या दुसऱ्या अर्थाला पुष्टी मिळते.[4] अशोकाने देशभर काढलेल्या मोठ्या दौऱ्याचा एक भाग म्हणून त्याने बोधिवृक्षाला भेट दिलेली असावी. याच आज्ञालेखात या दौऱ्याचा उल्लेख तो **धम्म–यात** (धम्मासाठी केलेला प्रवास–धर्मयात्रा) असा करतो.

**अयाय संबोधि** याचा अर्थ व लघुशिलाशासनात उल्लेखिलेल्या २५६ दिवसांच्या प्रवासाचा महत्त्वाचा प्रश्न यांचा निकटचा संबंध आहे. लघु लेखाच्या बहुतेक सर्व आवृत्त्यांमध्ये २५६ ही संख्या गूढ पद्धतीने दिलेली असली तरी सहस्राम आज्ञालेखावरून हे स्पष्ट होते की या संख्येचे महत्त्व एखाद्या प्रवासाच्या वा दौऱ्याच्या संदर्भातच असावे.

**'इयं च सवने विवुथ्येन दुवे सपंना लातिसता विवुथ्या ति २०० ५० ६'**[5]

दौऱ्यावर असताना ही घोषणा केलेली आहे. प्रवासामध्ये २५६ रात्री घालविलेल्या आहेत.

काही अधिकारी विद्वान असे मानतात की हा आज्ञालेख अशोकाने दौऱ्यावरून राजधानीला परतल्यानंतर प्रसृत केला.[6] परंतु जर हे मान्य केले तर दौऱ्यासाठी किती दिवस घालवले याची नेमकी संख्या सांगण्याची काही विशेष जरूर नव्हती. 'मी जेव्हा दौऱ्यावरून परतलो.' असे त्याला म्हणता आले असते. तो जेव्हा प्रत्यक्ष दौऱ्यावर होता तेव्हाच त्याने हा आज्ञालेख लिहिला हे या आज्ञालेखावरून निश्चितपणे दिसते.

---

१. आठवे शिलाशासन गिरनार उपरोक्त पृ. ११२.

२. द ला वाले पुसँ, **लँद ओ तॉं दे मौर्य**, पृ. १०४ तळटीप.

३. मुकर्जी, **अशोक**, पृ. २९४.

४. एगरमाँट, **दि क्रॉनॉलाजी ऑफ दि रेन ऑफ अशोक मोरीय** पृ. ८० दीपवंस, सोळा.

५. ब्लोख, **ले एंस्क्रेपसिआँ द अशोक**, पृ १५०.

६. उपरोक्त, पृ. १४९.

२५६ या संख्येबाबत अनेक मते व्यक्त करण्यात आलेली आहेत. ब्राह्मणांच्या पद्धतीप्रमाणे अशोकाने चार महिन्यांचा एक अशा तीन ऋतूंत वर्षाची विभागणी केली असे सुचवून, फिलीओझा यांनी २५६ रात्री याचा अर्थ स्पष्ट केला आहे.[१] यांपैकी एक ऋतू म्हणजे **वस्स** किंवा पावसाळा घरी घालविण्यात आला तर इतर दोन ऋतू तौलनिक दृष्ट्या कोरडे असल्याने प्रवासात घालविण्यात आले. **ज्योतिष-वेदांग** या ग्रंथाच्या आधारे २७ दिवस, ६ तास, ३ मिनिटे व ४ सेकंद यांचा एक महिना मानला जातो.[२] या हिशेबाने चार महिन्यांचे १०९ दिवस, १२ मिनिटे व १६ सेकंद होतात. हिंदु पंचांगानुसार वर्षाच्या ३६० दिवसामधून वरील आकडा वजा केला तरी २५६ दिवस मिळत नाहीत. दोन तृतीयांश वर्षाचे २४० दिवस होतात त्यामुळे हा कालखंड पुरा होण्यास १५ दिवस बाकी राहतात. या २५६ दिवसांच्या कालात भिख्खूने भ्रमंती करावी व भिक्षा मागावी अशी अपेक्षा असेल तर आपला आज्ञालेख प्रसृत करण्यापूर्वी, हा नियुक्त कालखंड पुरा करण्यासाठी अशोक आणखी पंधरा दिवस थांबला नाही ही गोष्ट विचित्र दिसते. तेरा महिन्यांचे एक वर्ष या हिशेबाने पाहिले तर वर्षाचा दोन तृतीयांश कालखंड म्हणजे २५६ दिवस मिळत नाहीत कारण **ज्योतिष–वेदांग** या ग्रंथानुसार आठ महिन्यांमध्ये २१८ दिवस, २४ मिनिटे व ३२ सेकंद आहेत. अशोकाने केलेल्या प्रवासाच्या दिवसापेक्षा हा काळ स्थूलमानाने ३६ दिवसानी कमी पडतो. म्हणजे २५६ दिवस हे नऊ महिन्यापेक्षा थोडे जास्त होतात. ३५४ दिवसांचे चालू वर्ष (अधिक मास वगळून) हिशोबासाठी धरले तरी दोन तृतीयांश वर्ष म्हणजे २५६ दिवस मिळत नाहीत. शेवटी आम्हाला असे वाटते की एका वर्षातील दिवसांची संख्या वेगवेगळ्या वर्षी बदलत असल्याचे आपल्याला माहीत असल्याने बौद्धधर्मविधीमध्ये असलेल्या नियुक्त कालाशी या संख्येचा संबंध जोडणे योग्य होणार नाही.

---

१. **जर्नल एशियाटिक,** १९४९, पृ. १४३ तळटीप.

२. ख्रिस्ती कालगणना सुरू होण्यापूर्वी वैदिक कालात ज्ञात असलेल्या खगोलशास्त्राच्या ज्ञानाचा समावेश **ज्योतिष–वेदांग** या ग्रंथात केलेला आहे.

अशोकाचा प्रवास म्हणजे भ्रमंती अगर एखाद्या राजर्षींची यात्रा नव्हती.[१] फ्लीटचे असे मत आहे की, राजत्याग करून भिक्षू झाल्यानंतर अशोकाने आपला अखेरचा आज्ञालेख बुद्धाच्या मृत्यूच्या २५६ व्या वर्षी प्रसृत केला, परंतु या मताला पुष्टी देणारा पुरेसा पुरावा नाही.[२] त्याच्या कारकिर्दीच्या अठ्ठाविसाव्या वर्षी प्रसृत केलेल्या सातव्या स्तंभशासनाच्या पुराव्यावरून आपल्याला असे दिसते की लघु शिलाशासन प्रसृत केल्यावरही अनेक वर्षे त्याची कारकीर्द चालू राहिली. भिक्षू झाल्यानंतर काढलेला आज्ञालेखही राजा असताना काढलेल्या आज्ञालेखां-सारखाच असावा ही गोष्टही संपूर्णपणे असंभवीय आहे. त्याने त्या विभागातील अधिकाऱ्यांना उद्देशून लिहावे असा काहीही अधिकार भिक्षू झाल्यावर त्याच्याकडे राहणे कठीण आहे. दिवसांची संख्या आणि परिनिर्वाणानंतरच्या वर्षांची संख्या यांचा काही संबंध असावा ही कल्पना पटण्यासारखी नाही कारण तसा संबंध असता तर त्याच्याकडे लक्ष वेधण्यास व कदाचित त्याला शुभ समजावे असे म्हणण्यात अशोकाने एक क्षणही अनमान केले नसते. स्वत:च्या सत्कृत्यांची स्तुती करण्याची वेळ आली तेव्हा तो अगदी विनम्र राहिला होता असे आपल्याला त्याच्या इतर काही आज्ञालेखांवरून वाटत नाही. प्रवासाच्या संदर्भात त्याने वापरलेले शब्द म्हणजे अशोकाने २५६ दिवस दौरा केला या वस्तुस्थितीची नोंद आहे. त्या संख्येला इतर काही महत्त्व नाही.

त्याच्या आज्ञालेखांची भौगोलिक स्थानेही लक्षात घेण्याजोगी आहेत. एक गट मध्यभारतातील प्रदेशात सापडलेला आहे तर दुसरा त्याच्या साम्राज्याच्या अगदी दक्षिणेकडच्या प्रदेशात आढळलेला आहे. सुरवातीच्या शब्दांमध्ये सुवर्णगिरी आणि इसिला यांचा उल्लेख आहे. ती स्थाने म्हणजे मस्कीजवळील कनकगिरी व सिद्दापूर अशी सांगता येतील.[३] त्या लेखाचा सुरवातीचा परिच्छेद पुढील-प्रमाणे आहे.

---

१. अशोकावरील आपल्या ग्रंथात केर्न असे सुचवितात की धर्मज्ञान संपादण्या-साठी त्याने २५६ रात्री प्रार्थना करण्यात घालवल्या. व्युथ या शब्दाच्या चुकीच्या अर्थावर हे मत आधारलेले आहे. आम्हाला असे वाटते की धर्मज्ञानप्राप्तीसाठी २५६ दिवस प्रार्थनेत घालविण्याइतका अशोकाचा बौद्धधर्माविषयीचा जिव्हाळा नव्हता. शिवाय त्यासाठी इतक्या लांबवर इसिला येथे जाण्याचीही त्याला गरज नव्हती. (**अशोक पृ. ३८**)

२. **जेआरएस्**, १९०९, पृ. ९८१, तळटीप.

३. तिसरे परिशिष्ट पाहावे.

सुवण्णगिरीते अय्यपुत्तस्स महामात्ताणं च वचनेन इसिलस्सि महामात्ता आरोगियं वत्तविया...[1]

सुवर्णगिरीहून आर्यपुत्र आणि महामात्र आज्ञा करीत आहेत. इसिलाच्या महामात्रांना कुशल विचारून....

जर हा आज्ञालेख पाटलिपुत्रातून प्रसृत करण्यात आला असेल तर या सुरवातीच्या वाक्याची काय जरूर होती ? यात असलेला आर्यपुत्राचा उल्लेख म्हणजे त्या भागाचा स्थानिक राज्यपाल असावा. इसिलाच्या महामात्रांचे कुशल विचारले आहे त्यावरून बहुधा आपल्या साम्राज्याच्या दक्षिण भागात दौऱ्यावर असताना अशोकाने हा आज्ञालेख स्थानिक भागासाठी काढला असावा. सहस्राम व रूपनाथ यांसारख्या पाटलिपुत्राच्या जवळच्या ठिकाणीही हा आज्ञालेख सापडतो. त्याचे स्पष्टीकरण असे करता येते की अशोकाच्या दक्षिणेकडील दौऱ्याचा माग याच भागातून जात असावा व कदाचित दौऱ्यामधील ज्या ज्या ठिकाणी तो गेला त्यातील महत्त्वाच्या ठिकाणी हा आज्ञालेख कोरून ठेवण्यात आला असावा. म्हणजे २५६ रात्री इतका काल त्याने या दौऱ्यावर या वेळेपर्यंत घालविलेला होता. जर हा प्रवास केवळ धार्मिक हेतूने केला असता तर फक्त बौद्धधर्मीयांना पवित्र वाटणाऱ्या स्थानांवरच अशोकाने आपले लक्ष केंद्रित केले असते व या आज्ञा-लेखाच्या आवृत्त्या फक्त बौद्धधर्मीयांच्या पवित्र ठिकाणीच सापडल्या असत्या.[2]

त्याने आठ वर्षे राजमुकुट धारण केल्यानंतर कलिंगयुद्ध झाले. युद्धानंतर बौद्धधर्माविषयी त्याला जास्त जास्त आस्था वाटू लागली असे गृहीत धरले तर त्यानंतर क्रियाशील भिक्षू बनण्यास त्यास अडीच वर्षे लागली हे त्यानेच कबूल केले आहे हे पाहता हा काळ त्याच्या कारकिर्दीच्या बाराव्या वर्षी येतो हे आपल्याला दिसून येते. म्हणजे इ. स. पू. २५७–२५६ हाच या लघु शिला-शासनाचा काल या निष्कर्षाप्रत आपण येतो.

अशोकाच्या कारकिर्दीचा कालानुक्रम ठरविण्याच्या दृष्टीने याहून जास्त महत्त्वाच्या असलेल्या उपलब्ध पुराव्यांमध्ये तेराव्या शिलाशासनाचा समावेश

---

१. ब्लोख ले एंस्क्रेप्सीओं द अशोक, पृ. १४५

२. हा दौरा म्हणजे धर्मयात्रेचाच एक भाग होता असे वर्णन करण्यात आलेले आहे. तो अशोकाने दहाव्या वर्षी केला. (एगरमांट, दि क्रॉनॉलॉजी ऑफ दि रेन ऑफ अशोक मोरीय. पृ. ८१) पण जर अशोक कलिंगयुद्धानंतर बौद्धधर्माकडे आकर्षित झाला असेल तर त्याच्या राज्यारोहणाच्या दहाव्या वर्षी तो हा दौरा करू शकला नसता.

होतो. अशोकाला समकालीन असणाऱ्या पाच ग्रीक राजांची नावे या आज्ञालेखात सांगितलेली आहेत व त्यांची ओळख पटल्यामुळे या कोरीव लेखाचा काल निश्चित करण्यास पुरावा मिळालेला आहे. त्यासंबंधीचा परिच्छेद असा–

**'अत्त अंतियोगे नाम योनलाज पलं चा तेना अंतियोगना चट्टालि ४ लजाने तुलमये नाम अंतेकिने नाम मका नाम अलिक्यसुदले नाम'**[1]

'अँटिओकस नावाचा ग्रीक राजा जेथे राज्य करतो आणि त्याच्या पलिकडे (त्याच्या प्रदेशाच्या) टॉलेमी, अँटिगोनस, मगस आणि अलेक्झांडर या नावांच्या चार राजांच्या (भूमीमध्ये)'

सेल्यूकस निकेटरचा नातू, सिरियाचा दुसरा अँटिओकस थिऑस (इ. स. पू. २६१–२४८), इजिप्तचा दुसरा टॉलेमी फिलाडेल्फस (इ. स. पू. २८५ ते २४७), मॅसिडोनियाचा अँटिगोनस गोनॅटॅस (इ. स. पू. २७६–२३९) आणि सायरेनचा मगस (ज्याच्या मृत्यूच्या वर्षासंबंधी अजून निश्चिती झालेली नाही परंतु इ. स. पू. २५८ ते २५० यांमधील वर्षे असावे असे अनुमान आहे) अशा पहिल्या चार राजांची ओळख पटविणे शक्य आहे.[2] शेवटी उल्लेखिलेला राजा अलेक्झांडर हा कॉरिंथचा अलेक्झांडर (इ. स. पू. २५२–२४४) किंवा एपिरसचा अलेक्झांडर (इ. स. पू. २७२–२५५) असू शकेल.[3]

आपल्या कारकिर्दीच्या तेराव्या वर्षीपासून अशोकाने आपले प्रमुख (दीर्घ) आज्ञालेख प्रसृत करण्यास सुरवात केली असे आपल्याला सहाव्या स्तंभशासनावरून समजते. या दीर्घ शिलाशासनांची शैली व त्यांतील मजकूर पाहता ते लिहिले जाण्याचा काळ परस्परांच्या अतिशय जवळचा असावा. म्हणून तेरावे शिलाशासन अशोकाच्या कारकिर्दीच्या चौदाव्या वर्षाच्या सुमारास म्हणजे इ. स. पू. २५६–२५५ या कालात कोरले गेले असावे असे आपण गृहीत धरू शकतो. मगसंचा काळ निश्चित करून आणि शिलाशासनात उल्लेखिलेला अलेक्झांडर, दोहोपैकी कोणता हे निश्चित करून दुसरा एखादा काल सुचविणेही शक्य आहे. हे सर्व हयात असताना हा आज्ञालेख कोरला गेला असे दिसून येते यांपैकी कोणाही

---

१. तेरावे शिलाशासन, कालसी. बूलोख, **ले एन्स्क्रेपसिऑं द अशोक** पृ. १३०.

२. इ. स. पू. २५० हा काल **दि एज ऑफ दि नंदाज् अँड मौर्याज्** यात सुचविलेला आहे. पृ. २०७. तर इ. स. पू. २५८ हा काल ब्लोख यांनी **ले एन्स्क्रेपसिऑं द अशोक** पृ. १३० न. २३ या ग्रंथात सुचविला आहे.

३. **कॉर्पस एन्स्क्रिप्शनम इंडिकारम,** व्हॉ. एक, पृ. ४८ न. ६; लॅसेन, **इंडिशं आल्टरयुम्सकुंड,** व्हॉ. दोन, पृ. २५५

एका राजाच्या मृत्यूची वार्ता अशोकापर्यंत पोहोचण्यास एखादे वर्ष लागले असावे असे आपल्याला मानता येण्यासारखे आहे.

या आज्ञालेखाचा काळ इ. स. पू. २५६–२५५ धरला तर यात उल्लेखिलेला अलेक्झांडर हा कॉरिंथचा अलेक्झांडर असण्याची शक्यता नाहीशी होते कारण इ. स. पू. २५२ पर्यंत तो सत्तेवर आलेला नव्हता व म्हणून कोरीव लेख ज्यावेळी प्रकाशित केला त्यावेळी त्याच्यासंबंधी अशोकाला माहिती नव्हती. एपिरसच्या अलेक्झांडरने इ. स. पू. २७२–२५५ या काळात राज्य केलेले असल्याने त्याची अशोकाला माहिती होती, असे मानता येईल. आज्ञालेख कोरला गेल्यानंतर त्याच्या मृत्यूची बातमी आली असेल. म्हणून एपिरसचा अलेक्झांडर हाच अलिक्य-सुदल असे आमचे मत झाले आहे.

एगरमाँटने सायरेनच्या मगसच्या मृत्यूच्या कालाविषयीच्या प्रश्नाचा सविस्तर विचार केलेला आहे.[१] कॅटलस, अँथेनिअस व समकालीन नाणी यांचा आधार घेऊन त्याने बऱ्याचशा निश्चितपणे असे सिद्ध केले आहे की मगसचा मृत्यू इ. स. पू. २५२–२५० या कालातच झालेला आहे आणि त्याच्या आधी निश्चितपणे नाही. जरी या कालावर मान्यतेचा शिक्का बसलेला नसला तरी पाच राजांपैकी एपिरसचा अलेक्झांडर हा सर्वांत आधी म्हणजे इ. स. पू. २५५ मध्ये मरण पावला असे आपण गृहीत धरू शकतो. म्हणजे या आज्ञालेखाचा काळ आपण जास्तीत जास्त इ. स. पू. २५४ पर्यंत लांबवू शकतो पण आमच्या मते इ. स. पू. २५६–५५ हाच काळ सत्य काळाच्या जास्त जवळचा आहे.

धम्माचा प्रचार करण्याच्या हेतूने आपल्या साम्राज्याबाहेरील देशांमध्ये दूत पाठविण्याच्या संदर्भात अशोकाने ग्रीक राजांचा उल्लेख केलेला आहे. या दूतांच्या किंवा काही ठिकाणी त्यांना म्हटल्याप्रमाणे धर्मप्रचारकांच्या पाठवणीमुळे महिंदाचे अशाच कार्यासाठी श्रीलंकेला जाणे व त्या शिष्टमंडळाचा काळ यांच्या-संबधीच्या प्रश्न उपस्थित होतो. परंतु त्यापूर्वीच्या एका घटनेचा म्हणजे पाटलिपुत्र येथे भरलेल्या बौद्धांच्या तिसऱ्या धर्मसंगीतीसंबंधीचा विचार करणे आवश्यक आहे. पाटलिपुत्र येथे भरलेल्या धर्मसंगीतीपूर्वी दोन धर्मसंगीती भरल्याचे सांगितले गेले आहे. पहिली मगधामध्ये राजगृह येथे भरविली गेली होती व पिटकांमध्ये एकत्रित केलेल्या बुद्धाच्या प्रवचनांना पद्धतशीर स्वरूप देऊन त्यांचा अर्थ

---

१. **ॲक्टा ओरिएंटालिया,** १९४०, पृ. १०३ तळटीप.

लावण्यासाठी ती भरवली गेली होती.[1] याच धर्मसंगीतीमध्ये बुद्धाच्या एका आवडत्या शिष्याने, आनंद याने बौद्धभिक्षुणींसाठी वेगळा संघ स्थापन करण्यास संमती द्यावी म्हणून आवाहन केल्यामुळे त्याच्यावर सनातनीपणाचा आरोप करण्यात आलेला होता. यावरून ही धर्मसंगीती बुद्धाच्या मृत्यूनंतर लगेच भरविण्यात आली असावी असे दिसते. दुसरी धर्मसंगीती वैशाली येथे भरविण्यात आली असल्याचे सांगितले जाते.[2]

तिसऱ्या धर्मसंगीतीच्या आख्यायिकेच्या विश्वसनीयतेविषयी शंका आहे, कारण फक्त पाली ग्रंथांमध्येच तिचा उल्लेख येतो. या ग्रंथांनुसार असे दिसते की ही धर्मसंगीती बोलाविण्यात आणि तेथे काही निश्चित ठराव संमत करवून घेण्यात अशोकाने अतिशय महत्त्वाची कामगिरी बजावली. परंतु अशोकाने त्यासंबंधीचा उल्लेख कोणत्याही कोरीव लेखात केलेला नाही हे जरा चमत्कारिकच म्हणावे लागेल. ह्या घटनेशी अगदी जवळचा संबंध असू शकेल असा उल्लेख आपल्याला दुफळीसंबंधीच्या आज्ञालेखात सापडतो.[3] या ठिकाणी संघाच्या ऐक्याचे सातत्य व बंडखोर भिक्षू आणि भिक्षुणी यांची हकालपट्टी याविषयी तो पोटतिडकेने बोलतो. बौद्धसंघातील बंडखोर सभासद व एकनिष्ठ सभासद यांच्यात फरक करणे शक्य आहे ही वस्तुस्थिती असे सूचित करते की या मुद्द्यावर काही स्पष्टीकरण झाले असावे व कार्यपद्धतीविषयी काही नियम संमत करण्यात आले असावेत.

या संदर्भात **दीपवंसमध्ये** कथा आहे. बौद्धांच्या **विहारात** अगर मठांमध्ये सुधारक पंथाचा शिरकाव झाल्याने शिस्त व श्रद्धा यांच्या बाबतीत ढिलाई निर्माण झाली अशा स्पष्टीकरणाने या कथेची सुरवात होते.[4] ही गोष्ट परिनिर्वाणानंतर २३६ वर्षांनी म्हणजे अशोकाच्या राज्याभिषेकानंतर अठरा वर्षांनी घडली. साहजिकच काही सनातनी बौद्धांनी या परिस्थितीवर आक्षेप घेतला. अशोकाच्या मंत्र्यांपैकी एकाने **पातिमोक्कविधी** (मुक्ती मिळविण्यासाठी भिक्षूंनी घ्यावयाच्या प्रायश्चितांची मालिका) परत सुरू करावा अशी आज्ञा दिली. परंतु मठातील काही ज्येष्ठ भिक्षूंनी तो विधी न केल्याने हा मंत्री इतका क्रोधाविष्ट झाला की त्याची परिणती त्या भिक्षूंना ठार मारण्यात झाली. हीच कथा **महावंसमध्ये** जास्त

---

१. दत्त, **अर्ली मोनॅस्टिक बुद्धिझम**, व्हॉ. दोन, पृ. ३२४.
२. हॉफिंगर, **एत्युद सुर ल कान्सिल द वैशाली** पृ. १५१ तळटीप.
३. ब्लोख, **ले एंस्क्रेपसीओं द अशोक**, पृ. १५२.
४. सात, ३६–३८,४९.

विस्ताराने सांगण्यात आलेली आहे.[1] राजाचा भाऊ तिस्स हा सनातनी बौद्ध असावा असे दिसते. भिक्षूंच्या वधामुळे दुःखित होऊन त्याने दुसऱ्या एका मंत्र्या-करवी ही हकिगत राजाला कळवली. तेव्हा भिक्षूंचा संहार थांबला असे या कथेत आहे. उत्तरेकडच्या कथेमध्ये आपल्याला वेगळेपणा दिसतो. **निर्ग्रंथ** व बौद्ध यांच्यात दंगली होऊन त्याचे पर्यवसान राजाचा भाऊ, एक धर्मशील बौद्ध ठार होण्यात झाले असे ही कथा सांगते. त्यामुळे राजाने हस्तक्षेप केला व दोनही पंथांना शांत केले.[2] हीच कथा ए–यु–वँग–चुआन मध्येही येते परंतु राजाचा भाऊ चुकीने **निर्ग्रंथ** समजला गेला व मारला गेला असा थोडा फरक त्या कथेत आहे.[3]

पाली आख्यायिकेत पहिल्या दोन कथांचा समावेश असून त्यानंतर संघाच्या शुद्धीकरणाचे वर्णन पुढे चालू केले आहे.[4] बौद्ध संघाचा एक सन्माननीय ज्येष्ठ नेता व भिक्षू, मोग्गलिपुत्त तिस्स याला अशोक पाठवितो व सर्व भिक्षूंना अशोका-राम या प्रसिद्ध मठामध्ये एकत्र जमवितो. जे **विभज्ज** सिद्धांतावर श्रद्धा ठेवणारे होते त्यांनाच केवळ खरे बौद्ध मानले जाते. बाकीच्याना संघातून हाकलले जाते. या शुद्धीकरणानंतर तिसरी बौद्ध धर्मसंगीती मोग्गलिपुत्त तिस्स याच्या अध्यक्षतेखाली पाटलिपुत्र शहरात भरविण्यात येते. **विभज्जवाद** हीच खरी श्रद्धा असे जाहीर करण्यात येते. या दोन कथांमधील खरा फरक असा आहे की पाली कथेमध्ये बौद्ध व बौद्धेतर यांच्या संघर्षातून तिसरी धर्मसंगीती बोलाविली गेली व संघामधून बौद्धेतरांना हाकलून शुद्धीकरण केले तर उत्तरेकडील ग्रंथामध्ये असे दिसते की राजाने श्रमणांच्या जीविताच्या सुरक्षिततेची हमी दिली.[5]

या कथांमधील बीज विश्वसनीय असू शकेल. बौद्ध व बौद्धेतर अशा विविध पंथांना एकत्र जमण्यास अशोकाने उत्तेजन दिले हे आपल्याला अशोकाच्या आज्ञा-लेखांवरून समजते. त्यामुळे बौद्धांच्या केंद्रांमधून आजीविक व **निर्ग्रंथ** यांची उपस्थिती असणे असंभवनीय नाही. सुसंवादी चर्चा व्हावी या धोरणाचा तो एक भाग होता. अशा परिस्थितीत तीव्र संघर्ष व दंगलीही होण्याची शक्यता होती

---

१. पाच, २३४–४२.

२. **दिव्यावदान**, अठ्ठावीस, पृ. ४२७.

३. प्रझिलस्की, **ला लेजांद द लॅंपेरर अशोक**, पृ. २७८–९.

४. **महावंस**, पाच, २६८–७१

५. **दि क्रॉनॉलॉजी ऑफ दि रेन ऑफ अशोक मोरीय**, पृ. ११३.

याकडे दुर्लक्ष करता येत नाही. चर्चा अत्यंत वादळी स्वरूपाच्या झाल्या असल्या पाहिजेत. तेव्हा एकाच केंद्रात राहणाऱ्या परस्परविरोधी धार्मिक जमातींच्या तणावांच्या संभवनीयतेविषयी बोलण्याची गरज नाही. एखाद्या प्रसंगी वादावादी-मधून हिंसेचा प्रादुर्भाव झाल्याने अशोकाने आपला एखादा मंत्री भांडखोर गटांना शांत करण्यासाठी पाठविला असेल हेही तितकेच शक्य आहे. दंगलीचे स्वरुप उग्र झाल्यामुळे सर्वमान्य तोडगा काढण्याची गरज आहे याची अशोकाला जाणीव झाली असणार. राजाच्या भावाच्या मृत्यूविषयी म्हणूनच शंकेला जागा आहे. कथेला आर्ततेची जोड द्यावी व श्रोतृवर्गावरील नैतिक प्रभावाची परिणामकारकता वाढावी म्हणून हा भाग कथेत समाविष्ट केला असावा.

दत्त यांचा असा तर्क आहे की, श्रीलंकेतील ग्रंथांखेरीज इतरत्र या घटनांना विशेष महत्त्व दिले गेलेले नाही, त्यामुळे हा संघर्ष श्रीलंकेतील ग्रंथकारांच्या कल्पनेतील असावा, श्रीलंकेतील **विभज्जवादी** व इतर पंथ यांच्यात संघर्ष असावा व त्यावर हा काल्पनिक संघर्ष आधारलेला असावा व **विभज्जवाद्यांना** पाठिंबा द्यावा हा त्यात हेतू असावा,[1] हा तर्क खरा असू शकेल.

वेगवेगळ्या ग्रंथांमध्ये सांगितलेल्या घटनांपैकी, अशोकाच्या कोरीव लेखां-मधून जिला पुष्टी मिळण्यासारखी आहे अशी एकच घटना दिसते, ती म्हणजे संघाचे शुद्धीकरण. दुफळीसंबंधीचा आज्ञालेख व घटना यांच्यात काहीतरी संबंध असावा असे या ठिकाणी दिसते. या आज्ञालेखात असे गृहीत दिसते की शुद्धीकरण होऊन गेलेले आहे व संघातील एकता परत प्रस्थापित झाली आहे. ज्या भिक्षूंवर व भिक्षुणींवर संघात दुफळी पाडल्याचा (पांढरी कौपीन वापरणारे विरुद्ध भगवी कौपीन वापरणारे ) दोष येत होता त्यांना संघातून हाकलून देण्याची धमकी यात दिलेली आहे. शुद्धीकरण होण्यापूर्वी एखादी धर्मसंगीती भरली असावी ही घटना या आज्ञालेखावरून सिद्ध होत नाही. त्यात केवळ एवढेच म्हटले आहे की बंडखोर घटक घालवून संघ शुद्ध झाला पाहिजे. संघातून बंडखोरांची हकालपट्टी करणे ही बाब स्थानिकरीत्या सहजपणे हाताळता येण्यासारखी असल्याने, भिक्षू व भिक्षुणी यांच्या प्रत्येक समुदायाने स्थानिक मंडळाच्या नेतृत्वाखाली ती धमकी, अर्थातच **महामात्तांना** कळवून, अंमलात आणली. जर अशोकाने पाटलि-पुत्राला धर्मसंगीती बोलावून या शुद्धीकरणाला स्वतः मदत केली असती तर त्याच्या एखाद्या आज्ञालेखात त्याने त्यासंबंधीचा उल्लेख निःसंशयपणे केला असता.

---

१. **अर्ली मोनॅस्टिक बुद्धिझम**, व्हॉ. दोन. पृ. २६५.

दुफळीसंबंधीचा आज्ञालेख अशोकाच्या कारकिर्दीच्या शेवटी अगर शेवटच्या वर्षामध्ये कोरला गेला असावा असा एक तर्क केला जातो. कारण 'आपल्याला परत एकदा सहजतेने श्रीलंकेतील कथांमधील शंभर टक्के बौद्ध सापडतो.'[१] आणखी एका दृष्टिकोनातूनही या आज्ञालेखाचा विचार झाला पाहिजे. संघामधील संघर्षाने जो टेकीला आलेला आहे व शासक म्हणून या संघर्षात हस्तक्षेप करण्यासाठी ज्याला सतत बोलाविले जात आहे अशा एका राज्यकर्त्याच्या दृष्टिकोनातूनही या आज्ञालेखाचा अर्थ लावता येण्यासारखा आहे. संघामधील ऐक्य 'यावच्चंद्र दिवाकरौ' टिकून राहील अशी आशा आज्ञालेखाच्या पहिल्या भागात तो करतो. हे त्याचे शब्द निःसंशयपणे एकनिष्ठावान बौद्धांचे आहेत. बंडखोर सभासदांना हुसकवण्याची धमकी देणारा दुसरा भाग म्हणजे ज्याच्या कार्यात व ज्याच्या शासकीय अधिकाऱ्यांच्या कामात धार्मिक झगडे अडथळा आणताना दिसतात अशा राज्यकर्त्याने दिलेली ताकीद असण्याची शक्यता आहे. धार्मिक पंथांना शांत करणे हे काम कधीच सुखकारक झालेले नाही. अशोकाने ज्या पातळीवर बौद्धधर्म अंगिकारला होता व संघाने ज्या पातळीवर बुद्धाच्या शिकवणुकीचा अर्थ लावला होता त्या दोनही पातळ्या निश्चितपणे अतिशय भिन्न असल्या पाहिजेत.

दुफळीच्या आज्ञालेखाचा काळ अनिश्चितच राहतो. बुद्धाच्या मृत्युनंतर २३६ वर्षांनी धर्मसंगीती भरल्याचे व शुद्धीकरण केल्याचे पाली बखरी सांगतात.[२] इ. स. पू. ४८६ हा परिनिर्वाणाचा काल पायाभूत धरला तर इ. स. पू. २५० म्हणजेच अशोकाच्या कारकिर्दीचे एकोणिसावे वर्ष हा धर्मसंगीतीचा काळ मिळतो. अलाहाबादच्या स्तंभावर ज्या ठिकाणी हा लेख कोरलेला आहे त्यावरून या आज्ञालेखाचा काल याहून पुढचा असावा असे अनुमान करण्यात आलेले आहे.[३] हा आज्ञालेख सातव्या स्तंभशासनानंतर काही काळाने प्रसृत झाला असे मानले जाते. असे असेल तर या आज्ञालेखाचा काल राज्याच्या अठ्ठाविसाव्या वर्षानंतर येतो. सात स्तंभशासने अत्यंत पद्धतशीरपणे कोरलेली आहेत. स्तंभाचा परिघ त्यांनी व्यापला आहे आणि प्रत्येक अक्षर काळजीपूर्वक कोरलेले आहे व सर्वत्र समान अंतर आहे. या आज्ञालेखांच्या खाली दुफळीचा आज्ञालेख व त्याखाली राणीचा आज्ञालेख आहे. जर दुफळीसंबंधीचा आज्ञालेख स्तंभशासनापूर्वी कोरला गेला

---

१. एगरमाँट, **दि क्रॉनॉलॉजी ऑफ दि रेन ऑफ अशोक मोरीय**, पृ. ११६.

२. **दीपवंस**, सात, ३६–३८.

३. **दि एज ऑफ दि नंदाज् अँड मौर्याज्**, पृ. २१६.

असता तर तो निश्चितपणे वरच्या पातळीवर व इतर लेखांच्या वरच्या बाजूला कोरला गेला असता.[1]

यावरून अशोकाच्या कारकिर्दीच्या अखेरीच्या वर्षांमध्ये हा लेख कोरला गेला असावा. पाली बखरी सांगतात त्यावर विश्वास ठेवावयाचा झाल्यास निरनिराळ्या केंद्रामधील बौद्ध व बौद्धेतर यांच्यातील कटू वर्तनामुळे संघाची जर इतकी बजबजपुरीची परिस्थिती झाली असेल तर ती सुधारण्याची प्रक्रिया सुरू होऊन त्या पाठीमागचे हेतू साध्य होण्यास अनेक वर्षे लागली असली पाहिजेत. बंडखोर सभासदांना केवळ बाहेर काढणे एवढ्यानेच भागण्यासारखे नव्हते. ही प्रक्रिया अशोकाच्या कारकिर्दीच्या एकोणिसाव्या वर्षी सुरू झाली असणे शक्य आहे व आणखी दहा वर्षे वा त्याहून जास्त काल संघाची संपूर्ण शुद्धी झाली नसावी. अखेर एकदा धार्मिक संघर्ष संपुष्टात आले व सनातनी बौद्ध कोण हे पारखण्याच्या काही निश्चित कसोटचा प्रस्थापित झाल्या असे अशोकाला वाटले तेव्हा त्याने हा दुफळीसंबंधीचा आज्ञालेख लिहिला असावा. अशोकाच्या इतर जाहीरनाम्यांमधून सहिष्णुवृत्तीला जे आवाहन करण्यात आलेले आहे त्याला विरोधी असा हा दुफळीसंबंधीचा आज्ञालेख नाही, तर बौद्धधर्मपीठातच गाजलेला संघर्ष संपुष्टात आल्याची ती केवळ नोंद आहे.

अशोकाच्या आश्रयाखालील धर्मसंगीतीची ऐतिहासिकता शंकास्पदच राहते. मोग्गलिपुत्त तिस्स याच्या मार्गदर्शनाखाली पाटलिपुत्रात एखादी स्थानिक धर्मपरिषद भरलीही असेल. तिच्याशी अशोकाचा थोडासा संबंध असेल वा नसेलही. धार्मिक संघर्षामुळे निर्माण झालेल्या समस्यांवर उचित उपाय म्हणजे बौद्ध जगतातील प्रत्येक भागातील संघाचे शुद्धीकरण करण्याचा निर्णय हाच होता. प्रत्येक स्थानिक संघात हे तत्व प्रत्यक्षात उतरवण्यापूर्वी काही वर्षे हा निर्णय घेतला असेल. सहिष्णुतेचा प्रचार करण्यात मग्न असलेल्या अशोकाच्या दृष्टीने धर्मसंगीतीला फारसे महत्त्व नव्हते. परंतु धार्मिक तत्वाच्या दृष्टीने तिला अतिशय महत्त्व असल्याने पाली बखरींनी तिला भरपूर महत्त्व दिलेले आहे. कदाचित याच कारणासाठी अशोकाचा तिच्याशी संबंध जोडण्याचा प्रयत्न झाला असावा. विभज्जवादी बौद्धधर्मीयांना तिचे महत्त्व वाटत असल्याने या स्थानिक धर्मपरिषदेला त्यांनी अवास्तव महत्त्व दिले असावे.

---

१. कॉर्पस इन्स्क्रिप्शनम् इंडिकारम्, व्हॉ. एक. संपा. कनिंगहॅम, पृ. ३८ चित्रफलक बावीस.

जैनांच्या धार्मिक इतिहासात, जैन धर्मातील विविध पंथांच्या संदर्भात अशाच परिषदेचे वर्णन आहे हे लक्षात घेण्याजोगे आहे. शार्पेन्तिए यांनी पुरावा गोळा करून पुढील घटना सांगितल्या आहेत.[१] चंद्रगुप्त मौर्यांच्या कारकिर्दीत पडलेल्या बारा वर्षांच्या दुष्काळाच्या शेवटी इ. स. पू. ३०० मध्ये जैन धर्मपीठाचे दुर्दैव ओढवले. त्याची दोन परस्परविरोधी पंथांमध्ये, श्वेतांबर व दिगंबर पक्षांमध्ये विभागणी झाली. दुष्काळाच्या काळात दक्षिणेकडे स्थलांतरित झालेल्या साधूंनी आपले आचरण सनातनी तत्वांप्रमाणेच ठेवलेले होते परंतु मगधाला परतल्यानंतर त्यांना असे दिसले की मागे राहिलेल्या साधूंच्या आचरणात ढिलाई आलेली आहे. म्हणून मगधातील साधूंनी पाटलिपुत्र येथे धर्मग्रंथ गोळा करून त्यांची पुनर्रचना करण्यासाठी धर्मपरिषद बोलावली. दोनही आख्यायिकांमधील सारखेपणावरून असे वाटते की कोणीतरी एकाने दुसऱ्याची उसनवारी केली असावी.

श्रीलंकेला गेलेल्या महिंदाच्या शिष्टमंडळाची कथा तिसऱ्या बौद्ध धर्मसंगीतीशी निगडीत आहे. महिंद हा **विभज्जवादी** पंथाचा अनुयायी होता हे श्रीलंकेच्या बखरकारांना सिद्ध करावयाचे असेल या कल्पनेकडे आम्ही दुर्लक्ष करू शकत नाही. पाली बखरींनुसार महिंदाच्या धर्मांतरास मोग्गलिपुत्त तिस्स हा जबाबदार होता.[२] महिंद वीस वर्षांचा झाला तेव्हा अशोकाच्या कारकिर्दीच्या सहाव्या वर्षी ही घटना घडली. तिसरी धर्मसंगीती संपल्यानंतर उपखंडातील विविध भागांमध्ये व शेजारच्या देशांमधून बौद्ध धर्मप्रचारकांना पाठविण्यात आले. वेगवेगळ्या शिष्टमंडळांची पाठवणी करण्याची व्यवस्था लावण्यास एखादे वर्ष लागले असावे असे मानल्यास अशोकाच्या कारकिर्दीच्या विसाव्या वर्षी म्हणजे इ. स. पू. २४९ मध्ये महिंदाला श्रीलंकेला पाठविण्यात आले असे आपल्याला गृहीत धरता येईल. हा काल **दीपवंसमधील** उल्लेखावरोबर जुळणारा आहे कारण **परिनिर्वाणानंतर** २३७ वर्षांनी महिंद श्रीलंकेमध्ये आला असे तो म्हणतो.[३]

महिंदाला पाठविण्यापूर्वी अशोक व श्रीलंकेचा राजा देवानम्पिय तिस्स यांचा संबंध आलेला होता हे आपल्याला माहीत आहे. **महावंस** सांगतो की

---

१. **केंब्रिज हिस्ट्री ऑफ इंडिया**, खं. एक, पृ. १६५, **परिशष्टिपर्वन**, नऊ, ५५–७६.

२. **दीपवंस**, सात १४–२०, २४.

३. **उपरोक्त**, पंधरा, ७१.

अशोकाला भेट देण्यासाठी तिस्स काही रत्ने पाठवू इच्छित होता. तो अशोकाला 'आपला मित्र' म्हणवीत असे.[1] पुढे असे वर्णन आहे की 'जरी दोघांनी परस्परांना पाहिलेले नसले तरी हे दोन राजे एकमेकांचे बराच काळ मित्र होते.' आज्ञालेखांमध्ये श्रीलंकेसंबंधी दोन उल्लेख असून ते दोन्हीही बौद्धधर्मसंगीतीपूर्वीचे आहेत.[2]

दीपवंसमध्ये अशोक आणि तिस्स यांचा प्रत्यक्ष संपर्क असल्याचे सांगितले आहे. परिनिर्वाणानंतर २३६ वर्षांनी म्हणजे अशोकाच्या राजवटीच्या एकोणिसाव्या वर्षी तिस्साने प्रथम मुकुट धारण केला.[3] यानंतर त्याने लगेच आपला पुतण्या अरिथ्थ याच्या नेतृत्वाखाली अशोकाकडे एक शिष्टमंडळ पाठविले.[4] श्रीलंका ते ताम्रलिप्ति व तेथून पुढे पाटलिपुत्र असा त्याचा प्रवास झाला. पाच आठवडे मौर्यांच्या राजधानीत राहिल्यानंतर हे शिष्टमंडळ तिस्सासाठी अशोकाचा एक संदेश व देणग्या घेऊन परतले. आपण उपासक (सामान्य पूजक) बनलेलो असून तिस्सानेही तोच मार्ग अनुसरावा, असा हा संदेश होता. या संदेशासंबंधी दाट संशय आहे. जर अशोकाने खरोखरच असा संदेश पाठविला असेल तर आपण कमीत कमी नऊ वर्षे उपासक असल्याचे त्याने सांगितले नाही हे आश्चर्य आहे. लघु शिलाशासनाच्या पुराव्यावरून ते स्पष्ट झालेले आहे. हे शिष्टमंडळ परतल्यानंतर तिस्साला दुसऱ्यांदा अभिषेक झाला व त्यानंतर महिन्याने महिंद श्रीलंकेला आला.[5] या घटना इ. स. पू. २५० मध्ये घडल्या. शिष्टमंडळासंबंधीची ही हकीगत व महिंदाचे शिष्टमंडळ ही एकच गोष्ट व एकच घटना असावी असा तर्क करता

---

१. अकरा, १८.

२. दुसरे शिलाशासन, गिरनार आणि तेरावे शिलाशासन, कालसी, श्रीलंकेबरोबर ताम्रपर्णिचा संबंध सिद्ध झाला आहे, त्यावर हे आधारलेले आहे.

३. दीपवंस, सतरा, ७८.

४. महावंस, अकरा, २०.

५. तिस्साला दोनदा राज्याभिषेक झाला हे बखरींनी सांगावे हे खरोखरच विचित्र आहे. दुसऱ्या राज्याभिषेकासंबंधी विशेष स्पष्टीकरण केलेले नाही. तिस्साने बौद्धधर्मात प्रवेश केल्यानंतर तो राज्याभिषेक लगेच झाल्यामुळे, बौद्धभिक्षूंच्या दृष्टिकोनातून दोहोंमध्ये तो जास्त महत्त्वाचा होता असे गृहीत धरता येईल. म्हणून त्यांच्या राजांच्या यादीत त्याचा उल्लेख केला असावा.

येण्याजोगा आहे. स्नेहशील शेजाऱ्याच्या राज्याभिषेकाच्या गौरवार्थ वरच्या दर्जाचा योग्य अधिकारी म्हणून राजाचा मुलगा महिंद हा राजदूत म्हणून जाणे अगदी शक्य आहे. एक बौद्धभिक्षू या नात्याने त्याने राजा व त्याचे दरबारी यांच्यापुढे बौद्धधर्माची प्रवचने करण्याचा आणि राजाचा वकील म्हणून सेवा करण्याचा, असे दोनही हेतू निःसंशयपणे साध्य केले.

तिस्स राजाचा पुतण्या अरिध्थ हा परत एकदा या वर्णनात येतो.[1] यावेळी राणी अनुला व दरबारातील स्त्रिया यांना दीक्षा देण्यासाठी संघमित्ताला आणण्याकरिता म्हणून पाटलिपुत्राला त्याची रवानगी करण्यात आलेली आहे. या प्रसंगी अशोकानेही श्रीलंकेला बोधिवृक्षाची फांदी पाठवली असावी असे समजले जाते. या घटनेची ऐतिहासिक निश्चितता शंकास्पद आहे. बखरींनी या घटनेचा कोणताही काल दिलेला नाही. बोधिवृक्षाच्या बिया आणण्यासाठी श्रीलंकेच्या राजाने आपला एक वकील भारतात पाठवला व श्रीलंकेमध्ये त्या बिया पेरण्यात आल्या असे फा–हियानने आपल्या आठवणींमध्ये सांगितलेले आहे.[2] संघमित्तेची कथा ही मुख्य वर्णनाला फक्त एक सुखद सत्यकथा म्हणून जोडलेली असेल, पण त्यामुळे काल्पनिक प्रवासाच्या वर्णनासारख्या लेखनात निःसंकोचपणे रममाण व्हावयास बखरकारांना एक निमित्त मिळाले. अनुला ही पट्टराणी असल्यामुळे तिला दीक्षा घेण्यास तिस्साने परवानगी दिली असेल हे संभवत नाही. बोधिवृक्षाच्या शाखेच्या कथेत मात्र काही सत्य असेल. उत्साहाच्या भरात तिस्साने अशोकाडे अशी फांदी पाठवण्याची विनंती केली असेल. ती मान्य करून अशोकाने गमावले तर काही नाहीच पण जर काही मिळविले असेल तर तिस्साची अधिक सदिच्छा.[3]

---

१. **महावंस**, अकरा, १८ ४२, अठरा, एकोणीस. **दीपवंस**, अकरा, २५–४०, बारा, १–७, पंधरा, ७४–९५, सोळा १–७, ३८–४१.

२. गाइल्स, **ट्रॅव्हल्स ऑफ फा–हियान**, पृ. ६८.

३. ही कथा भारत व श्रीलंका यांच्याही बाहेर पसरली होती हे आपणास गोबीच्या वाळवंटासारख्या दूरच्या प्रदेशातही ती पाहावयास मिळते यावरून समजते. येथील मठाच्या एका गुहेत एक भित्तिचित्र आहे. त्या चित्रात अशोक बुद्धाची एक प्रतिमा आणि बोधिवृक्षाची एक शाखा श्रीलंकेला पाठवीत असल्याचे चित्रित केल्याचे सांगितले जाते. हे भित्तिचित्र इसवी सनाच्या सातव्या शतकातील आहे.




बौद्ध शिष्टमंडळे पाठविण्यात आलेले भाग

तिसऱ्या बौद्ध धर्मसंगीतीच्या अखेरीस काही नामवंत बौद्धभिक्षूंना निवडण्यात आले व धर्मप्रचारक म्हणून वेगवेगळ्या प्रदेशात त्याना पाठविण्यात आले असे सांगितले जाते. त्यांच्यामध्ये मज्झंतिक (ज्याला काश्मीर व गांधार येथे पाठविण्यात आले होते). महादेव (महिषमंडल), रक्खित (वनवासी), योन धम्मरक्खित (अपरन्तक), महाधम्मरक्खित (महारठ्ठ), महारक्खित (योन), मज्झिम (हिमालयातील प्रदेश), सोन आणि उत्तर (सुवर्णभूमी), महिंद (लंका यांचा समावेश होतो.[1]

हिमालयाच्या प्रदेशात पाठविलेले शिष्टमंडळ मोठे होते व त्यात कस्सपगोत्त, धुन्दिभिस्सर, सहदेव आणि मूलकदेव या चार साधूंचा अंतर्भाव होता. सांची येथे अवशेष असलेल्या करंडकांवर यातील थोडी नावे आहेत. योन हा शब्द (ग्रीक हे दर्शविण्यासाठी साधारणपणे वापरतात) धम्मरक्खित या नावाच्या मागे आहे त्यावरून हा भारतीयेतर कदाचित ग्रीक वा इराणी भिक्षू असावा असे सूचित होते. परंतु भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील अपरन्तक या भागात त्याला पाठविले जावे तर महारक्खित याला ग्रीक प्रदेशात पाठविले जावे हे विचित्र वाटते. योन म्हणजे वायव्य भारतातील भारतीय ग्रीकांच्या वसाहती अभिप्रेत असाव्यात, परंतु रुद्रदामनच्या जुनागड येथील कोरीव लेखात जो तुशास्प याचा उल्लेख आलेला आहे त्यावरून असे दिसून येईल की पश्चिम भारतात इराणी वा ग्रीक यांच्या परकीय वसाहती असाव्यात.[2] दुसरी एक शक्यता अशी दिसते की जेव्हा बखरींच्या नकला करण्यात आल्या तेव्हा मजकुराच्या बाबतीत काही गोंधळ झाला असावा. या धर्मप्रसारकांची जी नावे आहेत ती इतकी सारखी आहेत की त्यातून संशय निर्माण होतो असेही म्हणता येईल. अर्थात ज्यावेळी या व्यक्तींनी बौद्धसंघात प्रवेश केला त्यावेळी त्यांनी ही नावे धारण केलेली असावीत हेही शक्य आहे कारण ख्रिस्ती धर्मासारख्या इतर काही धर्मांप्रमाणेच बौद्धधर्मविधी-मध्येही ही प्रथा प्रचलित असल्याचे ज्ञात आहे.[3]

---

१. महावंस, बारा, १–८.

२. सरकार, सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स... पृ. १६९.

३. केर्न, मॅन्युअल ऑफ बुद्धिझम, पृ. ११७.

बौद्धधर्मसंगीतीने केलेल्या धर्मप्रसारकांच्या या पाठवणीची अशोकाच्या धम्मविजयाच्या (धम्माच्या मार्गाने विजय) धोरणाशी सांगड घातली गेली आहे.[1] या मताच्या समर्थनासाठी तेराव्या शिलाशासनाचा हवाला देण्यात आलेला आहे. या लेखात अशोक असे जाहीर करतो की, धर्मनिष्ठेने वा सद्गुणांनी मिळविलेला विजय हा सत्य विजय, आणि तो असा विजय मिळविल्याचा दावा करतो कारण त्याचा असा विश्वास होता की त्याच्या राज्याच्या सीमांबाहेरही हे धम्माचे धोरण अंगिकारले गेले आहे.[2] परंतु बौद्धांची शिष्टमंडळे आणि अशोकाच्या वकिलाती यांच्यातील निश्चित संबंध दाखविणारा हा आधार नाही. तेरावे शिलाशासन इ. स. पू. २५६–२५५ मध्ये प्रकाशित करण्यात आले आणि वकिलाती यापूर्वीच उघडल्या गेल्या असल्या पाहिजेत. पाचव्या शिलाशासनात अशोक स्पष्टपणे सांगतो की आपल्या कारकिर्दीच्या चौदाव्या वर्षी त्याने धम्ममहंताची नेमणूक करण्यात सुरुवात केली.[3] धम्माचे आचरण आणि प्रचार यांची जबाबदारी ज्यांच्यावर होती अशा अधिकाऱ्यांचे हे एक खास मंडळ होते.

अशोकाने हे धर्मप्रचाराचे कार्य चालवले होते असे म्हणणे आपल्याला शक्य असेल (सर्व राजनैतिक मंडळे कोणत्या तरी कारणाची वा कल्पनेची प्रचारक असतात असे संभाव्य गृहीत धरल्यास) तर त्याने कसेही असो, पण या बाबतीत बौद्ध शिष्टमंडळांपेक्षा निदान पाच वर्षे तरी आधी आघाडी उघडलेली होती. बौद्ध शिष्टमंडळे केवळ धार्मिक स्वरुपाची होती आणि ती अशोकाच्या मार्गदर्शनानुसार नव्हे तर बौद्धसंगीतीच्या मार्गदर्शनानुसार बाहेर पाठविली गेली होती. बौद्ध शिष्टमंडळांपेक्षा त्याच्या स्वतःच्या वकिलाती अगदी वेगळ्या होत्या व त्यांना पुढच्या काळात काही मार्गांनी बौद्धशिष्टमंडळानी मदत केलीही असेल.

बौद्ध शिष्टमंडळांनी अशोकाच्या राज्यात किंवा राज्याच्या सीमांवरील भागांमध्ये आपले लक्ष केंद्रित केले होते हे लक्षात घेण्याजोगे आहे. संघाच्या शुद्धीसंबंधीचे निर्णय ठिकठिकाणी कळविणे हा त्याचा प्रमुख हेतू व नवे धर्मांतरित मिळविणे हा दुय्यम हेतू असल्याने हे साहजिकच आहे. बौद्ध ग्रंथांमध्ये सांगितलेल्या बहुतेक भागांमध्ये अशोकाने आधीच धम्ममहामत्तांच्या नेमणूका केलेल्या होत्या.[4]

---

१. निळकंठ शास्त्री (संपा.) दि एज् ऑफ दि नंदाज् अँड मौर्याज्. पृ. २१७.
२. दुसरे शिलाशासन, ब्लोख, ले एंस्क्रेप्सिओं द अशोक, पृ. ९३ तळटीप.
३. उपरोक्त.
४. उपरोक्त.

ही शिष्टमंडळे पाठविण्याची जर राजाचीच जबाबदारी असती तर त्याने यापेक्षा जास्त दूरच्या प्रदेशात जेथे त्याने अजून स्वतःचे वकील व अधिकारी पाठविलेले नव्हते, अशा प्रदेशात पाठविण्यासंबंधी जास्त आस्था दाखविली असती.

बौद्ध बखरींचा पुरावा म्हणून विचार करताना, त्या बौद्ध भिक्षूंच्या एका मंडळाने रचलेल्या होत्या हे लक्षात ठेवणे अतिशय महत्त्वाचे आहे. अशोकाच्या कारकिर्दीत घडलेल्या काही घटनांची माहिती जरी त्या देत असल्या तरी त्यांचा प्रधान हेतू त्या वर्षामध्ये बौद्धधर्माची वाढ करणे हाच होता. या वाढीच्या दृष्टीने पोषक ठरेल त्या ठिकाणीच ऐतिहासिक माहिती समाविष्ट केली आहे. शिवाय बौद्धधर्माच्या इतिहासाच्या दृष्टीने ज्या घटना महत्त्वाच्या आहेत त्यांनाच इतरांच्या पेक्षा जास्त प्राधान्य दिलेले आहे. या बखरकारांना अशोक महत्त्वाचा वाटतो तो त्याच्या ऐतिहासिक स्थानामुळे नव्हे तर बौद्धधर्माच्या वाढीसाठी त्याने जे कार्य केले त्यामुळे. ज्या घटनांना धार्मिक दृष्ट्या जास्त महत्त्व आहे व ज्या घटना राजाच्या राजकारणाशी संबंधित आहेत त्यांच्यातील फरकाचे आपण सतत भान ठेवले पाहिजे.

अशोकाने आपल्या कारकिर्दीच्या एकविसाव्या वर्षी बुद्ध जिथे जन्माला आला त्या लुम्बिनिवनाला भेट दिली.[१] ही घटना इ. स. पू. २४८ मधील असावी. या घटनेची नोंद करण्यासाठी एका स्तंभावर लेख कोरण्याचा आदेश राजाकडून देण्यात आलेला होता. एगरमाँटने या भेटीचा, अशोकाने इ. स. पू. २४८ मधील ग्रहणानंतर केलेल्या यात्रेशी मोठ्या चातुर्याने व संदेह राहणार नाही अशा पद्धतीने मेळ घातला आहे. अशोकाच्या काळातील घटनांचा अनुक्रम ठरविण्याच्या दृष्टीने ही घटना म्हणजे एक महत्त्वाचा घटक मानता येईल.

एकाच दिवशी, एकाच वेळी ८४००० स्तूप बांधावेत अशी अशोकाची इच्छा होती, अशी एक कथा दिव्यावदानात आलेली आहे.[२] यशस या थेराला हे कळविण्यात आल्यानंतर, हे अशक्य कार्य प्रत्यक्षात यावे म्हणून त्याने आपल्या हाताने सूर्य लपविला. थोड्याशा फरकाने हीच कथा इतर बौद्धग्रंथांमधूनही आढळते.[३] सूर्य लपविणे म्हणजे सूर्यग्रहण हा एगरमाँटने लावलेला अर्थ अचूक

---

१. रुम्मिनदेइ कोरीव लेख. ब्लोख, ले एंस्क्रिप्सिओं द अशोक पृ. १५७.

२. सव्वीस, पृ. ३८१.

३. वॅटर्स, ऑन युआन च्वांग्ज ट्रॅव्हल्स इन इंडिया, व्हा. दोन, पृ. ९१
दीपवंस, सात १–८

आहे. हा अर्थ उघड आहे व या परिच्छेदाचा इतर कोणता अर्थ लागत नाही. अशोकाच्या कारकिर्दीत असे एखादे ग्रहण लागून गेले असेल का याविषयीचे गणित मांडणे कठीण आहे. फेझी[1] व सिडेरस्की[2] यांच्या संशोधनावरून असे आढळते की अशोकाच्या कारकिर्दीच्या काळात इ. स. पू. ४ मे २४९, इ. स. पू. १५ जून २४२ व इ. स. पू. १९ नोव्हेंबर २३२ या तारखांना सूर्यग्रहणे होती. एखादे सूर्यग्रहण लागले होते ही वस्तुस्थिती प्रस्थापित झालेली असल्याने वरील तीन ग्रहणांपैकी **दिव्यावदानात** उल्लेखिलेले ग्रहण कोणते हे सूचित करणाऱ्या इतर काही पुराव्याचा विचार करणे आपल्याला भाग आहे.

**दिव्यावदानातील** या कथेमध्ये पुढे असे वर्णन आहे की, स्तूप बांधून झाल्यानंतर व सूर्यग्रहणानंतर **थेराने** बौद्धधर्मीयांना पवित्र वाटणाऱ्या स्थळांकडे नजर टाकण्यास अशोकाला परवानगी दिली आणि यांपैकी काही ठिकाणी स्तूप व चैत्य बांधलेले अशोकाला आढळले. यांमध्ये बुद्धाचे जन्मस्थान सांगितलेले आहे. या सर्व घटना लागोपाठ झपाटयाने घडल्या अशी वस्तुस्थिती असल्याचे तारानाथ सांगतो.[3] पवित्र ठिकाणांचे दर्शन व त्यानंतर तेथे बांधलेले स्तूप व चैत्य यांवरून सूर्यग्रहणानंतर अशोकाने एखादा दौरा अगर यात्रा सुरू केली असावी असे दिसते. नाहीतर प्रत्यक्षात तो या सर्व जागा कसा काय पाहू शकला असता ? अशोकाच्या कारकिर्दीच्या विसाव्या, सत्ताविसाव्या आणि सदतिसाव्या वर्षी वरील तीन ग्रहणे लागली होती. यांपैकी कोणत्याही एका वर्षी तो दौऱ्यावर असावा वा त्याने यात्रा केली असावी हे निश्चित. पण जास्त स्पष्ट म्हणावयाचे झाल्यास विसावे वर्ष हे सर्वात जास्त संभाव्य वाटते कारण रुम्मिनदेइ येथील स्तंभावरील कोरीव लेख त्याच्या पुढच्या वर्षात प्रकाशित झाला आहे.[4] राजा असे म्हणतो की त्याने लुम्बिनिला (लुम्बिनी या प्राचीन नावाचे आधुनिक रुप म्हणजे रुम्मिनदेइ) भेट दिली आणि तेथे पूजा केली कारण ते बुद्धाचे जन्मस्थान होते. याच कारणासाठी त्या जागी खूण म्हणून एक घोडयाचे शिल्प व स्तंभ उभारण्यात आला.[5] आपण

---

१. **जेए**, १९३०, व्हॉ. दोनशे सतरा, पृ. १३५, १३६.
२. **जेए**, १९३२, व्हॉ. दोनशे वीस, पृ. २९५--९७.
३. **गेशिस्ट देस बुधीझमुस इन् इंडिअन**, पृ. ३६.
४. ब्लोख, **ले एंस्क्रेपसिओं दि अशोक**, पृ. १५७.
५. ते जनावर म्हणजे घोडा असावा हे विचित्र आहे. बुद्धाच्या जन्माशी नेहमी हत्तीचे साहचर्य दिसते.

यापूर्वी पाहिल्याप्रमाणे **दिव्यावदाना**मध्ये लुम्बिनिच्या गौरवाचा विशेष उल्लेख आहे. शिवाय खऱ्या बौद्धाने ज्या चार स्थळांची यात्रा करावी अशी अपेक्षा आहे, त्यांपैकी लुम्बिनी हे एक यात्रास्थान आहे. याच वर्षी अशोकाने कोनाकमन या स्तूपाला भेट दिली. यावरून कदाचित ग्रहणानंतर काही महिन्यांनीच त्याने आपल्या कारकिर्दीच्या एकविसाव्या वर्षी यात्रा केली असावी असे दिसते.

श्रीलंकेच्या बखरी या घटनांचा काळ अशोकाच्या कारकिर्दीचे सातवे वर्ष म्हणजे इ. स. पू. २६२–२६१ असा सांगतात.[1] ग्रहणांच्या पुराव्यावरून हा काल चूक आहे कारण त्या वर्षी ग्रहणच नव्हते. एकविसाव्या वर्षातील यात्रेचा प्रत्यक्ष उल्लेख नाही. परंतु पाटलिपुत्रातील तिसरी धर्मसंगीती झाल्यानंतर मोग्गलिपुत तिस्साने नावेतून गंगानदीमधून प्रवास केला व काही मुक्कामांवर अशोक त्याच्याबरोबर होता असे आपल्याला सांगण्यात आलेले असल्याने[2] या कालात अशोकाने गंगेच्या प्रदेशात प्रवास केलेला असलाच पाहिजे हे स्पष्ट झालेले आहे. यावरून सूर्य लपविणे म्हणजे इ. स. पू. ४ मे २४९ चे ग्रहण आणि त्यानंतरच्या वर्षी अशोकाने बौद्धधर्मीयांच्या पवित्र स्थानांना भेट दिली असे आपण गृहीत धरू शकतो.

अशोकाच्या कारकिर्दीतील यापुढील ज्ञात घटना म्हणजे त्याने स्तंभावर कोरलेले आज्ञालेख व त्यांचा काल सत्ताविसावे व अठ्ठाविसावे वर्ष असा सांगितलेला आहे. पहिले सहा आज्ञालेख प्रामुख्याने **धम्माशी** संबंधित असून ते त्याच्या कारकिर्दीच्या सत्ताविसाव्या वर्षी कोरले गेले. त्यानंतरच्या वर्षी कोरला गेलेला सातवा आणि शेवटचा आज्ञालेख म्हणजे त्याच्या कार्याचे विशेषतः **धम्माच्या** विकासासंबंधीच्या कार्याचे समालोचन दिसते. यानंतर पुढे इ. स. पू. २३२ मध्ये त्याचा मृत्यू होईपर्यंतच्या वर्षांमध्ये दीर्घ आज्ञालेख दिसत नाहीत हे एक आश्चर्यच आहे. आज्ञालेख प्रसृत करण्यात इतक्या तत्पर असलेल्या माणसाच्या बाबतीत दहा वर्षांच्या मौनाचे स्पष्टीकरण करणे कठीण आहे.

अशोकाच्या कारकिर्दीच्या अखेरच्या वर्षांमध्ये त्याच्या राज्याच्या शासनयंत्रणेवरचा त्याचा ताबा कमी होण्यास सुरुवात झाली होती असे सुचविणाऱ्या पुरेशा कथा बौद्धांच्या धर्मग्रंथांमधून आलेल्या आहेत. अशोकाच्या अखेरीच्या वर्षासंबंधीच्या घटना **महावंस** पुढीलप्रमाणे सांगतो. त्याच्या कारकिर्दीच्या एकोणतिसाव्या वर्षी त्याची पट्टराणी असंधिमित्ता मरण पावली. यानंतर चार

---

१. **महावंस**, पाच, १७३–६.

२. एगरमाँट, **दि क्रॉनॉलॉजी ऑफ दि रेन ऑफ अशोक मोरीय**, पृ. १२८.

वर्षांनी इ. स. पू. २३७ मध्ये त्याने तिस्सरख्खा हिला पट्टराणीचा मान दिला. दोन वर्षांनंतर, तिने राजाच्या बोधिवृक्षाविषयीच्या भक्तीचा मत्सर वाटून त्या वृक्षात एक विषारी काटा खुपसून त्याला इजा केली, त्यामुळे तो वृक्ष वठू लागला. यामुळे अत्यंत संतापून जाऊन अशोकाने त्या वृक्षाचा जो काही लहानसा भाग जिवंत राहिला होता तो मोठ्या प्रयत्नाने व काळजीने जोपासला, त्यामुळे तो वृक्ष वाचू शकला. त्याच्या कारकिर्दीच्या सदतिसाव्या वर्षी इ. स. पू. २३३–२३२ मध्ये राजा मृत्यू पावला. फा–हियान जरी राणीचे नाव सांगत नसला तरी त्याने याच कथेची पुनरुक्ती केलेली आहे.[१]

या घटनांवर बखरकारांनी खुलेपणाने टीका केली आहे. असंधिमित्ता ही चांगली राणी होती, कारण संघाविषयी तिला स्नेहभाव होता. आपल्या नवऱ्याच्या कल्पनांविषयी सहानुभूती असलेली एक विचारी स्त्री असे तिच्याविषयी मत होते. तिस्सरख्खा, ही दुराभिमानी व मूर्ख असल्याचे वर्णन आहे. अशोकाने तत्वचिंतना' वर तास आणि तास घालविणे आणि कदाचित बौद्धधर्मीयांच्या बाबींकडे विशेष लक्ष पुरविणे याविषयी अत्यंत राग असणारी एक स्वार्थी स्त्री असे तिचे स्वरुप दिसते. बोधिवृक्षात काटा खुपसून त्याचा तिने नाश केला ही कथा आजच्या वनस्पतिशास्त्राच्या ज्ञानाच्या प्रकाशात मान्य करता येण्याजोगी नाही. परंतु या वृक्षाची हानी करण्याचा प्रयत्न करून आणि इतर काही मार्गांनी तिने आपला राग दाखवून दिला असावा. तिच्या आधीच्या राणीपेक्षा तिला बौद्धधर्मीयांविषयी फारच कमी सहानुभूती होती. कदाचित हा वृक्ष नैसर्गिक कारणांनीच वठण्यास सुरुवात झाली असेल परंतु बखरकारांनी तिस्सरख्खाच्या बौद्धधर्मीशी असलेल्या हाडवैराशी त्याची सांगड घातली असेल हाच संभव जास्त दिसतो. असंधिमित्ता-सारखी सुबुद्ध सहचारिणी गमावल्यानंतर, आपल्या अखेरच्या काळात अशोक आपल्या नव्या राणीचा प्रभाव आणि मोहकता यांच्या आहारी गेला असावा ही कल्पना या कथेतून सूचित होते.

अशोकावदानात, तिस्सरख्खाने (संस्कृत ग्रंथांमध्ये तिला तिष्यरक्षिता म्हटले आहे) आक्रस्ताळेपणाने आपल्या सामर्थ्याचे प्रदर्शन केल्याच्या ज्या कथा आहेत त्या वरील कल्पनेला पुष्टी देणाऱ्या आहेत.[२] पद्मावती या राणीचा मुलगा राजपुत्र कुणाल हा अतिशय सुंदर डोळे घेऊन जन्माला आलेला होता असे एका कथेत

१. गाइल्स, ट्रॅव्हल्स ऑफ फा–हियान, पृ. ५८.
२. प्रझिलस्की, ला लेजांद द लँपेरर अशोक, पृ. २८३, तळटीप.

आहे. परंतु पुढच्या आयुष्यात तो आंधळा होईल असे भाकित वर्तविण्यात आलेले होते. तिस्सरख्खाने केलेल्या कारस्थानामुळे हे भाकित खरे ठरले. अशोकाची पत्नी असूनही कुणालाच्या सुंदर नेत्रांमुळे ती त्याच्या मोहात पडलेली आहे. त्याने तिच्या वासनेला प्रतिरोध केल्याने त्याचा सूड घेण्याचे ती ठरविते. मध्यंतरी अशोक आजारी पडतो. तिस्सरख्खा त्याच्या दुखण्याचे चातुर्याने निदान करते व त्यामुळे ती त्याला बरा करू शकते.[1] राजा कृतज्ञतेने तिची कोणतीही इच्छा पूर्ण करण्याचे मान्य करतो. नंतर ती या वचनाचा उपयोग अशा काही पद्धतीने करते की त्यामुळे शेवट दुःखद होतो. तक्षशिलेत एक बंड होते व ते मोडण्यासाठी कुणालाला पाठविले जाते. राणी अशोकाची मुद्रा वापरून (त्याने तिला दिलेल्या वचनाचा एक भाग म्हणून तिला ही मुद्रा मिळालेली असते.) तक्षशिलेच्या अधिकाऱ्यांना अशी आज्ञा करते की कुणालाला आंधळा करून त्याला ठार मारावे. अतिशय गोंधळलेले अधिकारी आज्ञेचा पहिला भाग अंमलात आणतात परंतु तरुण राजपुत्राविषयी त्यांना प्रेम वाटत असल्याने दुसऱ्या भागाची अंमलबजावणी करण्याचे नाकारतात व तक्षशिला सोडण्यास त्याला मुभा देतात. आपली आवडती पत्नी कांचनमाला हिच्यासह तो ते शहर सोडून भटकू लागतो. वीणा वाजवीत आणि गाणी गात तो देशभर हिंडत असतो आणि एके दिवशी तो पाटलिपुत्र नगरात पोहोचतो. अशोक त्याचा आवाज ओळखतो. त्याची सर्व हकिगत ऐकल्यानंतर अशोकाच्या दुःखाला पारावार राहात नाही. तिस्सरख्खाला जिवंत जाळण्याची शिक्षा देण्यात येते. कुणालाची दशा पाहून अशोक असे उद्‌गारतो की, ' मागच्या काही पापाबद्दल त्याला स्वतःलाच ही शिक्षा झालेली आहे.' या कथेत नैतिकतेचा काही अंश समाविष्ट करावा लागला आहे हे अर्थातच उघड आहे.

ही पुराणकथा जशी आहे तशी पाहिल्यास असे दिसते की ती प्रामुख्याने भिक्षूंच्या कल्पनाविलासातून निर्माण झालेली आहे. बिंदुसाराच्या कारकिर्दीच्या अखेरीस तक्षशिलेत असेच एक बंड उद्‌भवले होते, ते शमविण्यासाठी अशोकाला पाठविण्यात आले होते. या मूळच्या कथेसारखीच तक्षशिलेतील बंडाची हकिगत

---

१. अशोकासारखाच आजार असलेला दुसरा एक माणूस शोधून काढण्यात आला. वेगवेगळ्या प्रकारचे उपचार त्याच्यावर चालू ठेवून दुखण्याची संभाव्य कारणे नाहीशी करण्यात आली. अचूक उपाय सापडेपर्यंत त्याच्यावर उपचार करण्यात आले. त्या कालातील वैद्यकीय पृथक्करणावर हा परिच्छेद प्रकाश टाकतो.

आहे. या दोन कथांमधील अतिशय-सारखेपणामुळेच मूळ कथेचे अनुकरण केले असावे ही खात्री पटते. अशोकाच्या कारकिर्दीच्या अखेरीस अगदी नेमकी अशीच घटना घडली असेल असे क्वचितच घडण्यासारखे आहे. पहिल्या बंडाची कथा आणि कुणालाला देशाच्या दुसऱ्या एखाद्या भागात कदाचित उपराजपालक म्हणून पाठविल्याची कथा यांच्यात **अशोकावदानाच्या** संपादकाने काही गोंधळ केलेला असणे संभवनीय आहे. आपण यापूर्वी सांगितल्याप्रमाणे, सिरकपच्या अॅरेमिक कोरीव लेखाचा पूरक पुरावा मिळाल्यामुळे पहिल्या बंडाच्या ऐतिहासिक अचूकतेविषयी जास्त विश्वसनीयता वाटते. दुसरा आणि एक अर्थ असा लावता येईल की अशोकाच्या कारकिर्दीच्या अखेरीस त्याला आपल्या राज्याच्या विविध भागांमधील किरकोळ उठावांना तोंड द्यावे लागले असावे. अशोकाचा ताबा सैल सुटल्यामुळेच केवळ हा परिणाम झाला नसावा तर **धम्माच्या** काही जास्त त्रासदायक बाबींविरुद्ध सामान्य लोकांच्या प्रतिक्रियेमुळेही कदाचित असे घडले असावे. शेवटच्या प्रकरणात या कल्पनेचा आपण जास्त विचारपूर्वक विचार करू.

अशोकाचा आजार आणि तो बरा होणे याविषयीच्या कथेवरून असे सूचित होते की राजघराण्यातील कमी महत्त्वाच्या व्यक्तींकडून राज्याच्या कामांमध्ये काही कट वा हस्तक्षेप केले जात असावेत. सर्व वर्णनाच्या संदर्भात अशोकाकडून तिस्सरख्खाला, तो तिची इच्छा पूर्ण करील असे वचन मिळणे आवश्यक होते. हे करण्यासाठी अर्थातच सर्वात उघड मार्ग म्हणजे अत्यंत कठीण क्षणी त्याचा जीव वाचविणे हाच होय. हे साध्य करण्याचा तौलनिक दृष्ट्या साधा मार्ग म्हणजे असह्य वाटणारा आजार त्याला भोगावयास लावणे. हीच पुराणकथा, अगदी अशाच स्वरुपात इतर संस्कृतीमधूनही दिसून येते. जो काही तुटपुंजा तपशील या पुराणकथेतून गोळा होण्याजोगा आहे त्यावरून असे सूचित करता येईल की अशोकाच्या अखेरच्या काळामध्ये राणी व त्याचे कुटुंबीय यांच्याकडून होणाऱ्या त्रासांनी तो घेरला गेला असावा.

राजाच्या शेवटच्या वर्षांसंबंधी ही एकच पुराणकथा **अशोकावदनात** नाही. त्याच्या कारकिर्दीच्या शेवटी भिख्खूंना दान देण्यास तो असमर्थ ठरल्याची एक कथा आहे.[1] कुकुटाराम येथील मठाला अशोकाने आपला सर्व कोष अर्पण केला असे सांगितले गेले आहे. तो असे जाहीर करतो की कुणालाचा मुलगा सम्प्रती हा राज्याचा खरोखर वारस आहे व आपण केवळ नाममात्र राजा आहोत. हा

---

१. प्रझिलस्की, ला लेजांद द लँपेरर, अशोक, पृ. २९६, तळटीप.

आधार असे सुचवितो की राजपुत्र हा मंत्र्यांच्या विश्वासातील होता व ते सर्वजण अशोकाच्या विरुद्ध कट करीत होते कारण त्याने बौद्धसंघांना दिलेल्या देणग्या त्यांना मान्य नव्हत्या. एके दिवशी एक भिख्खू भिक्षा मागण्यासाठी येतो. त्याला भिक्षा म्हणून देता येईल अशी केवळ एकच गोष्ट अशोकाच्या मालकीची असते व ती म्हणजे अर्धा आंबा. ज्याची सर्व सत्ता नष्ट झालेली आहे असा हा राजा दुःखी व निराश होऊन मेला असे या कथेवरून सुचविता येईल.

बौद्धग्रंथांमध्ये दिलेल्या या पुराणकथांवरून काही इतिहासकार असे म्हणतात की, अखेरच्या वर्षांमध्ये अशोकाची सत्ता बरीच दुबळी झाली होती एवढेच नव्हे तर अधिकारी चढेल बनले होते व बळाचा वापर करावयाचा नाही अशी शिकवण राजपुत्रांना असल्याने साम्राज्याचा कारभार पाहण्यास ते असमर्थ होते.[1] काही लेखकांचे असे मत आहे की अशोक आपल्या वृद्धापकालात राज्यकार-भारातून वस्तुतः निवृत्त झालेला होता, आपला वारस व मंत्री यांच्याकडे आपले अधिकार त्याने सुपूर्त केले होते व अशोकाचे धोरण चालू ठेवण्याविरुद्ध त्यांनी कट केले असावेत असे दिसते.[2] बौद्धकथांवर हे लेखक अती विश्वास ठेवीत असल्याने त्यांची ही चुकीची मते झालेली आहेत. अशोकाच्या कारकिर्दीच्या अखेरीस त्याच्या अधिकारांमध्ये काहीसा कमकुवतपणा आलेला होता हे नाकारता येणार नाही. अशोकाच्या वारसासंबंधी विविध साधनांमध्ये असणारा एकमताचा अभाव, त्याच्या शेवटच्या वर्षांमध्ये असलेला गोंधळ काही अंशी दर्शवितो. परंतु त्याच्याविरुद्ध मंत्र्यांनी एखादा कट केला हे जसे असंभवनीय दिसते तसेच त्याने संघाला सर्वस्वाचे दान केले व त्याच्याजवळ केवळ अर्धा आंबा राहिला यावर विश्वास ठेवणेही अशक्य वाटते. पुराणकथेमध्ये या मंत्र्याचा राधागुप्त असा उल्लेख आहे. बिंदुसाराचा मंत्री राधागुप्त, ज्याने अशोकाला गादी मिळविण्यास साहाय्य केले होते, तो अशोकाच्या छत्तीस वर्षांच्या कारकिर्दीच्या अखेरीसही अशोकाच्या विरुद्ध कटकारस्थाने करण्याइतका सामर्थ्यवान असावा याच्यावर विश्वास ठेवणे अत्यंत कठीण आहे.

या पुराणकथांच्या खरेपणाचा विचार करताना त्या ज्या हेतूने लिहिल्या गेल्या आहेत तो आपल्याला लक्षात ठेवला पाहिजे. शिवाय या कथा एकाच माणसाने लिहिलेल्या नाहीत. वेगवेगळ्या भागांतून या आख्यायिका गोळा कर-

---

१. रायचौधरी, **दि पोलिटिकल हिस्ट्री ऑफ इंडिया**, पृ. ३६३, तळटीप.

२. बारुआ, **अशोक अँड हिज इन्स्क्रिप्शन्स**, पृ. ६२.

ध्यात आलेल्या होत्या, त्यात सतत बदल केला जात होता, वेगवेगळ्या देशांमध्ये प्रचलित असलेल्या कल्पनांचे, विशेषत: त्या ज्या ठिकाणच्या आख्यायिका होत्या तेथील कल्पनांचे मिश्रण त्यात होत होते. आज आपल्यापर्यंत या आख्यायिका ज्या स्वरुपात येऊन पोहोचल्या आहेत ती बौद्धभिक्षूंची कामगिरी आहे. ज्या ठिकाणी बौद्धांच्या नीतितत्वांत त्या बसणाऱ्या नव्हत्या, तेथे त्यांनी जरूर ते बदल केलेले आहेत यात शंका नाही. बौद्धांच्या दृष्टिकोनातील सत्याचे, काहीशा कच्चेपणाने का होईना पण प्रत्येक गोष्टीत चित्रण करायचे हा प्रत्येक कथेचा हेतू होता आणि बुद्धाच्या शिकवणुकीशी सुसंगत असे तात्पर्य प्रत्येक गोष्टीत होते. त्यामुळेच अशोकाचे सुरवातीचे जीवन दुष्ट, अधार्मिक माणसाचे होते. त्याने बौद्ध धर्माचा स्वीकार केला आणि तात्काळ तो बौद्धांच्या सदाचरणाचा मूर्तिमंत पुतळा बनला. इतका धर्माचरणी असूनही केवळ अर्धा अंबा त्याच्याजवळ राहिला आहे, अशा स्थितीत त्याचा शेवट सापेक्षत: दु:खातच झाला. पृथ्वीवरच्या प्रत्येक माणसाच्या नशिबी दु:ख असतेच. अगदी अशोकासारख्या धर्मनिष्ठ माणसालाही त्याच्या वाट्याला आलेल्या भोगातून जावे लागले. त्याच्या यातना अधिक मोठ्या होत्या कारण त्याच्या कारकिर्दीच्या शेवटी त्याला त्या भोगाव्या लागल्या आणि त्याच्या समकालीनांच्या नजरेमधून तो अपयशी ठरला असावा.



## ३ : समाज आणि आर्थिक व्यवहार

अशोकाच्या धोरणाचे योग्य आकलन होण्यासाठी मौर्यकालीन भारताच्या सामाजिक आणि आर्थिक परिस्थितीचा अभ्यास करणे अत्यावश्यक आहे हे आम्ही प्रस्तावनेच्या प्रकरणात सांगितलेले आहे. याशिवाय मौर्यांनी सुरू केलेली व विकसित केलेली केंद्रित नोकरशाहीसारखी एक विशिष्ट प्रकारची प्रशासनयंत्रणा या परिस्थितीमुळेच राबविणे शक्य झाले कारण या प्रकारची प्रशासनव्यवस्था घडविण्यास त्या परिस्थितीची मदत झाली. सामाजिक आणि आर्थिक घटकांचा परस्परांवर पडणारा प्रभाव हाही तितकाच महत्त्वाचा आहे. कोणतीही एकमेव प्रेरणा, मग ती धार्मिक शक्ती असो, एखादी आर्थिक व्यवस्था असो किंवा एखादी तत्वज्ञानात्मक चळवळ असो, ती समाजाच्या विकासाला संपूर्णपणे जबाबदार असत नाही. या प्रेरणांपैकी प्रत्येक प्रेरणा एकमेकीशी संबंधित असून सर्वसाधारण विकासात ती महत्त्वपूर्ण कामगिरी बजावते. समाजाच्या प्राथमिक अवस्थेत उपजीविकेच्या केवळ भौतिक अंगाशी आर्थिक घटकाचे अतिशय निकटचे साहचर्य असते, पण म्हणून केवळ तो घटक समाजाचे स्वरुप पालटू शकत नाही. एखाद्या कालखंडाच्या इतिहासाच्या अभ्यासाचा उद्देश सत्यशोधन हा असेल तर विविध प्रेरणांची कामगिरी विचारात घेणे अत्यावश्यक ठरते.

समाजाला आकार देणाऱ्या सामाजिक घटकांचे पृथक्करण आणि आर्थिक प्रेरणांचे परीक्षण यांची अनेक वेळा एकमेकात सरमिसळ होते कारण त्या दोन्हींचा अत्यंत घनिष्ट संबंध असतो. साम्राज्याची संघटना म्हणजे सामाजिक व्यवस्थेवरही परिणाम करणाऱ्या एका नव्या प्रकारच्या अर्थव्यवस्थेचा स्वीकार ही वस्तुस्थिती लक्षात घेतली तर मौर्यकालीन जीवनाच्या या दोन वैशिष्ट्यांना कसे विशिष्ट महत्त्व आहे ते स्पष्ट होते. मौर्यपूर्वकालात प्राथमिक पशुपालन अवस्थेतील अर्थव्यवस्थेचे रुपांतर शेतीवर आधारलेल्या ग्रामीण अर्थव्यवस्थेत झालेले होते. अरण्ये नष्ट केल्यानंतर हे पाऊल पडणे साहाजिकच होते. त्यामुळे शेतजमिनीशी निगडीत असलेले ग्रामीण समुदाय, ही गंगेच्या खोऱ्यामध्ये सर्वसाधारण पद्धती बनली. तौलनिकदृष्ट्या अधिक स्थिर झालेल्या वसाहतींबरोबर व्यापारासारख्या सोयींसाठी संघटना आल्या. नदीतून वाहतूक करण्याची सोय असल्याने गंगेच्या खोऱ्यात व्यापाराला अनुकूल परिस्थिती होती. व्यापाराच्या विकासामुळे व्यावसायिकांच्या श्रेणींमधून व्यापारी समुदायांची प्रस्थापना झाली. हे समुदाय म्हणजे नागरी जीवनातील एक प्रभावी

घटक ठरल्याने तत्कालीन समाजात एका नव्या शक्तीचा उदय झाला. हळुहळू अर्थव्यवस्थेतील हा बदल गंगेच्या खोऱ्यांतून इतर भागांमध्ये होत गेल्याने या सर्व भागांचा एकत्रित विचार करून त्यांना एक परिमाण मानणे शक्य झाले. त्यानंतर एकदा एका राजकीय नियंत्रणाखाली हा प्रदेश आल्यानंतर प्रशासनव्यवस्थेच्या विकासालाही त्याचा हातभार लागला. बहुतेक भागांमध्ये एकाच प्रकारची सर्वसाधारण जीवनपद्धती प्रचलित झालेली असल्याने शासनविषयक कल्पनांचा विकास जास्त सुलभपणे होऊ शकला असावा.

शेतीवर आधारलेली अर्थव्यवस्था कायमची प्रस्थापित झाल्यानंतर अर्थ-व्यवस्थेचा इतर कोणता प्रकार असण्याचा संभव नव्हता असे येथे सुचविण्याचा उद्देश नाही. आर्थिक रचनेत बदल होतच राहिले, परंतु ज्या भागात असे बदल होणे जास्त फायदेशीर होते तेथेच ते विशेषत्वाने होण्याची प्रवृत्ती होती. शेतीवर आधारलेल्या अर्थव्यवस्थेच्या विस्तारामुळे, एकच विशिष्ट प्रकारची अर्थव्यवस्था असली की करांची आकारणी करणे सुलभ होते, या विचाराला चालना मिळत गेली. उदाहरणार्थ सागरी व्यापारावर अवलंबून असणारे किनारपट्टीवरील भाग जमेल त्याप्रमाणे आपला व्यापार चालू ठेवतील वा वाढवितील परंतु ज्या भागांमध्ये एकाच मुख्य आर्थिक व्यवसायाला विशेषत्वाने वाहून घेतलेले असते व त्याच्या अनुषंगाने तेथे कराची आकारणी केली जाते त्या भागांसारखे हे भाग कधीच मानले जाणार नाहीत. ज्या ठिकाणी करपद्धती आणि करांचे दर बऱ्याचशा कायम स्वरुपात प्रस्थापित करता येण्याजोगे होते, अशा स्थिर अर्थव्यवस्थेच्या राज्यकर्त्यांना खूपच काही मिळविण्याजोगे होते. त्यामुळे मौर्यांच्या राज्याच्या राजकीय–आर्थिक पायासंबंधी सिद्धांत मांडणाऱ्या कौटल्याने अर्थशास्त्राचा एक महत्त्वाचा भाग करयोजनेच्या अंमलबजावणीसाठी खर्च केलेला आहे, यात आश्चर्य वाटण्याजोगे काही नाही.[1] करांच्या रुपाने किती जमीनमहसूल गोळा होण्याजोगा आहे याचा अंदाज बांधणे शक्य झाल्याने एक आर्थिक व सामाजिक सुरक्षिततेची भावना निर्माण झाली. प्रशासनव्यवस्थेच्या विकासाच्या सुरवातीच्या अवस्थांमध्ये कर गोळा करणे ही प्रशासकीय व्यवस्थेमधील प्रमुख बाब असल्याने प्रशासनव्यवस्थेचे कामही सुलभ झाले. आपल्या घटकांना फायदेशीर ठरेल अशा पद्धतीने सातत्याने कार्यरत राहणारा असा समाज संघटित करण्याची एक स्वप्नरम्य इच्छा या सामाजिक सुरक्षिततेने निर्माण झाली.

---

१. बुक दोन.

वैदिक काळातच सामाजिक संघटनाला सुरुवात झाली होती. समाजोपयोगी श्रमांच्या संघटनेवर आधारलेली, समाजाची चार जातींमध्ये विभागणी करणारी व्यवस्था त्यातून उदयाला आली. मौर्यकालापर्यंत या समाजव्यवस्थेचे स्वरुप बरेचसे प्रवाही होते आणि सामाजिक गतिक्षमता दर्शविणारी बरीचशी उदाहरणे सांगता येण्याजोगी आहेत.[१] उदाहरणार्थ, ब्राह्मण व क्षत्रिय या पहिल्या दोन जातींचे स्थान आपापसात बदलू शके. पुरोहित म्हणून ज्याला मान दिला जाई, परंतु प्रसंगी ज्याची टरही उडविली जाई अशा ब्राह्मणापेक्षा राजपुत्राला सामाजिकदृष्ट्या वरचढ स्थान मिळत असल्याचे अनेक वेळा दिसते. बौद्ध वाङ्मयात समाजामधील जातींची यादी वारंवार क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य आणि शूद्र या क्रमाने दिली जाते व त्यावरून बुद्धाच्या काळात ब्राह्मणाचे सामाजिक स्थान क्षत्रियापेक्षा कमी दर्जाचे होते असे सुचविले जाते.[२] मौर्यकालापर्यंत ब्राह्मणांनी जास्त वरचे स्थान मिळविले असावे असे दिसते. जातिव्यवस्थेत नंतरच्या काळात निर्माण झालेल्या ताठरतेची सर्व वैशिष्टचे जरी मौर्यकाळात दिसून येत नसली तरी त्यांच्या निर्मितीची प्रक्रिया सुरू झाल्याचे स्पष्टपणे जाणवते. ब्राह्मणांचे काही अग्रमान आणि अधिकार प्रस्थापित झाल्याचे मान्य करण्यात आलेले होते.[३] राज्याशी संबंधित असणाऱ्या विषयांबाबत पुरोहिताकडे असणाऱ्या नेतृत्वासंबंधी या आधीच्या ब्राह्मणग्रंथांमध्ये जे उल्लेख आहेत त्यांवर **अर्थशास्त्रामध्ये** भर देण्यात आलेला आहे[४] जातिव्यवस्थेची सैद्धांतिक बाजू संपूर्णपणे स्वीकारण्यात आलेली होती असे मेगॅस्थिनिसच्या भारतीय समाजाविषयीच्या वृत्तांतावरून स्पष्ट दिसते. ब्राह्मणांच्या वाढत्या सत्तेला अंकुश म्हणून बौद्धधर्म उपयुक्त ठरू शकला असता. परंतु ब्राह्मणविरोधाचे हत्यार म्हणून त्याचा परिणामकारकरीत्या कधीच उपयोग करण्यात आला नाही. एकदा विजय प्राप्त झाल्यानंतर, आपल्या सर्वसामर्थ्यानिशी ब्राह्मणी शक्ती आपल्या स्थानावर पक्का पाय रोवून बसल्या हे मनूने अनेक ठिकाणी दाखवून दिले आहे व जातिसंस्थेची ताठरता हे कायमचे वैशिष्ट्य होऊन बसले.

---

१. ऱ्हीस डेव्हिड्स्, **बुद्धिस्ट इंडिया**, पृ. ५६.

२. **अंगुत्तर निकाय**, तीन, पृ. ३६२, तळटीप, **जातक**, तीन, १९, पाच, २०५.

३. **अर्थशास्त्र**, दोन, २८.

४. उपरोक्त, एक, १०.

प्राचीन भारतातील सामाजिक संघटनेच्या अभ्यासाची एक उपयुक्त दिशा म्हणजे समकालीन प्रवाशांच्या वृत्तांतांचे आणि परकीय साधनांमधून येणाऱ्या याच विषयावरील वृत्तांतांचे परीक्षण करणे ही होय. उदाहरणार्थ ग्रीक व लॅटिन ग्रंथांमधून भारतातील जातिव्यवस्थेविषयी उल्लेख आहेत. यापैकी बहुसंख्य उल्लेखांचा उगम प्रामुख्याने मेगॅस्थिनिसच्या वृत्तांतामध्ये असावा. आमच्या विवेचनासाठी पाया म्हणून आम्ही मेगॅस्थिनिसच्या मतांचा उपयोग करू इच्छितो. इतर कोणत्याही भारतीय वा परकीय साधनांपेक्षा ती मते जास्त विश्वसनीय आहेत म्हणून नव्हे तर कोणताही पूर्वग्रह न बाळगता मौर्यकालीन सामाजिक जीवनाची प्रधान वैशिष्ट्ये त्यात विचारात घेतली आहेत म्हणून ! कोणत्याही विशिष्ट दृष्टिकोनाच्या समर्थनासाठी ती मते नसून प्रामुख्याने नोंदी करण्यासाठी व्यक्त केली आहेत म्हणून.

भारतीय समाज सात वर्गांमध्ये विभागलेला होता असे मेगॅस्थिनिस सांगतो. तत्त्वज्ञानी, शेतकरी, सैनिक, गुराखी, कारागीर, न्यायाधीश व सल्लागार अशी यादी तो देतो.[1] अॅरियन सुद्धा सात वर्ग असल्याचे म्हणतो पण ते ठामपणाने सांगत नाही.[2] मेगॅस्थिनिसचे हे निरीक्षण वस्तुस्थितीवर काही अंशीच आधारलेले आहे. समाजाची अनेक गटांमध्ये विभागणी करावी लागते ही कल्पना सार्वत्रिक होती यात शंकाच नाही आणि स्थानिक ब्राह्मणांनी ही पद्धती त्याला स्पष्ट करून सांगितलेली असली पाहिजे. परंतु वर्गांची संख्या आणि प्रकारांची संख्या यांचा त्याच्या मनात गोंधळ उडालेला असला पाहिजे. त्याने पाडलेले गट सामाजिक नसून आर्थिक असावेत. चातुर्वर्ण्यव्यवस्था किंवा जातिव्यवस्था यांचा उगम आर्थिक विभागणीत आहे आणि मौर्यकालातही या उगमासंबंधीचा मागमूस टिकून राहिलेला असण्याची शक्यता आहे. त्यामुळे हा गोंधळ समजण्यासारखा आहे. मेगॅस्थिनिसने सांगितलेल्या या गटांना बहिर्विवाहाचे नियम पाळता येणे आणि स्वतःच्या व्यवसायांना स्वतःच मर्यादा घालणे अर्थातच शक्य नव्हते.[3] स्वतःचे निरीक्षण आणि ब्राह्मणांची विचारसरणी यांचा मेळ घालताना मेगॅस्थिनिसची गडबड उडाली असावी असे दिसते. भारताला भेट दिल्यानंतर कदाचित काही वर्षांनी त्याने आपला वृत्तांत लिहिला असावा. त्यामुळे त्याला स्पष्ट करण्यात आलेली वस्तुस्थिती विसरली गेली असावी व

१. डायोडोरस, दोन, ४०–४१.

२. इंडिका, अकरा.

३. टिमर, **मेगॅस्थेनेस एक डे इंडिशे माल्शापिज**, पृ. ६६

अंदाजाने त्याने सात ही संख्या सांगितली असावी व त्यामुळे संख्येबाबतचा हा गोंधळ दिसतो. तसेच आपल्याला उपलब्ध झालेले उतारे हे मूळ वृत्तांतातील नसून मुळामधून घेतलेल्या अवतरणांच्या स्वरुपात आहेत हेही आपल्याला लक्षात ठेवले पाहिजे. पुढच्या लेखकांनी अवतरणे देताना केलेल्या चुकांमुळेही काही विसंगती निर्माण झाल्या असाव्यात असे स्पष्टीकरण देता येण्याजोगे आहे. हिरोडोटसने इजिप्तच्या साम्राज्याचे वर्णन करताना इजिप्तमधील समाजात सात वर्ग असल्याचे सांगितलेले आहे, तेही मेगॅस्थिनिसच्या मनात असण्याचा संभव आहे.[१]

विविध जातींच्या संदर्भात सर्वसाधारण अभिप्राय व्यक्त करताना मेगॅस्थिनिस म्हणतो, 'कोणालाही स्वतःच्या जातीच्या बाहेर विवाह करता येत नाही अगर स्वतःच्या जातीचा धंदा किंवा कारागिरी याखेरीज इतर व्यवसाय पत्करता येत नाही.'[२] परंतु इतरत्र तो असेही सांगतो की, 'या बाबतीत तत्त्वज्ञानी माणसाचा अपवाद करण्यात आलेला आहे, त्याच्या सद्‌गुणामुळे त्याला हा अधिकार प्राप्त झालेला आहे.'[३] पुढच्या काळातील, मनूच्या **धर्मशास्त्र** या ग्रंथातील, 'ब्राह्मणांना खालच्या जातीत विवाह करण्यास परवानगी आहे.' या वचनाचा सूचक असा हा परिच्छेद आहे.[४]

मेगॅस्थिनिसने प्रथम तत्त्वज्ञानी लोकांच्या जातीचा उल्लेख केला आहे. हा गट ब्राह्मणांचा प्रातिनिधिक गट आहे असे साधारणतः मानले जाते. या गटाविषयी मेगॅस्थिनिसने दिलेल्या अभिप्रायांचे परीक्षण करण्यापूर्वी पारंपारिक वाङ्‌मयातून दिसणाऱ्या या गटाच्या स्थानाचा विचार केला पाहिजे. फिकचे असे मत आहे की ब्राह्मणांची दोन गटात विभागणी झालेली आहे. त्याचे हे मत मौर्यकाळाच्या निकटच्या वाङ्‌मयावर आधारलेले असल्याने खात्रीलायक आहे.[५] या दोन प्रकारांमध्ये **उदिच्य** व **सतकलख्खन** यांचा समावेश होतो. यांपैकी **उदिच्य** हे जास्त सनातनी असून ते गुरु व पुरोहित असत तर **सतकलख्खन** ब्राह्मण ऐहिक लाभाकडे पाहणारे अंधश्रद्ध व अज्ञानी असत. दुसऱ्या प्रकारचे ब्राह्मण ज्योतिष

---

१. **हिस्ट्रीज्**, दोन, १६४.
२. डायडोरस, दोन, ४०.
३. स्ट्रॅबो, पंधरा, एक, ४८.
४. तीन, १३.
५. **दि सोशल ऑर्गनायझेशन इन नॉर्थ-ईस्ट इंडिया इन बुद्धाज् टाइम**, पृ. २१२.

सांगण्याचा व जादूटोणा करण्याचा व्यवसाय करीत. सर्व संकटांवर यज्ञ हा अमोघ उपाय होता. यज्ञाचे पौरोहित्य करताना प्रत्येक वेळी हे ब्राह्मण त्यातून पैसा काढीत. त्यामुळे पशुहत्येवर बहिष्कार टाकणाऱ्या बौद्धांचा, त्याचप्रमाणे मंगल व तत्सम समारंभ निरर्थक वाटल्याने अशोकाने ते बंद केल्याचा, या ब्राह्मणांना संताप आलेला असणार. ब्राह्मणांचा दुसरा गट काही वेळा आर्थिक गरजेपोटी ब्राह्मणांसाठी नसलेले व्यवसाय पत्करित असावा. उदाहरणार्थ अरण्याच्या जवळपास राहणारा ब्राह्मण, त्या भागात प्रमाणापेक्षा जास्त संख्येने पुरोहित असल्यास सुतारकीच्या व्यवसायाचा अंगिकार करी.[१] यावरून असे दिसून येईल की, आर्थिक दबावाचा प्रत्यक्ष परिणाम होत असेल तर आपल्या जातीत राहून काही अंशी व्यवसाय बदलण्याची मुभा दिलेली असावी. तथापि सर्वसाधारणपणे बहिर्विवाहाच्या नियमांचे कठोरपणे पालन होत असे. ब्राह्मण जातीतच विवाह केल्याने ब्राह्मणाचा जन्म निश्चित होई. त्यामुळे इतर लोकांशी ब्राह्मणांचा संकर होण्यास प्रतिबंध असे.[२]

राजकीय घडामोडींबाबत केवळ प्रासंगिक सावधानता बाळगण्यात ज्यांना समाधान नव्हते तर ज्यांना अधिक टिकाऊ सत्तेची हाव होती अशा पुरोहितांचा फिकने आवर्जून उल्लेख केलेला आहे.[३] साहजिकच अशा प्रवृत्तीचा दुबळचा किंवा अंधश्रद्ध राजावर घातक परिणाम होई व आपण पुरोहिताच्या हातचे बाहुले बनलो आहोत असे त्याला आढळून येई. जातकग्रंथांमध्ये ब्राह्मणांविषयी अर्थातच पूर्वग्रह आहेत. तथापि या चित्राची दुसरी बाजू म्हणजे कनिष्ठ जातींमधील लोकांना आपण कसे दिसतो याविषयीचे ब्राह्मणांचे मत या ग्रंथांमध्ये दिलेले नाही. जातकग्रंथांमधील ब्राह्मणांविषयीच्या वर्णनापेक्षा मेगॅस्थिनिसने केलेले ब्राह्मणाचे वर्णन निश्चितपणे जास्त सहानुभूतीपूर्ण आहे.[४] ब्राह्मणांच्या तत्त्वज्ञानाविषयी त्याने जे अभिप्राय व्यक्त केलेले आहेत त्यावरून असे दिसते की या संदर्भात त्याने जास्त विश्वसनीय निरीक्षण केले होते. एके ठिकाणी तो थोडक्यात असे सांगतो की ब्राह्मण यज्ञ करतात, मृतासंबंधीचे विधी करतात आणि

---

१. जातक, चार, पृ. २०७ तळटीप.

२. फिक, **दि सोशल ऑर्गनायझेशन इन नॉर्थ-ईस्ट इंडिया इन बुद्धाज टाइम**, पृ. २१२.

३. उपरोक्त, पृ. १७४, १८७.

४. डायोडोरस, दोन, ४०.

भविष्य वर्तवितात. पुढे तो असेहि सांगतो की अशांची संख्या लहान आहे पण त्यांचा प्रभाव फार मोठा आहे.

आणखी एका मोठ्या उताऱ्यात तो '**ब्राखमनेस** व **सर्मनेस**' अशा दोन गटांमध्ये तत्त्वज्ञानी लोकांची विभागणी करतो.[1] **ब्राखमनेसना** एकांतवासात राहून सखोल अध्ययन करावे लागते व तेथे ते सदतीस वर्षे राहतात. ही संख्या मनूने दिलेल्या संख्येच्या अगदी निकटची आहे हे सहज लक्षात येण्याजोगे आहे. मनू म्हणतो की एखादा मनुष्य जास्तीत जास्त छत्तीस वर्षे ब्रह्मचारी राहू शकतो.[2] यानंतर **ब्राखमनेस** कौटुंबिक जीवनाकडे वळतात. ते मांस खातात परंतु कामाला जुंपलेल्या जनावरांचे मांस ते खात नाहीत; त्यामुळे गायी, बैल, घोडे आणि हत्ती यांचे मांस त्यांना वर्ज्य आहे. बहुपत्नीत्वाची त्यांना मुभा आहे. त्यामुळे साहजिकच त्यांना खूप मुले असतात. मुले बरेचसे काम करतात कारण भारतीय समाजात गुलाम नाहीत. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात स्त्रियांना अज्ञानात ठेवले जाते. **ब्राखमनेसांच्या** तत्त्वज्ञानात मेगॅस्थिनिसने रस घेतला असावा असे दिसते कारण पुढे तो म्हणतो, जीवन हा स्वप्नसदृश भ्रम आहे असे ते मानतात. भारतीय तत्त्वज्ञानात प्रचलित असलेल्या 'माया' या सिद्धांताला उद्देशून हा उल्लेख असावा असे दिसते. मृत्यूचे साहचर्य, भीती वा धास्ती यांच्याशी नव्हते तर एका निश्चित अपेक्षेने त्याचा स्वीकार केला जाई कारण मृत्यू म्हणजे खरा जन्म असा त्यांचा विश्वास होता तो म्हणतो की सृष्टीतील चमत्कारांविषयीच्या त्यांच्या कल्पना रांगड्या होत्या परंतु ग्रीकांप्रमाणेच त्यांच्याही काही श्रद्धा होत्या; उदाहरणार्थ त्यांचे विश्वविषयक काही सिद्धांत.

यानंतर तो **सर्मनेसची** अनेक लहान लहान गटांत विभागणी करतो.[3] यांच्यापैकी हिलोबिओइ यांना सर्वांत जास्त मान दिला जाई आणि ते संन्यस्त जीवन जगत. दुसऱ्या गटात तो वैद्यांचा व शेवटी ज्योतिषी आणि मांत्रिक यांचा समावेश

---

१. **स्ट्रॅबो, पंधरा एक, ५९.**

२. तीन, एक. हिंदूंच्या आयुष्यातील चार टप्प्यांपैकी पहिला टप्पा म्हणजे ब्रह्मचर्याश्रम. हा पहिला आश्रम म्हणजे अध्ययनाचा आणि अविवाहित राहण्याचा काळ. यानंतर गृहस्थाश्रमी होण्याचा काळ येतो, त्यानंतर जगाकडे पाठ फिरवून संन्यासी होण्याची पूर्वतयारी करण्याचा काळ व सर्वांत शेवटी संन्यास.

३. **स्ट्रॅबो, पंधरा, एक, पृ. ५९.**

करतो. हे वर्णन करताना त्याचा काहीसा गोंधळ झाला असावा असे दिसते, कारण साधू व ऐहिक लाभावर जास्त नजर ठेवणारे ब्राह्मण असे जे दोन प्रकार त्याने पूर्वी सांगितलेले आहेत तेच येथे सूचित होतात आणि बौद्ध भिक्षू व जैन श्रमण यांचे जे नेहमी सर्वसाधारण वर्णन केले जाते त्याच्याशी वरील वर्णनाचा मेळ बसत नाही. मेगॅस्थिनिसचे जर धार्मिक कल्पनांविषयी आस्था दाखविली असेल तर बौद्धांविषयी त्याला निश्चितच माहिती असणार. **उदिच्च** व **सतकलख्खन** या ब्राह्मणांच्या दोन गटांचा त्याने नंतरच्या काळात गोंधळ केलेला असणे शक्य आहे व **सतकलख्खन** ब्राह्मणांचा उल्लेख **सर्मनेस** या नावाने केला असावा. सनातनी हिंदुधर्मातील वानप्रस्थाश्रम व **सर्मनेस** यात मेगॅस्थिनिसने काही गोंधळ केला असावा असे टिमरचे मत आहे.[1] हिंदूंच्या धर्मग्रंथांमधून अशांना संपूर्णपणे संन्यासी मानले जात नाही. सदतीस वर्षे विजनवासात राहून नंतर गृहस्थाश्रमी झाल्याचा जो उल्लेख आहे त्यावरून ते ब्रह्मचारी असावेत असे सूचित होते. चार आश्रमांमध्ये झालेली उपविभागणी तात्त्विक स्वरुपाची होती आणि बहुसंख्य द्विज हिंदूही त्यांचे काटेकोरपणाने आचरण करीत असतील असे वाटत नाही. सर्वसंगपरित्याग केलेला असल्याने, व्यक्तिगत व सामाजिक जबाबदाऱ्यांमधून संन्यासी मुक्त झालेला असे. त्यावरून संघटित समाजातील दैनंदिन जीवनाच्या कटकटीतून मुक्त होणे हा बहुसंख्य संन्याश्यांचा हेतू असावा, असे सुचविण्यात काहीच चूक नाही.

दुसऱ्या आणखी एका उताऱ्यात **ब्राखमनेस** याच नावाने संबोधिल्या गेलेल्या विचारवंतांच्या गटाची याहून जास्त गोंधळात टाकणारी माहिती दिलेली आहे. हा उतारा सुडो–ओरिजेन **फिलॉसॉफिया** या इसवी सनाच्या तिसऱ्या किंवा चौथ्या शतकातील एका जुन्या ख्रिस्ती ग्रंथात उद्धृत करण्यात आलेला आहे, त्यामुळे या गोंधळाचे आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. या वर्गातील ब्राह्मण, झाडावरून पडलेल्या व गोळा केलेल्या फळांवर उदरनिर्वाह करीत, अशी यात माहिती आहे. दक्षिण भारतातील तुंगभद्रा नदीच्या प्रदेशात ते राहात, परंतु त्यांची संपूर्ण नग्नावस्तेत भ्रमंती चाले कारण शरीर हे आत्म्याचे केवळ आवरण आहे यावर त्यांची श्रद्धा असे. ते अविवाहित असत असे सांगितलेले आहे, पण त्यात आश्चर्य वाटण्याजोगे काही नाही. यानंतरच्या

---

**१. मेगस्थेनेस एन डे इंडिशे मात्शापिज्** पृ. १० वानप्रस्थाश्रम हा तिसरा आश्रम असून त्यात अरण्यात जाऊन साधूचे जीवन जगावयाचे असते.

२. सुडो–ओरिजेन, **फिलॉसॉफिया**, २४.

परिच्छेदात या पंथीयांकडून वापरल्या जाणाऱ्या शब्दांमधील गूढतेविषयी अतिशय बुचकळ्यात पाडणारी माहिती दिलेली आहे. त्यांच्या बोलण्यात परमेश्वराविषयीचा उल्लेख वारंवार केला जाई त्यावरून ती एक ब्राह्मण संन्याश्यांची वसाहत असावी. तरीही त्यांचे वर्णन दक्षिण भारतात राहणाऱ्या जैनांशीच खुपसे जुळणारे आहे. अग्निवर शिजविलेले अन्न वर्ज्य मानणे व त्याऐवजी केवळ फळांवर उदरनिर्वाह करणे ही गोष्ट काही सनातनी जैन प्रथांशी जुळणारी आहे.[1] तुंगभद्रेचा प्रदेश हे त्यांच्या वास्तव्याचे स्थान होते ही गोष्टही ते जैन असावेत असे सूचित करणारी आहे. चंद्रगुप्त मौर्य भद्रबाहूबरोबर दक्षिण भारतात गेला आणि त्याचे अखेरचे दिवस त्याने बरेचसे या भागात घालविले असावेत हे आपणास माहीत आहे. या संन्याश्यांना भेटण्यासाठी मेगॅस्थिनिस स्वतःच तुंगभद्रेच्या प्रदेशात गेला होता की हा भाग मौर्यसाम्राज्याचाच एक भाग होता व तेथील संन्याश्यांच्या जीवनाची त्याला माहिती देण्यात आलेली होती, याविषयी दुर्दैवाने मेगॅस्थिनिस स्पष्टपणाने काहीच सांगत नाही. त्यांची नग्नावस्था ही वस्तुस्थिती व जैनांमधील दिगंबर पंथाची श्रद्धा या परस्परांशी जुळणाऱ्या आहेत.

तत्त्वज्ञानी लोकांना असणाऱ्या अधिकारांविषयी मेगॅस्थिनिसने दिलेली माहिती मजेशीर आहे. त्यांना करांमधून सूट मिळे असे तो सांगतो. त्यांना कोणत्याही प्रकारची सेवा करावी लागत नसे असे डायोडोरस सांगतो.[2] परंतु ॲरियन असे सांगतो की, राज्यासाठी कराव्या लागणाऱ्या यज्ञांखेरीज इतर सर्व कर्तव्यांमधून ते मुक्त असत.[3] त्यांनी राज्याच्या धर्मसभेला सांगितलेली भाकिते अचूक असली पाहिजेत या अटीवरच त्यांना हे स्वातंत्र्य दिले जाई. ज्यांना भविष्यकाळाविषयी अचूक भाकित वर्तविता आलेले नसेल त्यांना काही द्यावे लागत असे की काय हे स्पष्ट होत नाही. राज्यासंबंधीची कर्तव्ये व सेवा यांचा उल्लेख हा वेठबिगारी किंवा विष्ठि याविषयी असावा. ही पद्धती मौर्यकालात प्रचलित होती व तिचा आपण नंतर तपशीलवार विचार करणार आहोत. जे तत्त्वज्ञानी चुकीचे भाकित वर्तवीत त्यांना जन्मभर मौन पाळावे लागे असेही मेगॅस्थिनिस सांगतो. परंतु हे संपूर्ण मौन की फक्त भविष्यकालीन घटनांबाबतचे मौन हे मात्र स्पष्ट केलेले नाही. डायोडोरसने उद्धृत केलेला एक परिच्छेद असे सांगतो की हे वंशपरंपरेने तत्त्वज्ञानी असत. परंतु ॲरियनने उध्दृत केलेल्या

१. फिलीओझा, लेंद क्लासीक, २४४७–५४.

२. डायोडोरस, दोन, ४०.

३. इंडिका, अकरा.

परिच्छेदाशी हे विसंगत आहे. कारण त्यात असे सांगितलेले आहे की, कोणीही तत्त्वज्ञानी होऊ शकतो पण त्यात अडचण एकच आहे व ती म्हणजे हे आयुष्य फार कष्टाचे आहे.

टिमरच्या मते या उताऱ्यांवरून असे दिसते की मेगॅस्थिनिसने दाखविलेली जातींची विभागणी त्याला मिळालेल्या माहितीवर आधारलेली नसून त्याच्या निरीक्षणावर आधारलेली आहे.[1] आम्हाला असे वाटते की थोडेसे चुकीचे का होईना, पण भारतातील जातिव्यवस्थेविषयी त्याला काहीतरी ज्ञान होतेच. काही सर्वसाधारणतः मान्य होण्याजोगे मुद्दे त्याच्या निरीक्षणातून दिसतातच. ब्राह्मण जरी संख्येने थोडे असले तरी समाजातील तो एक प्रतिष्ठित वर्ग होता हे स्पष्ट दिसते. वेठबिगारीमध्ये त्यांनी काही वाटा उचलावा अशी अपेक्षा नव्हती आणि सामान्यतः त्यांना करांमधून सूट मिळत होती असेही दिसून येते. एक विशेष वर्ग म्हणून इतरांपेक्षा त्यांचे संपूर्ण वेगळेपण आहे असे दाखविणारा हा महत्त्वपूर्ण हक्क आहे. भारतीय साधनांमधील माहितीचा विचार केला तरीही हे स्थान याहून काही वेगळे आहे असे दिसत नाही. अशोकाच्या आज्ञालेखांमध्ये ब्राह्मण व श्रमण यांचा वारंवार एकत्र उल्लेख येतो. त्यांना आदर दाखवावा अशी कळकळीची विनंती तो प्रजाजनांना करतो, यावरून त्यांना खास वागणूक दिली जात होती व समाजाचा तो एक लाडावलेलाच घटक होता, हे स्पष्ट होते. उत्पादक श्रमांच्या ऐवजी त्यांची धार्मिक गुणवत्ता विचारात घेतली जात होती.

कृषिनिष्ठ अर्थव्यवस्थेच्या वाढीबरोबर शेतकऱ्यांच्या आर्थिक कामगिरीला वाढते महत्त्व मिळण्यास सुरुवात झाली. त्याचे सामाजिक स्थान खालचे होते, पण त्याचे आर्थिक स्थान डावलता येण्याजोगे राहिलेले नव्हते. मेगॅस्थिनिसच्या म्हणण्याप्रमाणे भारतातील सात जातींपैकी शेतकरी हा दुसरा वर्ग होता. हा वर्ग संख्येने मोठा होता व त्याने जमिनीला वाहून घेतलेले होते. आजूबाजूला जरी सैन्यांची धुमश्चक्री चालू असली तरी साधारणतः शेतकऱ्यांच्या वाटेला सैन्ये जात नसत.[2] तो पुढे असे सांगतो की, सर्व भूमी राज्याच्या मालकीची

---

१. **मेगॅस्थेनेस एन डे इंडिशे मात्शापिज**, पृ. ६६–६९.

२. डायोडोरस, दोन, ४०

३. **सीएफ् ब्रेलोएर इन ग्रंडिग**, पृ. ११९ **अभिधर्मकोशवाख्य** या बौद्ध ग्रंथात (**आयएच्क्यू**, दोन, क्र. ३, १९२६, पृ. ६५६) असे सांगितले आहे की शत्रूचा देश जिंकल्यावरही राजे शेतकऱ्यांना आपले काम करू देतात त्याप्रमाणे तत्त्वज्ञानी लोकांनी वादविवादातही तर्काचा अवलंब करावा.

होती व राजासाठी शेतकरी जमीन कसत. उत्पादनाचा एक चतुर्थांश भाग कर म्हणून शेतकरी देत. या कराव्यतिरिक्त राजाला ते ज़मिनीचा नजराणा देत. स्ट्रॅबोने उद्धृत केलेला मेगॅस्थिनिसचा उतारा, करासंबंधीचा भाग वगळता या वर्णनाशी जुळणारा आहे. स्ट्रॅबो असे म्हणतो की जमीन कसण्याबद्दल राजाकडून शेतकऱ्याला उत्पादनाचा एक चतुर्थांश भाग मिळतो.[1] ॲरियनच्या लिखाणातील उताऱ्यात करासंबंधीचा उल्लेख करताना निश्चित प्रमाण सांगितलेले नाही. तो फक्त एवढेच सांगतो की, शेतकरी जमिनीची मशागत करतो व राजांना आणि स्वतंत्र नगरांना नजराणा देतो.[2]

भारतीय लोकसंख्येपैकी बहुसंख्य वर्ग शेतकऱ्यांचा होता हे दिसून येते आणि आजही त्या परिस्थितीत फरक पडलेला नाही. सर्व वृत्तांतावरून असे दिसते की त्यांना नि:शस्त्र ठेवले जाई व जमिनीची मशागत करणे हेच त्यांचे एकमेव कार्य असे. काही खेड्यांना करातून सूट दिली जात असे पण ती फक्त सैनिकांची भरती करण्यासाठी असे.[3] मेगॅस्थिनिस म्हणतो, युद्धामध्ये शेतकरीवर्गाला हात लावला जात नसे, ही एक तात्त्विक कल्पना आहे यात शंका नाही. अत्यंत निकड भासेल त्यावेळी स्थानिक शेतकऱ्यांच्या रुपाने जे काही उपलब्ध मनुष्यबळ असे त्याचा राजा उपयोग करीत नसे किंवा शत्रूच्या प्रदेशातील खेड्यांवर हल्ला करीत नसे, असे क्वचितच होत असावे. कलिंगयुद्धातील मृत व जखमी लोकांची अशोकाने दिलेली संख्या, जरी अतिशयोक्तिपूर्ण असली तरी फक्त सैन्यापुरतीच ती संबंधित नसावी.[4] कलिंगमधून हद्दपार केलेल्या दीड लक्ष लोकांपैकी बरीच मोठी संख्या शेतकऱ्यांचीच असली पाहिजे आणि कदाचित जंगल साफसूफ करण्याच्या कामी व नवीन जमिनी लागवडीला आणण्यासाठी त्यांना राबविले असावे. सैन्यासाठी अन्नपुरवठा करणाऱ्या खात्याची यंत्रणा बऱ्याच अंशी स्थानिक पुरवठ्यावर अवलंबून राहात असली पाहिजे व त्यामुळे स्वतःचा अन्नधान्याचा साठा अधिकृत वा अनधिकृत रीत्या त्या खात्याच्या हवाली करणे शेतकऱ्यांना भाग पडत असावे.

मेगॅस्थिनिसने दिलेली जातींची यादी व जातींची पारंपारिक भारतीय विभागणी यांचा संबंध जोडण्याच्या प्रयत्नात असे सुचविले गेले आहे की

---

१. पंधरा, एक, ४०.

२. इंडिका, अकरा.

३. अर्थशास्त्र, दोन, ३५.

४. तेरावे शिलाशासन, कालसी, ब्लोख, **ले एंन्स्क्रेपसीओं द अशोक**, पृ. १२५

शेतकरी हे शूद्र होते.[१] आणि जित प्रदेश व अति लोकसंख्या असलेली शहरे यांमधून हद्दपार केलेल्या शूद्रांकरवी ओसाड जमिनीवर नवीन खेडी वसविली जात.

त्यांना निःशस्त्र व राज्याच्या हुकमतीखाली ठेवले जाई व त्यांची जादा संपत्ती राज्य हिरावून घेई. शूद्र दास हा आपण होऊनच राज्याच्या नियंत्रणाखाली आलेला होता त्यामुळे अन्नोत्पादनासाठी फार मोठ्या प्रमाणावरील गुलामगिरीची आवश्यकता राहिली नाही. परकीयांना स्थलांतरास प्रवृत्त करून (**परदेशापवाहनेन**) किंवा दाट लोकसंख्येच्या केंद्रामधील अतिरिक्त लोकसंख्या नव्याने वसलेल्या भागात गेल्यामुळे (**स्वदेशाभिशांडवमनेनवा**) नवी खेडी तयार होत, असे **अर्थशास्त्र** सांगते.[२] या संदर्भात उल्लेखिलेले परकीय म्हणजे बहुधा जित प्रदेशातील लोक असावेत, अति लोकसंख्येच्या भागातून शूद्रांना नक्कीच हलविले जात असावे. साहजिकच नव्या भागांमध्ये वसाहत करण्यास जाणाऱ्यांमध्ये केवळ शूद्र शेतकरीच असतील असे नाही. खेड्यांची प्रस्थापना करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या सुतार व व्यापारी यांसारख्या इतर व्यावसायिकांचाही त्यात समावेश असावा. अर्थात शूद्रांना जाण्याचा हुकूम देण्यात आला व इतर व्यावसायिक आर्थिक लाभाच्या आशेने स्वेच्छेने गेले हा फरक त्यात आहेच. मौर्यकालीन ग्रामीण अर्थ-व्यवस्था प्रत्येक खेड्याच्या सामुदायिक प्रयत्नांना महत्व देत होती[३] ग्रामवासी-यांच्या दैनंदिन जीवनाच्या गरजा भागविण्याच्या बाबतीत का होईना पण खेडे एक स्वयंपूर्ण घटक असावे या दृष्टीने खेड्याचा विकास करण्याची प्रवृत्ती होती. राज्याकडे सर्वश्रेष्ठ सत्ता होती व खेड्याच्या, आपल्याहून मोठ्या असणाऱ्या घटकाशी, जिल्ह्याशी होणाऱ्या आर्थिक संघटनावर राज्याच्या प्रशासकीय अधिकाऱ्यांची देखरेख होती.

सर्व जमीन राज्याच्या मालकीची असे, हे मेगॅस्थिनिसचे विधान वादग्रस्त आहे आणि ते चूक आहे असे काही इतिहासकारांचे मत आहे. या मताच्या समर्थनासाठी ते असे प्रतिपादन करतात की या विषयासंबंधी ज्या विविध ग्रंथांचा आधार दिला जातो त्यातील राजाविषयीच्या उल्लेखाचा अर्थ, तो जमिनीचा मालक असा न लावता जमिनीचा संरक्षक असा लावावा.[४] मौर्यांच्या साम्राज्याचा विस्तार इतका अफाट होता व त्यात विकासाच्या इतक्या विविध अवस्था होत्या

१. कोसंबी, **इंट्रोडक्शन टु दि स्टडी ऑफ इंडियन हिस्ट्री**, पृ. १८५, २१८.
२. दोन, १.
३. ऱ्हीस डेव्हीडस्, **बुद्धिस्ट इंडिया**, पृ. ४९.
४. जयस्वाल, **हिंदू पॉलिटी**, व्हॉ. दोन, पृ. १७८-८८.

की अशा स्थितीत जमिनीच्या मालकीची एकच विशिष्ट पद्धती असणे व ती टिकवून धरणे अशक्य होते. या विषयासंबंधीची आपली चर्चा आपण फक्त गंगेच्या मैदानी प्रदेशापुरतीच विशेषत: मगधापुरतीच मर्यादित ठेवूया, या प्रदेशाशी मेगॅस्थिनिसचा व भारतीय ग्रंथांचा सर्वात अधिक परिचय होता. राजा, राज्य, बडे जमीनदार, सामुदायिक मालकी व शेतकरी हे जमिनीच्या मालकीसंबंधीचे पाच पर्याय मौर्यकालीन समाजात असण्याचा संभव आहे. कोणत्याही साधनग्रंथात जमीन शेतकऱ्याच्या मालकीची असे, असे दूरान्वयानेही सूचित केलेले नाही व यात आश्चर्य वाटण्याजोगे नाही कारण बरेचसे शेतकरी शूद्र असत. सामुदायिक मालकी ही बऱ्याच पुढच्या काळातील संकल्पना आहे व मौर्य कालानंतर काही थोडया शतकांपर्यंतही ती प्रचलित झालेली नव्हती.[1]

जातकांमधील गहपती व गामभोजक यांच्या वारंवार येणाऱ्या उल्लेखांकडे फिकने लक्ष वेधलेले आहे. जमिनीच्या मोठया क्षेत्रांवर त्यांचे नियंत्रण असावे असे दिसते.[2] जमिनीवर ते मोलाने मजूर लावित असत, असा त्यांच्याविषयी उल्लेख आहे. या मजुरांचे जीवन बेताचेच असले तरी दासांच्या (गुलाम) इतके ते निकृष्ट नव्हते. या कालात गहपतीचे कार्य नेमके कोणते याविषयी अनिश्चितता राहिली आहे. ही संज्ञा प्रतिष्ठित जमीनदार किंवा श्रीमंत नागरी घराणी यांना उद्देशून वापरली असावी असे दोन अर्थ फिक सुचवितो. ही संज्ञा जर पहिल्या अर्थाने वापरली असेल तर मोठया जमिनी धारण करणाऱ्या प्रतिष्ठित जमिनदारांनी आपले स्थान सुसंघटित करण्यासाठी एखादी राजकीय पद्धती निर्माण केली नाही हे विचित्र दिसते. पुढच्या शतकांमध्ये मुघलकालीन भारतात वा युरोपमधील सरंजामशाहीमध्ये हा प्रकार दिसून येतो. या कालखंडातील भारतीय समाजातील कोणताही ज्ञात सामाजिक वर्ग प्रतिष्ठित जमीनदार यासारख्या वर्गाशी जुळणारा नव्हता. नव्या क्षेत्रामधील खेडयांच्या विकासास जबाबदार असणारा शेतकरी आणि व्यापारी या दोघांना अर्थ–साहाय्य करणारा, असा संयोजकांचा वर्ग म्हणजे गहपती, असे असणे शक्य आहे. म्हणजे ते निश्चितपणे जमीनमालकही नव्हते वा करवसुली करणारे अधिकारीही नव्हते पण त्याना अर्ध–सरकारी दर्जा होता. व्यापारातील श्रीमंतीमुळे

---

१. जैमिनी न्यायमलविस्तार या मध्ययुगीन ग्रंथात तिचा उल्लेख आहे. पृ. ३५८.

२. दि सोशल ऑर्गनायझेशन इन नॉर्थ–ईस्ट इन्डिया ईन बुद्धाज् टाईम. पृ. २५३, ३०५.

राज्याच्या जमिनीखेरीज इतरत्र अनेकांनी स्वतःची जमीन संपादन केली असेल परंतु उत्पन्नाचे एक स्वतंत्र साधन ठरण्याइतकी ती मोठी नसावी. पाली वाङ्मया-मध्ये **गामभोजक** ही संज्ञाही अनेक वेळा आलेली आहे. ज्याने प्रदेश संपादन केलेला आहे व राजाने त्याला मान्यता दिली आहे असा जमीनमालक किंवा एखाद्याने केलेल्या सेवेचे पारितोषिक म्हणून ज्याला जमीन बहाल केलेली आहे असा जमीनमालक असे दोन अर्थ गामभोजक या संज्ञेचे बोस लावतात.[1] परंतु येथेही जमिनीची मालकी यापेक्षाही जमिनीपासून मिळणारा महसूल यावरच भर दिलेला ध्वनित होतो.

भारतीय ग्रंथांमधून प्रचलित असलेल्या आणखी काही संज्ञा व कल्पना यांचे परीक्षण केल्याने या प्रश्नाचे स्वरुप अधिक स्पष्ट होऊ शकेल. जमीन ही आपली खाजगी मालमत्ता आहे अशा पद्धतीने विश्वकर्मन् भौवन या राजाने पृथ्वीला वागणूक दिल्याने ती त्याच्यावर संतप्त झाली. या कथेवरून असे दिसते की राजा हा जमिनीचा मूलतः मालक नव्हता.[2] पण या परिस्थितीत बदल झाला. यानंतर स्मृतिग्रंथांमधून राजाच्या जमिनीवरील मालकीसंबंधीचे निश्चित उल्लेख आहेत. उदाहरणार्थ कात्यायन असे सांगतो की राजा हाच पृथ्वीपती आहे पण इतर कोणत्याही संपत्तीचा अधिकारी नाही व तो उत्पन्नाचा एक षष्ठांश भाग घेऊ शकतो.[3] एक विद्वान असे दाखवून देतात की ब्राह्मणग्रंथांमधील नियमांनुसार जमिनीची मालकी व जमिनीचा उपभोग यात फरक आहे.[4] जमिनीची मालकी यासाठी स्वं व त्यापासून निघालेले, **स्वत्व, स्वाम्य, स्वामित्र** हे शब्द वापरलेले आहेत. जमिनीचा उपभोग यासाठी **भोग** हा शब्द वापरलेला आहे. यावरून राजाच्या वैयक्तिक मालकीची जमीन व राज्याच्या मालकीची जमीन असा फरक असावा, आपल्या स्वतःच्या मालकीच्या जमिनीची विल्हेवाट राजा कशीही लावू शके तर राज्याच्या मालकीच्या जमिनीपासून राजाला राज्याचा प्रमुख म्हणून कर मिळत असे. पण ती त्याच्या मालकीची नसून तो तिच्यातील उत्पादनाचा फक्त उपभोग घेत असे. धार्मिक पंथांना वा इतर कोणालाही खाजगी रीत्या जमिनीच्या रुपाने दान देण्याची राजाला इच्छा असेल तर तो आपल्या स्वतःच्या अधिकारात स्वतःच्या मालकीच्या जमिनीतून दान करीत असे. राज्याच्या मालकीच्या जमिनीतून नव्हे.

---

१. **सोशल अँड रूरल इकॉनॉमी ऑफ नॉर्दर्न इंडिया**, पृ. ३८

२. **शतपथ ब्राह्मण**, तेरा, ७, एक, १५.

३. काणे, **कात्यायनस्मृतिसरोद्धार**, पृ. १६–१७.

४. घोषाल, **दि अॅग्रेरियन सिस्टिम इन एन्शंट इंडिया**, पृ. ८४.

**अर्थशास्त्रातही** राजाच्या जमिनीसंबंधीचा उल्लेख आहे.[1] या जमिनी राजाच्या स्वतःच्या वैयक्तिक मालकीच्या असत व त्यापासून त्याला मिळणारे उत्पन्न, आजच्या काळात खाजगी उत्पन्न म्हणून ज्याचे वर्णन करता येईल अशा उत्पन्नाचा एक भाग असे. इतर जमीन तात्त्विक दृष्टचा राज्याच्या मालकीची असे. परंतु या ठिकाणी वहिवाटीमुळे हे तत्त्व गुंतागुंतीचे झाले आहे. वस्तुतः या काळात राजा म्हणजेच राज्य मानले जाऊ लागल्याने राजाचे वैयक्तिक अधिकार व राज्याचा मुख्य म्हणून त्याला असलेले अधिकार यात फरक करणे अत्यंत कठीण होऊन बसले आहे. **अर्थशास्त्रातील** याच परिच्छेदामध्ये, शेतीच्या अध्यक्षाच्या कामासंबंधी चर्चा करताना, राज्याचा मुख्य या नात्याने ती जमीन राजाच्याच मालकीची आहे, अशा पद्धतीने जमिनीच्या प्रशासनाबाबतचे विवेचन आहे. भारतीय राजकीय विचारांमध्ये या कालापर्यंत राज्य या संकल्पनेचा विकास झालेला नसल्याने राजाची सत्ता व राजाचे स्थान यांमध्ये फरक करण्यात आलेला नव्हता. जमिनीची मालकी नसणारा राजा या कल्पनेकडून राजा हाच संपूर्ण जमिनीचा मालक या कल्पनेकडे होत गेलेला सूक्ष्म व क्रमशः बदल हा यानंतरच्या राज्यशास्त्रज्ञांच्या ग्रंथांमधून दिसतो.[2] मेगॅस्थिनिसच्या ग्रंथातील उताऱ्याचा हवाला देऊन ॲरियन असे प्रतिपादन करतो की, राजसत्तेमध्ये शेतकरी जो करभार राजाला देत असत तोच गणराज्यामध्येही दिला जाई. यावरून राजसत्तेमध्ये राजा हाच राज्याचा प्रतिनिधी असल्याने तो जमिनीचा मालक मानला जाई याच मुद्याला पुष्टी मिळते.

**अर्थशास्त्रातील** एक लहानसे प्रकरण जमीन व इमारती यांच्या विक्रीसंबंधी आहे.[3] ज्याला किंमत मोजता येणे शक्य असेल तो या प्रकारची जमीन विकत घेऊ शकेल असे दिसते. टिमर या परिच्छेदाचे स्पष्टीकरण असे करतो की जमीन ही संपूर्णपणे आणि सर्वार्थाने वैयक्तिक मालमत्ता मानली जात नसे ही वस्तुस्थिती होती, वस्तूच्या न्याय्य व योग्य उपयोगावर मालमत्तेविषयीची भारतीय कल्पना आधारलेली आहे तर पाश्चात्यांची कल्पना संपूर्ण मालकीवर अधिक भर देणारी अशी आहे.[4] या परिच्छेदावरून असे दिसते की ही जमीन तिच्यावरील इमारतीपेक्षा गौण मानली जात असावी. जमीन राज्याच्या माल-

---

१. दोन, २४.

२. मनु, धर्मशास्त्र आठ. ३९.

३. तीन, ९.

४. **मेगॅस्थेनेस एन डे इंडिशे मात्शापिज. पृ. १२३.**

कीची असते ही कल्पना असली तरी मशागतीस योग्य अशी लहान जमीन व्यक्तींना धारण करता येत असे व थोडयाशा मदतीच्या आधारे त्या स्वतः ती जमीन कसू शकत. याचा थोडक्यात अर्थ असा की लहान प्रमाणावरील जमिनीची मालकी हे काही विशेष महत्त्वाचे लक्षण नव्हते.

डायोडोरसने जमिनीची खंडणी व कोषागारात जमा होणारा कर असा फरक केला आहे. त्याचे स्पष्टीकरण, शेतसारा हा जमिनीपासून मिळणाऱ्या उत्पन्नावरील करापेक्षा वेगळा होता असे करता येईल.[१] त्यावरून एकूण करभार बराच जड होता असे दिसते. परंतु फक्त डायोडोरस एकटाच अशा तऱ्हेचा उल्लेख करतो त्यावरून हीही एक शक्यता आहे की, ज्या आधारावरून त्याला हा पुरावा मिळाला त्याचा अर्थ लावताना काही गोंधळ उडाला असावा. दुसरा एक असा संभव आहे की काही भागांमध्ये उत्पादनाच्या एक चतुर्थांश कर हा काही विशिष्ट पिकांना लागू असावा व शेतसारा हा मूलभूत महसूल असावा. घोषाल यांनी असे दाखवून दिले आहे की नंतरच्या कालात जमिनीपासून दोन प्रकारचे महसूल मिळत. वेदांमध्ये उल्लेखिलेल्या बलि या कल्पनेवर आधारलेला एक प्रकार भाग या नावाने ओळखला जाई व दुसरा हिरण्य हा प्रकार म्हणजे पिकांच्या विशिष्ट प्रकारांवर रोखीने दिला जाणारा कर.[२] यावरून, काही विशेष परिस्थितीत एकाच क्षेत्राला दोनही प्रकारचे कर लागू होत असण्याची शक्यता दिसते.

ॲरियनने जरी कररूपाने दिल्या जाणाऱ्या रकमेचा उल्लेख केलेला नसला तरी इतर लेखक मेगॅस्थिनिसचा दाखला देऊन जमिनीवरील उत्पन्नाच्या एक चतुर्थांश असा आकडा देतात.[३] स्ट्रॅबो सांगतो की, शेतकऱ्यांना त्यांच्या श्रमासाठी म्हणून उत्पन्नाचा एक चतुर्थांश भाग मिळत असे तर इतर भाग राजाला मिळत असण्याचा संभव आहे. ही विसंगती स्ट्रॅबोच्या स्वतःच्या चुकीमुळे निर्माण झाली असावी किंवा ज्यावरून त्याने ही माहिती घेतली त्यात चूक असावी, म्हणून शेतकरी उत्पन्नाचा एक चतुर्थांश भाग राजाला देई असे सांगण्याऐवजी, तो भाग शेतकऱ्यालाच मिळे, असे तो सांगतो. दुसरी शक्यता अशी दिसते की, जरी स्ट्रॅबो तसे स्पष्ट करीत नसला तरी राजाच्या जमिनीवर राबणाऱ्या मजुरांचा तो शेतकरी म्हणून उल्लेख करीत असावा. त्यांना वेतन म्हणून उत्पादनाचा एक चतुर्थांश भाग मिळत असावा. उरलेला तीन चतुर्थांश भाग राजाला जात असल्याने

१. डायोडोरस, दोन. ४०.

२. **दि ॲग्रेरियन सिस्टिम इंन एन्शंट इंडिया.** पृ. ६.

३. **इंडिका**, अकरा, डायोडोरस, दोन, ४० स्ट्रॅबो, **पंधरा**, एक, ४०

त्याच्या उत्पन्नात भरघोस भर पडत असावी. अशा प्रकारच्या महसुलाचा अर्थशास्त्रात उल्लेख आहे.[१] उत्पन्नाच्या एक चतुर्थांश महसूल हा एक सर्वसाधारण अंदाज असावा किंवा मेगॅस्थिनिसला ज्या भागाचा विशेष परिचय होता अशा पाटलिपुत्राच्या भोवतालच्या अतिशय सुपीक प्रदेशासारख्या क्षेत्रालाच फक्त तो लागू असावा. स्थानिक परिस्थितीनुसार कराचा नेमकेपणा बदलत असावा. करात होणाऱ्या अशा प्रकारच्या बदलाचे एक उदाहरण अर्थशास्त्रात आलेले आहे. ज्या प्रकाराने पाणीपुरवठा केलेला असेल त्या प्रकारानुसार पाण्याबरचा कर एक पंचमांशपासून एक तृतीयांशापर्यंत वेगवेगळा दिसतो.[२] हीच गोष्ट जमिनीवरील कराबाबतही निश्चितपणे असणार पण त्यामधील फरकाचे प्रमाण कमी असावे. बऱ्याचशा भारतीय ग्रंथांमधून येणाऱ्या उत्पन्नाच्या एक षष्ठांश या सर्वसाधारण प्रमाणापेक्षा एक चतुर्थांश हे प्रमाण जास्त वाटते.[३] एक अष्टमांश, एक दशांश व एक बारांशसुद्धा, असे बदल दिसतात. अर्थशास्त्राचा असा सल्ला आहे की आणिबाणीच्या काळात कराचे प्रमाण एक तृतीयांश वा एक चतुर्थांश इतके वाढवावे अगर ज्या सुपीक प्रदेशात फक्त पावसाच्या पाण्यावर शेती होते तेथे दुबार पीक घेण्याची पद्धती अनुसरावी.[४] काही इतिहासकारांच्या मते एक चतुर्थांश हा भारी कर होता, परिणामी जनतेवरील हा भारी बोजा सरकारविरुद्ध न्याय्य बंड करण्यास साहाजिकच कारणीभूत झाला असावा.[५] एक चतुर्थांश कर भारी होता हे मान्य केले तरी पुढील शतकांमध्ये याहून जास्त वाईट स्थिती होती. उदाहरणार्थ, अकबराच्या कारकिर्दीत एक तृतीयांश हे कराचे प्रमाण नित्याचे होते.[६]

रुम्मिनदेइ कोरीव लेख हा एकच असा अशोककालीन कोरीव लेख आहे की ज्यात कराविषयीचा एक निश्चित उल्लेख आहे.[७] लुंबिनी हे गाव बुद्धाचे जन्म-

---

१. एक, ६.

२. दोन, २४.

३. घोषाल, **कॉन्ट्रिब्युशन्स टु दि हिस्ट्री ऑफ दि हिंदु रेव्हेन्यु सिस्टिम,** पृ. ५८, मनु, **धर्मशास्त्र,** सात, १३०.

४. पाच, २.

५. रायचौधरी, **पोलिटिकल हिस्ट्री ऑफ एन्शंट इंडिया.** पृ. ३६३, तळटीप.

६. मोरलंड, **दि अॅग्रेरियन सिस्टिम ऑफ मुस्लीम इंडिया,** पृ. ९१.

७. ब्लोख, **ले एंस्क्रेपसिओं द अशोक,** पृ. १५७.

स्थान होते म्हणून राजाने ते करमुक्त केले होते व हे गाव उत्पन्नापैकी फक्त एक अष्टमांश भाग देत असे, असे यात सांगितलेले आहे. पहिल्या बाबीसंबंधी **उदबलिके** असा शब्द उपयोजिलेला असून त्याचा अर्थ साधारणतः **बलिपासून** मुक्त असा होतो. प्रत्येक खेड्याला जो जमिनीचा करभार देणे भाग पडत असे त्याला उद्देशून बहुधा हा उल्लेख असावा **अट्ठभागिये** किंवा आठवा भाग हा जमिनीतून मिळणाऱ्या उत्पन्नाला उद्देशून असावा यात शंका नाही.[1] नित्याच्या एक चतुर्थांश वा एक षष्ठांश प्रमाणात केलेली ती कपात होती की नित्याचेच एक अष्टमांश प्रमाण चालू ठेवण्यासंबंधीचा तो उल्लेख आहे, हे अनिश्चित आहे. जर हा उल्लेख दुसऱ्या बाबीविषयी असेल तर राजाला तो कर सांगण्याची काहीही जरूर पडली नसती. पण जमिनीच्या करभारातून आता त्या गावात सूट मिळालेली होती त्यामुळे निम्मी नाही तरी अल्प प्रमाणात करकपात केलेली असण्याची जास्त शक्यता आहे. थोडक्यात या प्रदेशात नित्याचा कर एक षष्ठांश असावा. पाटलिपुत्राच्या प्रदेशातील एक चतुर्थांश कराशी तुलना केली तर रुम्मिनदेइ प्रदेशातील करआकारणी कमी होती असे यावरून सूचित होण्याजोगे आहे. रुम्मिनदेइच्या उत्तरेकडील भाग गंगेजवळच्या भागाइतका सुपीक नसावा, हे याचे कारण असावे. गंगेच्या खोऱ्यातील सुपीक प्रदेशापासून दूरवर पसरलेल्या वसाहतींमधून करआकारणीत बदल करण्यात आलेले असले पाहिजेत. म्हणून एक चतुर्थांश इतकी करआकारणी होत असल्याचे मेगॅस्थिनिसचे विधान राजधानीच्या परिसरातून गोळा होणाऱ्या निधीवर आधारलेले असावे व सर्व देशाला तेच प्रमाण लागू असल्याचे त्याने गृहीत धरले.

रुम्मिनदेइ कोरीव लेखावरून आणखी एक विशेष वस्तुस्थिती दिसते ती ही की जमिनीच्या करभारातून मुक्त करण्याचा प्रश्न राजा प्रत्यक्ष स्वतःच हाताळतो. जमीनमालकाच्या स्वरुपात जर एखादा मध्यस्थ असता तर करातून सूट देताना राजापुढे काही अडचण उभी राहिली असती कारण जमीनमालकाच्या आर्थिक प्रतिष्ठेवर त्याचा काही परिणाम झाला असता. जमीनदारी विकसित करण्याच्या अनेक संभाव्य मार्गांपैकी हा एक मार्ग उपयोगात नसावा असे दिसते. मेगॅस्थिनिस सांगतो की लष्करी अधिकाऱ्यांना रोखीने वेतन मिळे.[2] पुढच्या काळातील भारतातील बहुतेक हिंदू व मुसलमान राज्यांनी जी वेतनासाठी मुलुख तोडून देण्याची प्रथा अंगिकारली होती, तिची गरज यामुळे भासली नाही धार्मिक पंथांना दिलेल्या

१. फ्लीट, **जेआर ए एस्**, १९०८, पृ. ४७९.
२. डायोडोरस, दोन, ४१.

जमीनमहसुलाबाबत मालकीमध्ये बदल करण्याची गरज नसे तर अक्षरशः ती फक्त महसुलाची देणगी असे; त्यामुळे त्या पंथाच्या अनुयायांना चरितार्थासाठी काम करावे लागत नसे. जेव्हा जमिनीच्या मालकीत बदल करावयाचा असे तेव्हा त्यास **ब्रह्मदेयदान** असे म्हणत.[1] **अर्थशास्त्रामध्ये** सांगितलेल्या राजाच्या काही हक्कांवरून असे दिसते की राजाच्या जमिनीवरच्या मालकीविषयी तत्त्वतः काहीही सांगितलेले नसले तरी व्यवहारात ती मालकी गृहीत धरली जाई.[2] गरजेच्या वेळी राजा दुसऱ्या पिकाची सक्तीने मागणी करू शकतो, ही गोष्ट म्हणजे अशा प्रकारचा हक्क आहे.

मौर्यकालात जमीनमहसूल गोळा करणाऱ्यांसारखे राज्याचे अधिकारी लागवडीखालील जमिनीवरची करआकारणी स्वतः करीत, हे स्पष्ट आहे.[3] गावाच्या सर्व जमिनी एकत्र विचारात घेऊन त्यावर ही आकारणी आधारलेली नसे तर गावातील प्रत्येक शेतकरी व गावकरी यांच्याविषयीचा तपशीलवार विचार केला जाई. आकारणीच्या प्रक्रियेतील पहिली पायरी म्हणजे जमिनीच्या मगदुराप्रमाणे खेड्यातील सर्व जमिनींची उत्तम, मध्यम व हलकी अशी तीन प्रकारांमध्ये होणारी विभागणी, यानंतर त्या खेड्याचा खालीलपैकी एका गटात समावेश होई; करमुक्त असलेली खेडी (**परिहारक**), सैनिक पुरवणारी खेडी (**आयुधिय**), धान्य, जनावरे, सोने या रुपाने कर देणारी खेडी (**हिरण्य**) किंवा कच्च्या मालाच्या रुपाने कर देणारी खेडी (**कुप्य**), बिगारीने मजूर पुरविणारी खेडी (**विष्ठि**), आणि कराऐवजी दुग्धोत्पादन करणारी खेडी, कोणतीही आकारणी करण्यापूर्वी स्थानिक वैशिष्ट्ये विचारात घेत असत हे यावरून बरेचसे स्पष्ट होते.

भारतात दुष्काळ नाहीत, असे मेगॅस्थिनिस सांगतो.[4] त्याच्या या विधानात अतिशयोक्ती आहे, कारण भारतीय साधनांमध्ये दुष्काळ पडत असल्याचे सांगितलेले आहे. चंद्रगुप्त मौर्याच्या कारकिर्दीत एक दुष्काळ पडल्याचे जैन आख्यायिका सांगते.[5] सोहगौरा व महास्थान या दोन मौर्यकालीन कोरीव लेखांमधूनही दुष्काळी परिस्थितीचा पुरावा गोळा करता येण्याजोगा आहे; गंगेच्या खोऱ्यातील दुष्काळी

---

१. बोस, **सोशल अँड रुरल इकॉनॉमी ऑफ नॉर्दन इंडिया**, पृ. १८.
२. पाच, २.
३. **अर्थशास्त्र**, दोन, ३५.
४. डायोडोरस, दोन, ३६.
५. **परिशिष्टपर्वन**, पृ. एकाहत्तर, आठ, पृ. ४१५, तळटीप.

परिस्थिती सुधारण्यासाठी करावयाच्या उपाययोजनांसंबंधीच प्रामुख्याने हे लेख आहेत.[1] ज्या भूमीला दुष्काळाचे संकट कधीच माहीत नाही अशी ही संपन्न भूमी होती यावर आपल्या वाचकांचा विश्वास बसावा या इच्छेने मेगॅस्थिनिस रसरशीत शब्दांनी भारताचे वर्णन करण्याचा प्रयत्न करीत असावा किंवा कोणताही दुष्काळ पडण्यापूर्वीच त्याने भारत सोडला असावा व तोच संभव जास्त दिसतो.

मौर्यकालातील, विशेषत: अशोकाच्या कारकिर्दीतील वाढलेले केंद्रीकरण म्हणजे राज्याचे अर्थव्यवस्थेवरील वाढलेले नियंत्रण. प्रशासनपद्धती सुधारली होती व विकसित झाली होती. त्यामुळे आर्थिक रचनेच्या अगदी बारीकसारीक अंगांचे परीक्षण व नियंत्रण करण्यास ती समर्थ झाली होती. उलटपक्षी या पद्धतीचे नियंत्रण व एकसूत्रीकरण करण्यास राजा त्या प्रमाणात वाढत्या सत्तेवर हक्क सांगू लागला. शेतकरी प्रशासनव्यवस्थेच्या प्रत्यक्ष संपर्कात आला व त्याला प्रशासन यंत्रणा म्हणजेच राज्य असे वाटू लागले. त्याच्या दृष्टीने राजा पूर्वीपेक्षाही जास्त दूरचा वाटू लागला आणि शेतकऱ्याच्या भोवतालच्या जगाचा अधिकारीवर्गाशीच संबंध जडला व ही परिस्थिती पुढे अनेक शतके चालू राहिली.

मेगॅस्थिनिसने सांगितलेली तिसरी जात म्हणजे धनगरांची आणि गुराख्यांची. ते भटके असत व जनावरांची शिकार करण्याची परवानगी फक्त याच गटातील लोकांना होती. एखाद्या क्षेत्राची साफसफाई झाल्यानंतर त्यातील उरल्यासुरल्या रानटी जनावरांचा बंदोबस्त करण्यासाठी बहुधा त्यांना बोलाविले जात असावे. भारतीय साधनांमधून, हा एखादा महत्त्वपूर्ण वर्ग असावा या गोष्टीस पुष्टी मिळत नाही, परंतु नंतरच्या ग्रंथामधून आलेल्या अभीर किंवा अहीर जातीच्या उल्लेखावरून असे सूचित होते की त्यांचे लहानसे गट एखादी उपजात म्हणून अस्तित्वात असावेत. मेगॅस्थिनिस पुढे सांगतो की ते आपला करभार जनावरांच्या रुपाने देत. यावरून असेही सुचविता येईल की पशुपालक आर्यांचा अवशिष्ट भाग अजूनही भटक्या अवस्थेत पडीक भूमिवर राहात असावा व कृषिव्यवसायात तो अजूनही स्थिर झाला नसावा.

**अर्थशास्त्रात** गुराखी वा धनगर यांचा फारसा विचार केलेला दिसत नाही. या विषयावरील त्यातील अभिप्राय साधारणत: स्थूल स्वरुपाचे आहेत. उदाहरणार्थ 'मशागतीस अयोग्य असलेल्या भूमीमध्ये राजा चराऊ कुरणांची व्यवस्था करील.'[2]

---

१. सरकार, **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स** पृ. ८२, ८५.
२. दोन, २.

जनावरांची देखभाल करण्याचे काम करणारी विशिष्ट अशी जात नव्हती या गोष्टीस यामुळे, विरोधी पुराव्याच्या अभावी पुष्टी मिळते. त्यांच्याकडे मेगॅस्थिनिस एक जात म्हणून पाहतो कारण तो आर्थिक विभागणीच्या संदर्भात विचार करीत होता. सामाजिक व्यवस्थेच्या श्रेणीक्रमामध्ये धनगरांचा समावेश शूद्रांमध्येही झालेला असेल. आम्ही वर सुचविल्याप्रमाणे जरी त्यांचे मूळ आर्यांमध्ये असले तरी त्यांच्या व्यवसायाचे स्वरुप असे होते की त्यामुळे ते सर्वात खालच्या पातळीवर ढकलले गेले असावेत. जर ते पाळीव जनावरांची काळजी घेत असतील तर बहुधा त्यांचा समावेश शेतकऱ्यांमध्येच होत असावा. जर ते शिकारी असल्याने भटके जीवन जगत असतील तर आता स्थिर समुदायांमध्ये जीवन जगणाऱ्यांकडून ते अधम आर्य म्हणून मानले जात असावेत.

गुराख्यांकडून ज्या पाळीव प्राण्यांची निपज व संगोपन केले जाई त्यांमध्ये गाई, म्हशी, शेळ्या, गाढवे आणि ऊंट यांचा उल्लेख केलेला आहे.[१] घोडे व हत्ती यांचेही संगोपन होई पण त्यांचा समावेश वेगळ्या प्रकारात केला जाई व त्यांचे वेगळे अध्यक्ष असत कारण लष्करी उपयोगाच्या दृष्टीने ते पशू महत्त्वाचे होते.[२] नांगरटीच्या बैलांचाही उल्लेख आहे.[३] त्यावरून बैलांकडून ओढला जाणारा लाकडी नांगर शेतकऱ्यांना माहित असलाच पाहिजे. या पाळीव प्राण्यांमध्ये गाईला सर्वात जास्त महत्त्व होते हे निश्चित. गाय हा पवित्र पशू असल्याचा उल्लेख कोठेही नाही परंतु गाईचे मोल ओळखले गेलेले आहे. दूध व त्यापासूनचे पदार्थ आणि चामडे या वस्तूंसाठी मुख्यत: गायींची निपज केली जात असे. जो मनुष्य गायींच्या कळपाची राखण करीत असेल त्याने त्या कळपाच्या मालकाला दरवर्षी निश्चित प्रमाणात शुद्ध लोणी पुरवावे व त्या वर्षी मरण पावलेल्या गायींची निवडक चामडी द्यावीत, या अर्थशास्त्रातील विधानावरून[४] वरील निष्कर्ष काढता येण्याजोगा आहे. जरी मांसासाठी म्हणून गाय मारली जात नसे तरी गोमांस खाल्ले जात नसे असे नाही. गाय मेल्यावर तिचे मांस किंवा सुके मांस गुराखी विकू शके असे आपल्याला सांगितलेले आहे.[५] दुसऱ्या एका परिच्छेदात 'वासरू, बैल अगर

---

१. अर्थशास्त्र, दोन, २९.
२. उपरोक्त, दोन, ३०, ३१.
३. उपरोक्त, २९.
४. दोन, २९.
५. उपरोक्त.

दुभती गाय यांसारख्या जनावरांची हत्या करू नये ' असे सांगितलेले आहे.[1] याचे कारण उघडच आहे. कष्ट करणारी आणि दूध पुरविणारी ही जनावरे असल्याने साहजिकच ती बरीच मौल्यवान होती. साहजिकच नैसर्गिक मरणाने ही जनावरे मेली तरच त्यांचे मांस विकता येणे शक्य होते. गुराखी आपला करभार जनावरांच्या रूपाने देत, या मेगॅस्थिनिसच्या अभिप्रायाच्या संदर्भात अर्थशास्त्रावरून असे दिसते की हा करभार जनावरांच्या रुपाने नाही तर दूध व त्यापासूनचे पदार्थ यांच्या रुपाने दिला जात असावा. या पदार्थांपैकी काही निश्चित टक्के अगर भाग हा कळपाच्या मालकाला किंवा गायींच्या अध्यक्षाला दिला जाई.[2] कळपाच्या मालकाचा उल्लेख, जनावरांची मालकी खाजगी असावी ही वस्तुस्थिती दर्शवितो कळपाचे संगोपन केवळ राज्याकडूनच होत असे असे नाही तर श्रीमान व्यक्तीकडूनही होत असे. अध्यक्षाच्या कामामध्ये कर गोळा करणे, जनावरांच्या परिस्थितीसंबंधी व गुराख्यांच्या कामासंबंधी चौकशी करणे यांचा समावेश होत असे.

जनावरांना दयाळूपणाने आणि काळजीपूर्वक वागवावे, अशी विनंती अशोकाने वारंवार आपल्या आज्ञालेखांमधून केलेली आहे. एके ठिकाणी तो असे सांगतो की ' आपल्या स्वतःच्या राज्यात, त्याचप्रमाणे आजूबाजूच्या भागांत आणि इतर देशांमध्ये जनावरांसाठी वैद्यकीय उपाययोजनेच्या तरतुदी केलेल्या आहेत.'[3] माणसे आणि जनावरे यांना पाणी मिळावे आणि वृक्षांच्या छायेत विसावा घेता यावा म्हणून मुख्य राजमार्गांवर झाडे लाविली आहेत आणि विहिरी खणल्या आहेत, असेही तो पुढे सांगतो. पुढच्या एका आज्ञालेखात तो प्रजेला असे सांगतो की, जनावरांच्या हत्येपासून प्रजेने दूर रहावे. राजवाड्यातील स्वयंपाकघरात नित्य मारल्या जाणाऱ्या पशूंच्या संख्येत त्याने कपात करून ते प्रमाण दोन मोर व एक हरिण येथपर्यंत आणून ठेवले व या प्राण्यांची हत्याही अधिक काळ चालू राहिली नाही. हीच कल्पना मनात धरून, यापूर्वीच्या राजांची शिकारीसारखी एक आवडती करमणूक त्याने बंद केली.[4] जनावरांविषयी असणारी रास्त कळकळ व बेसुमार हत्येमुळे देशातील पशुसंपत्तीला धोका निर्माण होईल ही भीती या दोहोंमुळे या धोरणाला प्रेरणा मिळाली यांत शंका नाही. यज्ञात जनावरांचा बळी देणे ही

१. दोन, २६.
२. दोन, १९.
३. दुसरे शिलाशासन. गिरनार; ब्लोख, ले एंस्क्रेप्सिओं द अशोक, पृ. ९४
४. पहिले, चौथे व आठवे शिलाशासन, गिरनार, उपरोक्त पृ. ९१, ९८ तीन.

अतिशय घातक रूढी होती कारण देवाच्या संपूर्ण आराधनेसाठी बळी म्हणून कळपातील सर्वोत्कृष्ट पशूची निवड केली जाई. पशुहत्त्येवर घातलेल्या या बंदीमागे अशोकाचा केवळ अहिंसेचाच उद्देश असता तर उदाहरण घालून देण्यासाठी म्हणून त्याने निश्चितपणे राजवाडयातील स्वयंपाकघरात मांस शिजविणे ताबडतोब बंद केले असते.

कोणत्याही परिस्थितीत ज्या पशूंची मुळीच हत्त्या करावयाची नाही अश्या पशूंची एक तपशीलवार यादी पाचव्या स्तंभशासनामध्ये दिलेली आहे. आणि यानंतरच्या पुढच्या यादीतील पशू व प्राणी हे काही विशिष्ट दिवशी अवध्य म्हणून जाहीर करण्यात आलेले आहेत.[1] वरवर पाहता ढोबळ दिसणारे पहिल्या यादीचे स्वरुप म्हणजे एक दीर्घकाळचे मोठे कोडे होऊन बसले आहे. हंस, राणी-मुंग्या व घोरपडी यांना अवध्य म्हणून का जाहीर करावे, याचे स्पष्टीकरण करणे कठीण दिसते. या यादीच्या शेवटी राजा असे सांगतो की जे चतुष्पाद उपयोगीही नाहीत व खाण्यासारखेही नाहीत त्यांची हत्त्या करू नये. जरूर नसता जनावरांची हत्त्या करण्यावर घातलेली बंदी न्याय्य आहे. जनावरांच्या या यादीची अर्थ-शास्त्रातील चौदाव्या भागात दिलेल्या जनावरांच्या नावांशी तुलना केली तर या दोहोतील काही संबंध शोधणे शक्य आहे. मोठ्या प्रमाणावर सर्वत्र आढळणाऱ्या प्राण्यांच्या शरीराचे विविध भाग एकत्र करून जे मंत्र व विष तयार होते त्या-विषयीची माहिती या भागांत दिलेली आहे. सरडयाच्या जातीच्या प्राण्यांचे उल्लेख अनेकवार येतात आणि घोरपड हा सरडयाच्या जातीतील प्राणी असल्याने, आपण असे गृहीत धरूया की हे प्राणी अवध्य म्हणून जाहीर करण्यात आलेले होते कारण त्यांचा उपयोग विष व जादूटोणा करण्यासाठी होत असे. यज्ञ व अशोक ज्यांना निरुपयोगी समारंभ आणि धर्मविधी म्हणतो त्या गोष्टी याविषयींची त्याची नापसंती अनेक आज्ञालेखांमधून दिसून येते.[2] जादूटोण्यासाठी विशिष्ट पशूंचा उपयोग करण्यास त्याचा आक्षेप असल्याने परिणामी या आज्ञालेखात तो आक्षेप सूचित झाला असावा, प्रजाजनांपैकी भोळसट लोकांवर मांत्रिक व जादूगार यांचा जो प्रभाव होता तो नष्ठ करण्याचा त्याचा हा एक मार्मिक प्रयत्न असावा.

कत्तलखान्यावरील अध्यक्षांच्या संबंधी असलेल्या प्रकरणात ज्या पशूंचे व पक्ष्यांचे पीडेपासून-संरक्षण करावयाचे अश्यांची एक यादी आहे.[3] त्यात मानवी

---

१. तत्रैव, पृ. १६५.

२. नववे शिलाशासन, गिरनार ब्लोख, उपरोक्त पृ. ११३.

३. अर्थशास्त्र, दोन, २६.

आकारातील पशूंचाही समावेश आहे. हे बहुधा माकडांना उद्देशून असावे. सर्व प्रकारच्या माश्यांचा या यादीत उल्लेख आहे व त्याशिवाय राजहंस, हंस, पोपट व मैना यांचा उल्लेख असून त्यांचा आज्ञालेखातही समावेश झालेला दिसतो. इतर शुभकारक पशू म्हणून ज्यांचे सर्वसाधारण वर्णन केलेले आहे त्यात येणाऱ्या पशूंचा समावेश या आज्ञालेखात झालेला आहे. दुर्दैवाने, या प्राण्यांचे संरक्षण का करावे याविषयीचे स्पष्टीकरण अर्थशास्त्रात दिलेले नाही. काही विशिष्ट मासे खाता येण्याजोगे नसल्याने त्या आधारे, मासे पकडण्यावर घातलेल्या बंदीचे स्पष्टीकरण करणे शक्य आहे.[1] या आज्ञालेखात पुढे असे विधान आहे की शेळ्या, मेंढ्या व डुकरीणी जर लेकुरवाळ्या वा दुभत्या असतील किंवा सहा महिन्यांपेक्षा लहान असतील तर त्या अवध्य आहेत. या विधानाला स्पष्टीकरणाची गरजच नाही. अशा स्थितीतील पशूंची हत्या करणे हे कृत्य अशोक निश्चितपणे निर्दय मानी. शिवाय ते सर्व पाळीव पशू होते व मांस व अन्य पदार्थांसाठी त्यांची जोपासना केली जाई.

मासे पकडण्यास सर्वसाधारणतः प्रतिबंध केलेला आहे व काही विशिष्ट दिवशी मासे विकण्यासही बंदी घालण्यात आलेली आहे. बेसुमार प्रमाणात मासे पकडले गेले तर त्यांच्या नैसर्गिक प्रजोत्पादनाच्या सवयींवर अनिष्ट परिणाम होईल या विचाराने माश्यांच्या विक्रीवर बंदी घातली असावी असे स्पष्टीकरण देता येईल.[2] आज्ञालेखात सांगितलेली ही विशिष्ट दिवशी माश्यांच्या विक्रीवर घातलेली बंदी, म्हणजे सबंध वर्षभर माश्यांची विक्री सुरळीत व्हावी म्हणून घातलेला निर्बंध होता. मौर्यकाळात मासा ही एक महत्त्वाची वस्तू मानली जात असे. जितके मासे आणि पक्षी पकडले असतील त्यांच्या एक दशांश जकात देणे भाग पडे.[3] जरी अर्थशास्त्राने माशाचा समावेश खाद्य पदार्थांत केलेला असला व मत्स्यपालनाच्या व्यवस्थेविषयी बराच विचार केलेला असला तरी माश्यांचा उप-

---

१. होरा, आरशीव एंतेरनास्योनाल दीस्तुआर दे सीआंस, क्र. १५, १९५१, पृ. ४०५–१२.

हा लेखक असे सांगतो की या आज्ञालेखात उल्लेखिलेले मासे गंगेच्या पाण्यात नेहमी आढळणारे आहेत व आजही ते अखाद्य समजले जातात. बहुधा इ. स. पू. तिसऱ्या शतकातही ते अखाद्य असल्याचे माहित असावे.

२. उपरोक्त.

३. अर्थशास्त्र, दोन, १; दोन, २; दोन, २४; चौदा, १.

योग इतर अनेक हेतूंनी केला जात असे. उदाहरणार्थ माश्याच्या खताची उपयुक्तता माहित होती. शत्रूच्या प्रदेशात वाहात जाणाऱ्या प्रवाहांमधील माश्यांवर विष-प्रयोग करणे, हा शत्रूची शक्ती खच्ची करण्याच्या अनेक मार्गांपैकी एक मार्ग होता व म्हणूनच मत्स्याहार ही एक नित्याची बाब असावी असे यावरून दिसते.

राजाचे शिकारी व कोळी यांच्यासंबंधी कंदहारांच्या कोरीव लेखात एक मजेशीर उल्लेख आहे. खालील वाक्यात तो उल्लेख येतो.

'आणि राजा सजीवांचे भक्षण करीत नाही आणि खरोखरच इतर माणसे व जे कोणी राजाचे शिकारी व कोळी आहेत त्यांनी शिकार करणे बंद केले आहे.'[1]

राजाने आपल्या मालमत्तेवर किंवा स्वतःच्या खाजगी उपयोगासाठी ज्या शिकाऱ्यांची आणि कोळ्यांची नेमणूक केलेली होती त्यांना उद्देशून हा उल्लेख असावा असा तर्क करता येईल. अशोकाने राजाला शोभेल अशा थाटामाटाने करण्यात येणारी शिकार बंद केली हे उदाहरणादाखल आपल्याला माहित आहे. जर मौर्यकालातील आहारामध्ये मासा ही महत्त्वाची बाब असेल तर मासे पकडण्यावर बंदी घालणे राजाला अशक्य होऊन बसले असेल. दाट अरण्याची क्षेत्रे प्रवाश्यांना तुलनेने सुरक्षित प्रदेश वाटावीत म्हणून शिकाऱ्यांची गरज वाटत असलीच पाहिजे. साम्राज्याच्या सर्व भागांमधील शिकाऱ्यांनी शिकार करणे व कोळ्यांनी मासे पकडणे बंद केले असेल हे खचितच अशक्य आहे.

मौर्यांच्या काळात झालेले भारताचे राजकीय एकीकरण आणि बलिष्ठ, केंद्रित सरकारचे नियंत्रण यामुळे झालेल्या विशेष महत्त्वाच्या परिणामांपैकी एक परिणाम म्हणजे विविध प्रकारच्या कारागिरीला चालना मिळाली. प्रशासनाच्या सुधारणेबरोबर व्यापाराचे संघटन अधिक सोपे झाले आणि कारागिरीने हळूहळू लघु उद्योगांचा आकार धारण केला. भारतीय समाजाच्या मेगॅस्थिनिसने केलेल्या सात वर्गांमधील विभागणीत कलाकार व कारागीर यांचा चौथा वर्ग म्हणून उल्लेख केलेला आहे. तो त्यांच्याविषयी असे लिहितो की काही करभार देतात आणि काही राज्यासाठी निश्चित व विवक्षित सेवा देतात. डायोडोरस म्हणतो की ते शस्त्रे आणि आयुधे बनविणारे होते. त्यांना करातून सूट तर मिळत होतीच शिवाय त्यांचे वेतन राज्याच्या कोषागारातून देण्यात येई.[2] ॲरियन असे स्पष्ट करतो की बरेचसे कारागीर आणि हस्तकलाकार राज्याला

---

१. जेए, व्हॉ. दोनशे सेहेचाळीस, पृ. २–३.

२. डायोडोरस, दोन, ४१; स्ट्रॅबो, पंधरा, एक, ४६.

कर देत. शस्त्रे बनविणारे व नौका बांधणारे हे अपवाद होते व त्यांना राज्याकडून वेतन मिळे.[1] यावरून असे दिसून येते की, कारागीरवर्गातील काहीजणांना करातून सूट मिळत असे कारण त्यांची नेमणूक प्रत्यक्ष राज्याकडूनच होत असे. शस्त्रे बनविणारे कारागीर राज्याचे नोकर होते यात आश्चर्यकारक काही नाही. जे राज्याला निश्चित सेवा देत असत ते बहुधा प्रत्येक वर्षातील काही निश्चित दिवस राज्यासाठी काम करीत असावेत. नित्य कराबरोबरच हा जादा सेवारुपकर मानला जात असावा.

युरोपीय व भारतीय ग्रंथांमधील अभिप्रायांवरून असे स्पष्ट दिसते की कारागीर पद्धतशीरपणे संघटित झालेले होते. उदाहरणार्थ, पक्क्या मालावर ताबडतोब कर बसविण्यात येत असे, इतकेच नव्हे तर एका खास अधिकाऱ्याकरवी त्यावर एक विशिष्ट मुद्राही उमटविली जात असे. त्यामुळे जुना न विकलेला माल व नवा माल यांतील फरक समजत असे, याविषयी साधारणतः एकमत आहे.[2] प्रशासनाकडील बाजूचे इतके उच्च दर्जाचे संघटन म्हणजे दुसऱ्या बाजूस त्या वस्तूच्या उत्पादकांच्या कार्यपद्धतीही तितक्याच उत्तम रीतीने संघटित झालेल्या असल्या पाहिजत. ग्रंथांमधून ज्या श्रेणिपद्धतीचा वारंवार उल्लेख येतो त्या बौद्धकालाच्या प्रारंभी निर्माण झाल्या व मौर्यकालातही कार्यान्वित होत्या. श्रेणींच्या इतिहासाचा मागोसा घेताना फिक असे सुचवितो की स्थानिक भौगोलिक परिस्थितीने त्यांच्या विकासाला जितकी मदत केली तितकीच विशिष्ट कारागिरीच्या सर्व व्यापाऱ्यांनी, साधारणतः शहरातील काही विशिष्ट भागांमध्ये स्थायिक होण्याच्या पद्धतीनेही केली.[3] कच्च्या मालाची सुलभ उपलब्धता असल्याने एक विशिष्ट कारागिरी जेथे केंद्रित झालेली होती, अशी व्यापाऱ्यांची काही खेडीही ज्ञात आहेत.[4] श्रेणिपद्धतीच्या उदयाला आवश्यक असणाऱ्या तीन प्रमुख बाबी अस्तित्वात होत्या. पहिली बाब म्हणजे धंद्याचे स्थानिकीकरण शक्य होते, दुसरी बाब म्हणजे वंशपरंपरागत व्यवसायाची पद्धती मान्य झालेली होती व

---

१. इंडिका, बारा.

२. स्ट्रॅबो, पंधरा, एक, ५०; **अर्थशास्त्र**, दोन, २१.

३. फिक **दि सोशल ऑर्गनायझेशन इन नॉर्थ–ईस्ट इंडिका इन बुद्धाज् टाइम**, पृ. २७९, २८०.

४. उदा. बनारसच्या जवळच अरण्य असल्याने तेथे सुतारांचे एक खेडं भरभराटीला आले. **अलीनचित्त जातक**, दोन, १८.

शेवटची बाब म्हणजे श्रेणीचा नेता किंवा **जेट्ठक** ही कल्पना सर्वत्र स्वीकारली गेली होती.[1] सुरुवातीला टोळ्या व जाती यांच्यामधली एक पायरी म्हणजे श्रेणी होत्या, त्यांच्या विकासाला व स्थैर्याला मौर्यकालातील व्यापाराच्या विस्तारामुळे बरीच मदत झालेली असली पाहिजे. पुढच्या काळात कडक नियमांनी त्या जख-डल्या गेल्या व त्याचा परिणाम म्हणजे त्यांतील काही श्रेणींनी हळूहळू जातीचे रूप धारण केले. सुरूवातीला श्रेणी बनविण्यासाठी स्पर्धा हे आणखी एक प्रलोभन असले पाहिजे. आर्थिक दृष्टया, वैययक्तिकरित्या काम करण्यापेक्षा एखाद्या संस्थेत काम करणे अधिक चांगले होते. अशा संस्थेमुळे सामाजिक दर्जा वाढे आणि गरजेच्या वेळी इतर सभासदांकडून मदत मिळू शके. टप्प्याटप्प्यांनी या श्रेणींचा विकास त्या त्या प्रदेशातील अतिशय महत्त्वाच्या अशा औद्योगिक संस्थांमध्ये झाला.

तयार मालाच्या जवळ जवळ संपूर्ण उत्पादनावर ज्यावेळी श्रेणींचे नियंत्रण प्रस्थापित झाले, त्यावेळी त्यांना असे आढळून आले की श्रेणींचे सभासद व त्यांचे कुटुंबीय यांच्या श्रमात जेवढे उत्पादन होऊ शकते त्यापेक्षा अधिक मालाला मागणी आहे, परिणामी त्यांना पगारी मजुरांची नेमणूक करावी लागली. त्यांच्यामध्ये दोन प्रकार होते. **कर्मकार** आणि **भृतक** हे नियमित वेतनावर काम करणारे स्वतंत्र कामगार होते आणि **दास** हे गुलाम होते.[2] **भृतक** व **दास** यांच्यासंबंधी बोल-ताना अशोकाने आपल्या आज्ञालेखात या दोन्ही प्रकारांचा उल्लेख केलेला आहे.[3] अशा प्रकारे मौर्यकालात श्रेणींचा मोठ्या प्रमाणावरील संघटनेत विकास झालेला होता व जरी सर्व देशात नाही तरी निदान भारतीय उपखंडाच्या उत्तर भागात त्यांना मान्यता प्राप्त झालेली होती. स्थानिक अधिकाऱ्यांकडून त्यांची नोंदणी होत असावी, असे दिसते. तसेच स्थानिक सहकार्यावर आधारलेल्या श्रेणींखेरीज इतर श्रेणींना खेड्यांमधून बंदी होती. त्यावरून त्यांना मान्यताप्राप्त दर्जा असावा असेही दिसते.[4] यावरून असेही सूचित होते की अधिकाऱ्यांच्या परवानगीशिवाय कोणत्याही श्रेणीला एका भागातून दुसऱ्या भागात जाता येत

---

१. **जातकांमध्ये जेट्ठक** किंवा विशिष्ट कारागिरीचा अध्यक्ष याविषयीचे उल्लेख आहेत. **जरूदपन** दोन, पृ. २९५.

२. **अर्थशास्त्र**, तीन, १३, १४.

३. नववे शिलाशासन, गिरनार, ब्लोख, **ले एंस्क्रेपसिओं द अशोक**, पृ. ११५

४. अर्थशास्त्र, दोन, १.

नसावे. याशिवाय या कालापर्यंत कारागीरवर्गामध्ये त्यांच्या त्यांच्या व्यवसाया-वर आधारित असा एखादा सामाजिक श्रेणिक्रमही विकसित झाला असावा. शहरांमधील इमारतींचे वर्णन करणारे अर्थशास्त्रातील एक प्रकरण विविध व्यावसायिकांच्या सामाजिक दर्जावर काहीसा प्रकाश टाकते. या व्यावसायिकांच्या जागा व शहरात ज्या भागांमध्ये त्यांच्यापेक्षा अधिक वरचा सामाजिक दर्जा असलेले लोक राहात होते तो भाग यांच्या संबंधावरून तो दर्जा वेगवेगळा दिसतो.[१]

श्रेणिसंघटनेमुळे तिच्या सभासदांना काही व्यक्तिगत हक्क प्राप्त होत असत उदाहरणार्थ इजा व चोरी यांपासून त्यांचे संरक्षण केले जात असे. एखादा कारागीर जर जखमी झाला तर त्याला कारणीभूत असणाऱ्या माणसाचा वध करण्यात येत असे.[२] अर्थातच हा कायदा तो कारागीर ज्या वेळी प्रत्यक्ष काम करीत असेल त्या वेळेपुरताच लागू होत असणार. एखाद्या कारागिराच्या वस्तू चोरल्याचा आरोप एखाद्या माणसावर सिद्ध झाला तर त्याला शंभर पण इतका जबरदस्त दंड द्यावा लागत असे.[३] कारागिरांनी फसवणूक केली तर त्यांच्याही बाब-तीत तितकेच कडक नियम होते. कारागीर जरी श्रेणींशी संबंधित असले तरी त्यांना पैसे देताना लोकांनी सावध असावे असे सांगितले जाई.[४] श्रेणीशी कारागिरांचा संबंध असल्यामुळे लबाडीच्या व्यवहारांना आळा घातला जात असावा. जर एखादा विशिष्ट कारागीर अशा प्रकारचा व्यवहार करताना पकडला गेला तर त्या श्रेणीचा सभासद म्हणून राहण्यास त्याला परवानगी मिळत नसावी व एखाद्या कारागिराला स्वतंत्रपणे काम करणे ही एक अत्यंत कठीण गोष्ट असावी असे दिसते.

कामाचा दर्जा आणि उत्पादित वस्तूंची संख्या यांनुसार वेतनाची निश्चिती होई. उदाहरणार्थ विणकराचे वेतन, त्याने कातलेल्या तलम, जाडयाभरडया वा मध्यम प्रतीच्या सुतावर व त्याने विणलेल्या कापडावर अवलंबून असे.[५] विशिष्ट उत्पादनासाठी विशिष्ट वेतन अशी पद्धतीही परिचित होती. याशिवाय सुटीच्या

---

१. अर्थशास्त्र, दोन, ४.
२. उपरोक्त, तीन, १९, स्ट्रॅबो, पंधरा, १, ५४.
३. अर्थशास्त्र, दोन १३.
४. उपरोक्त, चार १.
५. उपरोक्त, दोन १३.

दिवसांमध्ये केलेल्या कामाबद्दल मोबदला अगर बक्षिसी मिळत असे. कडक देखरेख व उत्पादनाची तपासणी करण्याची पद्धती प्रचलित होती. हलक्या दर्जाच्या वा लबाडीच्या कामाला भारी दंड वा शिक्षा केली जाई. जेवढे काम पूर्ण केलेले असेल त्यानुसार वेतन देण्यात यावे असे कौटल्याचे मत होते.[1] जर एखाद्या कारागिरावर सोपविलेले काम त्याने अर्धवट केले तर जेवढा भाग पूर्ण असेल तेवढ्याचीच मजुरी त्याला मिळे. ते काम त्यानें स्वतः पूर्ण केले वा इतर कोणाकडून पूर्ण करून करून घेतले तरच त्याला पूर्ण रक्कम मिळे किंवा ज्याने त्याच्यावर हे काम सोपविले त्याला नुकसानभरपाई देणे त्या कारागिराला भाग पडे. ही पद्धती एखाद्या व्यक्तिगत कारागिराच्या बाबतीत अगर श्रेणी हा घटक मानून तिच्या बाबतीत लागू होती.

केवळ कारागिरांच्याच श्रेणी अस्तित्वात होत्या असे नाही. सैन्यभरती करण्याच्या कामी सैनिकांचे मंडळही महत्त्वाची कामगिरी बजावीत असे.[2] हे मंडळ वा श्रेणी यात जे सैनिक असत ते खड्या सैन्यदलातील सैनिक नसत हे स्पष्ट आहे. ते बरेचसे आधुनिक काळातील राखीव फौजेतील सैनिकांसारखे असत वंशपरंपरागत सैनिक, भाडोत्री सैनिक, सैनिकांची मंडळे, दोस्तांचे सैनिक व वन्य टोळ्या यांचा सैन्यात समावेश होई असे सांगितलेले आहे. वंशपरंपरागत सैनिक ही संज्ञा खड्या सैन्यासाठी वापरलेली आहे हे निश्चित आहे. राज्याकडून प्रत्यक्षपणे व कायमची या सैन्यासाठी भरती होत असे. जेव्हा जशी गरज भासेल त्याप्रमाणे भाडोत्री सैन्य तात्पुरते भरती केले जाई. सैनिकांच्या मंडळाखेरीज इतर प्रकारच्या सैनिकांची भरतीही बहुधा फक्त गरजेच्या वेळी केली जाई. शेतकऱ्यांना जरी नाही तरी कारागिरांना बहुधा शस्त्रे वापरण्यास मुभा असावी आणि म्हणूनच युद्धाच्या वेळी त्यांना सैन्यात सेवेसाठी म्हणून बोलाविले जात असण्याची शक्यता आहे. अशा तऱ्हेने बोलाविण्यास जे योग्य असत त्यांची कदाचित यादी केली जात असावी व ते जसे आपापल्या श्रेणीचे सभासद असत तसेच सैनिक-मंडळाचेही असत.[3] प्रशिक्षित सैनिकांइतके ते कार्यक्षम नसत हे त्याच प्रकरणातील पुढील एका परिच्छेदावरून स्पष्ट होते. यामध्ये असे स्पष्टीकरण दिले आहे की खड्या सैन्यात नसलेल्या पण मंडळामध्ये असलेल्या सैनिकांना, ज्यावेळी शत्रुपक्षाकडील सैन्यात

---

१. उपरोक्त, तीन १४.

२. उपरोक्त, नऊ, २.

३. अशाच प्रकारची पद्धती ट्युडर व स्टुअर्ट काळांमध्ये इंग्लंडमध्ये प्रचलित होती.

तशाच प्रकारचे सैनिक असतील त्यावेळी लढाईत उतरवावे, यावरून समोरासमोर चालणाऱ्या लढाईपेक्षा गनिमी काव्याच्या लढाईत त्यांना उतरवावे असे सूचित होते.

प्रशासकीय अध्यक्षांच्या कार्याविषयीची चर्चा करीत असताना अर्थशास्त्राने त्यांचा अनेक श्रेणींच्या कार्याशी संबंध असल्याचे सांगितले आहे. या श्रेणींनी उत्पादित केलेल्या मालाच्या पुराव्याला प्राचीन युरोपीय ग्रंथामधून व पुरातत्त्वीय अवशेषांमधून पुष्टी मिळते. शस्त्रागारामध्ये तयार केल्या जाणाऱ्या आयुधांची खूपच तपशीलवार यादी दिलेली आहे.[1] भारतीय पायदळातील सैनिक आपल्या बरोबर धनुष्य, भाले व तलवारी बाळगीत आणि घोडदळातील प्रत्येक स्वाराजवळ दोन भाले असत असे ॲरियन सांगतो.[2] हस्तिनापुरातील उत्खननावरून असे दिसून आले आहे की नित्यांच्या घरगुती व लष्करी वापरात धातूचा उपयोग होत असे व त्यावरून आधीच्या काळापेक्षा तांत्रिक ज्ञान जास्त प्रगत होते, असे दिसते.[3] आयुधांमध्ये काटेरी व भोकात बसविता येण्याजोगी बाणांची लोखंडी अग्रे आढळून आली.

धातूंची माहिती बऱ्याच मोठ्या प्रमाणावर होती आणि हे धातू खाणीतून काढून त्यांपासून उत्पादन करण्यासंबंधीची खास वैशिष्टचे सांगण्यात आलेली आहेत. लोखंड, तांबे व शिसे यांसारख्या नित्योपयोगी धातूंप्रमाणेच सोने आणि चांदी यांसारख्या मौल्यवान धातूसंबंधीचेही ज्ञान होते. हस्तिनापूर येथे सुरम्याच्या तांब्याच्या शलाका व नखांची कात्री याचे अवशेष सापडलेले आहेत आणि तक्षशिलेतील भिर टेकाडामध्ये मौर्यकालीन स्तरात तांबे आणि ब्रांझ यांच्या इतर वस्तूंचे अवशेष आढळलेले आहेत.[4] रामपूर्वा येथील अशोकस्तंभावरील तांब्याची खिट्टी आणि मौर्यकालीन तांब्याची ओतीव नाणी, हा या धातूचा वापर होत असल्याचा आणखी पुरावा आहे.[5] मौर्यकालात लोखंडासाठी असलेली मागणी वाढली असावी असे दिसते. भिर टेकाडातील सुरुवातीच्या स्तरांमध्ये सापडलेल्या लोखंडाच्या वस्तूंमध्ये, बाकस, चाकू, तासण्या आहेत. नंतरच्या स्तरातील आयुधे,

---

१. **अर्थशास्त्र**, दोन, १८.

२. **इंडिका सोळा.**

३. लाल, **एन्शंट इंडिया** १९५४, व्हॉ. दहा, पृ. १६.

४. **उपरोक्त**, मार्शल, **तक्षिला**, व्हॉ. एक, पृ. १०३.

५. पंचानम् नियोगी, **कॉपर इन एन्शंट इंडिया**, पृ. १८–२०

हत्यारे, शेतीची अवजारे व घरगुती भांडी ही लोखंडाचा भरपूर उपयोग होत असल्याचे दाखवितात.[1]

या कालात सोने व चांदी यांसारख्या मौल्यवान धातूंचा व हरतऱ्हेच्या मौल्यवान खड्यांचा बराच वापर होत असल्याचे स्पष्टपणे दिसते. सोन्यावरील अध्यक्षाच्या कामाविषयी व राज्याच्या सोनाराच्या कर्तव्यांविषयी कौटल्याने विस्तारपूर्वक विवेचन केले आहे.[2] राजाच्या कोषागारात आणलेल्या रत्नांची पारख या विषयावर पुढचे एक संपूर्ण प्रकरण खर्ची घातल आहे.[3] एका भारतीय सणाच्या मिरगणुकीच्यावेळी राजसेवकांनी घातलेल्या सोन्याच्या किंवा मौल्यवान रत्ने जडविलेल्या विपुल अलंकारांचे वर्णन स्ट्रॅबो करतो.[4] हस्तिनापूर व भिरचे टेकाड येथे विविध प्रकारच्या जडजवाहिरांविषयींचा पुरावा सापडलेला आहे. सोनारांच्या व जवाहिऱ्यांच्या श्रेणींना राजाकडून आलेल्या मागण्या व श्रीमंत नागरिकांनी दिलेली कामे यामुळे भरपूर काम असावे असे दिसते.

दगड कापणे व दगडातील काम यांमधील कारागिरीच्या अत्युत्कृष्ट दर्जाविषयी खात्री पटविण्यासाठी वाङ्मयीन पुराव्याची गरज नाही. अशोकाचे स्तंभ व त्यावरील स्तंभशीर्षे हा पुरेसा पुरावा आहे. इतका उत्कृष्ट दर्जा कसा साध्य झाला हे अद्याप एक कोडे आहे, कारण मौर्यपूर्वकाळातील दगडातील कोरीव कामाचा नमुना म्हणून निश्चितपणे सांगता येईल असे एकही उदाहरण नाही. मौर्यपूर्वकाळात होत असलेला लाकडाचा भरपूर वापर आणि मौर्योत्तर काळात तितक्याच विस्तृत प्रमाणावर होणारा दगडाचा वापर यावरून असे सूचित होते की या बाबतीत मौर्यकाळ हाच संक्रमणाचा काळ असावा.[5] अशोकाच्या काळातील जे दगडातील काम आज टिकून राहिलेले आहे ते करणारे बरेचसे कारागीर साम्राज्याच्या वायव्य भागातील, बहुधा तक्षशिलेतील असावेत असे स्पष्टपणे जाणवते. या कारागिरीचे एक समान केंद्र असावे हे तिच्यातील एकसारखेपणावरून निश्चितच सूचित होते. तक्षशिलेसारख्या ठिकाणचे भारतीय कारागीर, दगडाच्या माध्यमाशी आधीच परिचित असलेल्या इराणी कारागिरांच्याही संपर्कात आले

---

१. मार्शल, तक्षिला, व्हॉ. एक, पृ. १०४, १०७.
२. दोन, १३, १४.
३. दोन, ११
४. स्ट्रॅबो, पंधरा, १, ६९.
५. सीएफ्. जातकाज्, एक, पृ. ४७०.

असावेत. मथुरेतील अवशेष व भिरच्या टेकाडातील चुनारच्या वालुकाप्रस्तरांचे अवशेष हे यां तर्काला पुष्टी देणारे आहेत.[1]

लाकूडकाम करण्याऱ्या कारागिरांची श्रेणीही एक महत्त्वपूर्ण श्रेणी असली पाहिजे. अग्निप्रतिबंधक उपाययोजनांकडे नगरातील अध्यक्षांना विशेष लक्ष पुरवावे लागे या अर्थशास्त्रातील उल्लेखावरून[2] असे सूचित होते की नगरांच्या बांधकामात लाकडाचा वापर बऱ्याच अंशी होत असावा. राष्ट्रीय अरिष्टांच्या यादीमध्ये आगीला अग्रक्रम दिलेला आहे.[3] जरी विटांचे काम होत असल्याच्या खुणा दिसत असल्या आणि एका विशिष्ट आकाराची विट मौर्यकालीन विट म्हणून पुरातत्त्ववेत्ते मानीत असले तरी लाकडाचा वापर खूपच विस्तृत प्रमाणावर होत असला पाहिजे.[4] पडीक जमिनींवरील अरण्ये तोडण्याचे काम चालू असल्याने इमारती लाकडांचा भरपूर पुरवठा होत असला पाहिजे व त्यामुळे बांधकामाचे साहित्य म्हणून दगडापेक्षा लाकूडच जास्त स्वस्त असावे. पाटलिपुत्र शहराभोवती एक लाकडाची तटबंदी होती.[5] हस्तिदंत व हाडे यांवर कोरीव काम करणारे कारागीर लाकूडकामाशी संबंधित आहेत. या दोन साहित्यांपासून तयार केलेल्या शोभिवंत वस्तूंचे अवशेष भिरच्या टेकाडात सापडले होते.[6] सांचीच्या प्रवेशद्वारावरील कमी उठावाचे कोरीव काम हस्तिदंतावरील कोरीव कामाच्या नमुन्यावर आधारलेले होते असे मत कला-इतिहासकारांनी व्यक्त केलेले आहे.[7]

मौर्यकालात विणकरांच्या श्रेणीही खूपच महत्त्वाच्या असल्या पाहिजेत. विशिष्ट प्रकारच्या विणकामामध्ये कौशल्य दाखविणाऱ्या स्थानांचा उल्लेख अर्थशास्त्रात आहे.[8] मथुरा, अपरांत, कलिंग, काशी, वंग आणि महिष येथे कापसाचे कापड तयार केले जाई. अपरांतामध्ये तयार केलेले कापसाचे कापड भरुकच्छहून पश्चिमेकडे निर्यात होत असले पाहिजे. कापडांच्या इतर प्रकारांचाही उल्लेख

---

१. मार्शल, तक्षिला, व्हॉ. एक, पृ. १०३.
२. दोन, ३६
३. चार, ३.
४. लाल. एन्शंट इंडिया, १९५४, व्हॉ. दहा, पृ. १५.
५. एआरएएसआय, १९१२–१३, पृ. ५३ तळटीप.
६. मार्शल, तक्षिला, व्हॉ. एक, पृ. १०३.
७. हिस्ट्री अँड कल्चर ऑफ दि इंडियन पीपल, व्हॉ. दोन पृ. ५४१
८. दोन, ११.

केलेला आहे. त्यांमध्ये दुकूल या शुभ्र व तलम कापडाचा व क्षौम या तागाच्या प्रकाराचा अंतर्भाव आहे. लोकरीच्या घोंगड्या व लोकरीचे इतर धागे तयार करणे हेही ज्ञात होते. भरतकाम केलेल्या व सोन्याच्या जरीचा वापर केलेल्या कापडांचे कपडे घातलेल्या मानकरी व्यक्तींच्या मिरवणुकींचा उल्लेख ग्रीक ग्रंथांमध्ये आहे.[1]

मातीच्या भांड्यांच्या व्यापाराच्या ओझरत्या उल्लेखापलीकडे कुंभाराच्या कारागिरीविषयी कौटल्य काही सांगत नाही हे आश्चर्यकारक आहे. मौर्यकालीन स्थळांच्या उत्खननात वारंवार सापडणारी मातीची भांडी व खापराचे तुकडे लक्षात घेता, कुंभारांच्या श्रेणी भरंभराटीमध्ये असल्याच पाहिजेत असे म्हणावे लागेल. मातीच्या भांड्यांच्या भट्ट्या इतक्या सार्वत्रिक होत्या की त्यांचा खास उल्लेख केला नसावा. परंतु मौर्यकालीन समाजातील वरिष्ठ वर्ग विशेष करून काळी चकचकीत भांडी वापरीत होता व मातीच्या भांड्यांचा तो एक विशेष प्रकार होता. त्यामुळे कौटल्याने त्याचे काही वर्णन करावे अशी अपेक्षा एखाद्याने करणे अगदी साहजिक आहे.[2] तथापि प्रत्येक कारागिरीचा उल्लेख केल्याचा दावा तो करीत नाही तर कारागिरांच्या सर्वसाधारण वर्णनासाठी आवश्यक तेवढ्यांचाच उल्लेख तो करतो. त्यामुळे कुंभारांना वगळले गेले असावे.

व्यापाराविषयीचे नियम काळजीपूर्वक केलेले आहेत आणि ते सुसंघटित व्यवस्थेला साजेसे असेच आहेत. मालाच्या विक्रीवर राज्याची कडक देखरेख असे. वस्तूचे मूल्य ठरविताना, किंमतीमधील चढउतार व वाहतुकीची साधने यांचा विचार व्यापाराचा अध्यक्ष करीत असे.[3] वाहतुकीच्या साधनामुळे वस्तूच्या किंमतीत फरक पडे कारण जमिनीवरील वाहतुकीपेक्षा पाण्यावरून होणारी वाहतूक स्वस्त असते. परदेशातून येणाऱ्या मालाच्या विक्रीमधून नफा मिळावा म्हणून परदेशी माल आयात करणारे व्यापारी, व्यापारी करातून सूट मिळावी अशी मागणी करू शकत. व्यापारी कर हा बहुधा राज्याच्या ठराविक वाटयाइतकाच असावा. यामध्ये जकातीच्या उत्पन्नाच्या एक पंचमांश भागाचा समावेश होत असे. जकातीचा दर हा वस्तूच्या मूल्याच्या एक पंचमांश होता. प्रजेला जाचक

---

१. स्ट्रॅबो, पंधरा, १, ६९.
२. चौथे परिशिष्ट पाहावे.
३. अर्थशास्त्र, दोन, १६.

होईल असा गैरवाजवी नफा मिळविणाऱ्या व्यापाऱ्याला प्रतिबंध करण्याची जबाबदारी व्यापाराच्या अध्यक्षावर असल्याने किमतींवरही नियंत्रण होते. प्रत्येक व्यापाऱ्यासाठी नफ्याची टक्केवारी निश्चित असे व त्यापेक्षा अधिक होणारा नफा राज्यकोषामध्ये जमा होई.[1] ही रक्कम स्थानिक वस्तूंच्या बाबतीत पाच टक्के व परकीय मालाच्या बाबतीत दहा टक्के असे.[2] किमतीवरील हे लाभदायक नियंत्रण नित्याच्या परिस्थितीत एक वरदानच होते. तथापि गरज पडेल त्याप्रमाणे राज्यकोषात परत भर टाकण्याची वेळ आली तर व्यापाऱ्यांनी जास्त किमत मागावी असे त्यांना उत्तेजन देण्यात येत असावे हे निश्चित, कारण त्याचा परिणाम म्हणून राज्यकोषातही जास्त रक्कम जमा होण्याची शक्यता असे. दलालाच्या कमाईचेही नियंत्रण होईल इतका, हा किमती व नफा यावरील सर्वसाधारण नियंत्रणाचा आवाका होता.[3] एखादे निश्चित क्षेत्र आणि एखादी विशिष्ट वस्तू या दोन्ही दृष्टीनी पुरवठा व मागणी यांचे नियमन केले जाई असे दिसते. परंतु एकूण उत्पादन व उपयोग यांचा हिशेब करणे शक्य नसल्याने या उपाययोजनेचा परिणाम फक्त वरवर दिसण्यापुरताच होत असावा. नियंत्रणाची व उत्पादन इतरत्र वळवण्याची प्रक्रिया त्या काळामध्ये अत्यंत मंद होती त्यामुळे एखाद्या विशिष्ट वस्तूच्या बाबतीत अतिउत्पादनाचे संकट निश्चितच वारंवार ओढविले गेले असले पाहिजे. जुन्या मालाची विक्री अगर गहाणवट यांविषयीचे व्यवहार फक्त अध्यक्षाच्या उपस्थितीतच होऊ शकत.[4] फसवणूक टळावी व नव्या मालाच्या नावाखाली जुनाच माल विकला जाण्यास प्रतिबंध व्हावा म्हणून प्रामुख्याने हा नियम लागू करण्यात आला होता.

विक्रीयोग्य मालावर एक दशांश इतका सर्वसाधारण कर आकारला जात असावा असे दिसते. तरीही प्रत्येक वस्तूच्या बाबतीत त्यात फेरफार होत असावा.[5] काही विशिष्ट दर्जाच्या कापडावर एक पंचविसांश, तर फुले, भाजीपाला यावर एक षष्ठांश असे वेगवेगळे बदलते कर दिसतात. विक्रीस योग्य अशा सर्व मालावर कर होता त्यामुळे ज्या जागी उत्पादन होई त्या जागी कर व किमत निश्चित

---

१. **उपरोक्त**, दोन २२.
२. **अर्थशास्त्र**, दोन, २१.
३. उपरोक्त, चार, २.
४. चार, २.
५. एक, १३, दोन, २२

होण्यापूर्वी कोणतीही वस्तू विकत घेणे हा शिक्षेस पात्र असा गुन्हा होता. देशामध्ये उत्पादित होणाऱ्या वस्तूंवर उत्पादनाच्या जागी शिक्के मारले जात आणि पर-देशातून येणाऱ्या वस्तूंवर जकात नाक्यांवर शिक्के मारले जात. वस्तूच्या मूल्यांवर जकात आकारली जाई त्यामुळे ती बहुधा वस्तूच्या रुपाने नव्हे तर पैशाच्या रुपाने भरली जाई. जरी परदेशी व्यापाराला उत्तेजन मिळावे म्हणून परकीय मालावरील करात सूट मिळू शके तरी परकीय व्यापाऱ्यांचे विशेष असे स्वागत होत नसे एखाद्या कारागिराकडे अगर व्यापाऱ्याकडे त्याच्याच व्यवसायातील दुसरा एखादा सभासद आला व त्याच्या घरी राहू लागला तर त्याची वर्तणूक चांगली राहील याची जबाबदारी त्या त्या कारागिरावर वा व्यापाऱ्यावर असे.[१] जो मनुष्य ज्या कारागिराला वा व्यापाऱ्यांला माहित असेल त्याची खात्री तो देई परंतु अनोळखी माणसाच्या बाबतीत कोणीही मध्यस्थ म्हणून काम करीत नसे. किंमत निश्चित करताना कोणत्याही वस्तूच्या वजनाच्या व मापाच्या बाबतीत लबाडी केली तर अत्यंत कडक शिक्षा दिली जात असे.[२] या बाबतीत कोणत्या स्वरूपाच्या गुन्ह्याला कोणती शिक्षा दिली जात असे याचा तपशील सांगितलेला आहे. त्याचप्रमाणे विवक्षित नफ्यापेक्षा जास्त नफा मिळविणे हाही शक्षेस पात्र असा गुन्हा समजला जाई.

व्याजाने पैसे देण्याच्या प्रथेच्या संदर्भात मेगॅस्थिनिस असे सांगतो की भारती-यांना व्याजाने पैसे देणे वा उसने घेणे हे माहितच नाही.[३] आपण वर वर्णन केलेल्या आर्थिक हालचालीच्या दृष्टिकोनातून पाहता ही गोष्ट क्वचितच शक्य आहे. बौद्ध वाङ्मयावरून, साधने आणि संपत्ती यांचे संघटन करण्याची जी पद्धती दिसते ती पाहता त्या कालातील व्यापारीवर्गाजवळ औद्योगिक व्यवस्थापनाविषयी उच्च दर्जाच्या विकसित कल्पना होत्या असे म्हणावे लागेल. या विषयीचा एक उचित परिच्छेद पुढीलप्रमाणे आहे.

फुलाला न दुखविणाऱ्या मधमाशीसारखा पैसे मिळविणारा शहाणा आणि सदाचारी मनुष्य पर्वतशिखरावरील ज्वालेसारखा दीप्तिमान होतो. असा मनुष्य हळूहळू मुंग्यांच्या वारूळासारखी रास रचतो. अशा रीतीने श्रीमान झालेला मनुष्य आपल्या कुटुंबियाना मदत करू शकतो आणि आपले मित्र पक्केपणाने स्वतःशी

---

१. दोन, ३६.

२. चार, २.

३. एलियन पाच, ५०, चार, १.

जोडतो. त्याने आपल्या पैशाचे चार भाग करावेत. एक भाग स्वतःच्या चरितार्थासाठी, दोन भाग आपल्या व्यापारासाठी आणि चौथा भाग आपत्काळासाठी म्हणून राखून ठेवावा.[1]

व्यापारी माणसाला आपल्या उलाढालीकरिता मदत करण्यासाठी सावकारीची पद्धती नव्हती हे असंभवनीय दिसते. कौटल्याने अर्थशास्त्रात पैशाच्या संघटित उसनवारीविषयी ऊहापोह केलेला आहे. अशा पद्धतीच्या व्यवहारावर बंदी नव्हती असे दिसते कारण जर निश्चित हप्त्यांनी व्याज दिले तर राज्यकोषातूनही उसने पैसे मिळू शकत.[2] विशिष्ट परिस्थितीमध्ये कायदेशीर रीतीने व्याजाचा कोणता दर आकारता येईल याविषयीचा तपशील दिलेला आहे.[3] उसनवारीने घेतलेल्या पैश्यांवर दरसाल दर शेकडा पंधरा टक्के हा व्याजाचा सर्वसाधारण दर दिसतो. **व्यावहारिकी** हा एक व्यापारी व्याजाचा विशेष प्रकार सांगितलेला आहे व तो दरसाल दर शेकडा ६० टक्के इतका आकारला जाई. ज्या व्यापारी व्यावहारास समुद्रप्रवास अगर दीर्घ प्रवास यांची गरज असे अशा व्यवहारांसाठी बहुधा व्याजाचा इतका भारी दर असावा. कदाचित व्याजाच्या दराचे नियंत्रण राज्याकडून होत असावे व त्यामुळे जबर व्याजाने पैसे दिले जात नसावेत म्हणून मेगॅस्थिनिसचे असे मत झाले असावे.

कर चुकविणाऱ्यांना दिव्य करण्याची (**क्लेप्टिम टोटेलोस**) शिक्षा दिली जाई असे ग्रीक ग्रंथ सांगतात.[4] या ठिकाणी कर चुकविणारा असा अर्थ नसून कर गोळा करणाऱ्याची चोरी करणारा असा असावा असे एकमत आहे.[5] अशा गुन्ह्यासाठी दिव्य करण्याची शिक्षा **अर्थशास्त्रात** सांगितलेली नाही. माल जप्त करणे किंवा दंड भरणे इतकीच शिक्षा सांगितलेली आहे.[6] **अर्थशास्त्र** या ग्रंथात कर गोळा करणाऱ्याच्या चोरी करण्याच्या गुन्ह्यावर बराच जोर दिलेला आहे. त्यावरून असे दिसते की असा गुन्हा परिचित असावा व अनेक प्रसंगी होत असावा. या गुन्ह्याच्या उल्लेखासाठी ग्रीक शब्दप्रयोग (**क्लेप्टिम टोटेलोस**) वापरणे हे बहुधा अधिक बरोबर ठरेल.

---

१. **दीघ निकाय**, तीन, पृ. १८८ (भाषां. ए. एल्. बॅशॅम)
२. दोन, ८.
३. तीन, ११.
४. स्ट्रॅबो, पंधरा, १, ५०
५. टिमर, **मेगॅस्थेनेस एन डे इंडिशे मात्शापिज**, पृ. २१७.
६. दोन, ८

मौर्यकालातील आर्थिक संघटना आणि व्यापार व दळणवळण यांचे प्रशासन यांच्याविषयीचा पुरावा म्हणून अर्थशास्त्राचा विचार करीत असताना हे लक्षात ठेवले पाहिजे की कौटल्याने रेखाटलेले चित्र हे आदर्श राज्याचे चित्र आहे. मौर्यांचे राज्य प्रत्येक बाबतीत याच पद्धतीने चालत होते हा समज आम्ही स्वीकारू शकत नाही. अर्थशास्त्राने सर्वसाधारण धोरणांविषयी मार्गदर्शन केले आहे व ही धोरणे अंमलात आणण्याच्या दृष्टीने विविध मार्गांचे वर्णन केलेले आहे. अर्थशास्त्रातील विचार आणि मौर्यांच्या राज्याचे सर्वसाधारण धोरण सारखेच होते आणि अर्थशास्त्रातील कल्पनांवरून मौर्यांच्या प्रशासन-पद्धतीला बऱ्याच अंशी स्फूर्ती मिळाली होती याविषयी शंका नाही. तथापि त्यांमध्ये काही विसंगती असणे शक्य आहे असे मानणे तर्काला धरून आहे. इतक्या मोठ्या प्रमाणावर तपशीलवार आर्थिक संघटना हे देशाच्या राजकीय–आर्थिक व्यवस्थेचे एक नवे लक्षण होते. या कल्पनांचा व्यवहारात उपयोग करताना निश्चितच काही उणीवा राहिलेल्या असणार. उदाहरणार्थ परदेशातून किंवा दूर अंतरावरून, अनेक संभाव्य धोके पत्करून, माल आणणारे व्यापारी, आपण ज्याची चर्चा केलेलीच आहे असे अधिकृत दराने एक दशांश इतके कमी नफाप्रमाण स्वीकारण्यास राजी होत असतील यावर विश्वास ठेवणे कठीण आहे. अधिकाऱ्यांना लाच दिली जात असेल व नफ्याचा मामला अध्यक्ष आणि व्यापारी यांच्यात खाजगी रीत्या मिटविला जात असेल असाच संभव अधिक दिसतो.

राजमार्ग व नौकानयनास अनुकूल नद्या यांचाच व्यापारी मार्ग म्हणून उपयोग करण्याकडे या कालात प्रवृत्ती दिसते. पश्चिमेकडील देश व ब्रह्मदेशाचा उत्तर किनाऱ्यावरील भाग या दोहोंबरोबर सागरी व्यापार चालू होता. खुष्कीचा मार्ग व जलमार्ग यांच्या फायदेशीरपणाविषयी अर्थशास्त्रात विशेष चर्चा केलेली आहे.[1] जलमार्ग हा निश्चितच अधिक स्वस्त आहे परंतु तो कायम स्वरूपाचा नाही व भूमिमार्गाचे जसे संरक्षण करता येते तसे त्याचे करणे शक्य होत नाही. भर समुद्रातील मार्गापेक्षा किनाऱ्याकिनाऱ्याने जाणारा मार्ग अधिक बरा, कारण त्यामुळे किनाऱ्यावरील अनेक बंदरांशी संपर्क साधता येतो व त्यामुळे कदाचित दळणवळण अधिक वाढते. नौकानयनास योग्य अशी नदी हा बराचसा सुरक्षित मार्ग मानला गेला आहे. भूमिमार्गांपैकी हिमालयाच्या दिशेने उत्तरेकडे जाणारे

---

१. सात, १२.

मार्ग हे दक्षिणेकडे जाणाऱ्या मार्गांपेक्षा अधिक चांगले असे सांगितलेले आहे. हे ठामपणाने म्हटले आहे, कारण उत्तरेकडील प्रदेशाचा अधिक परिचय होता आणि दक्षिणेकडील प्रदेशापेक्षा या प्रदेशात अधिक सुपरिचित रस्ते होते. त्या कालात उत्तरेकडील व्यापाऱ्यांना दक्षिण भागात जाणे हे साक्षेपत: नवे धाडस होते.

तथापि, उत्तरेकडील मार्ग अधिक चांगले या मताला विरोधी असा विचार कौटल्य मांडतो. व्यापारी मार्गामुळे निर्माण होणाऱ्या व्यापारी संबंधाच्या आधारे तो त्या मार्गाचे मूल्यमापन करतो. तो असा निर्णय देतो की दक्षिणेकडील व्यापाराला अधिक चांगली संधी आहे आणि तेथे उपलब्ध असणाऱ्या वस्तूंचे मूल्य उत्तरेकडील वस्तूपेक्षा अधिक आहे. दक्षिणेकडे जाणाऱ्या मार्गांपैकी जे मार्ग खाणींच्या प्रदेशातून जातात त्यावर लोकांची जा ये असल्याने ते वापरणे जास्त शहाणपणाचे असे सुचविले आहे. त्यामुळे दूर अंतरावर एकाकी प्रवास करण्याची गरज राहात नाही आणि शिवाय मार्गावरील लोकांशी व वस्त्यांशी व्यापार करण्याची संधी मिळते. पायवाटेपेक्षा गाडीरस्ते जास्त बरे आणि ओझ्याच्या जनावरांना जाता येईल असा मार्ग साहजिकच सर्वांसाठी चांगला.

बौद्ध ग्रंथांच्या आधारे मौर्यपूर्वकाळात वापरात असणाऱ्या विविध मार्गांची एक यादी तयार करण्यात आलेली आहे.[१] मौर्यकालात त्या मार्गांचा वापर होत असला पाहिजे. यांपैकी सर्वात महत्वाचे मार्ग म्हणजे उत्तरेकडून नैर्ऋत्येकडे जाणारा मार्ग (श्रावस्ती ते प्रतिष्ठान), उत्तरेकडून आग्नेयेकडे जाणारा मार्ग (श्रावस्ती ते राजगृह) आणि गंगा व यमुना या नद्यांच्या प्रवाहाच्या बाजूने जाणारा पूर्व-पश्चिम मार्ग. राजस्तानचे वाळवंट परिचित होते. भरूकच्छ (भडोच) या पश्चिम किनाऱ्यावरील बंदराचा उल्लेख वारंवार केला जाई व बबेरू (बाबिलोन) हे पश्चिमेतील व्यापारी केंद्र म्हणून परिचित होते. आपण असे मानू की इ. स. पू. पाचव्या व चौथ्या शतकांमध्ये ते मार्ग वारंवार बौद्धांच्या वापरात येत असत. दळणवळणाची ही केंद्रे होती आणि पुढच्या काळात मौर्य-साम्राज्यात सर्वत्र दळणवळणाच्या साधनांचा प्रसार झाला. बौद्धांनी यात्रांवर भर दिलेला असल्याने या मार्गाची काळजी घेण्यास व देखभाल होण्यास मदत झाली यात शंका नाही. त्याच वेळी गंगेचा प्रदेश आणि देशाच्या पश्चिमेकडील प्रदेश या दोहोंमध्ये व्यापाराचा विकास झाल्याने दळणवळणाचे मार्ग सुस्थितीत ठेवणे अगत्याचे ठरले.

---

१. ऱ्हीस डेव्हिडस, **बुद्धिस्ट इंडिया**, पृ. १०३ तळटीप.

मौर्यसाम्राज्याच्या विस्ताराबरोबर पाटलिपुत्रापासून बाहेर सरहद्दीपर्यंत अगर त्यांच्याही बाहेर दळणवळणाचा व्याप वाढविणे क्रमप्राप्तच होते. नोकरशाही-युक्त प्रशासनयंत्रणेच्या विकासामुळे अशा दळणवळणाची गरज भासू लागली. कारण अधिकाऱ्यांना प्रमुख शहरांशी सतत संपर्क साधावा लागे. अशा प्रकारे साम्राज्यातून आरपार जाणारे प्रमुख मार्ग किंवा पाटलिपुत्रापासून सर्वत्र जाणारे मार्ग होते, इतकेच नव्हे तर प्रांतांमध्येही त्यांच्यापुरते रस्त्यांचे लहान जाळे तयार करावे लागले. मौर्यांच्या प्रशासनयंत्रणेत इमारती व रस्त्यांची देखभाल करण्यासाठी अधिकाऱ्यांचा एक खास विभाग नेमलेला असावा असे दिसते. या अधिकाऱ्यांचा **ॲगोरनोमोई** या शब्दाने मेगॅस्थिनिसने उल्लेख केलेला आहे. त्याचा अक्षरशः अर्थ बाजारपेठेतील सरकारी अधिकारी असा आहे.[1] परंतु त्यांचे काम दळणवळणाशी संबंधित होते. रस्त्यांच्या बांधणीबद्दल ते जबाबदार होते. प्रत्येक दहा **स्टेडिया** इतक्या अंतरावर चिन्हदर्शक खांब उभारले होते. त्यावर अंतर, तेथून फुटणारे रस्ते व अशीच इतर काही माहिती नोंदलेली होती. हा अभिप्राय सातव्या स्तंभ-शासनाच्या दृष्टीनेही सूचक आहे. त्यामध्ये अशोक असे सांगतो की प्रत्येक आठ कोसांवर म्हणजे सुमारे दर नऊ मैलांवर त्याने विहिरी खणलेल्या आहेत.[2]

वायव्येकडून (तक्षशिलेच्या प्रदेशातून) पाटलिपुत्राकडे येणारा राजमार्ग हा सर्वांत महत्त्वाचा मार्ग समजला जात असे, व अनेक शतके तो चालू राहिला आहे, आज आधुनिक भारतीयांना तो ग्रँड ट्रंक रोड या नावाने परिचित आहे.

---

१. स्ट्रॅबो, पंधरा, १, ५०

२. ब्लोख, **ले एंस्क्रेपसिओं द अशोक** पृ. १७०, अध्यकोसिक्य या संज्ञेचे ब्लोख यांनी अर्धा कोस असे भाषांतर केले आहे, परंतु अध्य हा अष्टम् या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश आहे या फ्लीटच्या मतावर आधारित असे हुल्ट्श यांचे वाचन आम्ही मान्य करतो. (हुल्ट्श, **कॉर्पस इन्स्क्रिप्शनम इंडिकारम**, व्हॉ. एक, पृ. १३५, न. एक, **जेआरएएस्**, १९०६ पृ. ४०१ तळटीप). कोस म्हणजे नेमके किती अंतर हे निश्चित सांगणे कठीण आहे कारण योजन (४ कोस) हे अंतर पाच ते नऊ मैल इतके वेगवेगळे दिसते. प्रत्येक अर्ध्या मैलावर विहिरी खोदण्याची व धर्मशाळा बांधण्याचे काही गरज नसावी. परंतु प्रवाश्यांचा बराचसा प्रवास पायी होत असे ही वस्तुस्थिती लक्षात घेता प्रत्येक नऊ मैलाचे अंतर हेच योग्य होते कारण नऊ मैलांच्या चालण्याने विसावा घेण्याची गरज भासत असे.

लॅटिन ग्रंथामध्ये त्याचे काहीसे तपशीलवार वर्णन आहे.[1] तो पुढे पूर्वेकडे तामलुकपर्यंत अगर त्यापुढेही गंगेच्या मुखापर्यंत जात असे, असे म्हटले गेले आहे. व्यापार व संरक्षण या दोन्ही दृष्टींनी तो सारखाच महत्त्वाचा होता. सागरी व्यापार विकसित होण्यापूर्वी पश्चिमेकडे जाणारा तो मुख्य व्यापारी मार्ग होता. तक्षशिला हे व्यापारी उलाढालींचे केंद्र होते. अंतर्गत व्यापारासाठीही त्याचा वारंवार वापर होत असे कारण गंगेचे खोरे आणि वायव्य भाग यांच्यामध्ये व्यापारी मालाचा विनिमय बऱ्याच मोठ्या प्रमाणात होत असे.[2]

दक्षिण भारतातील मार्गपद्धतींचा पुरावा फारच अपुरा आहे. विंध्य पर्वतापर्यंतचे प्रवास हे काही विशेष असे प्रसंग नसावेत परंतु त्यापुढे दक्षिणेकडे प्रवास करणे हे एखादे साहस करण्यासारखेच असावे. भडोच आणि सौराष्ट्र यांपासून पश्चिम किनाऱ्याने नैर्ऋत्य किनारपट्टीवरील बंदरांकडे आणि श्रीलंकेकडे जाणारा सागरी मार्ग वापरात असावा असे दिसते. उदाहरणार्थ आपल्याला असे आढळते की विजय हा श्रीलंकेचा पहिला राजा पश्चिम किनाऱ्यावरील सोपारा बंदरामधून श्रीलंकेला गेला.[3] पूर्व किनाऱ्याने जाणाऱ्या सागरी मार्गावर याहून अधिक वर्दळ असावी असे दिसते.[4] मौर्यांच्या साम्राज्याला, मोक्याचे स्थान म्हणून कलिंगाचे फार महत्त्व वाटत होते. महानदी आणि गोदावरी या नद्यांच्या मधल्या प्रदेशात तो देश असल्याने वंग आणि दक्षिण भारत यांमधील सागरी वाहतुकीचे तो नियंत्रण करू शके. शत्रूच्या हाती कलिंग असणे म्हणजे या मार्गाला सततचा धोका होता. याशिवाय नद्यांच्या खोऱ्यांमधून जाणारे सोपे मार्ग कलिंगाच्या प्रदेशातून जात असल्याने दक्षिणेकडे जाणाऱ्या खुष्कीच्या मार्गातही तो अडथळा आणी.

दख्खनच्या पठारावरून जाणारे खुष्कीचे मार्ग हे साहजिकच शक्यतो नद्यांच्या खोऱ्यांमधून जात. दक्षिण भारताकडे जाणाऱ्या अनेक मार्गांपैकी एक मार्ग शोण नदीच्या खोऱ्यातून सहस्त्रामपर्यंत, तेथून पठारावरून उतरून कलिंगमधील तोसालीपर्यंत आणि नंतर किनाऱ्याने कृष्णा नदीच्या त्रिभुज प्रदेशापर्यंत जात असावा हे उघड आहे. हाच रस्ता त्यानंतर कृष्णेच्या खोऱ्यातून रायचूरच्या भागाकडे जात असावा. कृष्णेला येऊन मिळणाऱ्या तुंगभद्रेच्या खोऱ्यामुळे उत्तर म्हैसूरकडे जाणारा मार्ग मिळत असावा. पाटलिपुत्रापासून अधिक अंतर्गत भागाकडे

---

१. प्लिनी, **हिस्टोरिआ नॅचरॅलिस**, सहा, २१.

२. **अर्थशास्त्र**, दोन, ११.

३. **महावंस**, सहा, ४६, ४७.

४. उपरोक्त, अकरा, ३८.


भारत आणि पश्चिमेकडील
देश यांच्यामधील
व्यापारी व दळणवळणाचे
मार्ग
मॅसिडोनिआ
काळा समुद्र
ग्रीस
सायरेन
टायर
इजिप्त
तिबेट
हिमालय
ब्रह्मपुत्रा न.
तक्षशिला
काबूल
श्रावस्ती
गंगा न.
पाटलिपुत्र
यमुना न.
रूपनाथ
महानदी
तामलूक
नर्मदा न.
प्रतिष्ठान
सोपारा
गोदावरी
कृष्णा न.
तुंगभद्रा
अरबी
समुद्र
बंगालचा
उपसागर
ताम्रपर्णी
हिंदी महासागर
उंच डोंगराळ प्रदेश
0 ५०० १००० मैल

जाणाऱ्या आणखी एका मार्गाला रुपनाथ येथे फाटा फुटत असावा व तो गोदावरी नदीला उत्तरेकडून मिळणाऱ्या वैनगंगा खोऱ्याला मिळत असावा. गोदावरी नदीच्या मुखाकडून तो मार्ग दक्षिणेकडे कृष्णा नदीपर्यंत जाऊन पुढे कृष्णेच्या खोऱ्यातून जात असावा. दुसरा एक मार्ग प्रतिष्ठान ते सोपारा व पुढे दक्षिणेकडे पश्चिम किनाऱ्याने जात असावा.

नद्यांच्या खोऱ्यांमधून व्यापारी मार्ग जात असावेत हे सुचविण्याची कारणे प्रामुख्याने भौगोलिक आहेत. दख्खनच्या पठाराची उंची सरासरीने १२०० ते ३००० फूट आहे. त्यावरून प्रवास करण्याच्या दृष्टीने ही निश्चितच काही फार मोठी उंची नाही. सखल प्रदेशातून एकदम या पठारांची उंची वाढते व त्यामुळे रस्त्यांची चढण वा उतरण फार खडी असते, हीच अडचण हे पठार पार करताना येते. परंतु जेथे नद्या आहेत तेथे मैदानाकडून पठाराकडे जाणारी चढण मोठ्या दऱ्यांमुळे खंडित होते, त्यामुळे चढ अगदी हळूहळू वाढतो व त्यामुळे ते भाग रस्त्याने जोडणे जास्त सुलभ असते. याशिवाय, आजच्यासारखीच त्या काळात नद्यांमधून होणारी वाहतूक नद्यांच्या खोऱ्यातून प्रवास करताना अधिक काटकसरीची होत असावी. हे पठार कोरडे व त्या काळात दाट अरण्यांनी भरलेले होते. अरण्यांची तोडणी फारशी झालेली नसल्याने विशेषतः एकट्या दुकट्या प्रवाशाला ते सुरक्षित नव्हते. पठारापेक्षा नद्यांच्या खोऱ्यांमधून अधिक दाट वस्ती असल्याने त्यातून प्रवास करणे हा जास्त संयुक्तिक विचार होता.

साम्राज्यातून सीमेपलीकडे असणाऱ्या देशांकडे जाणारे मार्ग प्रामुख्याने पश्चिम आणि वायव्य सीमांवर केंद्रित झालेले होते. पूर्वेकडचा प्रांत आणि ब्रह्मदेशाचा उत्तर किनारा यांच्यामध्ये संपर्क साधला जात असावा असे दिसते.[1] परंतु त्यापलीकडील पूर्व भागाशी या कालात संबंध असल्याच्या नोंदी नाहीत. ग्रीकांच्या साम्राज्याशी बरेचसे निकट संबंध होते. टार्न या भारतीय ग्रीकांच्या एका आधुनिक इतिहासकाराने भारतातून पश्चिमेकडे जाणाऱ्या मार्गांची काहीशी तपशीलवार चर्चा केलेली आहे त्याने तीन मुख्य गटांमध्ये त्यांची विभागणी केली आहे.[2] पहिला उत्तरेकडचा मार्ग होता आणि तुलनेने तो कमी महत्वाचा होता. तो तक्षशिलेहून काबूलला, नंतर तेथून बॅक्ट्रिया, ऑक्ससचा प्रदेश, कॅस्पियन समुद्राच्या दक्षिणेकडील प्रदेश, फॅसिस (कॉकेशसमध्ये) असा जाऊन काळ्या समुद्राजवळ संपत असे. इ. स. पू. तिसऱ्या

---

१. दुसरे प्रकरण पाहावे.

२. **हेलेनिस्टिक सिव्हिलायझेशन**, पृ. २११ तळटीप.

शतकात ज्यांचा खूप मोठ्या प्रमाणावर उपयोग केला जाई अशा तीन मार्गांचा समावेश दुसऱ्या गटात होतो. एक भारतातून कंदहार आणि हेरात या मार्गे इक्बाटाना येथे जाणारा होता आणि तो सर्वांत महत्त्वाचा मार्ग होता. अलीकडे उजेडात आलेला अशोकाचा कंदहारचा लेख हे मत पक्के करणारा आहे. ग्रीक आणि ॲरेमिक ग्रंथ कंदहारमध्ये ग्रीक व इराणी लोकांची खूप वस्ती असल्याचे सांगतात. या लोकांचा चरितार्थ या व्यापारी मार्गांच्या भरभराटीवरच प्रामुख्याने अवलंबून असावा. दुसरा एक कमी महत्त्वाचा मार्ग कंदहार येथून फुटून पर्सिपोलीस आणि सुसा यांच्या दिशेने जाई. यानंतर दुसऱ्या गटातील आणखी दक्षिणेकडचा मार्ग भारतातून इराणी आखात आणि तैग्रिस नदी या बाजूने सेल्युशिया येथे जाई. सेल्युशियापासून इफेसस, ॲंटिओककडे, फ्रिमियाकडे, एडेसा दमास्कसकडे आणि टायरकडे जाणारे असे अनेक फाटे या मार्गाला फुटत. अलेक्झांडरच्या सैन्याने भारताच्या मोहिमेवरून परतताना या दिशेने कूच केलेले होते. त्यामुळे त्यानंतर बहुधा हा दक्षिणेकडचा मार्ग सुरू झाला असावा. परंतु हवामानातील त्रासदायक-पणा व ज्या प्रदेशातून हा मार्ग जात होता त्यातील पहिल्या अर्ध्या भागातील प्रदेशाचा ओसाडपणा यामुळे एक महत्त्वाचा मार्ग म्हणून त्याचा कधीच विकास झाला नाही. टार्नने ज्याची चर्चा केली आहे असा तिसरा मार्ग म्हणजे भारताच्या पश्चिम किनाऱ्याकडून अरेबियाच्या आग्नेय किनाऱ्यावरील बंदरे घेत जाणारा व नंतरच्या काळात जेथे एडन हे आधुनिक बंदर विकसित झाले त्या विशिष्ट ठिकाणापर्यंत जाणारा सागरी मार्ग. मौर्यकालातील भारतीय व्यापारी आपल्या मालाची पूर्व भूमध्यसमुद्रातील मालाशी जेथे देवाण घेवाण करीत असत अशी ठाणी अरेबियाच्या किनाऱ्यावरील बंदरांमध्ये आधीच निर्माण झाली असावीत. पूर्व भूमध्यसमुद्रातील माल तांबड्या समुद्राकडे पाठविला जात असला तरी पुढच्या शतकांमध्ये ज्या प्रमाणात हा व्यापार विकसित झाला तितका या काळात निश्चितच झाला नव्हता.

बौद्ध वाङ्‌मयामध्ये दूरवरचे प्रवास करणाऱ्या व्यापाऱ्यांचे उल्लेख वारंवार आलेले आहेत.[१] देशोदेशी होणारे हे प्रवास काल्पनिक आणि इतर धोक्यांनी भरलेले असत. जर दरोडेखोर आणि वन्य श्वापदे यांची भीती पुरेशी वाटत नसली तर त्यात पिशाच्यांच्या झुंडीची भर घालण्यास कल्पना नेहमीच तयार असे. वाळवंटातील प्रवास विशेष त्रासदायक असत. तारे मार्गदर्शक ठरू शकतील अशा

१. **जातकाज्**, व्हॉ. दोन, पृ. २४८, व्हॉ. तीन, पृ. ३६५.

रात्रीच्या वेळी ते केले जात.[1] या प्रवासाचे स्वरूप धोक्याचे असल्यामुळे साधारणत: खूप मोठा तांडा जमवून ते केले जात. नौकानयनाविषयी काही मजेदार शेरे मारून सागरी प्रवासाचाही उल्लेख जातकांमध्ये केलेला आहे. उदाहरणार्थ, जमिनीच्या दिशेने उडणे हे कावळयांना माहित असल्याने जहाजाला मार्गदर्शन करण्यासाठी त्यांचा उपयोग केला जात असे.[2] पूर्वीच्या बॅबिलोनियातील आणि फिनिशियातील लोकांपासून ही चाल उचलली असावी असे सूचित केले गेले आहे.[3]

मौर्यपूर्वकालात भारतीयांना जहाजबांधणीचे ज्ञान होते. ॲरियन म्हणतो की अलेक्झांडरच्या मोहिमेमध्ये पंजाबमध्ये राहणाऱ्या कॅथियोइ या टोळीच्या मोठ्या गोद्या होत्या व तीने ग्रीकांना लांब व अरुंद प्रकारची जहाजे आणि वाहतुकीसाठी नावा पुरविल्या.[4] सिंधु नदीच्या तीरांवर राहणाऱ्या टोळयांना सागरी वाहतूक माहितच असली पाहिजे कारण या आधीच्या काळात या प्रदेशाचा आणि सॅबाईन प्रदेशातील लोकांचा व्यापार चालू होता.[5] स्ट्रॅबो लिहितो की मौर्यांनी जहाजबांधणीचा व्यवसाय राज्याची मक्तेदारी म्हणून चालविला होता.[6] जहाजे बांधणारे लोक व्यापाऱ्यांना नदीवर त्याचप्रमाणे सागरावर वापरण्यासाठी भाडयाने जहाजे देत असत. अर्थशास्त्रातील अभिप्राय विचारात घेता असे दिसते की जहाजबांधणीच्या व्यवसायावर शासनाचे बरेचसे नियंत्रण होते.[7] समुद्रगामी जहाजे आणि नद्या व सरोवरे यांवरील नावा, नौकांचा अध्यक्ष या एका खास अधिकाऱ्याच्या मुखत्यारात असाव्यात. चाच्यांची जहाजे व शत्रूच्या प्रदेशाकडे जाणारी जहाजे किंवा नियमांचा भंग करणारी कोणतीही जहाजे नष्ट करण्यात येत असत. पण हा कायदा अक्षरश: ठामपणाने विचारात घेतला जात नसावा असे जहाज जप्त करणे पुरेसे होत असावे. जहाजामधून येणाऱ्या आणि समुद्रावरील परिस्थितीमुळे खराब झालेल्या मालावरील

---

१. उपरोक्त, व्हॉ. एक, पृ. १०७.

२. उपरोक्त, व्हॉ. तीन, पृ. १२६–७, २६७.

३. फिक, **दि सोशल ऑर्गनायझेशन इन नॉर्थ–ईस्ट इंडिया इन बुद्धाज् टाइम**, पृ. २६९.

४. **ॲनाबॅसिस**, सहा, १५.

५. वॉमिंग्टन, **कॉमर्स बिटवीन दि रोमन एंपायर ॲंड इंडिया**, पृ. ४६.

६. स्ट्रॅबो, पंधरा, १, ४६.

७. दोन, २८.

जकात माफ केली जात असे अगर अशा परिस्थितीत जकातीतून काही सूट दिली जाण्याची शक्यता असे.[1] सागरी व्यापाराला मदत करणारी ही एक विशेष तरतूद होती. त्या काळात जहाजे चालविण्याच्या बाबतीत जी काही परिस्थिती होती त्या परिस्थितीत नुकसान होऊ नये म्हणून पुरेशी उपाययोजना करणे क्वचितच शक्य होते; उदाहरणार्थ समुद्राचे तुषार.

लहान प्रमाणावरील व्यापारामध्ये प्रामुख्याने आजुबाजूच्या भागांमधील स्थानिक उत्पादनाची देवाण घेवाण होत असली पाहिजे. काही खर्चिक आणि साहसी व्यापाराविषयी आपल्याला अर्थशास्त्रात माहिती मिळते.[2] उत्तरेकडील प्रदेशातून घोंगडया, कातडी आणि घोडे निर्यात होत असत तर दक्षिणेकडून शंख, हिरे, मौल्यवान खडे, मोती आणि सोने येत असे. या कालात पश्चिमेकडे चालणाऱ्या व्यापारात कोणत्या वस्तूंचा अंतर्भाव होत असे त्याचा सुगावा दुर्दैवाने लागत नाही. पुढच्या दोन शतकांमध्ये हा व्यापार खूप मोठ्या प्रमाणावर विकसित झाला. त्यामुळे त्यात कोणत्या वस्तूंचा व्यापार होत असे याविषयी आपल्याला माहिती आहे. या पुढच्या काळातील अनेक ग्रंथ असे सांगतात की भारतामधून मिरी, दालचिनी आणि मसाल्याचे इतर पदार्थ, मोती, हिरे, (माणिक) अकीक, पोवळी, गोमेद, भारतीय सुती कापड, मोर, पोपट आणि हस्तिदंतावरील काम या वस्तू पश्चिमेकडे पाठविल्या जात असत.[3] पश्चिमेकडून आयात होणाऱ्या मालामध्ये घोडे, लाल पोवळे, तागाचे कापड आणि काच या वस्तू होत्या.[4] आपण असे मानूया की यापूर्वीच्या काळात, मौर्यांच्या काळात साधारणतः या प्रकारच्या मालाचा व्यापार होत असावा पण कदाचित त्याचे प्रमाण कमी असावे. मालाच्या प्रत्यक्ष विनिमयापेक्षाही अधिक महत्त्वाची वस्तुस्थिती ही आहे की या व्यापाराने आपल्या-बरोबर कल्पना आणि प्रथा यांचा प्रसार केला. जसा व्यापाराचा आकार वाढला तसा ज्या भागात व्यापार केला जाई त्यांची अधिक जवळीक निर्माण झाली व परिणामी अधिक ज्ञान व सामंजस्य वाढले.

---

१. उपरोक्त.

२. सात, १२.

३. वॉमिंग्टन, **कॉमर्स बिटवीन दि रोमन एँपायर अँन्ड इंडिया**, पृ. १६२. १६७, १८०, २१९.

४. उपरोक्त, पृ. १५०, २६३, २६४.

मेगॅस्थिनिसने दिलेल्या यादीतील सैनिक, प्रशासकीय अधिकारी आणि सल्लागार या शेवटच्या तीन वर्गांविषयींची दीर्घ चर्चा, देशाच्या प्रशासनव्यवस्थेचा विचार करणाऱ्या पुढच्या प्रकरणात करण्यात येईल.

मौर्यकालीन समाजातील स्त्रियांच्या कार्याला काहीसे महत्त्व आहे. त्यांचे स्थान पुरुषांपुढे दुय्यम असते हे गृहीतच धरलेले होते. अर्थशास्त्रात ज्या प्रकारच्या समाजाचा विचार केलेला आहे त्यात ही स्थिती विशेषत्वाने असते. ब्राह्मणी ग्रंथ स्त्रियांच्या बाबतीत नेहमीच कठोर होते परंतु नंतरच्या काळातील ग्रंथांनीही नि:संदिग्धपणाने स्त्रीजात कनिष्ठ दर्जाची मानली आहे. बौद्धधर्मीयांनी स्त्रियांना बऱ्याच अंशी दयाळूपणा दाखविला आहे. स्त्रियांना बौद्ध संघामध्ये भिक्षुणी म्हणून प्रवेश देण्याविषयी घेतलेला निर्णय अतिशय महत्त्वाचा होता तर ब्राह्मणी विचारानुसार स्त्रियांना शिक्षण घेण्याचीही मुभा राहिलेली नव्हती. स्त्री ही केवळ मुलांना जन्म देणारी आहे असे न मानण्याने बौद्ध समाजातील स्त्रीचे जीवन ब्राह्मणी समाजातील स्त्रीच्या जीवनाइतके कठीण नव्हते, असे मत मांडण्यात आले आहे व त्यात काहीसे तथ्य आहे.[1] हिंदू धर्मविधींसाठी पुत्राचा जन्म ही जशी आवश्यक गोष्ट होती तशी बौद्धधर्मविधींसाठी नव्हती. स्त्रियांना अविवाहित राहण्यास बौद्ध समाजाची मान्यता असल्याने स्त्रियांची वरसंशोधनाबाबत काळजी करण्याची प्रवृत्ती थोडीशी कमी होती. साहजिकच ताबेदारीही तितकी कमी होती. असे असूनही साधारणपणे विवाह हेच स्त्रियांसाठी अत्यंत योग्य कार्यक्षेत्र असे मानले जात होते. काम करणाऱ्या स्त्रियांवर त्यांच्या कामाबाबत बंधने घातली जात. कसरत आणि खेळ करून दाखविणे, कुटुंबांमध्ये अगर राजवाड्यांमध्ये घरकामासाठी दासी म्हणून राहणे, आणि शेवटचा मार्ग म्हणून वेश्यावृत्ती आणि गणिकावृत्ती पत्करणे याच कामांच्या शक्यता असाव्यात असे दिसते. पुढच्या काळात या विषयावरील हिंदूंच्या कल्पनांचा बौद्धधर्मात शिरकाव होण्यास सुरुवात झाली आणि स्त्रियांचे घरातील महत्त्वही कमी झाले आणि जुनी ब्राह्मणी प्रवृत्ती बळावली.

भारतीय रीतिरिवाजांविषयी बोलताना मेगॅस्थिनिस आणि अॅरियन, स्त्रियांविषयींची प्रचलित प्रवृत्ती आणि भारतीय समाजातील त्यांचे स्थान यासंबंधीची माहिती देतात. मेगॅस्थिनिस लिहितो की भारतीय लोक अनेक स्त्रियांशी विवाह करतात.[2] वधूच्या मोबदल्यात बैलांची एक जोडी अशी निश्चित किंमत असावी

---

१. हॉर्नर, **वुमेन इन प्रिमिटिव्ह बुद्धिझम**, पृ. २२, तळटीप.

२. स्ट्रॅबो, पंधरा, १, ५३–५६.

असे दिसते. गाड्या आणि मालाचे गाडे ओढण्यासाठी बैलांची जोडी लागत असल्याने ज्याना ती परवडत असे त्यांच्याजवळ बैलजोडी असे. ज्यांच्याजवळ बैल नसत त्यांना तितकेच मूल्य द्यावे लागत असावे. मुलीच्या लग्नात गाईची एक जोडी द्यावी लागत असल्याचा उल्लेख अर्थशास्त्रात आहे,[१] या प्रथेला आर्षविवाह असे म्हणतात आणि ती पुरातन चाल असल्याचे वर्णन आहे. विवाहविधींच्या आठ प्रकारांमध्येही त्याचा समावेश करण्यात आलेला आहे. दोन गायी या प्रतीकात्मक होत्या व त्यांच्या इतकेच मूल्यही स्वीकारले जात असावे असे दिसते. मेगॅस्थिनिस असे सुचविताना दिसतो की काही स्त्रिया अपत्यसंभवासाठी असाव्यात तर इतर आपल्या नवऱ्यांना त्यांच्या कामात मदत करीत असाव्यात. स्त्रियांचा हा दुसरा प्रकार इतर कोणत्याही वर्गापेक्षा शेतकरीवर्गालाच लागू होण्यासारखा आहे, कारण त्यांच्या स्त्रिया शेतात काम करीत असण्याची शक्यता आहे, परंतु इतर कोणत्याही प्रकारच्या कामामध्ये, विशेषतः शहरामध्ये, त्यांना मदत करण्याची परवानगी मिळणे हे केवळ असंभवनीय दिसते. श्रीमान घराण्यांमधून काही स्त्रिया गृहकृत्यांवर देखरेख करीत तर काही अपत्यसंगोपनाचे काम करीत. मेगॅस्थिनिसने फक्त अशा घरगुती क्षेत्रापुरताचा उल्लेख केला असण्याची शक्यता आहे.

भारतीय स्त्रियांच्या अनैतिकतेविषयीही शेरे मारलेले आहेत. स्त्रियांवर शुद्ध राहण्याची सक्ती नसेल तर त्या स्वतःहून वेश्या बनत. ॲरियन लिहितो की एखादा हत्ती भेट म्हणून मिळणार असेल तर भारतीय स्त्रियांमधील अत्यंत शुद्ध स्त्रीही शील गमावण्यास राजी होई.[२] वरपांगी पाहता हे एक प्रकारे भूषण मानले जाई कारण त्याचा अर्थ स्त्रीची योग्यता एका हत्तीं इतकी होती. उच्चवर्णीय हिंदू मुलींच्या बाबतीत वेगवेगळ्या हिंदू देवतांनी केलेल्या कृत्यांच्या कथांची, भारतीय ग्रंथांमध्ये जी वारंवार पुनरावृत्ती होते ती लक्षात घेता असे दिसते की या विषयामध्ये बराचसा ढिलेपणा असावा. यात आश्चर्य वाटण्याजोगे काही नाही. या कालात, लैंगिक विषयाच्या बाबतीत असलेले हिंदूचे नीतिनियम, इतर धर्मांमधील लैंगिक जीवनाशी निगडीत असलेल्या दोषांच्या गुंतागुंतीपासून मुक्त होते आणि म्हणूनच ते अधिक निकोप प्रवृत्तीचे निदर्शक होते. तथापि, हिंदूंची प्रवृत्तीही निर्दोष नव्हती. समाजामध्ये स्त्रियांना दुय्यम स्थान असल्यामुळे क्वचित विचित्र परिस्थिती निर्माण होई. उदाहरणार्थ

---

१. तीन, २.
२. इंडिका, सतरा.

शासनाने वेश्याव्यवसायावर बंदी घातली नाही परंतु प्रत्यक्षात त्यावर कर बसविला.[1] वेश्यांना वाईट वागणूक मिळू नये म्हणून संरक्षण मिळे. जर गरज भासली तर राज्याकरिता हेर म्हणून काम करण्यासाठीही त्यांना बोलाविले जाण्याची शक्यता असे.

राजवाड्यामध्ये नेमलेल्या स्त्रिया एक अंतःपुरात तरी कामे करीत[2] अगर राजाची देखभाल करण्याची जबाबदारी त्यांच्यावर असे.[3] दुसऱ्या प्रकारातील स्त्रिया त्यांच्या आईबापांपासून विकत घेतलेल्या असत. राजाच्या खास सेवक म्हणून स्त्रिया असत याविषयीच्या पुराव्याला अर्थशास्त्रातही पुष्टी मिळते. तेथे राजाला असा सल्ला दिलेला आहे की सशस्त्र अंगसंरक्षक म्हणून स्त्रियांना नेमावे.[4] राजाच्या शिकारीच्या मिरवणुकी मोठ्या कौशल्याने काढल्या जात असत असे दिसते. या प्रसंगीसुद्धा राजाभोवती सशस्त्र स्त्रियांचा गराडा असे. पुरुष हे स्त्रियांइतके कोणाच्या ताबेदारीत राहणारे नसल्याने, लाचलुचपतीच्या मोहाला बळी पडून ते राजाविरुद्ध उलटण्याचा अधिक संभव असतो, उलट स्त्रियांना समाजातील आपले दुबळे व दुय्यम स्थान माहित असल्याने राजाची सेवा करण्यातील प्रतिष्ठेत आनंद मानून त्याची काळजी घेण्यात त्या अतिशय दक्ष राहतील या कल्पनेमधून अशा सावधगिरीचा उगम झाला असावा.

ज्या व्यवसायाबाबत स्त्रियांवर बंदी घातलेली नाही असा एक व्यवसाय म्हणजे विणकाम.[5] वस्तुतः अर्थशास्त्र असे सुचविते की, विणकामाच्या अध्यक्षाला सर्व वयोमानाच्या स्त्रियांना फायदेशीर रीत्या नेमून घेता येणे शक्य आहे. परंतु विरुप स्त्रिया, विधवा, वृद्ध वेश्या आणि दंड देता न आल्याने ज्यांच्यावर कामाची सक्ती झाली आहे अशा स्त्रिया यांच्यासाठी प्रामुख्याने हा व्यवसाय सुचविलेला आहे. हे प्रकरण अप्रत्यक्षपणे स्त्रियांच्या संबंधातील सामाजिक प्रथांवर प्रकाश टाकते. उदाहरणार्थ स्त्रियांचे वर्गीकरण करताना जे तीन प्रमुख प्रकार सांगितलेले आहेत ते असे; ज्या स्त्रिया आपल्या घरातून बाहेर पडत नाहीत अश्या (**अनिष्कासिन्याः**), ज्या स्त्रियांचे पती दूरदेशी गेलेले आहेत अश्या आणि ज्या स्त्रिया पंगु आहेत पण

---

१. अर्थशास्त्र, दोन, २७.
२. उपरोक्त, एक, २०.
३. स्ट्रॅबो, पंधरा १, ५३–५६.
४. एक, २१
५. अर्थशास्त्र, दोन, २३.

स्वतःच्या चरितार्थासाठी त्यांना काम करावे लागते अश्या. ज्यावेळी एखाद्या स्त्रीला सूत आणावयाचे असेल अगर विणलेला माल पोहोचवावयाचा असेल त्यावेळी शक्य असेल तेथे लहान वयाच्या मुलीचा नोकर म्हणून ये जा करण्यासाठी उपयोग करावा असे सुचविलेले आहे. जेथे असे शक्य नसेल तेथे त्या स्त्रियांशी प्रत्यक्ष व्यवहार करण्यास अध्यक्षाला परवानगी दिली आहे. परंतु अशा प्रसंगी फक्त प्रकाश अंधुक असतानाच त्या स्त्रीने कार्यालयाला भेट द्यावी कारण त्यामुळे तो तिला स्पष्टपणे पाहू शकत नाही; तसेच त्याने फक्त तिच्या कामापुरतेच तिच्याशी संभाषण करावे.

विवाह आणि पतिपत्नींमधील संबंध या विषयांवरील प्रकरणांमध्ये अर्थशास्त्र पुढे स्त्रियांच्या स्थानाविषयीची चर्चा करते.[1] पुढील शतकांपेक्षा या काळातील विवाहित स्त्रियांचे सामाजिक कार्य अजून अधिक लवचिक आहे. विधवेचा विवाह तिच्या सासरच्या कुटुंबाच्या बाहेर केलेला ऐकिवात नाही. तिने तिच्या सासऱ्याची परवानगी घेतली पाहिजे. काही विशिष्ट परिस्थितीत पती व पत्नी या दोघांची इच्छा असेल तर विवाह–विच्छेदाला परवानगी होती, स्वेच्छेने अगर पळवून नेल्याने विवाह झाला असेल, अगर वधूची फार मोठी किंमत घेण्याचा करार होऊन लग्न झाले असेल तर अशा विवाहांच्या बाबतीतच विवाहविच्छेदाचे तत्व लागू होते. जे विवाह संपूर्णपणे सामाजिक प्रथांना धरून होत असत व जे मोडणे शक्य नसे अशा प्रकारचे विवाह अधिक प्रतिष्ठितपणाचे मानले जात असत. या ठिकाणी परत आपल्याला हे लक्षात ठेवले पाहिजे की, या पुस्तकातील हा विभाग म्हणजे संभाव्य परिस्थितीची तात्विक चर्चा होती. परंतु व्यवहारात उपरोक्त चालीरीतींना सामाजिक रूढींनी मान्यता दिलेली होती, असे निश्चितपणे सांगता येणे शक्य नाही. आजच्याप्रमाणे तेव्हाही, या कायद्यांच्या दैनंदिन अंमल-बजावणीचा प्रभाव लोकमतावर पडला असला पाहिजे यात शंका नाही.

भारतामध्ये गुलाम नव्हते असे मेगॅस्थिनिसने आपल्या वृत्तांतात सांगितलेले आहे.[2] भारतीय ग्रंथांमध्ये गुलाम असल्याचे सांगितलेले आहे आणि प्रत्यक्षात श्रमबळाचा बराचसा पुरवठा गुलाम आणि भाडोत्री कामगारांकडून होत होता. यामुळे मेगॅस्थिनिसच्या अभिप्रायासंबंधी खूप चर्चा झाली आहे. मेगॅस्थिनिसच्या मनात गुलामगिरीविषयीची ग्रीक संकल्पना असल्याने भारतातील पद्धती व

---

१. तीन, २. तीन, ३.

२. डायोडोरस, दोन, ३९.

ग्रीकांमधील पद्धती यांच्यामधील फरक त्याला ओळखता आला नाही, हे शक्य आहे. उदाहरणार्थ, जर मौर्यकालातील गुलामगिरी अर्थशास्त्रात वर्णन केलेल्या पद्धतीनुसार संघटित झालेली असेल तर मेगॅस्थिनिसचे म्हणणे बरोबर होते. भारतातील दास स्वतःची मालमत्ता करू शके व स्वतःसाठी कमावू शके. असा भारतीय दास आणि ग्रीक दौलोस हे दोघे अगदी एकमेकांसारखे नाहीत.

श्रमबळाच्या तरतुदीसाठी नेमलेले गुलाम व भाडोत्री कामगार यांच्यापैकी भाडोत्री कामगार गुलामांपेक्षा अधिक वरच्या स्थानावर होते. ते पूर्ण करतील तितक्या कामानुसार त्यांना वेतन दिले जाई व नेमणूक करणाऱ्यांची मालकी त्यांच्यावर नसे. आपण पूर्वी पाहिल्याप्रमाणे बरेचसे भाडोत्री कामगार कारागिरांकडून नेमले जात. त्यांचा उपयोग शेती व घरकाम यांसाठीही करून घेतला जाई, तसेच जहाजांवरही त्यांना काम करावे लागत असल्याचे माहित आहे.[1] या कामगारांचे सामाजिक स्थान अतिशय खालचे होते आणि जवळ जवळ ते जातिबहिष्कृतांसारखे होते. खुद्द अर्थशास्त्राने त्यांच्या वेतनाच्या तपशीलाविषयी खूपच आस्था दाखविली आहे परंतु त्यांच्या परिस्थितीत सुधारणा करण्यासाठी कोणतीही कृती सुचविलेली नाही. त्यांच्या कामाप्रमाणे त्यांचे वेतन निश्चित केले जाई किंवा त्यांनी तयार केलेल्या मालाच्या एक दशांश हे प्रमाणित वेतन होते.[2] मौर्यकाळात प्रचलित असलेली वेठबिगारीची किंवा विष्टी ही पद्धती भाडोत्री कामगारांच्या पद्धतीपासून वेगळी केली पाहिजे. मेगॅस्थिनिस सांगतो की, कारागीर कर देण्याऐवजी काही निश्चित दिवस राज्यासाठी काम करीत असत.[3] शेतजमिनीची मशागत करणाऱ्यांसाठीही अशीच पद्धती होती. अर्थशास्त्र तिचा उल्लेख करते आणि विष्टीच्या जुलमी वापराविरुद्ध इषारा देते. अधिकाऱ्यांकडून देण्यात येणाऱ्या वेठीच्या श्रमाच्या जुलमी शिक्षेपासून राजाने शेतकऱ्यांचे संरक्षण करावे असे मानले जाते.[4]

ॲरियन लिहितो की, सर्व भारतीय स्वतंत्र आहेत व त्यांच्यापैकी एकही जण गुलाम नाही. लॅसिडेमोनियन्स व भारतीय यांच्यात एवढेच साम्य आहे. तथापि लॅसिडेमोनियन्स आपल्या नोकरांना गुलाम मानतात आणि हे नोकर हलकी कामे करतातच, परंतु भारतीय लोक परकीयांचा सुद्धा गुलाम म्हणून उपयोग

---

१. बोस, सोशल अँड रुरल इकॉनॉमी ऑफ नॉर्दर्न इंडिया, पृ. ४२४.

२. तीन, १३.

३. स्ट्रॅबो, पंधरा, १, ४६.

४. दोन १.

करीत नाहीत. आणि स्वदेशबांधवांचा तर त्याहूनही नाही.[1] स्ट्रॅबो खात्रीपूर्वक सांगतो की भारतात कोणताही मनुष्य गुलाम नाही.[2] 'कायदा असा आहे की त्यांच्यापैकी कोणीही कोणत्याही परिस्थितीत गुलाम असणार नाही परंतु स्वातंत्र्य उपभोगताना, सर्वांना असणाऱ्या समान हक्काचा ते आदर राखतील.' असे मेगॅस्थिनिस म्हणत असल्याचे डायोडोरसने उद्धृत केले आहे.[3] यानंतरचा परिच्छेद कायद्याच्या समानतेविषयीचा आहे आणि मालमत्तेची विषमता त्यातून वगळलेली नाही. वरील कल्पनेचे मूळ पुढील परिच्छेदात मिळते. टिमर यांनी सुधारलेल्या मजकुरानुसार हा परिच्छेद असा आहे, 'जे कोणाच्याही वर वा खाली उभे राहण्यास शिकलेले नाहीत त्यांचे जीवन कोणत्याही परिस्थितीत उत्कृष्टच असले पाहिजे. प्रत्येकाविषयी एकच कायदा करणे आणि तरीही दर्जा असमान ठेवणे हे मूर्खपणाचे आहे."[4] ग्रीक पद्धतीवर टीका करण्याचा या परिच्छेदातील प्रयत्न टिमर यांनी बरोबर जाणला आहे. कायद्याची समानता आणि गुलामगिरी या विसंगत आहेत असे ग्रीकांना वाटू शकत नाही असे मेगॅस्थिनिस सुचवीत आहे. गुलामगिरीच्या उल्लेखासाठी भारतीय परिस्थितीचे वर्णन करण्याची गरज नव्हती. ग्रीसमधील गुलामगिरीच्या विरोधाच्या प्रचाराचा तो एक प्रयत्न असावा.[5] गुलामगिरीच्या पद्धतीवर डायोजिनिस व सिनिक्स यांनी चढविलेल्या हल्ल्यांमुळे गुलामगिरी-विरोधी चळवळ सुरू झालेली होती. मेगॅस्थिनिसने भारतातील गुलामगिरीचे अस्तित्व ओळखले तरी नसावे किंवा ग्रीसमध्ये चाललेल्या गुलामगिरीविषयीच्या चर्चेमध्ये त्याने आपल्या वृत्तांताचा उपयोग वादविवादासाठी केला असावा. ग्रीक वाचकांच्या मनात मेगॅस्थिनिसच्या विधानातील मुद्दा अधिक चांगला ठसावा म्हणून ॲरियनने त्याच्या मूळच्या विधानात स्पार्टाबरोबरची तुलना घुसडली असावी हेही शक्य आहे.

मेगॅस्थिनिसने आपल्या मूळ मजकुरात गुलामगिरीचा उल्लेख केला असेलही परंतु नंतरच्या संपादकांनी तो गाळून टाकला असेल व स्वतःचे अभिप्राय अधिक बरोबर आहेत असे मानून ते त्यात घातले असतील अशीही शक्यता आहे. बौद्ध

---

१. इंडिका, दहा.
२. पंधरा, १. ५४.
३. डायोडोरस, दोन, ३९.
४. मेगॅस्थेनेस एन डे इंडिशे मात्शापिज, पृ. २७४.
५. उपरोक्त, पृ. २७४–६.

वाङ्मयावरून, वडील गुलाम असल्याने वंशपरंपरेने जे गुलाम झाले होते ते, जे विकत घेतले गेले होते किंवा दान म्हणून दिले गेलेले होते ते आणि घरातच ज्यांचा जन्म झाला होता ते, असे गुलामांचे तीन प्रकार दिसतात.[1] युद्धकैद्यांना गुलामांप्रमाणे कामाला लावण्याची प्रथाही असलीच पाहिजे. तेरावे शिलाशासन असे सांगते की कलिंगामधून १५०,००० लोकांना हद्दपार केले.[2] इतक्या सर्व लोकांना गुलाम केले असेल असे नाही पण त्यांतील काही टक्के लोकांना बहुधा अर्थशास्त्रात सांगितल्याप्रमाणे नव्याने साफ झालेल्या भागांमध्ये वस्ती करण्यासाठी पाठविले गेले असावे.[3] इसवी सनाच्या सुरवातीच्या शतकांमध्ये मनूच्या काळापर्यंत ही प्रथा, नित्याचीच झाली होती.[4] शिक्षेचा परिणाम म्हणून गुलामगिरी (दण्डदास) हे जातकांवरूनही समजते व अर्थशास्त्रातही त्याचा उल्लेख आहे.[5] कुटुंबातील घरकामे ही बहुधा गुलामांसाठी जास्त करून नित्याची असावीत. त्यांचे मालक आपले वैयक्तिक सेवक म्हणून त्यांचा उपयोग करीत. काहींनी शेतमजूर म्हणून व इतर काहीजणांनी कारागिरांमध्ये काम केलेले असेल. एखाद्या माणसाजवळ जास्त गुलाम असल्यास प्रसंगी त्याने काही गुलाम सर्वसाधारण कामांसाठी भाड्याने दिलेले असतील हेही शक्य आहे.[6]

अर्थशास्त्र गुलामांच्या आणखी एका गटाचे वर्णन करते, त्यावरून भारतातील गुलामगिरी ग्रीसमधील गुलामगिरीइतकी भयानक नव्हती या वस्तुस्थितीला पुष्टी मिळते. नित्याच्या परिस्थितीत आर्याने गुलामगिरीची वृत्ती स्वीकारू नये असे म्हटले जाते, परंतु काहीशा दुर्दैवाने, कौटुंबिक संघर्षामुळे किंवा नेहमीपेक्षा अधिक पैसे उभारण्याची गरज भासली म्हणून कोणताही आर्य तात्पुरते गुलाम म्हणून काम करील.[7] त्याच्या कराराची मुदत संपल्यानंतर तो आपले स्वातंत्र्य परत विकत घेऊ शकत असे आणि नित्याचे आयुष्य कंठू शकत असे. हा उल्लेख महत्त्वाचा आहे. कारण गुलामाला जरी स्वातंत्र्य नसले तरी त्याला एक सामाजिक

---

१. विनय पिटक: भिक्खुनीविभंग संघादिसेस, एक, २, एक.
२. ब्लोख, ले एंस्क्रेपसिओं द अशोक, पृ. १२५.
३. दोन, १.
४. मनु, धर्मशास्त्र आठ, ४१५.
५. कुलवाक जातक: जातकाज्, व्हॉ. एक, पृ. २००, तीन, १३.
६. बोस, सोशल अँड रुरल इकॉनॉमी ऑफ नॉर्दर्न इंडिया, पृ. ४१३.
७. तीन, १३.

स्थान होते आणि वेठीच्या कामगारांचा तो आणखी एक प्रकार मानला जात होता ही वस्तुस्थिती त्यावरून स्पष्ट होते. मौर्यकालीन समाजाच्या सामाजिक मोजमापात गुलाम हे सर्वात खालच्या पातळीवर नव्हते तर तिरस्कृत वर्गामधील माणूस, जातिबहिष्कृत हे सर्वात खालच्या पातळीवर होते. अशा प्रकारे, गुलाम म्हणून समाजात जे अपमानित स्थान मिळे ते भारतामध्ये ग्रीसइतके नव्हते. या कालातील एखाद्या ग्रीक प्रवाश्याच्या दृष्टीने भारतातील गुलामगिरी ग्रीसमधील गुलामगिरीपेक्षा अधिक सौम्य स्वरुपाची होती. परंतु त्याच वेळी जातिबहिष्कृतांना बाकीच्या भारतीय समाजाकडून जे धिक्कारले जात होते ते समजणे वा ओळखणे त्याला जड जात होते.

जातक आणि अर्थशास्त्र या दोन्ही ग्रंथांमधून गुलामांविषयी सर्वसाधारणतः दयाळू वृत्ती दाखवलेली दिसते.[1] अर्थशास्त्रात गुलामांच्या संरक्षणाविषयीचे वेगवेगळे नियम सांगितलेले आहेत. ज्या माणसाने स्वतःला गुलाम म्हणून विकून घेतले आहे, त्याची मुले गुलाम होणार नाहीत. स्वतः जे कमाविले आहे त्याची मालकी सांगण्यास, वडिलांकडून वारसा मिळण्यास, आणि आपल्या मृत्यूनंतर आपल्या नातेवाईकांना काही देण्यास गुलामाला परवानगी आहे. स्त्री–गुलामाना योग्य वागणूक देण्याविषयी आग्रह धरला आहे. जर गुलाम स्त्रीला तिच्या मालकापासून मूल झाले तर आई व मूल ही दोघेही स्वतंत्र मानली जावीत, आपल्या गुलामांच्या गरजांकडे जे लक्ष देत नाहीत त्याना राजाने शिक्षा करावी अशी अपेक्षा आहे.[2] असे निश्चित नियम होते व ते सर्व पाळले जात यात शंका नाही. परंतु त्यातही काही उणीवा असल्या पाहिजेत. मारहाण, कारावास, प्रसंगी उपासमार यांसारख्या यातना सहन कराव्या लागणाऱ्या गुलामांच्या दुःस्थितीचा उल्लेख काही जातककथांमध्ये आहे.[3] प्रजाजनांनी आपल्या गुलामांना आणि कामगारांना दयाळूपणाने वागवावे, असे आवाहन अशोकाने वारंवार आपल्या आज्ञालेखांमध्ये केले.[4]

गुलाम आणि जातिबहिष्कृत यांच्यामधील मुख्य फरक असा होता की

---

१. उदा. नानच्छंद जातकाज्, व्हॉ. दोन पृ. ४२८, तीन, १३.

२. दोन, १.

३. जातकाज, व्हॉ. एक, पृ. ४०२, ४५१.

४. नववे, अकरावे, तेरावे शिलाशासन, सातवे स्तंभशासन.

आपल्या मालकांच्या सतत आणि निकट सेवेत गुलाम असल्याने ते अशुद्ध मानले जाऊ शकत नसत.[१] जातिबहिष्कृतांसारखे ते गावाच्या वेगळ्या भागांमध्ये राहात नसत तर कुटुंबाबरोबर राहात असत. अस्वच्छ मानल्या गेलेल्या वस्तूंशी प्रामुख्याने संबंधित असणाऱ्या व्यवसायांच्या गटामध्ये तिरस्कृत वर्गातील म्हणजे हीन जातीतील लोकांचा समावेश होई. ते लोक आणि इतर समाज यांच्यात संपूर्णपणे सामाजिक फारकत होती व समाजाच्या मुख्य अंगाकडून आपला कधी स्वीकार होईल अशी आशा त्यांना नव्हती.[२] चांडाळ हे अशा जातिबहिष्कृतांचे एक उदाहरण आहे. ब्राह्मण-शूद्र संयोगाचा परिणाम म्हणून त्यांची उत्पत्ती झाली असावी असे मानले जाई व म्हणून ते अत्यंत हलक्या जातीचे होते.[३] एका जातककथेत 'चण्डाल-भास' संबंधी उल्लेख येतो. तो एका अगदी प्राचीन भाषेविषयीचा असावा.[४] जाहीर रीतीने फासावर चढविणे, स्मशानभूमी स्वच्छ करणे, शिकार आणि कसरत व जादू करून दाखविणे एवढेच व्यवसाय त्यांनी करावेत असे त्यांच्यावर बंधन होते.[५] चामड्याची कामे करणारेही हलके मानले जात. रथकारांच्या कामात चामड्याचा उपयोग करावा लागत असे. या कारणाने तेही अप्रतिष्ठित मानले जात होते. टोपल्या आणि बासऱ्या बनविणाऱ्या **वेण** जातीचे मुळही बहुधा प्राचीन असावे. **नेसाद** जातीचे लोक शिकार आणि मासेमारी यांवर उपजीविका करीत आणि ते बहुधा मशागत केलेल्या जमिनीच्या आजूबाजूच्या भागांमधून आलेले होते.[६] स्थिर वस्ती असलेल्या शेतकऱ्यांच्या दृष्टीने **नेसादांचा** व्यवसाय हलका होता. कुंभार, कोष्टी, न्हावी, नर्तक, गारूडी आणि भिकारी या सर्वजणांची हलक्या जाती म्हणून गणना केली जात होती.[७] त्यांच्या जातींची नावे प्रत्यक्ष त्यांच्या व्यवसायाचे व कामाचे स्वरुप दाखवितात हे काहीसे लक्षात घेण्याजोगे आहे.

---

१. फिक, **दि सोशल ऑर्गनायझेशन इन नॉर्थ-ईस्ट इंडिया इन बुद्धाज् टाइम**, पृ. ३१२.
२. बोस, **सोशल अँड रुरल इकॉनॉमी ऑफ नार्दर्न इंडिया**, पृ. ४३५.
३. मनु, **धर्मशास्त्र**, दहा, १२.
४. **चित्त-संभूत जातक: जातकाज**, व्हॉ. चार, पृ. ३९१.
५. बोस, **सोशल अँड रुरल इकॉनॉमी ऑफ नार्दर्न इंडिया**, पृ. ४३५.
६. तत्रैव, पृ. ४४७–५५
७. तत्रैव, पृ. ४८३.

जातिबहिष्कृतांनी सामाजिक बहिष्कार असलेले हे स्थान स्वीकारले होते. कारण प्रत्येक भागामधील त्यांची संख्या या गोष्टीला विरोध करण्याइतकी बलवान नव्हती. शहराच्या बाहेर किंवा शहरातीलच एखाद्या लहान भागात ते आपल्या कुटुंबांसह एकत्रित राहात. आणि त्यामुळे शहराच्या इतर भागांशी संबंध ठेवण्याच्या दृष्टीने त्यांची जागा गैरसोयीची होती. संघटित संस्था म्हणून काम करू शकतील अशा पद्धतीने ते श्रेणींमध्येही एकत्र बांधलेले नव्हते. त्यांना हेतुपुरस्सर अशिक्षित ठेवलेले होते, त्यामुळे त्यांचे स्थान अधिकच दुबळे झाले होते.[1] **जातकां**मधील हलक्या जातींच्या वर्णनाला, विशेषत: चांडाळांसंबंधीच्या वर्णनाला **अर्थशास्त्रात**ही दुजोरा मिळतो. 'पाखंडी आणि चाण्डाळ स्मशानभूमीच्या पलिकडे राहतील.' म्हणजे शहराच्या सीमेच्या बाहेर राहतील हे अगदी स्पष्ट शब्दांमध्ये सांगितलेले आहे.[2]

गावांची बांधणी एखाद्या आराखड्यानुसार होत असे आणि घरांची रचना चांगली असे हे पुरातत्त्वीय पुराव्यावरून स्पष्ट होते[3] मध्यभागी अंगण व भोवताली खोल्या असा घराचा सर्वसाधारणत: साधा आराखडा होता. तळमजल्यावरील खोल्या वरच्या मजल्यावरील खोल्यांपेक्षा नेहमी लहान असत कारण श्रीमान कुटुंबातील दास व नोकर तळमजल्यावर व कुटुंबे वरच्या मजल्यावर राहात असावीत. मौर्यकालीन शहरांची मांडणी उत्तरमौर्य काळात आणि शुंगकाळात बरीच सुधारली. त्या काळातील शहरांचे नियोजन अधिक नियमित आणि नियंत्रित नमुन्यानुसार होते.[4] सांडपाण्याच्या व्यवस्थेसारख्या नगरपालिकांच्या जबाबदाऱ्या पार पाडण्यासाठी लागणारे उत्तम संघटन अगदी प्राचीन काळापासूनही स्पष्टपणे दिसते.

मौर्यकाळ हा विकसनशील अर्थव्यवस्थेचा काळ होता हे वाङ्मयीन आणि पुरातत्त्वीय पुराव्यांवरून दिसून येते. वाढता व्यापार आणि त्याच्या अनुषंगाने मिळणारे दळणवळणाचे फायदे यांच्या विशेष संदर्भात विविध प्रकारच्या कारा-

---

१. **चित्त–संभूत जातकज्**, व्हॉ. चार. पृ. ३९० तळटीप.

२. दोन, ४.

३. मार्शल, **तक्षिला**, व्हॉ. एक, पृ. ९१–१०१.

४. शर्मा, **एन्शंट इंडिया**, १९५३, व्हॉ. नऊ पृ. १६८, लाल, **एन्शंट इंडिया**, १९५४ व्हॉ. दहा-अकरा, पृ. ५, तळटीप.

गिरीच्या विकासाला मोठ्या प्रमाणावर नवी संधी उपलब्ध होत आहे याची जाणीव होत होती. कृषि-अर्थव्यवस्थेचे फायदेही प्रथमच मोठ्या प्रमाणावर उमगले आणि या प्रकारच्या अर्थव्यवस्थेला कायम स्वरुप प्राप्त झाले होते हेही स्पष्ट झाले. या आर्थिक बदलाबरोबरच अनेक शतके टिकून राहील अशा पद्धतीची सामाजिक संघटना विकसित झाली.



## ४ : अंतर्गत प्रशासन आणि परकियांशी संबंध

मौर्यांच्या राज्यप्रस्थापनेने सरकारच्या एका नव्या प्रकाराचा, केंद्रित साम्राज्याचा, परिचय करून दिला. त्या कालापर्यंत भारतीयांना परिचित असलेला राज्यांचा नित्याचा प्रकार म्हणजे लहानशा राजसत्ताकांचा आणि प्रजासत्ताकांचा राज्यसंघ. नंदांच्या काळात केंद्रित राजसत्तेचा एक प्रयत्न झाल्याने या प्रकारात बदल घडून आला. ज्या भागांनी आपले स्वातंत्र्य गमावले आणि मौर्यसरकारच्या विस्तृत राजकीय आणि आर्थिक पद्धतीच्या योजनेत ज्यांचा समावेश झाला त्या भागांमध्ये या प्रकाराची परिणती मौर्यसरकारच्या केंद्रित नियंत्रणात झाली. साम्राज्याच्या सीमांवरील राजसत्ताके आणि स्वायत्त राज्ये यांनी साहजिकच मौर्यांबरोबर बेताचेच संबंध ठेविले होते. साम्राज्यांतर्गत भाग राज्यसंघाच्या पद्धतीचे नव्हते तर मौर्यांच्या सत्तेपुढे त्यांना दुय्यम दर्जा होता. मौर्यांच्या संघ-राज्यात अनेक घटक राज्यांचा समावेश होता असे एके ठिकाणी सूचित केलेले आहे.[1] परंतु मौर्य आणि कलिंगाचे राज्य यांच्यामधील संबंध या मताच्या विरोधी म्हणून उदाहरणादाखल सांगता येईल. मौर्यकालात जर संघराज्याची कल्पना प्रचलित असती तर कलिंगाशी असलेल्या संघर्षावर तिने उपाय सांगितला असता. पण अशोकाला त्या राज्यावर संपूर्ण नियंत्रण हवे होते व म्हणून त्याला त्या राज्याविरुद्ध युद्ध करावे लागले.

तथापि भारतामध्ये इतक्या विस्तृत भागावर केंद्रित साम्राज्य प्रस्थापित होण्याचा हा पहिलाच प्रसंग असल्याने साम्राज्यातील किंवा त्याच्या सीमेवरील काही टोळयांनी आपली राजकीय संघटना अजूनही चालू ठेवलेली असणे शक्य आहे. **अर्थशास्त्र** काही टोळयांच्या प्रजासत्ताकांचा उल्लेख करते, यांमध्ये योद्धयांच्या मंडळाकडून कारभार चालविला जाणाऱ्या कांबोज व राजा हे नाव धारण करणाऱ्यांकडून कारभार चालविला जाणाऱ्या लिच्छवी, वृज्जी आणि पांचाल यांसारख्या प्रजासत्ताकांचा समावेश आहे.[2] या टोळया समान अगर समानतेच्या जवळपास येणारे घटक असण्याचा प्रश्नच नसल्याने मौर्यांच्या साम्राज्यात त्या कोणत्याही प्रकाराने घटकराज्य म्हणून समाविष्ट झालेल्या नव्हत्या. प्रशासनाच्या सोयीसाठी या पद्धतीचा व्यवहार्य विचार केल्यानेच प्रामु-ख्याने त्यांना आपापल्या राजकीय संघटना चालू ठेवण्यास परवानगी देण्यात

१. दिक्षितार, **मौर्यन पॉलिटी**, पृ. ७८.
२. बुक नववे.

आली ही वस्तुस्थिती होती. जोपर्यंत या टोळ्या मौर्य साम्राज्याच्या संघटनेला बाधा आणीत नव्हत्या तोपर्यंत त्यांना आपले राजकीय अधिकार उपभोगण्यास परवानगी होती. मौर्यांच्या अधिकाऱ्यांशी या टोळ्यांना सुलभपणाने संपर्क साधता येत असे. हे अर्थशास्त्रावरून स्पष्टपणे दिसते. त्यावरून या टोळ्या मौर्यसाम्राज्यात दुय्यम मानल्या जात असाव्यात हे सूचित होते. जर त्या राज्यसंघाचे भाग असत्या तर त्यांना एक विवक्षित महत्त्व दिले जावे अशी अपेक्षा असती. परंतु तसे महत्त्व दिले जात नव्हते.

टोळ्यांच्या प्रजासत्ताकांवर एक शासकीय पद्धती या दृष्टीने राजसत्तेने मिळविलेला विजय, मौर्यसाम्राज्य दर्शविते.[1] टोळ्यांच्या प्रजासत्ताकांविषयी म्हणजे संघाविषयी कौटल्याने स्वीकारलेल्या वृत्तीमध्येच केवळ नाही तर वस्तुतः खुद्द अर्थशास्त्राच्या संपूर्ण संकल्पनेमध्येच या विजयाचे दर्शन होते. केंद्रीय अधिसत्तेच्या नियंत्रणावर या प्रबंधाने भर दिलेला आहे. राज्याच्या संघटनेचा प्रत्येक तपशील त्यातील प्रशासकीय योजनेत चपखल बसतो व त्याचे उद्दिष्ट राजाकडे अंतिम नियंत्रण देण्याकडे आहे. राजाने समाजाचे संरक्षण करावे आणि सुव्यवस्था राखावी अशी अपेक्षा आहे आणि अशी सुव्यवस्था कायम राखल्याने प्रशासन सुलभ होते. उलटपक्षी अशा प्रशासनामुळे महसुलाची सतत आवक होते. राजपदाच्या पारंपारिक संकल्पनेनुसार राजा केवळ सामाजिक प्रथांचे संरक्षणच करतो असे नाही तर स्वतःचे कायदेही करू शकतो. यावरून राजाच्या अधिसत्तेची सर्वश्रेष्ठता सिद्ध होते.[2] पारंपारिक कायदा म्हणजे शास्त्र व राजाचा कायदा म्हणजे धर्मन्याय यांत विरोध निर्माण झाला तर धर्मन्यायच प्रमाण मानावा असे सांगितलेले आहे. राजाच्या सत्तेमध्ये ही खरोखरच प्रचंड वाढ होती. या सत्तेवर काही बंधने घालण्यात आलेली होती पण तरीसुद्धा अशा विधानांनी राजाची अधिसत्ता वाढलेली होती.

राजाच्या या वाढलेल्या सत्तेमुळे अशोकाच्या कारकिर्दीत मौर्यांची केंद्रित राजसत्ता एक पितृसदृश हुकुमशाही बनली. राजा हा संरक्षक पण प्रजेच्या नित्य व्यवसायांपासून दूर असणारा, ही पूर्वीची कल्पना जाऊन तिच्या जागी सामाजिक आणि राजकीय जीवनाच्या सर्व क्षेत्रांवर त्याचे संपूर्ण नियंत्रण असते हा समज निर्माण झाला. 'सर्व माणसे माझी मुले आहेत.' या अभिप्रायात ही पितृसदृश

१. **एज ऑफ दि नंदाज अँड मौर्याज**, पृ. १७२.
२. तीन, १.

वृत्ती व्यक्त झालेली आहे.[१] आणि प्रजेविषयीची अशोकाची वृत्ती निश्चितपणे सांगताना ते एक बोधवाक्य होऊन बसले आहे. प्रजाजनांच्या कल्याणाविषयी त्याला कळकळ आहे व ती एक महत्त्वाची जबाबदारी आहे असे तो रास्तपणे मानतो. अर्थशास्त्रानेही या कल्याणावर खूपच भर दिलेला आहे.[२] अशोकाची कळकळ अशी आहे की नैतिक दृष्टया सदाचार कोणता व दुराचार कोणता हे तो अधिकारवाणीने, पण पित्याच्या नात्याने प्रजाजनांना सांगतो. आपल्या प्रजाजनांशी आपला प्रत्यक्ष संपर्क असावा अशी इच्छा तो व्यक्त करतो.[३] आपल्या साम्राज्यातून मोठे मोठे दौरे काढण्याच्या त्याच्या कार्यक्रमाचे प्रयोजन काही अंशी यात सापडते. सुधारलेले रस्ते आणि दळणवळणाची साधने यांनीही प्रशासनाच्या या नव्या विकासास हातभार लावण्यात महत्त्वाचा वाटा उचललेला आहे. दळणवळणाची नवी साधने म्हणजे नवी क्षेत्रे खुली होणे आणि हालचाली व प्रवास यांना अधिक स्वातंत्र्य मिळणे.

या विषयावरील भारतीयांच्या विचारसरणीनुसार राजाचे मुख्य कर्तव्य म्हणजे समाजव्यवस्था सुरळीत राखणे, चार जाती आणि धार्मिक जीवनातील चार आश्रम यांना शक्यतो जास्तीत जास्त आपापल्या कर्तव्यांचे व व्यवसायांचे पालन करावयास लावणे.[४] राजाच्या अधिसत्तेची सांगड दैवी संमतीशी घालण्यात आलेली होती. दैनंदिन कार्याच्या पातळीवरील हा संबंध ब्राह्मणांच्या, विशेषत: राजप्रासादातील उच्च धर्मगुरुच्या, पुरोहिताच्या स्थानाचे महत्त्व सांगत ना व्यक्त केलेला आहे. उदाहरणार्थं राजा आपल्या इतर मंत्र्यांची चौकशी करीत असताना मुख्यमंत्र्यांबरोबर पुरोहित तेथे उपस्थित राही. या वस्तुस्थितीमध्ये हे महत्त्व दिसण्याजोगे आहे.[५] अशा प्रकारे राजाशी असलेल्या संबंधामध्ये पुरोहिताचे कार्य केवळ धार्मिक कार्यापुरतेच मर्यादित नाही तर राजकीय क्षेत्राशीही ते संबंधित आहे. याच ग्रंथात इतरत्र याहून अधिक स्पष्टपणे राजाचे ब्राह्मणांवरील अवलंबित्व दर्शविलेले आहे. येथे ब्राह्मणांचा पाठिंबा, मंत्रिपरिषदेचा रास्त सल्ला आणि

---

१. पहिला वेगळा आज्ञालेख, धौली. ब्लोख ले एंन्स्क्रेपसिओं द अशोक पृ. १३७.

२. दोन, १. चार, ३.

३. सहावे स्तंभशासन, ब्लोख, ले एंन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. १६७.

४. अर्थशास्त्र एक, ४.

५. अर्थशास्त्र, एक, १०.

शास्त्रानुसार कृती हे राजाला निःसंशय यश मिळवून देणारे तीन घटक आहेत असे सांगितलेले आहे.[1] आपल्या आज्ञालेखामध्ये अशोक कोठेही पुरोहिताचा उल्लेख करीत नाही. त्याच्या कारकिर्दीत, राजकीय बाबींमधून पुरोहिताला वगळलेले असण्याची शक्यता आहे.

अशोकाने पुरोहितांच्या सत्तेचा पाठिंबा मिळविण्यासाठी केलेल्या प्रयत्नांचे दुसरे एक निदर्शक म्हणजे त्याने केलेला 'देवानंपिय' या बिरुदाचा वापर, असे सांगितले गेले आहे.[2] पुरोहितांचा पाठिंबा मिळविण्याच्या त्याच्या इच्छेपेक्षाही काहीतरी अधिक असल्याचे ते एक निदर्शक आहे असे दिसून येईल. कदाचित राजपद आणि दैवी सत्ता यांच्यामधील पुरोहितांसारख्या मध्यस्थांनाही वगळणाऱ्या संबंधावर जोर देणारा हा एक प्रयत्न होता. अशोकाला आपल्या प्रचारा-मध्ये त्याचा उपयोग झाला. धम्मविषयक धोरणाच्या प्रसारामुळे जंबुद्वीप देवांसाठी योग्य झाले.[3] हा त्याचा दावा व तत्सम अभिप्राय यांची भोळ्या भाबड्या लोकांच्या मनात त्याच्या बिरुदांशी सांगड घातली गेली व त्यामुळे तो खरोखरच देवांना प्रिय आहे अशी त्यांची खात्री झाली असावी. आपण साधलेल्या आपल्या राज्याच्या कल्याणाच्या बाबतीत, स्तंभलेखात व इतरत्र त्याची जी आत्मसंतुष्टता व्यक्त झालेली आहे,[4] ती पाहता आपणास असे सुचविता येईल की निदान त्याच्या अखेरच्या वर्षांमध्ये आपल्या बिरुदावर त्याचा शब्दशः विश्वास असावा.

अधिकाऱ्यांना व प्रजाजनांना कोणत्याही वेळी राजाकडे जाता आले पाहिजे या कल्पनेवर **अर्थशास्त्राने** जोर दिलेला आहे आणि जर तसे नसेल तर गोंधळ व अप्रीती निर्माण होऊन ती राजाचा शत्रूला बळी देतील असाही इषारा **अर्थशास्त्राने** दिलेला आहे.[5] हा सल्ला मौर्य राजांनी कटाक्षाने मानलेला दिसतो. साम्राज्याच्या कारभारातील कामाच्या दडपणामुळे ते अत्यावश्यक ठरले यात शंका नाही. अंगमर्दन चालू असतानाही सल्लामसलतीसाठी राजाकडे

---

१. उपरोक्त, एक, ९.

२. **एज ऑफ दि नंदाज् अँड मौर्याज**, पृ. १७५.

३. लघु शिलाशासन, ब्रह्मगिरी, ब्लोख, **ले एंन्स्क्रेपसिऑं द अशोक**, पृ. १४६.

४. पाचवे शिलाशासन, दुसरे स्तंभशासन.

५. एक, १९.

जाता येते असे मेगॅस्थिनिस लिहितो.[1] आपल्या एका आज्ञालेखात अशोक असे सांगतो की, आपण कोठेही असलो, भोजन करीत असलो, अंतःपुरात अगर उपवनात आराम करीत असलो तरी वार्ताहरांनी तेथे यावे; मंत्रिपरिषदेच्या बैठकीत उपस्थित झालेल्या एखाद्या विषयाकडे आपण लक्ष देण्याची गरज भासली तर तसे आपल्याला तावडतोब कळवावे.[2] जर राजाने सर्वसाधारण तीन पथ्ये पाळली तरच राजा यशस्वी होऊ शकतो असे कौटल्य आग्रहाने सांगतो. सर्व विषयांकडे त्याने सारखेच लक्ष दिले पाहिजे. त्याने नेहमी कार्यरत व कारवाई करण्यात तत्पर राहिले पाहिजे आणि शेवटी आपल्या कर्तव्यात त्याने कधीही कसूर करू नये.[3] अर्थात ज्या राज्यात अधिकाऱ्यांच्या विस्तृत जाळ्यामार्फत कार्यक्षम प्रशासन होत असेल तेथेच असा आदर्श प्रत्यक्षात येऊ शकेल.

त्या काळात कायदा म्हणजे प्रामुख्याने सामाजिक चालीरीतींनाच मान्यता दिलेली असे. वैयक्तिक प्रकरणांविषयीचे निर्णय सामाजिक प्रघातांना अनुसरून घेतले जात. असे निर्णय देण्याचे राजाला स्वातंत्र्य असे. आपल्या सल्लागारांचे मत विचारात घ्यावे असा सल्ला राजाला देण्यात आलेला आहे. पण अंतिम निर्णय हा त्यानेच घ्यावयाचा असे. राजावर एक राजकीय अंकुश म्हणून मंत्रिपरिषदेने काम केलेही असेल. परंतु जेथे राजाने ठरविलेल्या धोरणाच्या विरुद्ध लोकमत असेल तेथेच मंत्रिपरिषद प्रभावी ठरू शकत असेल. मंत्रिपरिषदेसारख्या स्वरुपाच्या आधुनिक संस्थांना सरकारच्या चौकटीत जे एक मजबूत स्थान असते तसे मंत्रिपरिषदेला नव्हते. राजाच्या सामर्थ्यानुसार आणि सभासदांच्या कुवतीनुसार वेळोवेळी तिच्या सत्तेत बदल होत गेला यात शंका नाही. मंत्र्यांच्या सत्तेचे एक उदाहरण आपल्याला अशोकाच्या राज्यारोहणाच्या वेळचे सांगता येईल. राधागुप्त या मंत्र्याचा पाठिंबा असल्याने त्याला सिंहासनावर येण्यास मदत झाली. अशोक आपल्या दोन आज्ञालेखांमध्ये परिषदेचा उल्लेख करतो. पहिल्या प्रसंगी परिषदेचे काम दुय्यम स्वरुपाचे दिसते. अशोकाने स्वीकारलेल्या नव्या प्रशासकीय उपाययोजनांची दखल **युक्तांनी** घ्यावी अशी आज्ञा परिषदेने करावी अशी अपेक्षा दिसते.[4] या उदाहरणावरून असे दिसते की राजाने निश्चित केलेल्या धोरणाच्या अंमलबजाव-

---

१. स्ट्रॅबो, पंधरा, एक, ५३–५६

२. सहावे शिलाशासन, गिरनार, ब्लोख, **ले एन्स्क्रेपसिओं द अशोक** पृ. १०७

३. एक, १९.

४. तिसरे शिलाशासन, गिरनार, ब्लोख, **ले एन्स्क्रेपसिओं द अशोक** पृ. ९६.

णीची जबाबदारी परिषदेवर होती. दुसऱ्या प्रसंगी परिषदेला खूपच जास्त अधिकार असावेत असे दिसते.[1] राजाच्या अनुपस्थितीत राजाच्या धोरणाची चर्चा ती परिषद करू शके. तसेच दुरुस्त्याही सुचवू शके किंवा राजाने ज्याची जबाबदारी परिषदेवर सोपविली आहे अशा कोणत्याही आकस्मिक विषयाचा विचार करू शके. तथापि अशाही परिस्थितीत परिषदेचे मत राजाला असेल तेथे ताबडतोब कळवावेच लागे. अंतिम निर्णय राजाकडेच असे व परिषद ही सल्लागारसभा म्हणूनच मानली जाई. बहुधा बऱ्याच विषयांवर विशेषतः आणीबाणीच्या वेळी परिषदेचा सल्ला घेणे राजाच्याच हिताचे होते.[2]

राजा स्वतः परिषदेतील सभासदांची निवड करीत असे, या वस्तुस्थितीमुळे परिषदेवरील राजाच्या नियंत्रणात वाढ झाली होती. आपल्या स्वतःच्या धोरणाला जे अनुकूल आहेत अशाच लोकांची निवड करण्याची राजाची प्रवृत्ती असणार. मंत्र्यांच्या अंगी आवश्यक असणाऱ्या गुणांची यादी देताना, अर्थशास्त्र जन्म, प्रामाणिकपणा व बुद्धिमत्ता यावर जोर देते.[3] पुढे ते असे सुचविते की विविध साधनांच्या आधारे या गुणांची खात्री करून घ्यावी. मंत्र्यांच्या निवडी-बाबतचा हा दृष्टिकोन अत्यंत आदर्शवादी आहे आणि व्यवहारात तो संपूर्णपणे क्वचितच उतरविला गेला असेल. या मंत्र्यांच्या निष्ठेची पारख राजा कोणकोणत्या

---

१. सहावे शिलाशासन, गिरनार, उपरोक्त पृ. १०७.

२. मंत्र्यांच्या परिषदेला राजापेक्षा वरचढ सत्ता होती व ती राजाचे धोरण नाकारू शके असे सिद्ध करण्याचा प्रयत्न जयस्वाल यांनी केला आहे. (**हिंदू पॉलिटी** पृ. २७५–८०, २९४–३०५) बारुआंनी दर्शविल्या-प्रमाणे (**अशोक अँड हिज इन्स्क्रिप्शन्स**, पृ. २१३) जयस्वालांचे वाचन **निज्झति** या शब्दाच्या चुकीच्या अर्थावर आधारलेले आहे. जयस्वालना वाटते त्याप्रमाणे हा शब्द **निक्षप्ति**, नाकारणे या शब्दापासून झालेला नसून **निध्यप्ति** या शब्दापासून बनलेला आहे व त्याचा अर्थ, विचार-विनिमयातून निघालेला तोडगा, असा आहे. परिषदेकडूनच आपल्या धोरणाचा स्वीकार व्हावा म्हणून अशोक आतुरतेने वाट पाहात आहे असे काही या आज्ञालेखातून नक्कीच ध्वनित होत नाही. त्यातून आज्ञार्थीच सूर निघतो. शिवाय जर परिषदेला इतके सामर्थ्य असते तर अशोकाने आपल्या स्वतःच्या उणिवांना जाहीर प्रसिद्धी दिली नसती.

३. एक, ९.

मार्गांनी करु शकतो त्यांचेही स्पष्टीकरण दिलेले आहे. या ठिकाणी त्याला मुख्यमंत्री व पुरोहित यांची मदत मिळते.[1] मेगॅस्थिनिस सांगतो की राजाचे सल्लागार एका विशिष्ट जातीमधून निवडले जातात व त्याच्या यादीत तिचा सातवा क्रम आहे.[2] जर हे मंत्री ब्राह्मण व उच्चवर्णीय क्षत्रिय या जातींमधीलच असतील तर हे विधान बरोबर आहे. इतर कोणत्याही जातीच्या सभासदांची मंत्री म्हणून निवड होण्यासारखी नव्हतीच.

परिषदेच्या सभासदांची निश्चित अशी संख्या नव्हती. जरुरीप्रमाणे ती बदलत असे. मौर्यांची मंत्रिपरिषद बरीच मोठी असावी. **अर्थशास्त्रा**तील यादीत मुख्यमंत्री किंवा महामंत्रि असून मंत्री आणि मंत्रिपरिषद यांच्यात फरक केलेला आहे. (मंत्रिनोमंत्रीपरिषदांच),[3] मंत्रिमंडळ किंवा मंत्रिपरिषद म्हणजे महामंत्र्या-सकट तीन ते चार सल्लागारांचा एक लहानसा गट, अंतवर्तुळ किंवा एक निकटचे सल्लागारमंडळ म्हणून निवडला जात असावा. हा गट कायमचाही असू शकेल किंवा आजच्या समितीसारखा विशिष्ट प्रश्नांपुरता विचारविनिमय करण्यासाठी निवडला जात असेल. एखाद्या विषयावर सल्ला घेण्याची इच्छा असेल तर राजाने तीन ते चार मंत्र्यांचा वैयक्तिक किंवा त्या एवढ्या लहान गटाचा सामूहिक सल्लाही घ्यावा असे सुचवलेले आहे.[4] मोठ्या सभेपेक्षा राजाने वैयक्तिक रीत्या विचार घेतला तर मंत्री आपले दृष्टिकोन अधिक चांगल्या तऱ्हेने मोकळेपणाने सांगू शकतात. म्हणून अशा विचारविनिमयातून स्पष्ट मत मिळण्यास मदत होते. याशिवाय चर्चा केलेल्या विषयासंबंधीच्या विचारविनिमयाबाबत अधिक गुप्तता राहते आणि कौटल्य या विषयांबाबतच्या गुप्ततेविषयीचे महत्व आवर्जून सांगतो.

महसुलावर नियंत्रण ठेवणाऱ्या अनेक खात्यांमार्फत केंद्रीय प्रशासन होत असे व प्रत्येक खात्यावर एक विशिष्ट अधिकारी असे. राजकोष आणि धान्य, रत्ने यांसारखे प्रामुख्याने वस्तुरुपाने येणारे व रोखीने येणारे राज्याचे उत्पन्न यांच्या व्यवस्थेबाबत कोषाधिकारी **(संनिधाता)** जबाबदार असे. त्यांचा साठा करणे ही त्याची खास जबाबदारी होती.[5] राज्याच्या विविध भागामधून महसूल गोळा

---

१. एक, १०.
२. डायोडोरस, दोन, ४१.
३. एक, १५.
४. **उपरोक्त.**
५. दोन, ५

करण्याची जबाबदारी ज्याच्यावर होती अशा मुख्य अधिकाऱ्याच्या **(समाहर्ता)** खात्याबरोबर हे खाते काम करी.[1] **अर्थशास्त्रात** दिलेल्या महसुलाच्या साधनांच्या यादीमध्ये नगरे, जमीन, खाणी, जंगले, रस्ते, जकात, दंड, परवाने, पक्का माल, विविध प्रकारचा व्यापारी माल आणि मौल्यवान खडे यांपासून मिळणाऱ्या महसुलाचा समावेश आहे. उत्पन्न, खर्च आणि महालेखापरीक्षकाने सादर केलेल्या हिशेबांवर देखरेख या विषयांशीही **समाहर्ता** या अधिकाऱ्याचा संबंध असे. राज्याचे आणि राजकुटुंबियांचे हिशेब महालेखापरीक्षक ठेवीत असे.[2] त्याच्या मदतीस **कार्मिकांचे** कारकुनांचे मंडळ असे. प्रत्येक खात्याच्या हिशेबाविषयीचा अहवाल सर्व मंत्री एकत्र येऊन सादर करतील असे **अर्थशास्त्र** सांगते. विश्वासघाताच्या प्रकरणात जरी त्या त्या मंत्र्याला वैयक्तिक रीत्या किंवा खात्याला शिक्षा होई यात शंका नसली तरी यातून संयुक्त जबाबदारीची पद्धती सूचित होते. सरकारी सेवकांकडून पैशाचा अपहार हा प्रकार निश्चितपणे परिचित होता.[3] अशा अपराधासाठी जबरदस्त दंडाची शिक्षा सुचविण्यात आलेली आहे. आषाढ (जुलै) महिन्यापासून हिशेबाचे आर्थिक वर्ष सुरू होई व प्रत्येक वर्षात ३५४ दिवस कामाचे म्हणून मानले जात. अधिक महिन्यातील कामाचा हिशेब स्वतंत्र ठेवला जाई.

वेतन आणि सार्वजनिक बांधकामे यांवर प्रामुख्याने खर्च होई. राजदरबार व राजकुटुंब यांच्या खर्चासाठी राजाच्या जमिनीतून मिळणाऱ्या उत्पन्नाबरोबरच राष्ट्रीय महसुलाच्या काही भागाचा उपयोग करावा लागे. राजकोषात जमा होणाऱ्या पैशामधून अधिकाऱ्यांचेही वेतन दिले जात असे.[4] एकूण महसुलाच्या एक चतुर्थांश भाग यासाठी ठेवलेला असे. या वेतनांपैकी काहींची यादी आहे. मंत्री, पुरोहित व सेनापती यांना ४८००० **पण** मिळत. समाहर्ता व **संनिधाता** यांना २४००० **पण** दिले जात. मंत्रिपरिषदेच्या सभासदांना १२००० **पण** मिळत, लेखापरीक्षकांचा नोकरवर्ग व लेखक यांना ५०० **पण** दिले जात. दुर्दैवाने **पण** चे मूल्य किती होते अगर ही वेतने वार्षिक होती की मासिक होती याविषयी आपल्याला माहिती मिळत नाही. वेगवेगळ्या अधिकाऱ्यांना मिळणाऱ्या वेतनांचे **प्रमाण** मात्र स्पष्ट दिसते.

---

१. दोन, ६.
२. दोन, ७.
३. दोन, ९.
४ पाच, ३.

सार्वजनिक बांधकामावरील खर्चामध्ये रस्ते, विहिरी व धर्मशाळा यांच्या बांधकामाचा व देखरेखीचा खर्च, सुदर्शन तलावावरील धरणाच्या बांधकामासारख्या पाणीपुरवठ्याच्या बांधकामांचा खर्च आणि औषधी वनस्पती व झाडे यांच्या लागवडीचा खर्च यांचा समावेश होई. मोठे सैन्य सुसज्ज राखण्यासाठीही महसुलातील बराच मोठा भाग खर्ची पडत असला पाहिजे. राज्याच्या मालकीच्या खाणी व त्यांतील उत्पादन आणि राज्याने नेमलेल्या कारागिरांचे वेतन यांवरील खर्चही राजकोषातून होत असावा. धर्मादाय संस्थांना मिळणारी अनुदाने याच साधनातून दिली जात होती की राजाच्या जमिनीतून मिळणाऱ्या उत्पन्नातून दिली जात होती हे निश्चित करता येत नाही. राष्ट्रीय कोष आणि राजाचा खाजगी खर्च यात अर्थशास्त्रात फरक करण्यात आलेला नाही. राजा देत असलेली खाजगी दाने अशा प्रकारे कोषातूनच दिली जात. कोषातील निधीचा वापर करून अशोकाने बौद्ध मठाला दिलेल्या देणग्यांना नागरी प्रशासन व इतर धार्मिक संस्था यांच्याकडून विरोध झालेला असण्याची शक्यता आहे.

विविध अध्यक्षांच्या कर्तव्यांसाठी कौटल्याने एक संपूर्ण विभाग खर्ची घातलेला आहे.[1] विशिष्ट साधनांपासून मिळणाऱ्या महसुलावर या अधिकाऱ्यांची देखरेख असे आणि या साधनांशी संबंधित असणाऱ्या खात्यांच्या प्रशासनाची जबाबदारीही त्यांच्यावर असे. साधारतः ते स्थानिक केंद्रामध्ये कामे करीत व राजधानीतील प्रशासनाला आपला अहवाल सादर करीत. सोने व सोनार, गुदामे, व्यापार, अरण्यातून मिळणारा माल, शस्त्रागार, वजने आणि मापे, जकात, विणकाम, शेती, दारू, कत्तलखाना, वेश्या, जहाजे, गायी, घोडे, हत्ती, रथ, पायदळ, प्रवासपरवाने यावरील अध्यक्षांचा आणि नागरी अध्यक्षांचा या ग्रंथामध्ये उल्लेख केलेला आहे.

राजपुत्राकडे अगर राजकुटुंबातील एखाद्या व्यक्तीकडे प्रांतिक प्रशासनाचे नियंत्रण असे. आज्ञालेखांमध्ये कुमार आणि आर्यपुत्र या संज्ञांचा वापर केलेला आहे. कुमार हे बिरुद राजपुत्रांसाठी असावे व इतर निकटच्या नातेवाईकांचा उल्लेख आर्यपुत्र या संज्ञेने होत असावा.[2] साधारणतः ते साम्राज्याच्या प्रांतांवर राजप्रतिनिधी वा राज्यपाल असत. आज्ञालेखांमध्ये चार प्रांतिक राजधान्यांची नावे सांगितलेली आहेत. त्यावरून अशोकाच्या कारकिर्दीत साम्राज्याची विभागणी

---

१. दोन, १३–३६

२. हुल्टश, **कॉर्पस इन्स्क्रिप्शनम् इंडिकारम्**, व्हॉ. एक, पृ. चाळीस.

चार प्रमुख प्रांतांमध्ये झालेली असावी. तक्षशिला ही उत्तरेकडील प्रांताची तर, पश्चिमेची उज्जयिनी, पूर्वेची तोसली व दक्षिणेची सुवर्णगिरी ही राजधानी होती.[१] हे प्रांत प्रशासकीय विभाग असून ते राजप्रतिनिधींकडे सोपविलेले होते. राजप्रतिनिधी म्हणून राजपुत्रांची नेमणूक करण्याने त्यांच्या प्रशासकीय शिक्षणाचा व्यावहारिक हेतूही साध्य होई. जेव्हा राजा व राजपुत्र यांच्यामधील संबंध चांगले असत तेव्हा राजप्रतिनिधी या नात्याने राजपुत्र राजाच्या धोरणानुसार वागे, हा त्यात आणि एक फायदा असे. राजाशी एकनिष्ठ असणाऱ्या राजपुत्राच्या नेतृत्वाखाली बंडाळी होण्याचा संभव कमीच असणार. पण यातील गैरफायद्यांचीही कल्पना होती व त्याविरुद्ध विचारवंतांनी इशाराही दिलेला होता. राजाला विरोध करण्याच्या दृष्टीने आपले स्वतःचे बस्तान पक्के बसविण्यासाठी राजपुत्राला आपल्या राजप्रतिनिधित्वाच्या मुदतीचा फायदा उठविता येणे शक्य असते. राजपुत्र हे धोक्याचे उगमस्थान होऊ शकते आणि एखाद्या प्रांताचा संपूर्ण ताबा त्याच्याकडे देण्याने तो बेजबाबदार कृत्यास प्रवृत्त होऊ शकतो असा इशारा **अर्थशास्त्राने** दिलेला आहे.[२] भाऊ भाऊ असणाऱ्या राजपुत्रांमध्ये प्रांतिक राज्यपाल या नात्याने बरीच स्पर्धा असते व त्यातून वारश्यासाठी युद्ध सुरू झाल्यास ते प्रांतिक सेनेचा उपयोग परस्परांविरुद्ध करू शकतात.[३] बिंदुसाराच्या मुलांमध्ये सिंहासनासाठी संघर्ष सुरू झाला तेव्हा हे निश्चितच घडलेले असणार. राज्यपाल म्हणून अशोकाची कारकीर्द यशस्वी ठरल्यामुळे, बिंदुसारानंतर गादीवर येण्याचे कर्तृत्व आपल्याजवळ असल्याची त्याची खात्री पटली असेल असाही संभव आहे.

प्रांताच्या कक्षेतील लहान लहान विभागाचे प्रशासकीय अधिकारी बहुधा स्थानिक लोकांमधून निवडले जात असत. गिरनारच्या लेखात, परदेशातून येऊन स्थायिक झालेल्या कुलातील तुषास्प याचा राज्यपाल म्हणून उल्लेख केलेला आहे.[४] टोळ्यांच्या बाबतीत स्थानिक राजांनाच बहुधा प्रशासनाचे प्रमुख म्हणून मान्यता दिली जाई. यामुळे मौर्यांच्या नियंत्रणाखाली जेव्हा एखादा भाग येई तेव्हा संघटनेतील विस्कळीतपणा कमी होईल अशी काळजी घेतली जाई. शिवाय स्थानिक राज्यकर्त्यापेक्षा परक्या प्रशासकाबाबत अधिक राग असण्याचा संभव असे हा भाग

---

१. पहिला, दुसरा, वेगळा आज्ञालेख, लघु शिलाशासन, ब्रह्मगिरी.

२. एक, १७.

३. भारताच्या पुढच्या इतिहासात मुघलकाळामध्ये हा प्रकार वारंवार झाला.

४. सरकार, **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स**.... पृ. १६९.

वेगळाच. अशा बाबतीत प्रशासनातील खालच्या पातळीवर स्थानिक स्वायत्तता राहू दिली असावी.

प्रांतिक प्रशासनात मंत्रिपरिषदेला केंद्रातील मंत्रिपरिषदेपेक्षा अधिक अधिकार होते. व्यवहारातही राजपुत्रावर ती अंकुश ठेवी आणि जर प्रसंग पडलाच तर राजाशी प्रत्यक्ष संपर्क साधत असे. अशोकाच्या कारकिर्दीपूर्वीच्या आणि कारकिर्दीतील दोन घटनांनी हे स्पष्ट होते. बिंदुसाराच्या कारकिर्दीतील तक्षशिलेतील उठाव हा स्थानिक मंत्री व अधिकारी यांच्याविरुद्ध होता, राजपुत्राविरुद्ध नव्हे.[१] या ठिकाणी असे दिसते की मंत्र्यांना जेवढी सत्ता होती त्यापेक्षा त्यांनी अधिक वापरली. दुसरे निदर्शक म्हणजे अशोकाच्या आज्ञेने कुणालाला आंधळे केले ती कथा.[२] राजाच्या आज्ञेविषयी राजपुत्राला अज्ञानात ठेवल्याबद्दल मंत्र्यांना आश्चर्य वाटलेले नव्हते. यावरून राज्यपालाला न कळविता राजाने सरळ मंत्र्याना आज्ञा करणे हे नित्याचे प्रसंग असावेत असे या कथेवरून सूचित होते. आपल्या काही अधिकाऱ्यांची नेमणूक करण्याचा राज्पालाला अधिकार होता. उदाहरणार्थ, दर पाच वर्षांनी तपासणीसाठी दौरे करणाऱ्या **महामत्त** या अधिकाऱ्यांपैकी काहींची नेमणूक राजा तर काहींची नेमणूक राज्यपाल करीत असे.

मौर्यांच्या प्रशासनपद्धतीमध्ये **महामत्तांचा** नेमका दर्जा कोणता होता हे अनिश्चितच राहिलेले आहे. विविध साधनांमधून वेगवेगळ्या प्रकारच्या अधिकाऱ्यांचा **महामत्त** म्हणून उल्लेख केलेला आहे. कोणत्याही ज्येष्ठ अधिकाऱ्याला उद्देशून, मग त्याच्याकडे कोणतीही कामे सोपविलेली असोत, या संज्ञेचा वापर केला जात असावा असे दिसते. **अर्थशास्त्रात** मंत्री या अर्थाने ही संज्ञा वापरलेली आहे. बौद्ध वाङ्मयापेक्षा हा अर्थ अधिक मर्यादित आहे.[३] आपल्या कोरीव लेखांमध्ये

---

१. दुसरे प्रकरण पहा.

२. दुसरे प्रकरण पहा.

३. बौद्ध वाङ्मयात **महामत्ताचे** विशिष्ट काम अनेक वेळा त्याच्या बिरूदातच स्पष्ट केलेले दिसते. न्यायालयीन अधिकाऱ्याचा, **वोहारिकमहामत्त** लष्करी अधिकाऱ्याचा, **सेनानायकमहामत्त**, मुख्यमंत्र्याचा **सुब्बथ्थकम्महामत्त** आणि करांची आकारणी करणाऱ्या अधिकाऱ्यांचा **दोनमापकमहामत्त** संज्ञांनी उल्लेख केलेला दिसतो (**महावग्ग**, एक, ४०, **जातकाज्**, व्हॉ. दोन पृ. ३०, ७०) थॉमसने या समासांची फोड **महती मात्रा यस्य** अशी करून त्याचा अर्थ उच्चाधिकार असणारी व्यक्ती असा सांगितला आहे. (**जेआरएएस**, १९१४, पृ. ३८६)

या संज्ञेचा वापर करताना अनेक प्रकारच्या अधिकाऱ्यांचा समावेश अशोक त्यात करतो आणि मंत्री किंवा सल्लागार म्हणूनही **महामत्तांचा** उल्लेख केलेला आहे.[१] या प्रकारांपैकी काहींचा संबंध सामान्य प्रशासनाशी होता, लघु शिलाशासन ज्यांना उद्देशून लिहिलेले आहे त्यांचा या प्रकारात समावेश होतो.[२] नगरातील न्यायालयीन अधिकाऱ्यांचा उल्लेख एका वेगळया कोरीव लेखात केलेला आहे.[३] न्यायाधीश व न्यायालयीन अधिकारी यांच्या कामाच्या तपासणीसाठी ज्या अधिकाऱ्यांना दौऱ्यावर पाठवावयाचे होते त्यांना उद्देशूनही हीच संज्ञा वापरलेली आहे. अर्थातच हे अधिकारी न्यायालयीन अधिकाऱ्यांपेक्षा वरचढ असणार. केंद्रसरकार व प्रांतिक राज्यपाल या दोघांकडूनही दौऱ्यासाठी असे अधिकारी पाठविले जात. राणीच्या आज्ञालेखात कारुवाकी राणीने जी काही दाने करावयाची होती त्यांची नोंद **महामतांनी** ठेवावी अशी अपेक्षा आहे.[४] अंत:पुर व ज्या खात्यांशी स्त्रियांचा संबंध येत असे त्यावर **इथिझख–महामतांचे** नियंत्रण असे.[५] **धम्म–महामत्त** या नव्या प्रकारच्या **महामतांचा** वारंवार उल्लेख येतो, त्यांच्या सेवाकार्याची सुरुवात अशोकाच्या राज्यारोहणाच्या चौदाव्या वर्षापासून झाली.[६]

अशा प्रकारे **महामत्त** ही उच्च जबाबदाऱ्या असणाऱ्या अधिकाऱ्यांची श्रेणी होती. ते ज्येष्ठ स्थानावर असल्याने व प्रशासन आणि न्याय यांच्या विविध शाखांवर त्यांचे नियंत्रण असल्याने त्यांच्याविषयी खूपच आदर बाळगला जात असावा यात शंका नाही. सल्लागार व कर आकारणी करणारे निरीक्षक यांच्या सातव्या जातीचा जेव्हा मेगॅस्थिनिसने उल्लेख केलेला आहे तो बहुधा **महामत्तांना** उद्देशून असावा. मेगॅस्थिनिसच्या लिखाणातील एक उतारा डायोडोरस पुढील प्रमाणे उद्धृत करतो.

सल्लागार, कर आकारणी करणारे आणि सार्वजनिक कामांचा विचार करणारे यांचा सातव्या जातीत समावेश होतो. संख्येच्या दृष्टीने हा वर्ग सर्वात

१. सहावे शिलाशासन, गिरनार, ब्लोख, **लें एन्स्क्रेपसिऑं द अशोक**, पृ. १०७.
२. उपरोक्त पृ. १४५.
३. उपरोक्त पृ. १३६.
४. उपरोक्त, पृ. १५९.
५. बारावे शिलाशासन, गिरनार, उपरोक्त, पृ. १२१.
६. पाचवे शिलाशासन, बारावे शिलाशासन, सातवे स्तंभशासन.

लहान आहे पण या वर्गातील लोकांचे उच्च चारित्र्य आणि शहाणपण, राजाचे सल्लागार, राज्याचे कोषाधिकारी, तंटयांचा निकाल देणारे लवाद यांची या वर्गातून होणारी निवड यामुळे या वर्गातील लोकांना सर्वात जास्त मान दिला जातो. सेनेतील अधिकारी व मुख्य न्यायाधीश हेही साधारणतः याच वर्गातील असतात.[१] स्ट्रॅबोने पुढील उतारा दिला आहे. ' सातव्या वर्गामध्ये राजाचे सल्लागार आणि कर आकारणी करणारे अधिकारी यांचा समावेश होतो. सरकारमधील सर्वोच्च पदे, न्यायसभा, सार्वजनिक कामांचे सामान्य प्रशासन यांसाठी त्यांच्यातून निवड होते.'[२] ॲरियन लिहितो, ' राजा आणि स्वायत्त नगरांचे न्यायाधीश यांना सार्वजनिक कामाच्या संचालनात सल्ला देणाऱ्या राज्याच्या सल्लागारांचा सातव्या वर्गात समावेश होतो. संख्येच्या दृष्टीने हा वर्ग लहान आहे पण श्रेष्ठ दर्जाचे शहाणपण आणि न्यायबुद्धी यांमुळे तो वेगळा आहे. यामुळे राज्यपाल, प्रांतांचे प्रमुख, उपराज्यपाल, कोषाध्यक्ष, सेनानी, नौदलाधिकारी, शेतीचे नियंत्रक आणि उच्च अधिकारी यांची निवड करण्याचा खास अधिकार त्यांच्याकडे आहे.'[३]

या उताऱ्यांच्या परीक्षणावरून हे स्पष्ट होते की इतर साधनांवरून उपलब्ध असणारे महामत्तांच्या सेवेचे वर्णन आणि हे उतारे यांचा बराच मेळ बसतो. महामत्तांमधून मंत्रिपरिषदेची निवड करावी हा राजाला दिलेला सर्वात योग्य सल्ला, कारण त्यांचा प्रशासनाचा अनुभव फार मोलाचा असे. तंटयांचे निवाडे करणारे लवाद हे बहुधा आज्ञालेखांमध्ये उल्लेखिलेले न्यायदानविषयक महामत्त होते. सातव्या वर्गातील स्वायत्त नगरांमधील न्यायाधीशांच्या कामाविषयी ॲरियनने दिलेला अभिप्राय म्हणजे टोळयांच्या प्रजासत्ताकांमध्ये महामत्तांची प्रशासक म्हणून जी नेमणूक होई त्याविषयीचा काहीसा गोंधळ असावा. मौर्यांच्या बाबतीत अशा नेमणुका ही निश्चितच संभाव्य गोष्ट होती. महामत्तांच्या बाबतीत युरोपीय ग्रंथांमध्ये दुर्लक्षित केला गेलेला एकमेव गट म्हणजे धम्ममहामत्तांचा. परंतु अशोकाच्या कारकिर्दीपर्यंत या गटाची सुरुवात झालेली नसल्याने मेगॅस्थिनिसच्या वृत्तांतात त्याचा उल्लेख नसावा. उच्च पदांवर असणाऱ्या महामत्तांचा, एक अगदी वेगळा गट असावा असे दिसते. त्यामुळे साहजिकच मेगॅस्थिनिसला त्यांचा एक वेगळा वर्ग वाटला असावा.

---

१. डायोडोरस, दोन, ४१.
२. स्ट्रॅबो, पंधरा १, ४८.
३. इंडिका, बारा.

नगरांमधील न्यायदानाचे काम खास नेमणूक केलेल्या महामत्तांच्या हुकमती-खाली असे व पहिला वेगळा आज्ञालेख त्यांनाच उद्देशून आहे.[1] या आज्ञालेखात न्यायी वागणूक व निःपक्षपाती निवाडे यांच्या महत्त्वावर विशेष भर दिलेला आहे. क्रोध, आळस, थकवा, सहनशिलतेचा अभाव इत्यादी दोषांपैकी कोणत्याही दोषामुळे निवाडा पूर्वग्रहदूषित होऊ शकेल असा सावधगिरीचा इषारा अशोक देतो. अन्यायापासून संरक्षण करण्यासाठी आणखी तरतूद म्हणून नगरांमधील न्यायव्यवस्थेची तपासणी करण्यासाठी दर पाच वर्षांनी एक महामत्त पाठविण्याचे अशोकाने ठरविलेले आहे. राजाने पाठवावयाच्या तपासनिसाखेरीज स्थानिक नेमणूक केलेल्या महामत्ता-कडून दर तीन वर्षांनी प्रांतिक तपासणी होई. नगराच्या प्रशासनातून कारागीर, व्यापारी व इतर नगरवासीय यांच्या बाबतीत जे प्रश्न निर्माण होत असत त्यांच्याशी या न्यायदानविषयक महामत्तांचा संबंध असे व अशा अनेक प्रश्नांची चर्चा अर्थशास्त्रात करण्यात आलेली आहे.[2] विवाह आणि वारसा याविषयीचे दिवाणी दावेही याच अधिकाऱ्यांसमोर दाखल केले जात असले पाहिजेत.

ग्रामीण भागातील न्यायदानविषयक कामे राजुकांमार्फत होत असत. कर आकारणी करण्याचे कामही हे अधिकारी करीत, परंतु या ठिकाणी आपण फक्त त्यांच्या न्यायदानविषयक कामांचा विचार करणार आहोत. राजुकांच्या कार्याच्या या अंगाबाबत एक संपूर्ण स्तंभलेख कोरण्यात आलेला आहे.[3] अशोकाच्या कार-किर्दीच्या सत्ताविसाव्या वर्षीचा हा आज्ञालेख आहे. यावरून हे सूचित होते की अशोकाने या अधिकाऱ्यांना आपल्या कारकिर्दीत बऱ्याच उशीरा ही सत्ता प्रदान केली असावी. यापूर्वी ग्रामीण भागातील न्यायदानाचे काम उच्चतर अधिकाऱ्यांच्या हाती असावे हेही शक्य आहे, पण सर्व जनतेला त्यांच्यापर्यंत पोहोचता येत नसे. शेती आणि जमीन याविषयीच्या प्रश्नांवर राजुकांचे नियंत्रण होते.

याच आज्ञालेखात न्यायदानपद्धती व शिक्षा यासंबंधी एक वाक्य आहे. त्यातून असा प्रश्न उद्‌भवतो की जातिनुसार शिक्षांचे प्रमाण ठरविण्याची हिंदूंची चाल अशोकाने बंद केली होती की काय व तसे असेल तर ते नक्कीच एक अत्यंत धाडसी पाऊल होते. ते वाक्य पुढीलप्रमाणे आहे.

---

१. ब्लोख, ले एंस्क्रेपसिओं द अशोक, पृ. १३६.

२. बुक चौथे.

३. चौथे स्तंभशासन, ब्लोख, ले एंस्क्रेपसिओं द अशोक, पृ. १६४.

'इच्छितविये हि एसा किम्ति वियोहालसमता च सिय दण्ड समता च'[1]

'परंतु न्यायदानविषयक पद्धती आणि शिक्षा यांच्यात समानता असावी हे इष्ट आहे.'

या मजकुरातील महत्त्वाचा शब्द आहे समता. एक विद्वान, 'निःपक्षपातीपणा' असे त्याचे भाषांतर करतात. या संदर्भात न्यायाधीशांच्या बाबतीत पूर्वग्रहांच्या अभावापेक्षाही जास्त काहीतरी असे सूचित होते.[2] गुन्हेगाराच्या सामाजिक प्रतिष्ठेबाबत पक्षपाती वृत्ती ठेवून शिक्षा दिल्या जाऊ नयेत असे यावरून सूचित होते. पारंपारिक ग्रंथांमध्ये घालून दिलेली कायद्याची पद्धती व जिचे पालन केले जात होते याविषयी शंका नाही, त्या पद्धतीशी असा नियम विसंगत ठरतो. उदाहरणार्थ **अर्थशास्त्रात** या मुद्यावर अगदी स्पष्टता आहे. **अर्थशास्त्र** म्हणते, व्यक्ती (तिची सामाजिक प्रतिष्ठा), गुन्ह्याचे स्वरुप, गंभीर वा सौम्य कारण (ज्याच्यामुळे गुन्ह्यासारखे वाईट कृत्य घडले), पूर्वपरिस्थिती व विद्यमान परिस्थिती, वेळ आणि जागा लक्षात घेता आणि गुन्हेगार राजकुटुंबियांपैकी आहे की सामान्य लोकांमधील आहे याबाबतच्या न्याय्य फरकाची दखल घेण्यास न चुकता, न्यायाधीश सौम्य, मध्यम किंवा कठोर शिक्षा ठोठावण्यातील औचित्य ठरवील.[3] त्याचप्रमाणे हलक्या जातीतील माणसाला वाममार्गाला नेणाऱ्या गुन्हेगारापेक्षा ब्राह्मणाला वाममार्गाला लावणाऱ्या गुन्हेगाराला जास्त कठोर स्वरुपाचा दंड करण्यात आलेला आहे.[4]

अशांकाच्या दृष्टीने, शिक्षा देताना जात व दर्जा यावरून करण्यात येणारा पक्षपात नष्ट करणे हे **धम्माच्या** तत्त्वाना साजेसे ठरले असते. परंतु त्याचवेळी, अशा प्रकारचे क्रांतिकारक पाऊल टाकल्याने समाजात अभूतपूर्व उठाव होतील हेही अशोकाला उमगले असले पाहिजे. याशिवाय, असे पाऊल टाकल्याने फक्त ब्राह्मणच नव्हे तर क्षत्रियही त्याच्या विरुद्ध गेले असते व या दोघांच्या एकत्रित बळाला काबूत ठेवणे अशोकाला अवघड झाले असते. पशुहत्त्येवर बंदी घालण्यासारख्या उपायांनी अशोकाने जरी ब्राह्मणांच्या स्थानावर अप्रत्यक्षपणे हल्ला चढविलेला असला तरी भारतीय समाजातील या प्रभावी घटकाला उघड विरोध

---

१. चौथे स्तंभशासन, ब्लोख, **ले एंस्क्रेपसिओं द अशोक**, पृ. १६४.
२. हुल्टश, **कॉर्पस इन्स्क्रिप्शनम इंडिकारम**, व्हॉ. एक, पृ. १२५.
३. चार, १०. शामशास्त्री (भाषां) **अर्थशास्त्र** पृ. २५५.
४. चार, १३.

न करण्याइतका तो धूर्त होता, ब्राह्मणांना जास्तीत जास्त आदर दाखविला पाहिजे असा आग्रह आपल्या आज्ञालेखांमध्ये धरून, अशोकाने ब्राह्मणांची समजूत घालण्याची काळजी घेतली आहे. अलिकडच्या एका भाषांतरात सुचविल्याप्रमाणे, 'एकसारखेपणा' हा शब्द समता या शब्दाचा अर्थ जास्त काटेकोरपणाने दर्शवितो.[1] या अर्थानुसार, मौर्यांच्या प्रशासनाखालील सर्व प्रदेशांमध्ये कायद्याची समान पद्धती स्वीकारावयाची होती. त्याचप्रमाणे समान फौजदारी कायद्याचा उपयोग करावयाचा होता. यामुळे आपले निर्णय घेताना राजुकांना मदत झाली असती व दावे चालू असताना उच्च अधिकारी उपस्थित नसल्यास त्यांना प्रत्येक खटला समजावून देता आला असता. कारण अशा एकसारखेपणामुळे नियमित प्रकारांच्या पद्धतीनुसार कायदेशीर खटले चालविता आले असते.[2]

मेगॅस्थिनिसच्या म्हणण्याप्रमाणे मौर्यकालीन भारतात गुन्ह्यांचे प्रमाण कमी होते आणि तो भारतीयांचे प्रामाणिक लोक असे वर्णन करतो.[3] ग्रीक किंवा आशिया मायनर यांच्याशी तुलना करता हे बरेचसे खरेही असेल. पाटलिपुत्र हे राजधानीचे शहर असल्याने तेथील बंदोबस्त चोख असला पाहिजे आणि तेथील अधिकारी गुन्हे होऊ नयेत म्हणून कठोरपणाने वागत असले पाहिजेत. अर्थशास्त्राने गुन्ह्यांच्या विविधतेची शक्यता विचारात घेतलेली आहे. गुन्हेगारांचा शोध व त्यांचा नि:पात यासाठी तीन दीर्घ प्रकरणे खर्ची घातलेली आहेत.[4] बौद्ध वाङ्मयात ग्रामीण भागात दरोडे घालणाऱ्या टोळ्यांचा उल्लेख आहे.[5]

शिक्षा प्रामुख्याने दंडाच्या स्वरुपात दिल्या जात असत.[6] जे दंड देऊ शकत नसत त्यांना तो भरण्याकरता स्वत:ची वेठबिगारीसाठी विक्री करता येई.[7] काही

---

१. ब्लोख, **ले एंस्क्रेंपसिओ द अशोक**, पृ. १६५.

२. ब्लोख यांनी पुढे असे सुचविले आहे की समता शब्दामध्ये अनुस्वाराची भर घातली तर तो शब्द संमता (संस्कृत सम्यकता) असा होईल व त्याचा अर्थ एकसारखेपणा याऐवजी अचूकता असा होईल. (**ले एंस्क्रेंपसिओं द अशोक**, पृ. १६४, न. १०) जरी इतर कोणत्याही मजकुरामध्ये अनुस्वार नाही हे खरोखरच आश्चर्यजनक असले तरी हा अर्थ मान्य होण्याजोगा आहे.

३. स्ट्रॅबो, पंधरा, १, ५३–५६.

४. चार, ४, ५, ६.

५. **जातकाज्**, व्हॉ. चार, पृ. ४३०.

६. **अर्थशास्त्र**, तीन, २, १७–२०, पाच, १.

७. तीन, १३.

वेळा अवयवविच्छेदनाची शिक्षा बदलून दंडाची शिक्षा देता येई.[१] कठोर शिक्षा परिचित होत्या आणि प्रत्यक्षात त्या दिल्या जात. जरी अशोक स्वतः बौद्धधर्मीय होता तरी मृत्युदंडाची शिक्षा त्याने रद्द केली नाही. तथापि ज्यांना मृत्युदंडाची शिक्षा झालेली होती त्यांना तीन दिवसांची सुट देण्याची सवलत त्याने दिली.[२] या कालात न्यायाधीशांकडे अखेरची दाद मागणे शक्य होते. खटला परत चालविणे किंवा सुटकेसाठी नुकसानभरपाई करणे अशा स्वरुपात दाद मागणे शक्य असावे. ही पद्धती **अर्थशास्त्रा**तही नाही असे नाही.[३] जर दोन्हीपैकी काहीच शक्य नसेल तर मृत्युदंड झालेल्या गुन्हेगाराच्या अखेरच्या गरजा आप्त किंवा मित्र पुऱ्या करु शकत.[४] चौथ्या स्तंभशासनातील परिच्छेदावरून, कठोर शिक्षा देण्याची कल्पना अशोकाला पसंत नव्हती, हे स्पष्ट आहे. एखाद्या प्रसंगी धोरणी मुत्सद्देगिरीने त्याच्या ध्येयांवर मिळविलेल्या विजयाचे एक उदाहरण म्हणून हे मानता येईल.

प्रशासनाच्या सोयीसाठी प्रांतांची उपविभागणी जिल्ह्यांमध्ये करण्यात आलेली होती व प्रत्येक जिल्ह्यात अधिकाऱ्यांचे गट काम करीत. या गटात **प्रादेशिक**, **राजुक** आणि **युक्त** या तीन प्रमुख अधिकाऱ्यांचा समावेश असे. त्यांच्या हाताखाली मदतीसाठी इतर अनेक अधिकारी असत.[५] **प्रादेशिकाची** कामे ही **अर्थशास्त्रातील प्रदेशतृ**प्रमाणेच होती. प्रत्येक जिल्हा हा एका **प्रदेशतृच्या** हाताखाली असे व या अधिकाऱ्यांकडे एका प्रांतातील एका जिल्ह्याचे एकूण प्रशासन सोपविलेले असे. त्यांच्या कार्यामध्ये बराचसा भाग दौऱ्याचा असे. जिल्ह्याच्या आणि खेडयाच्या अश्या अधिकाऱ्यांच्या कामाची तपासणी त्यांना करावी लागे व वसुलीचा मुख्य अधिकारी किंवा **समाहर्तृ** याला अहवाल सादर करावे लागत.[६] त्यांना असलेल्या न्यायदान-

---

१. चार, १०.

२. चौथे स्तंभशासन.

३. दोन, ३६.

४. केर्न असे प्रतिपादन करतो की, या ठिकाणी उल्लेखिलेल्या बेडचा या शारिरीक शिक्षा देणाऱ्या नसून अध्यात्मिक बेडचा असाव्यात. (**अशोक**, पृ. ६४) हा अर्थ चुकीचा आहे, कारण चौथ्या स्तंभशासनाच्या संदर्भावरून असे स्पष्ट दिसून येते की, कायद्याची व न्यायदानाची पद्धती व त्यानुसार ज्या काही शिक्षा दिल्या जात त्यासंबंधीच तो उल्लेख आहे.

५. तिसरे शिलाशासन, गिरनार, ब्लोख, ले एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. ९६.

६. दोन, ३५.

विषयक अधिकारामुळे, तीन प्रदेशतृंचा गट, कायद्याविरुद्ध गुन्हे करणाऱ्यांच्या खटल्यासाठी न्यायाधीश म्हणून काम पाही.[1] तीन प्रदेशतृ व तीन मंत्री हे कार्य पार पाडीत असल्याचे हा ग्रंथ सांगतो. काही प्रदेशांमध्ये मंत्र्यांपेक्षा प्रदेशतृ मिळणे जास्त सोपे असे तर काही प्रदेशांमध्ये उलटही होई म्हणूनच ही प्रशासकीय योजना असावी. मंत्र्यांच्या श्रेणीमध्ये प्रदेशतृंचा समावेश आहे यावरून प्रदेशतृंचा दर्जा उच्च होता हे या परिच्छेदावरून स्पष्ट आहे. अर्थात, फक्त गंभीर स्वरुपाचेच खटले त्यांच्यापुढे आणले जात, व सौम्य स्वरुपाचे खटले जशी परिस्थिती असेल त्याप्रमाणे राजुकांकडे किंवा नगरन्यायाधीशांकडे सोपविले जात. अध्यक्ष आणि दुय्यम अधिकारी यांच्याही कामाची तपासणी प्रदेशतृने करावी अशी अपेक्षा आहे.[2] यावरूनही या अधिकाऱ्याचा दर्जा उच्च असल्याचे स्पष्ट होते. आपल्या जिल्ह्यातील महसूल गोळा करण्यावर देखरेख करणे आणि ग्रामीण भाग व शहरे या दोन्ही ठिकाणी कायदा आणि सुव्यवस्था राखणे असा प्रदेशतृंच्या कामाचा सारांश यावरून सांगता येईल.

प्रदेशतृपेक्षा राजुकाचा दर्जा दुय्यम होता. परंतु इतर काही लेखकांनी बरोबर उलट सुचविलेले आहे.[3] हजारो लोक या अधिकाऱ्याच्या ताब्यात होते. या वर्णनावरून तो केंद्रीय सरकारमधील एक मंत्री होता हे म्हणणे संयुक्तिक वाटण्याजोगे नाही, स्थानिक प्रशासनात त्याच्याकडे जबाबदारीची जागा असल्याचा तो उल्लेख असू शकेल. प्रादेशिकाच्या कामांमध्ये, आपल्या नियंत्रणाखालील प्रदेशांच्या संपूर्ण प्रशासनाच्या तपासणीसाठी दर पाच वर्षांनी काढावयाच्या दौऱ्याचा समावेश आहे. त्याच्याबरोबर युक्त आणि राजुक आहेत.[4] युक्त, राजुक

---

१. चार, १.

२. चार, ९.

३. राजूक हे केंद्रीय सरकारचे मंत्री होते असे सिद्ध करण्याचा प्रयत्न जयस्वाल यांनी केला आहे. त्याच्याकडे हजारो लोक सोपवलेले असत ही वस्तुस्थिती आहे. तरीही राजू म्हणजे राजा किंवा राज्यकर्ता यावरून तो शब्द आलेला आहे असे ते म्हणतात. (हिंदु पॉलिटी पृ. १९५, २८७, ३०१–२) दुसरे विधान चुकीच्या व्युत्पत्तीवर आधारलेले आहे. राजूकमधील पहिले अक्षर दीर्घ आहे कारण त्या काळात ब्राह्मी लिपीत व्यंजनांचे जोडाक्षर लिहिता येत नसे.

४. तिसरे शिलाशासन, गिरनार, ब्लोख, ले एंस्क्रेपसिओं द अशोक, पृ. ९६.

आणि **प्रादेशिक** या क्रमाने या अधिकाऱ्यांचा उल्लेख आहे. स्थूलमानाने पहिला किंवा शेवटी उल्लेखिलेला हा सर्वात वरचा असावा. **युक्त** हा दुय्यम अधिकारी असल्याचे आपल्याला माहीत आहे. यादीमध्ये सर्वात वरच्या दर्जाच्या अधिकाऱ्याचा उल्लेख मधेच करणे हे असंभवनीय आहे. जर प्रादेशिकाचे काम आपण लक्षात घेतले तर या तीन अधिकाऱ्यांमध्ये तो श्रेष्ठ होता हे स्पष्ट होते.

**राजुकांचा** संबंध लाखो लोकांशी येतो असे चौथे स्तंभशासन म्हणते. ज्या लोकांवर राजूक सत्ता गाजवितात त्यांच्याबरोबर त्यांचे संबंध कसे असावेत याबाबतचा सल्ला पुढे या स्तंभशासनात दिलेला आहे. तो प्रामुख्याने पारितोषिके व शिक्षा देणे यांच्याशी संबंधित आहे. महसूल-प्रशासक म्हणून **राजूक** जसे काम करीत तसेच न्यायाधिकारी म्हणूनही करीत. त्यांचे प्रशासकीय काम तितकेच किंवा जास्त महत्त्वाचे होते ही वस्तुस्थिती त्यांचा लाखो लोकांशी संबंध येत असे, या विधानावरून स्पष्ट होते, पण न्यायदानविषयक कामात त्यांचा संबंध बऱ्याच कमी संख्येशी येत असे. या स्तंभशासनात त्यांचा सामूहिक उल्लेख येतो यावरून साहजिकच त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील लोकांची एकूण संख्या अनेक लाख असावी. शिवाय राजाच्या दूतांना राजाच्या इच्छा माहीत असल्याने **राजुकांनी** या दूतांच्या आज्ञा पाळाव्यात असाही हुकूम या स्तंभशासनात आहे. जर ते बऱ्याच वरच्या दर्जाचे अधिकारी असते तर राजाने इतक्या कटाक्षाने व सार्वजनिक ठिकाणी राजाच्या दूतांच्या आज्ञा त्यांनी पाळाव्यात असे सांगितले नसते.[1] **जनपद हितसुखायें** म्हणजे ग्रामीण लोकांच्या कल्याणासाठी काम करण्याकरिता त्यांची नेमणूक झालेली असल्याने **राजुकांचे** काम ग्रामीण क्षेत्रांपुरतेच मर्यादित होते.[2] आपले नित्याचे काम करीत असताना त्यांनी लोकांना **धम्माचरण** शिकवावे अशीही अपेक्षा होती.

आपल्या कारकिर्दीच्या सत्ताविसाव्या वर्षी, **राजुकांनी** न्यायालयीन निर्णय द्यावेत, अशी आज्ञा अशोकाने दिली. या वस्तुस्थितीवरून यापूर्वीच्या वर्षांमध्ये हे निर्णय जास्त वरच्या अधिकाऱ्यांकडून होत असावेत असे सूचित होते. या नव्या

---

१. या दूतांना उद्देशून 'पुलिसानी' असा शब्द वापरलेला आहे. त्यावरून ते वरच्या दर्जाचे तपासनीस किंवा राजाचे खास गुप्त दूत नसत असे सूचित होते. पण ते राजाला लोकमत कळविणारे व याबाबतच्या राजाच्या धोरणासंबंधी आज्ञा घेणारे जनसंपर्काधिकारी असण्याची शक्यता आहे.

२. ब्लोख, **ले एंस्क्रेपसिओं द अशोक**, पृ. १६४.

धोरणाने **राजुकांना** जास्त सत्ता दिली. प्रत्येक न्यायालयीन निर्णय वरच्या अधिकाऱ्याकडे पाठविण्याची गरज न राहिल्याने प्रशासनाची परिणामकारकता व गती यात सुधारणा झाली. मृत्युदंडाच्या बाबतीत **राजुकांकडे** दाद मागता येणे शक्य झाले असावे. अर्थात व सीमारेषांवरील खटल्यांच्या बाबतीत, संपूर्ण मामला त्यांच्या वरचे अधिकारी **प्रादेशिक**, यांच्याकडे ते पाठवित असावेत. जेव्हा आपण **राजुकांच्या** प्रशासकीय कामाचा विचार करतो तेव्हा त्यांच्या न्यायदानविषयक कर्तव्यांचे स्वरुप अधिक स्पष्ट होते आणि प्रांतिक प्रशासनातील त्यांचे महत्त्वही अधिक समजते.

जमिनीची मोजणी आणि कराची आकारणी याबाबत जबाबदार असणाऱ्या प्रशासकीय खात्यामध्ये **राजुकांचा** समावेश होता. याविषयी विविध साधनग्रंथांमध्ये एकमत आहे. मौर्यकालीन राजुक आणि **जातकांमध्ये** उल्लेखिलेले **रज्जुगाहक** यांचे स्वरुप एकच असल्याचे मान्य करण्यात आलेले आहे.[१] राजूक किंवा **रज्जुगाहक** हा कर देणाऱ्या शेतकऱ्याच्या जमिनीची मोजणी करण्यासाठी दोर धरणारा अधिकारी होता. जमिनीचा आकार आणि कस यावर जमीनमहसूल आधारला जाई. उत्पादनामधील वाटचावरची आकारणी दुसऱ्या अधिकाऱ्याकडून होई. **अर्थशास्त्रातही राजुकाचा** उल्लेख आहे.[२] **कोर-रज्जुक** म्हणजे महसुलाच्या साधनांशी संबंधित असणारा ग्रामीण अधिकारी असे वर्णन आहे. **अँगोरॅनोमोइ**, म्हणून मेगॅस्थिनिसने केलेला बाजारपेठेतील अधिकाऱ्यांचा उल्लेख बहुधा **राजुकांविषयीच** असावा.[३] त्यांच्या कामाचे वर्णन पुढीलप्रमाणे आहे. काहीजण नद्यांवर देखरेख ठेवतात. इजिप्तमध्ये करतात तशी जमिनीची मोजणी करतात, आणि प्रत्येकाला समप्रमाणात पाणीपुरवठा व्हावा म्हणून मुख्य कालव्याला, शाखांमध्ये पाणी सोडण्यासाठी ज्या मोऱ्या आहेत त्यांची तपासणी करतात. ह्याच माणसांचा शिकाऱ्यांवर ताबा असतो, आणि त्यांच्या गुणानुसार त्यांना पारितोषिक वा शिक्षा देण्याची सत्ता त्यांच्याकडे असते. ते कर गोळा करतात आणि लाकूडतोडे सुतार, लोहार आणि खाणकामगार यांसारख्या, जमिनीशी संबंधित असणाऱ्या व्यावसायिकांवर देखरेख ठेवतात. ते रस्ते बांधतात आणि दर दहा स्टेडियांवर उपरस्ते आणि अंतरे दाखविण्यासाठी खांब उभा करतात.

---

१. बुहलर, **झेड्डीएम्जी**, १८९३ व्हॉ. सत्तेचाळीस, पृ. ४६६ तळटीप **जातकाज**, व्हॉ. चार, पृ. १६९.

२. दोन, ६. चार, १३

३. स्ट्रॅबो. पंधरा, १, ५०, **एज ऑफ दि नंदाज अँड मौर्याज**, पृ. १२० न एक आणि २२४.

**राजुकाच्या** कामासाठी अशोकाने एक संपूर्ण आज्ञालेख का खर्ची घातला हे उघड आहे. ग्रामीण प्रशासनाचे ते आधारस्तंभ होते हे स्पष्ट आहे. वस्तुतः अशोकाच्या कारकिर्दीत, तंटेबखेडे मिटविण्यासाठी त्यांना जी वाढती न्यायदान-विषयक सत्ता देण्यात आली ती म्हणजे एक तर्कशुद्ध पाऊल होते. त्यांच्याकडे आणण्यात येणारे तंटे हे प्रामुख्याने शेतीच्या समस्या, कराची आकारणी, करात सूट, जमिनीविषयीची भांडणे, पाण्याविषयीची भांडणे, शेतकरी आणि गुराखी यांच्यामध्ये गुरे चारण्यावरून होणारी भांडणे आणि ग्रामीण कारागिरांमधील तंटे यांच्याशीच संबंधित असावेत. जर यांपैकी प्रत्येक तंटा निवाड्यासाठी **प्रादेशिका**-कडे नेला असता तर प्रशासनाच्या गतीला ती एक खीळ ठरली असती. कारण विशिष्ट तंट्यातील प्रशासकीय उपाययोजनेला **राजूक** प्रत्यक्षपणे जबाबदार अधिकारी असल्याने त्याला स्वतःलाच हा खटला सादर करावा लागला असता. त्यामुळे जरी ग्रामीण भागातील लोकांशी वागताना **राजूक** वरचढ होण्याचा धोका असला तरीही त्याची सत्ता वाढविणे हेच जास्त समाधानकारक पाऊल होते व त्या धोक्याची अशोकाला जाणीव होती असे दिसते. हा निर्णय घेण्यास विशेष कारणी-भूत झालेला आणि एक घटक म्हणजे आपल्या कारकिर्दीच्या उत्तरकालात सुरवातीच्या वर्षांइतकेच वैयक्तिक नियंत्रण ठेवण्यास अशोक असमर्थ झाला, म्हणून त्याने काही खात्यांच्या बाबतीत विकेंद्रीकरणाचे धोरण स्वीकारण्याचे ठरविले असावे. **राजूक** या अधिकाऱ्याला अशा रीतीने जास्त सत्ता देण्यात आली.

**राजुकाने** आपल्या सत्तेचा दुरुपयोग करू नये म्हणून त्याच्यावरचे नियंत्रण **प्रादेशिकाच्या** रूपाने आधीपासूनच प्रत्यक्षात होते. त्याने तपासणी आणि काटेकोर निरीक्षण यांवर जास्त भर द्यावा अशी अपेक्षा होती. दर पाच वर्षांनी **प्रादेशिका, राजूक आणि युक्त या** तीन अधिकाऱ्यांच्या गटाने तपासणी करावी अशी विशेष आज्ञा अशोकाने आपल्या कारकिर्दीच्या तेराव्या वर्षी दिली. प्रत्येक **राजुकाने** आपले प्रशासकीय आणि न्यायदानविषयक काम **प्रादेशिकाला** सादर करावे आणि **प्रादेशिकाच्या** अहवालाची नोंद **युक्ताने** करावी हाच या दौऱ्याचा हेतू होता यात शंका नाही. तपासणीच्या वेळी असलेल्या **राजुकाच्या** उपस्थितीमुळे त्या हेतूचे महत्त्व अधिकच वाढलेले होते. नागरी न्यायदानविषयक प्रशासनाच्या तपासणी-साठी पाठविल्या जाणाऱ्या खास **महामत्ताकडून राजुकाच्या** केवळ न्यायदान-विषयक कामाची तपासणीही केली जात असावी. त्याचा अहवाल मंत्रिपरिषदेला युक्तांकडून उपलब्ध करून दिला जाई.

तिसऱ्या स्तंभशासनात असलेल्या **युक्तांच्या** उल्लेखावरून ते दुय्यम अधिकारी असावेत असे दिसते. या पूर्वीच्या लेखकांनी या शब्दाचे भाषांतर वेगवेगळ्या तऱ्हेने करण्याचा प्रयत्न केला आहे.[1] चिटणीशी कामे आणि फडणीशी यांचा समावेश प्रामुख्याने **युक्तांच्या** कामात होई. वरिष्ठ अधिकाऱ्यांनी घेतलेल्या निर्णयांची नोंद ठेवण्यासाठी तो **राजूक** आणि **प्रादेशिक** यांच्याबरोबर जाई आणि त्या निर्णयांवर आधारलेले अहवाल तयार करी, हे पुढे मंत्र्यांना आणि मंत्रि-परिषदेला सादर केले जात. **अर्थशास्त्रात युक्ताचा** उल्लेख फडणीस म्हणून केला आहे. लाचलुचपतीला प्रतिबंध करण्यासाठी खात्यांच्या अध्यक्षांनी **युक्त** व इतर अधिकारी यांच्याबरोबर काम करावे असे तेथे सांगितले आहे.[2] ते फडणीस असत ही गोष्ट म्हणजे त्यांनी **राजूक** आणि **प्रादेशिक** यांच्या पंचवार्षिक दौऱ्याचेवेळी त्यांच्याबरोबर जाण्याचे आणि एक कारण असावे.

जिल्हा आणि गावपातळी यांच्यामध्ये प्रशासनाची आणखी एक पातळी होती. या ठिकाणी पाच किंवा दहा खेड्यांचा एक गट असे. या गटाच्या प्रशासनामध्ये **गोप** आणि **स्थानिक** हे दोन महत्त्वाचे अधिकारी असत.[3] या गटाचा फडणीस म्हणून **गोप** काम करी. गावाच्या सीमारेषा निश्चित करणे, विविध प्रकारच्या जमिनी, इमारती, देणग्या आणि शेतीवरील करातील सूट यांची नोंद करणे, यांचा त्यांच्या कामात समावेश होता. करदानाची क्षमता व व्यवसाय आणि वय यांनुसार प्रत्येक खेड्यातील लोकसंख्येची गणनाही तो करीत असे. अशा व्यक्तींचे उत्पन्न व खर्च यांचीही नोंद होई. प्रत्येक खेड्यातील पशुधनही नोंदले जाई. प्रादेशिकाच्या हाताखाली **स्थानिकाकडून** कर गोळा केला जाई. **गोपा**प्रमाणेच त्याचीही ठराविक मुदतीने वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून तपासणी होई. **स्थानिक** हा आजच्या सहाय्यक जिल्हाधिकाऱ्यासारखा आणि **प्रादेशिक** हा जिल्हाधिकाऱ्या-सारखा होता. दोन्ही श्रेणींमधील अधिकाऱ्यांवर **समाहर्तृ** किंवा कर वसूल करणारा मुख्य अधिकारी याची अंतिम सत्ता असे, असे दिसते.

प्रत्येक खेड्यामध्ये त्याचा स्वतःचा अधिकाऱ्यांचा एक गट असे व ते अधिकारी सरळ **गोपाला** जबाबदार असत. गावाचा प्रमुख गावातील ज्येष्ठ लोकां-

---

१. **आयए**, १८९१, पृ. २४६ न. ५०, **झेड्डीएमजी**, व्हॉ. सदतीस, पृ. १०६, **जेंआरएएस**, १९१४, पृ. ३८७ तळटीप.

२. दोन, ९.

३. उपरोक्त, दोन, ३५.

मधून निवडला जाई यात शंका नाही. खेड्यातील करवसुलीवर आणि शिस्त व संरक्षण यांसारख्या आवश्यक गोष्टींवर तो देखरेख करीत असावा. लहानशा खेड्यांमध्ये गावप्रमुख हाच एकटा कामे करीत असण्याची शक्यता आहे. मोठ्या खेड्यांमध्ये फडणीस व कारकून यांसारख्या प्रशासनासाठी आवश्यक असणाऱ्या इतर सेवकांची मदत त्याला मिळत असावी. या निमसरकारी अंमलदारांचे वेतन करात मिळणाऱ्या सुटीच्या रुपाने मिळत असावे. राजाने नेमलेल्या पूर्ण वेळ अधिकाऱ्यांपैकी काहीजणांना जमिनीच्या देणगीच्या रुपाने वेतन दिले जाई.[१] तथापि, ती जमीन विकण्याचा किंवा गहाण टाकण्याचा हक्क त्याना नसे; म्हणजे ते त्या जमिनीचे मालक नसत. परंतु तिच्यामधील उत्पादन त्याना मिळत असे.

प्रशासनसंघनेच्या विविध पातळ्यांवर इतर अधिकारी काम करीत होते. राजाचे दूत किंवा **पुलिसानी** यांचा आम्ही उल्लेख केलेलाच आहे. ते बहुधा **युक्तांसारखेच** दुय्यम श्रेणीतील अधिकारी असावेत.[२] आजच्या जनसंपर्क अधिकाऱ्यांसारखेच ते काम करीत. लोकमताशी त्यांचा परिचय असे व ते राजाच्या कानी लोकमत घालीत आणि उलट राज्याच्या अगदी एकाकी भागांमध्येही त्याच्या धोरणाची माहिती झाली आहे किंवा नाही याविषयी खात्री करून घेण्यासाठी राजा त्यांचा उपयोग करी. त्यांच्या कामाच्या स्वरुपामुळे ते सर्वजण एकाच श्रेणीतील नसत. तीन श्रेणींमध्ये त्यांची नेमणूक केलेली होती असे अशोक सांगतो.[३] राजाच्या अगदी निकट असल्याने ज्यांचा धोरणविषयक निर्णयांमध्येही वाटा असू शकेल, असे अधिकारी सर्वोच्च श्रेणीमधील असले पाहिजेत. **पुलिसानीबरोबरच प्रतिवेदक** किंवा खास वार्ताहर यांचाही आज्ञालेखांमध्ये उल्लेख आहे.[४] ते कोणत्याही क्षणी राजाकडे सरळ जात आणि त्यांनी केलेल्या लोकमताच्या मूल्यमापनावर राजा जास्त अवलंबून राही, असे दिसते. **पुलिसानी** व **प्रतिवेदक** हे दोघेही केंद्रीय प्रशासन व प्रांतिक प्रशासन यांच्यामधील दुवा म्हणून काम करीत असले पाहिजेत. **प्रतिवेदकांची** तुलना **अर्थशास्त्रात** सांगितलेल्या हेरसंस्थेशी (कार आणि गूढपुरुष) करता येईल.[५] कौटल्याने जितकी चर्चा केली आहे तितकी अशोकाची संघटना गुंतागुंतीची असावी असे दिसत नाही. कौटल्याच्या ग्रंथामध्ये गुप्तहेराच्या पद्धतीला

---

१. अर्थशास्त्र, दोन, १.

२. चौथे स्तंभशासन, ब्लोख, **ले एंस्क्रेपसिओं द अशोक**, पृ. १६४.

३. सातवे स्तंभशासन, उपरोक्त पृ. १६८.

४. सहावे शिलाशासन, उपरोक्त पृ. १०७.

५. एक, १२, चार, ९.

अत्यंत महत्त्व दिलेले दिसते. जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात सामान्य नागरिकाच्या वेषाने सर्व देशभर हेर पाठविलेले आहेत. मंत्र्यांवरसुद्धा हेरांची नजर आहे. उलट, आपण दूत व वार्ताहर नेमतो, असे अशोक आज्ञालेखांमध्ये कबूल करतो. जे लोकांना आणि प्रशासनाला माहित असत, जे जागोजाग सरकारी संघटनांच्या तपासणीसाठी जात असत आणि राजाला अहवाल सादर करीत असत असे ते वरच्या दर्जाचे फिरते तपासनीस असावेत.

असे अधिकारी इतर साम्राज्यांच्या प्रशासनांमध्ये नव्हते असे नाही. अख-मोनीय साम्राज्यात प्रत्येक प्रांताच्या बारीक तपासणीसाठी दर वर्षी एक अधिकारी पाठवला जाई. तो राजाचा डोळा किंवा राजाचा कान किंवा राजाचा संदेशवाहक म्हणून ओळखला जाई.[1] त्याचे काम म्हणजे राजाच्या दृष्टीने प्रशासनावरील त्याचे स्वतःचे आणखी अधिक नियंत्रण होते. शार्लमेनने अशाच प्रकारची पण जास्त कार्यक्षम पद्धती विकसित केली. **मिस्सि** या नावाने ओळखले जाणारे दोन अधिकारी दर वर्षी देशाचा दौरा करण्यासाठी पाठविले जात असत.[2] लौकिक कामांसाठी एक प्रतिनिधी असे तर दुसरा धर्मपीठाचा (चर्चचा) प्रतिनिधी असे. ते साधारणपणे जोडीने प्रवास करीत व अशा रीतीने एकमेकांच्या कामावर नियंत्रण ठेवीत. खालच्या दर्जाचे कोणी अकार्यक्षम अधिकारी आढळले तर त्यांना काढून टाकण्याचा अधिकार या दोघांना होता. सार्वजनिक सभांमध्ये राजाची फर्माने वाचून दाखविण्याविषयी ते आग्रह धरीत व जेथे जरूर भासेल तेथे लॅटिन भाषेतून स्थानिक भाषांमध्ये या फर्मानांचे भाषांतर केले जाई. जेथे संधी मिळेल तेथे **पुलिसानींनीही** अशोकाचे आज्ञालेख मोठ्याने वाचून दाखवावेत अशी अपेक्षा असे हे अगदी संभवनीय दिसते. दोन **मिस्सिसपैकी**, धर्मविषयक प्रतिनिधी भिक्षु आणि जोगिणी यांची चौकशी करी आणि लौकिक अधिकारी प्रशासनातील न्यायदानविषयक आणि आर्थिक दप्तरे तपासत असे. शार्लमेनच्या बाबतीत स्थानिक उमरावांच्या वाढत्या सरंजामी सत्तेवर अंकुश म्हणून **मिस्सी** काम करीत. अशोकाच्या बाबतीत प्रांतिक राज्यकर्त्यांच्या महत्त्वाकांक्षेला राजाचे दूत मुरड घालीत.

वारंवार होणारी तपासणी व हेरांचे अस्तित्व यांच्यामुळे राज्याची सर्वंकष प्रवृत्ती जाणवत असली पाहिजे. राज्यकारभारात राजाला मदत करण्यासाठी

---

१. ओल्मस्टेड, **हिस्ट्री ऑफ दि पर्शियन एंपायर**, पृ. ५९, धिर्शमन, **इराण**, पृ. १४४.

२. विन्स्टन, **शार्लमेन**, पृ. २१०.

निवडलेले प्रतिनिधी मंडळ नसल्याने, लोकमत जाणून घेण्यासाठी अशा साधनांचा आधार तो घेऊ शके. जर त्यांचा उपयोग सावधगिरीने व जबाबदारीच्या जाणिवेने केला गेला असेल तर त्यामागचा हेतू चांगल्या रीतीने साध्य झाला असेल. इतर कामांबरोबरच प्रचाराची प्रचंड यंत्रणा या दृष्टीनेही अशोकाला या अधिकाऱ्यांचा उपयोग होत असे. उदाहरणार्थ त्यांच्याकडून लोकांना **धम्मविषयक** धोरण स्पष्ट केले जाई आणि लोकांची प्रतिक्रिया समजावून घेतली जाई. ही प्रतिक्रिया म्हणजे काही आज्ञालेखांचा आधार असणे अगदी शक्य आहे.

मेगॅस्थिनिसने उल्लेखिलेला सहावा वर्ग म्हणजे वेगवेगळ्या कामांची देखरेख व चौकशी करून राजाला किंवा स्थानिक न्ययाधीशांसारख्या वरच्या अधिकाऱ्यांना अहवाल सादर करणारे अधिकारी. डायोडोरसने उद्‌धृत केलेल्या परिच्छेदात या वर्गाला '**एपिस्कोपोई**' अशी संज्ञा वापरली आहे.[1] स्ट्रॅबो याच गटाविषयी सांगतो आणि ते अधिकारी सैन्याची आणि दरबारी मंडळींचीही तपासणी करीत आणि राजाला गुप्त अहवाल सादर करीत ही वस्तुस्थिती असल्याचे स्पष्ट करतो.[2] त्यांच्यासाठी तो **एफोरोई** अशी संज्ञा वापरतो. आपल्या वृत्तांतात ॲरियन याच संज्ञेचा उपयोग करतो व ते अधिकारी राजाला किंवा स्वायत्त प्रदेशातील न्यायाधीशांना अहवाल देत असल्याचे सांगतो.[3] बरेचसे जुने लेखक, हा हेरांचा वर्ग होता, असे मत देतात.[4] मूळ ग्रंथाच्या प्रकाशात पाहता, ग्रीक लेखकांनी वापरलेल्या या संज्ञेचा हा अतिशयोक्त अर्थ लावलेला आहे. दोन्ही संज्ञाचा शब्दशः अर्थ हेर असा असण्यापेक्षा, देखरेख करणारा किंवा अध्यक्ष असा आहे.[5] राजाला त्यांनी गुप्त अहवाल सादर करावेत असे त्यांना सांगण्यात आलेले होते ही वस्तुस्थिती असली तरी त्यामुळे

---

१. डायोडोरस, दोन. ४१

२. स्ट्रॅबो, पधरा, १, ४८.

३. **इंडिका**, बारा.

४. उदाहरणार्थ, टिमर, **मेगॅस्थेनेस एन डे इंडिशे मात्शापिज**, पृ. १७०.

५. **एपिस्कोपोई** या शब्दाचे भाषांतर, 'निरीक्षण करणारा, देखरेख करणारा, पालक' असे केलेले आहे. **एफोरोई** या शब्दाचे भाषांतर 'देखरेख करणारा, पालक, राज्यकर्ता' असे केलेले आहे. नगरपालिकेतील अधिकाऱ्यांसाठी ही संज्ञा वापरलेली आहे आणि हेराक्लिया येथील न्यायाधीशाचे ते बिरुद होते. (लिडेल अँड स्कॉट, **ग्रीक-इंग्लिश लेक्सिकॉन** पृ. ६५७, ७४७).

ते हेरखात्यात होते हे म्हणणे लागू पडत नाही. राजाजवळ त्यांना सरळ जाता येत असल्याचे हे निदर्शक आहे आणि त्यांचे महत्त्वाचे अहवाल नोकरशाही यंत्रणेच्या अनेक मार्गांमधून न जाता राजाजवळ पोहोचू शकत, असा या अहवालाच्या उल्लेखाचा अर्थ लावणे जास्त चांगले. शिवाय इतर लोकांपेक्षा हेरांचा एक वेगळा वर्ग म्हणून त्यांना ओळखता येणे हे क्वचितच साध्य होण्याजोगे दिसते. जर हेरांची संख्या आणि त्यांच्या हालचाली सर्वपरिचित असतील तर हेर नेमण्याच्या मागचा हेतूच नष्ट होतो.

सहावा वर्ग हा मंत्र्यांपेक्षा खालच्या दर्जाच्या अधिकाऱ्यांचा होता. म्हणजे अर्थशास्त्रात उल्लेखिलेल्या विविध खात्यांच्या अध्यक्षांसारखेच ते असावेत[1] आपल्या अखत्यारातील विशिष्ट खात्याच्या कार्यक्षम कारभाराबाबत हे अधिकारी जबाबदार होते. आपले काम पाहात असताना त्यांनी राजाला किंवा उच्चतर अधिकाऱ्यांना कामाचा अहवाल सादर करावा अशी अपेक्षा असण्यात काही असाधारण आहे असे नाही. अर्थशास्त्रात वर्णन केलेली हेरसंस्था या सहाव्या वर्गासारखी नाही. माहिती गोळा करण्यासाठी विविध वेषांमधील हेरांचा उपयोग करणे हे केवळ ज्ञात होते असे नसून राजकारणाचा तो एक नित्याचा भाग आहे असे सूचित केलेले आहे.[2] पण हेरांचा एक वेगळा वर्ग म्हणून कोठेही त्यांना वागविलेले नाही. प्रशासकीय यंत्रणेत तो एक गट म्हणून असतो आणि अनाथ बालकांपासून ते ब्राह्मण विधवा आणि शूद्र स्त्रिया यांच्यापर्यंत समाजातील वेग-वेगळ्या थरातील लोक त्यात भरती केलेले असतात. विविध प्रकारचे राज्याचे नोकरही त्यात असतात.

तपासनीस किंवा देखरेख करणारे, असे हेरांचे वर्णन केलेले नाही. ज्या गटावर हेरगिरी करण्याची कामगिरी सोपविलेली असेल त्या गटात स्वत: मिसळून जाणे आणि जो विषय त्यांच्याकडे सोपविलेला असेल त्याच्या जास्तीत जास्त जवळ प्रवेश मिळविण्यासाठी त्या व्यवसायातील सभासदांमध्ये त्यांच्यातीलच एक होऊन राहणे हा हेरांचा हेतू असतो. त्यासाठी फसवे अनुयायी, संन्यासी, गृहस्थाश्रमी व्यापारी, साधू, विद्यार्थी, भिकारी, स्त्रिया, वेश्या यांसारख्या विविध मिषांनी हेरांनी काम करावे असे सुचविण्यात आलेले आहे. हेरांची अशी रचना समाजातील अनेक विभागांमध्ये काम करू शकत असे. साहजिकच या कामात गुप्ततेवर भर

---

१. बुक दुसरे, अध्यक्ष ही संस्कृत संज्ञा व्युत्पतिशास्त्राच्या दृष्टीने डायोडोरस व ॲरियन यांनी वापरलेल्या संज्ञांसारखीच आहे.

२. दोन, ३५, चार, ४, एक, ११, एक, १२.

देण्यात आलेला आहे. केवळ सर्वसामान्य लोकांना हे हेर माहित नसतात असे नाही तर ते परस्परांनाही जाणीत नसतात. हेरखात्यातील अधिकाऱ्यांना प्रत्यक्षात काम करणारे हेर कोणते ते माहीत नसावे पण अधिकाऱ्यांनी लेखी आज्ञा द्याव्यात असे सांगितलेले आहे. हेरसंस्थेचा उपयोग केवळ गुन्हे शोधून काढण्यासाठी व स्वदेशातील लोकमत जाणून घेण्यासाठी केला जात नसे तर परदेशातही हेर पाठविले जात असत. कारण परदेशातील हेरही स्वदेशात काम करीत असल्याचे माहित होते.

नागरी प्रशासनात त्या त्या नगराच्या अधिकाऱ्यांचा श्रेणिक्रम होता. नगराचा अध्यक्ष किंवा **नागरक** याचे मुख्य काम म्हणजे नगरामध्ये कायदा आणि सुव्यवस्था प्रस्थापित करणे.[१] म्हणून प्रत्येक परक्या माणसाची खबर दिली जाई व नोंद केली जाई. रात्री सक्त संचारबंदी जारी केली जाई व खास परवाने असणारांखेरीज इतरांना हालचाली करण्यास प्रतिबंध केला जाई. नगराची स्वच्छता ही जबाबदारीही **नागरकाचीच** असे. काही नगरांमध्ये लाकडी इमारतीचे प्रमाण जास्त असल्याने आगीच्या धोक्याची सतत भीती असे. अग्निप्रतिबंधक उपाययोजनांची देखरेख करताना, व्यवसायासाठी अग्नीचा उपयोग करणारे लोहार व इतर व्यावसायिक, नगराच्या एका विशिष्ट भागात राहतात की नाही हे **नागरकाला** पाहावे लागे. दुष्काळाच्या काळात कोठारांमधील धान्य वाटण्याची जबाबदारी **नागरकावर** असे.[२] **गोप** व **स्थानिक** हे दोन दुय्यम अधिकारी **नागरकाच्या** मदतीला असत.[३] हीच नावे असलेल्या ग्रामीण प्रशासनातील अधिकाऱ्यांसारखीच यांचीही कामे होती. **गोप** हा दहा, वीस किंवा चाळीस कुटुंबांचा हिशेब ठेवीत असे. प्रत्येक कुटुंबाचे उत्पन्न व खर्च त्याला माहित असावा असे मानले जात असल्याने हा हिशेब तपशीलवार ठेवला जाई. तसेच प्रत्येक माणसाचे नाव, व्यवसाय, गोत्र आणि जात यांची नोंद करून तो दप्तर ठेवी. नगराच्या विविध विभागांचे हिशेब स्थानिक ठेवीत असे आणि जेव्हा व जेथून सर्वसाधारण कर गोळा करावयाचे असतील तेव्हा तो ते काम करी हे उघड आहे. महत्त्वाच्या बाबींची वर्दी प्रथम **गोप** किंवा **स्थानिक** यांना देण्यात येई व नंतर ते **नागरकाला** ती माहिती कळवित असत.

---

१. दोन, ३६.

२. महास्थान आणि सोहगौरा कोरीव लेख. सरकार, **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स**. ...पृ. ८२, ८५.

३. **अर्थशास्त्र**, दोन, ३६.

अशोकाच्या कोरीव लेखांमध्ये **नगलवियोहालक महामत्त** यांचा उल्लेख आहे आणि त्यांच्या न्यायदानविषयक अधिकारांच्या संदर्भात प्रामुख्याने तो उल्लेख आहे.[1] हा उल्लेख **नागरकाविषयीचा** नाही कारण हे **महामत्त** न्यायदानविषयक कामकाज चालवित असत असे दिसते तर **नागरक** हा, न्यायदान प्रशासनाच्या भाषेत, केवळ राजपुत्राच्या जन्मासारख्या काही शुभप्रसंगी कैद्यांची केवळ सुटका करण्याच्या कामाशी संबंधित आहे. **नगलवियोहालक** हे न्यायदानविषयक अधिकारी होते आणि **नागरकाच्या** सामान्य प्रशासनात ते काम करीत असत असे दिसून येते. काही विशेष खटले चालविताना त्यांच्या कामात **नागरकाने** हस्तक्षेप केलाही असेल, आणि काही वेळा काही विशिष्ट प्रसंगी कोणत्या कैद्यांना मुक्त करावे हे ठरवितानाही हस्तक्षेप केला असेल. **नगलवियोहालक** महामत्तांचे स्थान आजच्या फौजदारी न्यायाधीशांसारखे होते.[2]

नगरप्रशासनाचे वर्णन करताना, मेगॅस्थिनिसने एका अधिक व्यवस्थित पद्धतीची रुपरेषा दिलेली आहे.[3] त्याच्या म्हणण्यानुसार अधिकाऱ्यांची सहा समित्यांमध्ये विभागणी केलेली असे व प्रत्येक समितीत पाच सभासद असत. पहिल्या समितीकडे औद्योगिक कलांशी संबंधित असणारे विषय सोपविलेले असत. परकियांची देखभाल करण्याचे काम दुसरी समिती करीत असे. त्यांच्या राहण्याची सोय करणे व बाह्यात्कारी त्यांच्या मदतीला जे लोक दिलेले असत त्यांच्यामार्फत या परकियांवर नजर ठेवणे इत्यादींचा समावेश या समितीच्या कामात असे. ते जेव्हा देश सोडून जात तेव्हा प्रवासमार्गावर काही काळ त्यांना सोबत दिली जाई. किंवा ते मृत्यू पावल्यास त्यांची मालमत्ता त्यांच्या नातेवाईकांकडे पाठविली जाई. ते आजारी पडल्यास त्याना वैद्यकीय सोयी उपलब्ध करून दिल्या जात. तिसरी समिती जन्म व मृत्यू यांची नोंद ठेवी. शिरगणती व करपद्धती या दोन्ही दृष्टींनी ती नोंद ठेवली जाई. वजनमापांची तपासणी, सार्वजनिक बाजारपेठेची व्यवस्था, प्रत्येक व्यापारी एकाच वस्तूचा व्यवहार करीत आहे याची खात्री करून घेणे, (कारण एकापेक्षा जास्त वस्तूंचा व्यवहार असेल तर दुप्पट कर असे), इत्यादी व्यापार आणि वाणिज्य यांच्याशी संबंधित असलेल्या विषयांची जवाबदारी चौथ्या

---

१. पहिला वेगळा आज्ञालेख, श्लोक, **ले एन्स्क्रेपसिओं द अशोक** पृ. १३६

२. नागरी प्रशासनातील महत्त्वाच्या अधिकाऱ्यांमध्ये **पौर-व्यवहारक** याचा **अर्थशास्त्राने** थोडक्यात उल्लेख केलेला आहे. **नगलवियोहालक महामत्त** हे तसलेच अधिकारी असावेत.

३. स्ट्रॅबो, पंधरा, १, ५०.

समितीवर होती. पक्क्या मालाच्या सार्वजनिक बाजारावर देखरेख ठेवण्याचे काम पाचवी समिती करी. विक्री झालेल्या वस्तूंच्या, खरेदी-किमतीच्या एक दशांश इतका कर सहावी समिती गोळा करी.

भारतीय ग्रंथांमध्ये या समित्या अस्तित्वात असल्याचा उल्लेख नाही. परंतु मेगॅस्थिनिसने सांगितलेल्या समित्यांपैकी प्रत्येकीशी समान असे अधिकारी अर्थशास्त्राने दिलेल्या यादीत दिसतात. नगरप्रशासनाच्या विशेषत: पाटलिपुत्राच्या नगरप्रशासनाच्या काही विभागात व्यक्तिगत अधिकाऱ्यांपेक्षा समिती जास्त कार्यक्षम असल्याचे आढळून आले असेल हेही शक्य आहे. पाटलिपुत्रासारखे विस्तृत नगर अनेक भागांमध्ये विभागले गेलेले असले पाहिजे व प्रत्येक विभागात समान प्रशासकीय संघटना असली पाहिजे. एकाच खात्यातील सर्व अधिकारी एका गटात जमून मध्यवर्ती संघटनेला आपले अहवाल सादर करीत असतील व त्याच पद्धतीने आपले हुकूम मिळवीत असतील, असे होत असण्याची अगदी शक्यता आहे. **अर्थशास्त्र** हे मौर्य–प्रशासनाचे तपशीलवार वर्णन नाही तर सामान्य प्रशासनावरील ते एक सर्वसाधारण पुस्तक आहे. त्यामुळे अशी पद्धती शक्य आहे असे काही **अर्थशास्त्रात** सांगितलेले नाही. मौर्यांनी व्यवहारात **अर्थशास्त्रातील** भागांमध्ये नि:संशयपणे बदल केला असला पाहिजे किंवा जरुर पडली तेथे ते भाग त्यांनी डावललेही असावेत, म्हणून मेगॅस्थिनिसने वर्णन फक्त पाटलिपुत्राच्या प्रशासनाला लागू करता येण्याजोगे आहे.[१] कदाचित मेगॅस्थिनिसचे एकाच खात्यात काम करणाऱ्या विविध दर्जाच्या अधिकाऱ्यांचे गट पाहिले असतील व समान पातळीवरील अधिकाऱ्यांची ती एक समिती आहे अशी त्याची चुकीची समजूत झाली असावी, असे टिमर यांनी सुचविलेले आहे.[२] त्याने सांगितलेल्या समित्या **अर्थशास्त्रात** सांगितलेल्या विविध अध्यक्षांच्या कामांशी जुळणाऱ्या आहेत. या अधिकाऱ्यांना

---

१. पाचजणांच्या समित्यांचा वापर ही कल्पना भारतीय प्रशासनाला संपूर्णपणे परकी नाही. भारतीय ग्रंथांमधून जरी साधारणपणे प्रमुख म्हणून एक व्यक्ती असली तरी पंचायतीच्या कल्पनेवर आधारलेल्या अशा समित्यांचा उल्लेख जातकांमध्ये (**महाबोधि जातक**, व्हॉ. पाच, पृ. २२८) आणि **महाभारतामध्ये** (दोन, ५) केलेला आहे. मेगॅस्थिनिसच्या वर्णनाशी यापेक्षा ही जास्त मजेशीर समांतरता दाखविणारे वर्णन चोळ कालातील उत्तरामेरुर या खेड्याच्या प्रशासनात पडताळून पाहता येणे शक्य आहे. (एन्. शास्त्री, **दि चोळाज**, पृ. २८३–४.)

२. **मेगॅस्थेनेस एन डे इंडिज मात्शपिज**, पृ. १९९.

म्हणजे अध्यक्षांना दुय्यम अधिकाऱ्यांची मदत होत असे. कदाचित प्रत्येक कार्यालयात एक अध्यक्ष व चार दुय्यम अधिकारी असावेत त्यामुळे ती एक समिती असावी असा मेगॅस्थिनिसचा समज झाला असावा. अनेक संभवनीय स्पष्टीकरणांपैकी हे केवळ एक स्पष्टीकरण आहे.

पहिली समिती औद्योगिक कलांवर देखरेख करी. नगरातील कारागिरांच्या बाबतीत जबाबदार असणारे हे अधिकारी असावेत. दुसऱ्या समितीशी नेमके साम्य दाखविणारे असे अर्थशास्त्रात काही नाही. परकियांवर बारीक नजर ठेवली जाई हे नागरकांच्या कामावरून स्पष्ट होते, ते लक्षात घेता केवळ परकियांसाठी म्हणून अधिकाऱ्यांचा एक गट असला पाहिजे हे स्पष्टपणे दिसून येते. अशा मंडळाला साहजिकच राजधानीत जास्त काम पडत असले पाहिजे. कारण परकियांनी तेथेच भेटी देण्याची शक्यता अधिक. परकीय याचा अर्थ फक्त अभारतीय असा नव्हता. साम्राज्याच्या दूरवरच्या भागांमधून येणाऱ्या प्रवाश्यांचा समावेशही याच गटात होत असावा. अर्थशास्त्रात सुचविल्याप्रमाणे जर खरोखरच नगरातील रहिवाश्यांचे असे तपशीलवार दप्तर ठेवण्यात येत असेल तर नगराचे रहिवासी नसलेल्या कोणाचीही गणना परकियांमध्ये होत असण्याचा संभव आहे. देश सोडून जाताना मार्गामध्ये ज्यांना सोबत दिली जात असे ते जास्त महत्त्वाचे परकीय असावेत. परकियांच्या सुखसोयींसाठी नेमलेल्या खास मदतनीसांकडून त्यांच्यावर लक्ष ठेवले जात असे, ही वस्तुस्थिती, माहिती मिळविण्यासाठी विविध वेषातील हेरांचा उपयोग करण्यावर अर्थशास्त्राने जो भर दिलेला आहे त्या वृत्तीशी जुळणारी आहे. पाटलिपुत्रात मरण पावलेल्यांची मालमत्ता पोहोचती केली जात असे हे विधान काहीसे आदर्शवादी दिसते. मौर्यांच्या कक्षेतील भागांमध्ये ज्यांचे नातेवाईक राहात असतील त्यांच्याच बाबतीत कदाचित हे लागू पडत असावे. ही समिती मृत देहांचे दफन करीत असल्याचा जो उल्लेख आहे तो या उदाहरणात परकीय लोक अहिंदू असल्याचे दाखवितो. एरवी मृतदेहाची विल्हेवाट लावण्यासाठी दहनाचीच पद्धती रूढ असावी.

जन्ममृत्यूची नोंद करणारी व शिरगणतीचे अहवाल ठेवणारी तिसरी समिती यापूर्वीच उल्लेख केलेल्या गोपाच्या कामाच्या खूपच जवळची आहे. अर्थशास्त्रात सांगितलेल्या व्यापार आणि वाणिज्य यांच्याशी संबंधित असलेल्या विविध अध्यक्षांच्या जबाबदाऱ्यांसारख्याच जबाबदाऱ्या चौथ्या समितीच्या असाव्यात असे दिसते. वाणिज्याच्या अध्यक्षाकडे जे काम असे तेच पाचव्या समितीकडे होते. एक दशांश कर गोळा करण्याची जबाबदारी सहाव्या समितीकडे होती. वेगवेगळे कर

गोळा करण्याची जबाबदारी असलेल्या **स्थानिकाच्या** कामास उद्देशून बहुधा हा उल्लेख आहे.[1]

आपल्या आठवणी लिहिण्याची वेळ येईपर्यंत, नगरप्रशासनाशी संबंधित असलेल्या इतर अधिकाऱ्यांकडे मेगॅस्थिनिसचे दुर्लक्ष झाले असावे किंवा त्यांचा त्याला विसर पडला असावा असे दिसते. **नागरक** किंवा नगर-अध्यक्ष हा पाटलिपुत्रातील एक महत्त्वाचा अधिकारी निश्चितच असला पाहिजे पण तरीही मेगॅस्थिनिस त्याचा उल्लेख करीत नाही. मेगॅस्थिनिसच्या मूळ वृत्तान्तातील नगरप्रशासनाविषयीचे भाग नष्ट झालेले असावेत आणि **नागरक** व इतर अधिकारी यांचा उल्लेख संपूर्ण वृत्तांतात असावा, अशी शक्यता आहे. केंद्रीय नियंत्रणाचे महत्त्व **अर्थशास्त्राने** सतत जोरदारपणाने सांगितलेले आहे आणि मौर्यप्रशासन निश्चितपणे केंद्रीकरणाला अनुकूल होते. एरवी बुद्धिमान असणाऱ्या मेगॅस्थिनिससारख्या निरीक्षकाच्या नजरेतून हा जोर निसटण्यासारखा नाही. आपल्या स्वतःच्या राजकीय आदर्शवादावर आधारलेल्या संस्थांबरोबर लेखक भारताची सांगड घालत असल्याचे हे आणखी एक उदाहरण होते, ही गोष्टही संभवनीय दिसते.

आज्ञालेखांमध्ये अशोकाने सांगितलेल्या इतर अधिकाऱ्यांमध्ये अंत-**महामत्त** यांचा उल्लेख आहे.[2] सीमा प्रदेशांमधील लोकांमध्ये व कमी सुसंस्कृत टोळ्यांमध्ये हे अधिकारी काम करीत असत. त्यांना **महामत्तांचा** दर्जा दिलेला आहे त्यावरून या प्रदेशांमधील प्रशासनाची जबाबदारी त्यांच्यावरच असावी. सीमाप्रदेशांमधील लोकांविषयी असलेल्या अशोकाच्या धोरणाची अंमलबजावणी करण्याशी त्यांचा प्रत्यक्ष संबंध होता. हे धोरण म्हणजे प्रामुख्याने सीमांवरील टोळ्यांचा विश्वास संपादन करण्याचा प्रयत्न होता. त्यामुळे परस्परांवरील विश्वासामुळे त्यांच्या राजनिष्ठेवरही अवलंबून राहता येण्याजोगे होते. **अंतमहामत्तांनी** हा विश्वास निर्माण करण्याच्या दृष्टीने कार्य करावे अशी त्याची अपेक्षा आहे आणि सीमांवरील टोळ्या त्याला मुलांसारख्या आहेत आणि त्यांच्याबरोबरचे त्याचे नाते पित्यासारखे आहे असे तो परत प्रतिपादन करतो. हे प्रशासकीय धोरण, सीमांप्रदेशांमधील लोकांमध्ये करावयाच्या **धम्माच्या** प्रचाराशी अतिशय निगडित आहे आणि **अंतमहामत्तांच्या** अनेक कर्तव्यांमध्ये एक कर्तव्य म्हणून **धम्माच्या प्रचाराचा** समावेश होता.

---

१. दोन, १९, दोन, १६, दोन, ३६.

२. दुसरा वेगळा आज्ञालेख, पहिले स्तंभशासन, ब्लोख, **ले एंस्क्रेपसिओं द अशोक**, पृ. १४०, १६१.

माणसे आणि जनावरे यांच्यासाठी वैद्यकीय उपचारांची केंद्रे शेजारच्या देशांमध्ये स्थापन केल्याचे अशोक आपल्या आज्ञालेखामध्ये इतरत्र सांगतो. हे काम आपल्याच प्रेरणेने झाले असा दावा तो करतो व दक्षिण सीमेवरील लोकांमध्येही हे केल्याचे तो सांगतो.[१] जेथे या प्रकारच्या गोष्टींमध्ये सीमाप्रदेशामधील लोकसमूह सहभागी झालेले होते तेथे **अंतमहामत्त** संपर्काधिकारी म्हणून काम करीत असणे शक्य आहे. ग्रीक राज्यांनीही राजदूतांचे स्वागत केले असेल पण अशोकाशी असलेले त्यांचे नाते दक्षिणसीमांवरील राज्यांच्या नात्याइतके निकटचे असावे असे दिसत नाही. सीमाप्रदेशांमधील लोकांना **धम्माच्या** तत्त्वांचा परिचय करून देण्याची त्याचप्रमाणे सीमेवरील लोकांमधील मौर्यांच्या अधिसत्तेविरुद्धचे उठाव रोखण्याची जबाबदारीही **अंतमहामत्तांचीच** होती. राजाकडून या हेतूने नेमल्या जाणाऱ्या, **अयुतिके** नावाच्या खास अधिकाऱ्यांची मदत या महामत्ताना आपल्या कामात मिळत असे.[२] **युक्त** आणि **अयुतिके** या हुद्यांमधील सारखेपणावरून अधिकाऱ्यांचा हा सारखाच वर्ग असावा हे सूचित होते. आज्ञालेखांमधील **अंतमहामत्त** हे **अर्थशास्त्रातील** अंतपालांसारखेच असावेत.[३] जकातींवरचे हे अध्यक्ष होते. प्रत्येक प्रांतामध्ये स्वतःचे अंतपाल होते यात शंका नाही आणि कदाचित काही प्रांतांमध्ये विविध जिल्ह्यांमध्ये मालाची देवाण घेवाण करतानाही जकात द्यावी लागत असावी. पण साम्राज्याच्या सीमारेषावर जकातनाकी अस्तित्वात असलीच पाहिजेत- जकातीमधून मिळणारा महसूल गोळा करण्याच्या कामाचा समावेश **अंतमहामत्तांच्या** कामात होत असण्याची अगदी शक्यता आहे. अशा प्रकारे जकात वसूल करणाऱ्यांवर ते देखरेख करीत असावेत व जकातीचे अध्यक्ष त्यांना जबाबदार असावेत.

अशोकाच्या काळात स्त्रियांची समाजातील स्थिती खालावलेली असल्याने स्त्रियांच्या कल्याणाचीच जबाबदारी प्रामुख्याने ज्यांच्यावर टाकता येईल अश्या **महामत्तांच्या** खास गटाची नेमणूक करण्याची गरज त्याला भासलेली असणे शक्य आहे. अशा अधिकाऱ्यांसाठी **इथीझखमहामत्त** ही संज्ञा वापरली होती. तिचा

---

१. दुसरे शिलाशासन, गिरनार, **उपरोक्त,** पृ. ९३.

२. दुसरा वेगळा आज्ञालेख, **उपरोक्त,** पृ. १४०.

३. दोन, २१.

अक्षरशः अर्थ होतो स्त्रियांचे अध्यक्ष असलेले अधिकारी.[1] हे अधिकारी आणि गणिकाध्यक्ष किंवा वेश्यांचे अध्यक्ष[2] यांचा संबंध असावा असे सुचविण्यात आलेले आहे. **महामत्तासारख्या** हुद्यांवरील अधिकाऱ्यांची नेमणूक केवळ नगरातील वेश्यांवर देखरेख ठेवण्यासाठी केली जावी हे क्वचितच घडण्याचा संभव दिसतो. या **महामत्तांच्या** कामांमध्ये गणिकांवर देखरेख करण्याच्या कामाचा नक्कीच समावेश होत असावा. परंतु त्याबरोबरच स्त्रियांशी संबंधित असणाऱ्या इतर कर्तव्यांचाही त्या कामाशीच संबंध असावा. त्यांचा बराचसा वेळ राजाच्या अंतःपुरांसाठी खर्ची पडत असावा. अधिकाऱ्यांच्या एका खास वर्गाला अधिकारपत्र देण्याइतकी ही अंतःपुरे मोठी होती हे अशोकाच्या कोरीव लेखांवरून स्पष्ट होते. राजाचे स्वतःचे आणि त्याच्या भावांची आणि बहिणींची निवासस्थाने तसेच पाटलिपुत्रात व इतरत्र असलेली त्याच्या इतर नातेवाईकांची निवासस्थाने यांच्यासकट अनेक ठिकाणी काम करण्यात धम्ममहामत्त गढलेले आहेत असे राजा सांगतो.[3] उदाहरणार्थ अंतःपुरांच्या व्यवस्थेसाठी अधिकाऱ्यांचे असे खास मंडळ लागत असले पाहिजे. आपल्या मुख्य राजवाड्याखेरीज पाटलिपुत्राबाहेर अशोकाची अंतःपुरे असावीत असे मत मांडण्यात आलेले आहे.[4] या ठिकाणी हलक्या जातीच्या स्त्रिया होत्या. अंतःपुरातील जीवनात अशोक कितपत रममाण होत असे याविषयीचा हा अतिशयोक्त अंदाज आहे. अंतःपुरे ही काही त्याची एकट्याचीच नव्हती तर त्याच्या अनेक नातेवाईकांची होती असे आज्ञालेख दर्शवितात.

राजकुटुंबातील मंडळींनी दिलेल्या धर्मादाय देणग्यांची नोंद ठेवण्याचे काम **धम्ममहामत्त** व इतर अनेक मुख्य अधिकाऱ्यांकडे असल्याचे सातवे स्तंभशासन सांगते.[5] मुख्य अधिकारी म्हणजे बहुधा **इथीझखमहामत्त** असावेत आणि देणग्या वगैरेंची तपशीलवार नोंद ते ठेवीत, तर **धम्ममहामत्तांवर** राजकुटुंबियांना **धम्माची**

---

१. शाहबाझगढी येथील आज्ञालेखातील मजकुरात वापरलेल्या **इस्त्रिधियक्ष-महामत्त** या शब्दावरून हे स्पष्ट होते. ब्लोख, **ले एंस्क्रेपसिओं द अशोक**, पृ. १२४.

२. हुल्टश, **कॉर्पस इन्स्क्रिप्शनम् इंडिकारम्**, व्हॉ. एक, पृ. २२, अं. ४, **अर्थशास्त्र**, दोन, २७.

३. पाचवे शिलाशासन, धौली, ब्लोख, **ले एंस्क्रेपसिओं द अशोक**, पृ. १०४.

४. भाण्डारकर, **अशोक**, पृ. १२.

५. सातवे स्तंभशासन, ब्लोख, **ले एंस्क्रेपसिओं द अशोक**, पृ. १६८.

शिकवण देण्याची जबाबदारी होती आणि त्यांना ते देणग्या देण्यास प्रवृत्त करीत असावेत. अंतःपुराच्या प्रशासकीय बाजूशी **इथीझखमहामत्ताचा** संबंध होता. ज्यावेळी स्त्रियांना मदतीची गरज भासे तेव्हा त्या या महामत्ताकडे येत असाव्यात, हे शक्य आहे.[1] विणकामातील स्त्रियांची रोजगारी किंवा गणिकांविषयीचे नियम यांसारख्या अर्थशास्त्रात विचार केलेल्या कामांच्या प्रकारांशी याहून दुय्यम अधिकाऱ्यांचा संबंध असावा.

मौर्यप्रशासनातील प्रत्येक अधिकाऱ्याला, मग तो दौऱ्यावर जाणारा **प्रादेशिक** असो किंवा न्यायदानविषयक कामकाज पार पाडणारा **राजूक** असो, त्याला आपले नित्याचे कामकाज पार पाडीत असताना **धम्माचा** प्रसार करण्याचे काम करावे लागे. **धम्माविषयी** बोलताना, दास, सेवक, ब्राह्मण, श्रमण, मातापिता, वृद्ध, पशु यांच्याविषयी योग्य तो आदर दाखविणे, पशुहत्त्येपासून परावृत्त होणे, कैद्यांचे कल्याण साधणे यांसारख्या सर्वसामान्य आचारावर भर दिला जात असे. पण आपल्या अधिकाऱ्यांकरवी होणाऱ्या सर्वसाधारण **धम्मप्रचारावर** अशोक अवलंबून राहिला नाही. आपल्या कारकिर्दीच्या चौदाव्या वर्षी त्याने **धम्ममहामत्त** ही नवी सेवकश्रेणी निर्माण केली व **धम्मप्रसार** करणे आणि आवश्यक तेथे त्याच्या धोरणाचे स्पष्टीकरण करणे हे त्यांचे काम होते. या गटांच्या अधिकाऱ्यांची सेवा ही गोष्ट भारतीय प्रशासनात नवी होती.[2] मुळात त्यांचे काम प्रामुख्याने कल्याणा-विषयीचे होते परंतु हळूहळू त्यांची सत्ता इतकी वाढली की इतर निरनिराळ्या धर्मपंथांमध्ये व निधर्मी संस्थांमध्ये ते हस्तक्षेप करू लागले. राजा त्यांच्यावर अधिक अधिक अवलंबून राहू लागला. कोणत्याही धर्मविषयक व्यवस्थेबाबतच्या त्यांच्या वृत्ती एक सारख्याच झालेल्या दिसतात.

देशाच्या दैनंदिन प्रशासनातील अनेक महत्त्वाची कामे सर्वसाधारण प्रशास-कीय अधिकाऱ्यांकरवी पार पाडली जात असत. उदाहरणार्थ पाणीपुरवठ्याचे काम **राजूक** किंवा मेगॅस्थिनिस ज्यांना **अॅग्रोनोमोइ** म्हणतो त्या अधिकाऱ्याकरवी पाहिले जाई. ते नद्या आणि पाटाच्या मोऱ्या यांची तपासणी करीत आणि शेतक-ऱ्यांना वाटल्या जाणाऱ्या पाण्यावर देखरेख करीत. चंद्रगुप्त मौर्याच्या कारकिर्दीत, आजूबाजूच्या प्रदेशात पाणीपुरवठ्याची सोय करण्यासाठी सुदर्शन तलावावर एक

---

१. भाण्डारकर, अशोक, पृ. ५६–५७.

२. पुढील प्रकरणात आम्ही त्यांच्या कामाकामाविषयी तपशीलवर चर्चा केलेली आहे.

बंधारा बांधला होता असे रुद्रदामनचा कोरीव लेख सांगतो.[१] या कालात अरण्यांचे महत्त्व ओळखलेले होते. अरण्यातील उत्पन्नावरच्या अध्यक्षाचा, कुप्याध्यक्षाचा उल्लेख **अर्थशास्त्राने** केलेला आहे, हाच अध्यक्ष अरण्यांची काळजी घेण्याच्या कामावर देखरेख करीत असे.[२] अरण्यांची मन मानेल तशी तोडणी केल्यास होणारे दुष्परिणाम मौर्यकाळात जाणवले असले पाहिजेत. इमारती लाकूड आणि वन्य पशूंवर आपली उपजीविका करणारे शिकारी यांच्यावर बसविलेल्या करांमुळे अरण्ये महसुलाचे साधन झाले होते. त्यामुळे अरण्यांचे संरक्षणही केले जाई. शिवाय अरण्यातून मिळणारे इमारती लाकूड बांधकामासाठी अत्यावश्यक होते. त्यामुळे अरण्ये तोडण्याच्या बाबतीत निर्बंध घालणे भाग होते. निष्कारण हानी टाळण्यासाठी वनसंरक्षक नेमण्याची सूचना **अर्थशास्त्र** करते. ज्या ज्या वेळी जमीन साफसूफ करून लागवडीखाली आणली जाईल त्या त्या वेळी स्थानिक प्रशासनाला कळवावे, म्हणजे जमिनीची नोंदणी होऊ शकेल, शेतकरी आवश्यक ते कर भरतील, याविषयी खात्री करून घेण्यासाठीही हे निर्बंध होते. एका आज्ञालेखामध्ये विनाकारण अरण्ये जाळण्यास प्रतिबंध करण्यात आलेला आहे.

कौटल्य व मेगॅस्थिनिस या दोघांनीही सैन्यदलाच्या प्रशासनाचे तपशीलावार वर्णन केलेले आहे. कौटल्याने मौल (वंशपरंपरागत), भृत (भाडोत्री) व श्रेणि असे सैनिकांचे तीन मुख्य प्रकार सांगितलेले आहेत.[४] पहिल्या प्रकारचे सैनिक सर्वांत महत्त्वाचे होते. राजाचे खडे सैन्य यांच्यामधून तयार होई व मेगॅस्थिनिसने सैनिकांचा म्हणून जो पाचवा वर्ग उल्लेखिलेला आहे तो बहुधा या सैनिकांचा असावा.[५] हे सैनिक म्हणजे लढाऊ दलाचा गाभाच असल्याने त्याना विशेष वागणूक दिली जाई. संख्येच्या दृष्टीने मोठा गट म्हणून त्यांचा दुसरा म्हणजे शेतकरीवर्गाच्या खालोखाल क्रमांक लागतो असे मेगॅस्थिनिस सांगतो. सैनिकांना चांगले वेतन दिले जाई. शांततेच्या काळात ते आळसावत आणि करमणुकीत वेळ व्यतीत करीत असे दिसते, असे त्यांचे वर्णन आहे. त्यांना इतके चांगले वेतन असे की त्यावर ते इतरांचाही चरितार्थ चालवीत, या विधानात अतिश-

---

१. सरकार, **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स** पृ. १६९.

२. दोन, १७.

३. पाचवे स्तंभशासन, ब्लोख, **ले एन्स्क्रेपसिओं द अशोक**, पृ. १६६.

४. दोन, ३३.

५. डायोडोरस, दोन, ४१.

योक्ती नाही. प्रशिक्षित सैनिकांना ५०० **पण** देत असावेत असे **अर्थशास्त्रावरून** दिसते व वेतनश्रेणींच्या यादीत हे समाधानकारक उत्पन्न म्हणून गणले गेले होते.[१] **सेनापतिप्रचार** किंवा सरसेनापती आणि **प्रत्यध्यक्ष** म्हणजे पायदलाचा अध्यक्ष यांच्यावर सैन्याच्या व्यवस्थेची जबाबदारी होती. अश्वदल, हस्त्यदल व आयुधागार हे सैन्याचे इतर विभाग त्या त्या अध्यक्षांच्या (अश्वाध्यक्ष, हस्त्यध्यक्ष, आयुधागाराध्यक्ष) हाताखाली असत.[२]

पहिल्या दोन मौर्यांच्या कारकिर्दीतील साम्राज्याच्या विस्तारामुळे मोठ्या मोहिमांसाठी सतत तयार राहण्याकरिता अनेक बाबतीत सैन्याला अग्रक्रम द्यावा लागला. त्यामुळेच सैन्य हा एक खास वर्ग मानला जाई. मौल विभागातील सैनिकांचा संबंध समाजातील क्षत्रियांशी होता यात शंका नाही, त्यामुळे त्यांच्या प्रतिष्ठेत जास्त भर पडे. युरोपीय ग्रंथांमधून मौर्यांच्या व त्यांच्या पूर्वीच्या नंदांच्या सैन्यबलाचे वर्णन नेहमी प्रचंड संख्येने केलेले आहे. प्लिनी लिहितो, चंद्रगुप्ताच्या सैन्यदलात ९००० हत्ती, ३०,००० घोडदळ व ६००,००० पायदळ होते. ८०,००० घोडे, २००,००० पायदळ, ८,००० युद्धरथ आणि ६,००० लढाऊ हत्ती अशी यादी प्लुटार्क देतो.[३] या आकड्यांमध्ये खड्या व राखीव सैनिकांचा समावेश असावा. बियास नदीच्या पलीकडे जाऊन जर अलेक्झांडरने आपली मोहीम चालू ठेवली असती तर किती सैन्याच्या विरोधाला त्याला तोंड द्यावे लागले असते याचे स्पष्टीकरण देण्यासाठी, प्लुटार्क या सैन्याचे वर्णन करीत होता. त्यामुळे यांपैकी काही आकडे अतिशयोक्त असण्याची शक्यता आहे.

सैन्यदलाच्या प्रशासनाचे वर्णन करताना मेगॅस्थिनिस म्हणतो की, पाच सभासदांची एक अशा पाटलिपुत्राचे प्रशासन करणाऱ्या समित्यांसारख्याच सहा समित्या होत्या.[४] संख्यांमधील हा नेमका सारखेपणा विचित्र आहे आणि या किंवा त्या नोंदीतील चुकीचा तो परिणाम असू शकेल. शिवाय **अर्थशास्त्रात** वर्णन केलेले वेगवेगळ्या विभागांचे अध्यक्ष मेगॅस्थिनिसच्या मनात असतील. आरमाराच्या

---

१. पाच, ३. पुढच्या शतकामध्ये ईस्ट इंडिया कंपनीच्या सैन्यातील शिपायांना आपले खाजगी नोकर ठेवता येतील इतके वेतन असल्याचे ज्ञात आहे.

२. दोन, ३३, दोन, १८, दोन, ३३–३६.

३. **हिस्टोरिया नॅचरॅलिस**, सहा, २१, २२, **लाइफ ऑफ अलेक्झांडर**, बासष्ट.

४. स्ट्रॅबो, पंधरा, १, ५०.

प्रमुखाशी पहिली समिती सहकार्य करते म्हणजे आरमारी युद्धाशी तिचा संबंध आहे. नदीतून होणाऱ्या वाहतुकीसाठी वा हल्ला होण्याची शक्यता जेथे होती तेथे जहाजे व नावा यांचा उपयोग केला जात असला पाहिजे. अर्थात अशा स्वरुपाच्या युद्धपद्धतीचा काही विशेष विकास झाला होता असे दिसत नाही. दुसरी समिती आजच्या संरक्षणविषयक उत्पादनाच्या खात्यासारखी असावी. युद्धसाहित्य, अन्न व इतर गरजेच्या वस्तूंची वाहतूक करणाऱ्या बैलगाडयांवर देखरेख करण्याचे काम ती करते. पुरवठा करणाऱ्या अश्या समितीबाबत अर्थशास्त्र जरी काही तपशील देत नसले तरी प्रत्येक सैन्याला असा एक विभाग जोडलेला असतो हे गृहीत धरलेले आहे. उदाहरणार्थ सैन्याच्या छावणीविषयीच्या प्रकरणात त्याचा उल्लेख आहे.[१] खडया सैनिकांचे नोकर, मोतद्दार व इतर सेवक यांचा समावेश या विभागात केलेला आहे.

भारतीय ग्रंथांमध्ये नेहमीच नमूद करण्यात येणाऱ्या पायदळ, घोडदळ, रथदल व हस्तिदल या सैन्याच्या चार शाखांशी उरलेल्या चार समित्यांचा संबंध आहे. अर्थशास्त्रात यांपैकी प्रत्येकीची तपशीलवार चर्चा केलेली आहे.[२] सैनिकांनी आपली शस्त्रास्त्रे शस्त्रागारात परत करावीत अशी अपेक्षा होती असे मेगॅस्थिनिस सांगतो. हे बहुधा खरे असावे, कारण कौटल्याने वर्णन केल्याप्रमाणे आयुधागार म्हणजे एक प्रचंड कारखाना आहे व त्याची नियमितकालाने तपासणी होत असे. यावरून सर्व शस्त्रास्त्रे एकाच जागी ठेवली जात असत असे सूचित होते.[३] घोडे आणि हत्ती ही राजाची मालमत्ता होती आणि त्यांच्या खाजगी मालकीस परवानगी दिली जात नव्हती. भारतातील इतर ग्रीक लेखकांप्रमाणेच मेगॅस्थिनिसवरही हत्तींची अतिशय मोहिनी पडली असावी असे दिसते. हत्तींना पकडणे व त्यांची प्रजा वाढविणे याविषयीची त्यांची वर्णने आश्चर्य वाटण्याइतकी अचूक आहेत.[४] या सर्व माहितीवरून, सैनिकांचे वेतन रोख पैश्यात दिले जाई, जमिनीच्या देणगीच्या रूपाने नाही, ही वस्तुस्थिती स्पष्ट होते. लष्करी प्रशासनाचे वर्णन करीत असताना मेगॅस्थिनिसने केंद्रीय सत्तेचा, म्हणजे या ठिकाणी सरसेनानीचा, उल्लेख

---

१. दहा, १

२. दोन, ३०, ३१, ३३, दहा, १-६.

३. दोन, १८.

४. स्ट्रॅबो, पंधरा, १ ४१-४३

परत एकदा वगळला आहे. जो मनुष्य या पदावर असेल त्याला सैन्याच्या चारही शाखांचे काम पाहण्याचे कौशल्य असले पाहिजे याविषयी अर्थशास्त्राचा आग्रह आहे.

युरोपीय ग्रंथांमध्ये, मौर्यप्रशासनाच्या आणखी एका अंगाचा जाता जाता थोडक्यात उल्लेख केलेला आहे. डायोडोरसने आपल्या वृत्तान्तामध्ये राजाविरहित राज्याचा उल्लेख केलेला आहे. डायोनिसियसने भारतात एक राज्य स्थापन केले आणि त्याच्या वंशजांच्या अनेक पिढ्यांनी राज्य केल्यानंतर राज्याचे विघटन झाले व नगरांमधून लोकशाही सरकार स्थापन झाले.[1] हिरॅक्लिसने निर्माण केलेल्या राज्याविषयीही असेच सांगितलेले आहे.[2] या राज्यांच्या बाबतीत काही नगरांनी राजसत्ता मान्य केली. इतरांनी लोकशाही प्रकारचे सरकार स्वीकारले. जेथे राजा नाही तेथे सहावा म्हणजे निरीक्षकांचा वर्ग आपले अहवाल नगराच्या न्यायाधीशाकडे पाठवीत असे, असे इतरत्र सांगितले आहे.[3] ॲरियनने असाच अभिप्राय दिला आहे आणि शेतकरी आपले कर राजाला किंवा स्वायत्त नगरांना देतात अशी आणखी जास्त माहिती तो पुढे सागतो. त्याचप्रमाणे सहाव्या वर्गातील लोक स्वायत्त नगरांमधील न्यायाधीशांना अहवाल पाठवीत. सातव्या वर्गाच्या म्हणजे मंत्र्यांच्या बाबतीतही तो अशीच पद्धती सागतो.[4] हिपानिसच्या पलीकडील देशात प्रतिनिधींचे सरकार असलेल्या पद्धतीचा उल्लेख स्ट्रॅबो करतो. ५०० प्रतिनिधी असलेल्या या सरकारचे स्वरुप महाजनसत्तावादी आहे. यातील प्रत्येक प्रतिनिधीला राज्यामार्फत एक हत्ती पुरवला जाई.[5]

सेल्युकिड साम्राज्यात असलेल्या पद्धतीप्रमाणे एखाद्या साम्राज्यात अर्धस्वतंत्र दर्जा असणाऱ्या नगरांच्या पद्धतीची जाणीव मेगॅस्थिनिसला होती, असे या विषयाबाबत यापूर्वीच्या एका लेखकाचे मत आहे.[6] हे स्वातंत्र्य अर्थातच अंतर्गत घडामोडींवर नियंत्रण ठेवण्यापुरते मर्यादित होते. मेगॅस्थिनिस म्हणतो की ही स्वायत्त नगरे म्हणजे चंद्रगुप्ताच्या साम्राज्याचा भाग होती, तरीही अशोक मात्र

---

१. डायोडोरस, दोन, ३५.

२. उपरोक्त, ३९.

३. उपरोक्त, ४१.

४. इंडिका, नऊ.

५. स्ट्रॅबो, पंधरा, १, ३६.

६. टिमर, मेगॅस्थेनेस एन डे इंडिशे मात्शापिज, पृ. २३३ तळटीप.

त्यांचा उल्लेख करीत नाही. अर्थशास्त्रात उल्लेखिलेल्या आटविक टोळीसारख्या साम्राज्यात अंतर्भूत होणाऱ्या स्वायत्त टोळ्यांबाबत मेगॅस्थिनिस विचार करीत असावा व त्याने साहजिकच इतर स्वतंत्र नगरांच्या संघटनेशी त्यांचा संबंध जोडला असावा, असे पुढे सुचविण्यात आलेले आहे. मेगॅस्थिनिसच्या राजाविरहित राज्यांना 'पोलीस' म्हणजे नगर असे म्हटले आहे. 'एथॉस' म्हणजे लोक असे म्हटलेले नाही.[1] यावरून हे म्हणणे सरकारच्या पद्धतीला लागू पडते. लूटमार करून जगणाऱ्या टोळीवाल्यांना लागू पडत नाही.

या विषयावर काही प्रकाश टाकू शकेल असा पुरावा दुसऱ्या एका साधनावरून, कोरीव नाण्यांच्या मालिकेवरून मिळण्यासारखा आहे. तक्षशिला येथे सापडलेल्या नाण्यांमध्ये अनेक आयताकृती तांब्याच्या नाण्यांवर **नेगम** अशी अक्षरे आहेत.[2] या शब्दाचा अर्थ, 'व्यापाऱ्यांचा उल्लेख' किंवा 'एखाद्या बाजारातील व्यापाऱ्यांची श्रेणी' किंवा 'व्यापाऱ्यांनी प्रसृत केलेला प्रतिकात्मक व्यापारी पैसा' किंवा 'वाणिज्याचे नाणे' अशा अनेक प्रकारांनी लावण्यात आलेला आहे.[3] यावरून विशिष्ट विषयांबाबत काही प्रमाणात स्थानिक स्वायत्तता होती हे सूचित होत असले तरी या नगरांना स्वतंत्र नगरे म्हणून मानणे शक्य नाही कारण फक्त व्यापारी श्रेणींना किंवा मोठ्या प्रमाणावरील व्यापारी संघटनांना आणि तीही प्रामुख्याने वाणिज्यविषयापुरतीच ही स्वायत्तता होती. संपूर्ण नगराला राजकीय स्वायत्तता होती असे यावरून दिसत नाही. व्यापारी श्रेणी किंवा कारागीर आपला माल बनविण्यासाठी ज्या कच्च्या मालाचा उपयोग करीत असत, तो पिकविणाऱ्या शेतकऱ्यांनी आपले कर सरळ श्रेणींकडे भरावेत अशा प्रकारची काही व्यवस्था श्रेणींबरोबर करण्यात आलेली असावी.

डायोडोरस आणि ॲरियन यांनी मूळ मजकुराचा अर्थ चुकीचा लावल्यामुळे किंवा प्रत्यक्ष परिस्थिती काय होती हे मेगॅस्थिनिसला स्पष्टपणे न सांगता आल्यामुळे स्वतंत्र नगरांचा असा उल्लेख झालेला असण्याचीही शक्यता आहे.

---

१. उपरोक्त.

२. ॲलन, **कॅटलॉग ऑफ दि कॉइन्स ऑफ एन्शंट इंडिया,** (ब्रिटिश म्युझिअम) पृ. एकशेपंचवीस, तळटीप.

३. उपरोक्त, कनिंगहॅम, **एएस्आर,** चौदा, पृ. २०, बुहलर, **इंडियन स्टडीज,** तीन, पृ. ४९.

बौद्धकालात गंगेच्या खोऱ्यात महाजनसत्ताक पद्धतीचे सरकार असलेल्या टोळ्या अस्तित्वात होत्या.[१] सिंधुखोऱ्यातील काही टोळ्यामध्ये प्रजासत्ताक पद्धतीचे सरकार असल्याचे वर्णन युरोपीय ग्रंथामध्ये आहे.[२] यांपैकी काही टोळ्या स्वतंत्र व काहीसे प्रगत जीवन जगत होत्या. मौर्यांनी हा प्रदेश जिंकल्यामुळे या टोळ्यांचा साम्राज्यामध्ये समावेश झाला असावा. चंद्रगुप्त मौर्यांच्या कारकिर्दीत हा विजय नुकताच मिळालेला असल्याने मौर्यप्रशासनाने त्यांना उदार वागणूक दिली असावी. त्यांच्या जुन्या संस्था चालू ठेवण्यास परवानगी दिली असावी परंतु एकूण प्रशासनावर मात्र मौर्यांच्या अधिकाऱ्याचे नियंत्रण असावे. या पद्धतीमुळे या टोळ्या किंवा त्यांची नगरे अर्ध-स्वतंत्र असावीत असा ग्रह निर्माण झाला असावा. जसजशी प्रशासनाची व्याप्ती वाढू लागली आणि इतर प्रांतावर अधिकाधिक नियंत्रण ठेवण्यास सुरुवात झाली तसतसे या नगरांचे उरलेले स्वातंत्र्य कमी होऊ लागले आणि अशोकाच्या कारकिर्दीत ती नगरे संपूर्णपणे साम्राज्यात विलीन झाली.

राजसत्तेच्या परंपरागत आठवणी व अधून मधून येणारे प्रजासत्ताक सरकारचे कालखंड यांचे स्पष्टीकरण, ज्याकाळात राजे निवडले जात असत त्या जुन्या काळाच्या आठवणी अजूनही ताज्या होत्या या वस्तुस्थितीवरून करता येईल. वेदकाळामध्ये सभा आणि समिती या दोन मंडळाच्या साहाय्याने चालणाऱ्या सरकारच्या पद्धतीत महाजनसत्ताकपद्धतीचे मूळ असावे. ग्रीक लेखकांना ग्रीक नगरराज्यांची कल्पना चांगलीच परिचित होती आणि स्वतंत्र नगर हा काही त्यांच्या दृष्टीने असाधारण राजकीय चमत्कार नव्हता. ग्रीकांच्या राजकीय संस्थांचे ज्ञान असल्यामुळे डायोडोरसने विवेचनाच्या ओघात स्वतंत्र नगरांचा उल्लेख मध्येच केला असावा आणि मौर्यकालीन भारतामध्ये अशासारखी एखादी संस्था अस्तित्वात असू शकणार नाही याची त्याला जाणीव नसावी, हे शक्य आहे.

मेगॅस्थिनिसच्या मूळ मजकुराचा चुकीचा अर्थ लावण्यामुळे स्वतंत्र नगरांचे उल्लेख केले गेले असावेत. विशेषतः ज्या परिच्छेदात, ज्या नगरांमध्ये राजे नाहीत तेथे निरीक्षक आपले अहवाल न्यायाधीशांकडे पाठवितात, असे सांगितलेले आहे तेथे हे शक्य आहे. ज्या नगरात राजा वा राजाचा कोणीही महत्त्वाचा प्रतिनिधी यांचा निवास नाही अशा नगरांचा मेगॅस्थिनिस उल्लेख करीत असावा.

---

१. **सुमंगल विलासनि**, दोन, पृ. ५१९, **मज्झिम कॉमेंटरी**, एक, पृ. ३९४

२. ॲरियन, **ॲनाबॅसिस**, सहा, ६, १४, मॅकक्रिंडल, **इन्व्हेजन ऑफ इंडिया. बाय अलेक्झांडर दि ग्रेट**, पृ. ३५०–५१.

म्हणजे पाटलिपुत्रात किंवा राजप्रतिनिधींच्या नियंत्रणाखालील कोणत्याही प्रांतिक राजधानीत अध्यक्षांना आपले अहवाल सरळ राजाकडे किंवा राजप्रतिनिधींकडे पाठविता येत असत. जेथे अशा प्रतिनिधींचे वास्तव्य नसे अशा इतर नगरांमध्ये साहजिकच सर्वोच्च प्रशासकीय संस्थेकडे म्हणजे न्यायाधीशांकडे अहवाल पाठविले जात. ज्या नगरांमध्ये राजप्रतिनिधी राज्यकारभार करीत असत त्यापेक्षा वेगळी म्हणून स्वायत्त नगरे, असा अर्थ मेगॅस्थिनिसला अभिप्रेत असावा. अशा स्वायत्त नगरांच्या वर्णनात, जरी ती संज्ञा चुकीची होती तरी पुढच्या लेखकांनी भर घातली असावी. आपल्या **इंडिका** या ग्रंथाचे लेखन करताना ॲरियनने या विषया-वरील आपल्या पूर्वीच्या डायोडोरसच्या लिखाणाचा विचार केला असावा कारण खास करून डायोडोरसने मेगॅस्थिनिसच्या ग्रंथातील अवतरणे उद्धृत केलेली आहेत. उदाहरणार्थ सातव्या वर्गाच्या वर्णनात ॲरियनने स्वायत्त नगरांविषयी जी माहिती दिली आहे ती त्याची स्वतःची भर असावी आणि त्याच्या मताप्रमाणे डायोडोर-सच्या विधानाचा विचार करता ते अगदी तर्कशुद्ध असावे.

साम्राज्याच्या अगदी कानाकोपऱ्यातील भागावरही राजाचे नियंत्रण होते हे त्या काळच्या प्रशासनावरून स्पष्ट होते. यासाठी एका कार्यक्षम नोकरशाहीची आवश्यकता होती. दैनंदिन जीवनातील प्रत्येक बाबीवर हे नियंत्रण होते. जरी व्यवहारात या सर्व तपशिलांवर प्रशासक देखरेख करीत नसले तरी त्यांच्या जबाबदाऱ्यांमध्ये त्यांचा समावेश केल्याचा उल्लेख आहे यावरून या अधिकाऱ्यां-कडून कोणत्या पातळीवरील संघटन अपेक्षित होते याची कल्पना येते. ही पद्धती कार्यक्षम असल्यामुळे लोकांच्या जीवनात अनेक वेळा ती हस्तक्षेपही करीत असली पाहिजे व लोकजीवनाचे नियमनही करीत असली पाहिजे. या अधिकाऱ्यां-बरोबरच **धम्म-महामत्तही** काम करीत आणि यामुळे काही प्रसंगी ही युती इतकी जबरदस्त होत असली पाहिजे की सामान्य नागरिकाला ती जाचक वाटत असली पाहिजे. आपल्या दैनंदिन कार्यात हे प्रशासन काही अंशी साम्राज्यीय व काही अंशी स्थानिक असे. केंद्राकडून धोरण निश्चित केले जाई व प्रशासनामध्ये केंद्रीकरणाची प्रवृत्ती अतिशय बलिष्ठ होती असे आज्ञालेखांवरून स्पष्टपणे दिसते. जेथे राज्यकर्ता स्वतःच कार्यक्षम असतो तेथे ही पद्धती का चांगली चालते याची कारणे स्पष्ट आहेत. परंतु दुर्बल केंद्रीय सत्तेमुळे प्रांतांवर दुष्परिणाम होणे, अटळ आहे. पूर्वकालीन मौर्यांच्या प्रशासनातील हे अंगभूत दौर्बल्य उत्तरकालीन मौर्यांच्या कारकिर्दीतील या राजघराण्याच्या ऱ्हासाला काही अंशी जबाबदार होते.




अशोकाच्या लेखांत उल्लेखिलेल्या वन्य टोळ्या

मागील पानांमध्ये वर्णिलेल्या प्रशासकीय यंत्रणेच्या चित्राचा संबंध मौर्य-कालीन परिस्थितीशी आहे. अशोकाच्या कारकिर्दीतील साम्राज्याचा भौगोलिक विस्तार, सुदैवाने खूपच निश्चितपणे दाखविता येणे शक्य आहे. त्याची विखुर-लेली शिलाशासने व स्तंभशासने हा त्याच्या अधिकाराचा निखालस पुरावा आहे. परंपरेने त्याच्या नावाशी निगडित झालेल्या जागा त्याचप्रमाणे आपल्या आज्ञालेखांमध्ये त्याने सांगितलेले आपल्या साम्राज्यातील लोकसमूह व क्षेत्रे ही विचारात घेता येतील. वायव्य दिशेकडे मानसेहरा, शहाबाझगढी आणि लम्घनपर्यंत त्याचे कोरीव लेख पसरलेले आहेत तर पश्चिमेकडच्या बाजूस त्यांचा विस्तार कंदहारपर्यंत पोहोचलेला आहे. आपल्या सीमेवरचे लोकसमूह म्हणून गांधार, कांबोज व योन यांचा उल्लेख तो करतो. त्याच्या साम्राज्याच्या पश्चिम सीमेवर सिरियाच्या दुसऱ्या अँटिओकसचा प्रदेश होता. सीमेवरचे लोकसमूह म्हणून ज्यांचा वर उल्लेख आलेला आहे तो काहीसा संदिग्ध आहे. कारण त्या शब्दांवरून ते साम्राज्यात होते की सीमारेषेलगत साम्राज्याच्या बाहेर होते हे निश्चित होत नाही. कोरीव लेखांच्या जागा विचारात घेतल्या तर वर सांगितलेले लोकसमूह त्याच्या साम्राज्याच्या आत होते असे दिसून येईल. तथापि, दक्षिण सीमेवरील लोकसमूह साम्राज्याच्या आत होते असे दिसत नाही. हे लोकसमूह म्हणजे चोळ, पाण्डच, सातियपुत्र व केरळपुत्र हे होते, यांच्या प्रदेशात अजूनपर्यंत कोणताही अशोककालीन कोरीव लेख सापडलेला नाही. अगदी दक्षिणेकडील कोरीव लेख रायचूर जिल्ह्यातील आहेत. हे लोकसमूह आणि मौर्यसाम्राज्य यांच्यामधील संबंध जास्त निकटचे होते असे दिसते. दक्षिणेकडील सीमारेषा नेमकी कोणती हे निश्चित करता आलेले नाही. चित्रदुर्ग जिल्ह्याच्या अगदी दक्षिणेच्या बाजूने ती रेषा पश्चिम किनाऱ्याकडून पूर्व किनाऱ्याकडे जात होती असे दिसते. दक्षिण सीमेच्या पूर्वेकडील बाजूस पेन्नार नदीचे खोरे हे नैसर्गिक सीमा म्हणून मानले जात असावे. पूर्वेकडे गंगेच्या त्रिभुज प्रदेशापर्यंत हे साम्राज्य विस्तारलेले होते. तामलुक हे साम्राज्याच्या आत होते, ते एक गजबजलेले बंदर होते.

राज्यकर्ते किंवा सरकारे यांची गुणवत्ता ठरविताना त्यांच्या परराष्ट्रीय संबंधांचे परीक्षण करणे आवश्यक आहे. यांमध्ये राजनीती आणि भौगोलिक सानिध्य या दोहोंवर आधारलेल्या संबंधांचा समावेश होईल. ज्या शतकात अशोक राहात होता ते शतक म्हणजे पूर्व भूमध्यसामुद्रिक प्रदेश व दक्षिण आशिया यांच्यात होणाऱ्या प्रचंड प्रमाणावरील वाहतुकीचे शतक होते. परराष्ट्रीय संबंध व साम्राज्या-बाहेरील लोकांशी संपर्क यांचे महत्त्व अशोक जाणीत होता. त्याचा बराचसा संपर्क

दक्षिणेकडील आणि पश्चिमेकडील भागांशी होता. अजून पूर्वेकडील भाग त्याच्या हितसंबंधाच्या कक्षेबाहेर होते. हे हितसंबंध एकतर्फी नव्हते असे दिसून येईल. परकीय प्रवाश्यांच्या गरजा व सुखसोयी यांवर देखरेख करण्यासाठी नगरपालिकेच्या व्यवस्थापनात खास समिती नेमण्याची गरज भासली. यावरून पाटलिपुत्रात परकीय लोकांची संख्या खूप मोठ्या प्रमाणावर असली पाहिजे. परकीय ही संज्ञा साम्राज्यातील दूरवरच्या भागातील लोकांसाठीही वापरली जात असावी कारण ते लोक पाटलिपुत्राच्या नागरिकांना ग्रीकांच्या इतकेच परकीय होते.

भारतीय लोक आपल्या देशातून कधीही स्थलांतरित झालेले नाहीत असे जरी मेगॅस्थिनिस सांगतो,[1] तरी भारतीय लोक मोठ्या संख्येने परक्या देशांमध्ये जात असत आणि दूरवरच्या जागांपर्यंत प्रवास करीत असत ही वस्तुस्थिती म्हणजे एक नवी प्रगती दिसते.[2] ही धाडसाची नवी वृत्ती, काही अंशी ग्रीक मोहिमेनंतर इतर लोकांशी परिचय झाल्यामुळे व काही अंशी परकीय देशांशी विशेषत: पश्चिमेकडील देशांशी व्यापार सुरू झाल्यामुळे निर्माण झाली असावी यात शंका नाही. हेलेनिक जगातील वेगवेगळ्या भागात अशोकाने पाठविलेल्या शिष्टमंडळांनीही हातभार लावला असला पाहिजे.[3] ही शिष्टमंडळे म्हणजे अशोकाचा शेजारी देशांशी असलेला मुख्य संपर्क होता. जरी शिष्टमंडळ हा शब्द योग्य असला तरी त्यांचे वकिलाती म्हणून वर्णन करणेही शक्य आहे. ती ज्या देशांना भेटी देतील तेथे अशोकाच्या धोरणांचा, विशेषत: त्याच्या **धम्मविषयक** धोरणाचा परिचय करून द्यावयाचा, हा त्यांचा मुख्य हेतू होता. ती कोणत्याही एका देशात दीर्घकाल वास्तव्य करीत नसत. देशोदेशी हिंडणाऱ्या, स्थानिक लोकांना उद्देशून भाषणे करणाऱ्या, देणग्या आणि संदेश यांची देवाण घेवाण करणाऱ्या आणि ही शिष्टमंडळे ज्या देशातून येतात त्या देशातील कल्पना व लोकसमूह यांच्यासंबंधी

---

१. स्ट्रॅबो, पंधरा, १, ६–८.

२. जरी भारतीय सैनिक झर्क्सिसच्या नेतृत्त्वाखाली लढले हे माहित असले तरी. हिरोडोटस, **हिस्ट्रिज**, सात, ६५.

३. तेरावे शिलाशासन, कालसी; ब्लोख, **ले एंस्क्रेपसिओं द अशोक**, पृ. १३०

औत्सुक्य निर्माण करण्यास सर्वसाधारणपणे मदत करणाऱ्या आजच्या सदिच्छा-शिष्टमंडळांशी या शिष्टमंडळांची तुलना करता येईल.[1]

जर ही शिष्टमंडळे म्हणजे निवासी वकिलाती असत्या आणि जर त्यांना काही अंशी टिकाऊ स्वरुपाचे यश मिळाले असते तर युरोपीय ग्रंथांमध्ये त्यांचा एखादा तरी उल्लेख आला असता. समकालीन साहित्य व नंतरचे कोणतेही साधन यांत यांच्याविषयी अगदीच काही माहिती नाही. या वस्तुस्थितीवरून त्यांचा प्रभाव अल्पकालीन असावा असे सूचित होते. तथापि भारतीय कल्पना व माल यांचा ओघ चालू ठेवण्यासाठी एक मार्ग सुरू करण्यात त्यांना यश मिळाले. हेलेनिक जगाला भारतीय जीवनाचा परिचय नव्हता असे नाही. या शिष्टमंडळांनी त्याच्याही पलिकडे असणाऱ्या शेजारी देशांमधील रहिवाश्यांना भारताची ओळख करून दिली. ज्या राजांनी या शिष्टमंडळांचे स्वागत केले त्या सर्वांनी **धम्मविषयक** धोरण संपूर्णपणे व ताबडतोब व्यवहारात आणावे, अशी अशोकाची अपेक्षा असणे

---

१. आपण ज्यांच्याकडे ही शिष्टमंडळे पाठविली त्या राज्यकर्त्यांनी आपल्या प्रजेसाठी औषधी वनस्पतींची लागवड करणे आणि झाडे लावणे इत्यादी आपले धोरण स्वीकारले असा दावा अशोक करतो. या कल्पनेला उत्तेजन देण्यासाठी अशोकाने बी-बियाण्यांची पाकिटे व झाडांच्या फांद्या या शिष्टमंडळांबरोबर पाठविलेल्या असणे शक्य आहे. त्या काळातील ग्रीक वनस्पतिशास्त्रज्ञांना भारतातील नव्या झाडांचे ज्ञान असल्याचा प्रत्यक्ष उल्लेख थिओफ्रेस्टसच्या वनस्पतीशास्त्रावरील ग्रंथामध्ये नाही. (रोस्टोव्हट्झेप **सोशल अँड इकॉनॉमिक हिस्ट्री ऑफ दि हेलेनिक वर्ल्ड** व्हॉ. दोन, पृ. ११६४-९, ११८२) अमोमुम आणि नार्दुम यांसारख्या भारतीय वनस्पती सेल्युकिड राज्यकर्त्यांनी रुजविण्याचा प्रयत्न केला होता व त्या भारतातून समुद्रमार्गाने आणल्या होत्या हे उघडच आहे, असे प्लिनी सांगतो. **असिअे रेगेस** व टॉलेमी राजे यांनी चंद्रसेनी उदाची झाडे लावण्याचा प्रयत्न केला होता, असेही तो म्हणतो. (**हिस्टोरिया नॅचरॅलिस**, सोळा, १३५, बारा, ५६.) या वनस्पतींचा परिचय म्हणजे अशोकाच्या शिष्टमंडळांचा प्रत्यक्ष परिणाम असावा किंवा पश्चिमी देशांकडून मसाले आणि वनस्पती यांसाठी अतिपूर्वेकडील भागांतून आधीच मागणी असल्याने व्यापारी कारणासाठी त्या वनस्पतींच्या लागवडीला उत्तेजन मिळाले असावे.

असंभवनीय वाटते. परंतु तसे घडले, असा दावा तो करतो. ज्या लोकांना या शिष्टमंडळांनी भेटी दिल्या त्यांच्यामध्ये जोपर्यंत काही औत्सुक्य निर्माण होत होते तोपर्यंत अशोकाला त्यांच्या यशाची खात्री पटली.

अशोकाच्या सातव्या स्तंभशासनासारख्या शेवटच्या महत्त्वाच्या जाहीर घोषणेत या शिष्टमंडळाचा उल्लेख नसावा ही गोष्ट कुतुहलजनक आहे. कल्याण-कारी सेवांमुळे मिळालेले यश व धम्माचा विस्तृत प्रचार यांविषयी या आज्ञालेखात अशोक सांगतो. पण ते सर्व साम्राज्यांतर्गत आहे. याचे जास्त उघड स्पष्टीकरण हेच आहे की ज्या प्रमाणात यश मिळावे अशी राजाची इच्छा होती त्या प्रमाणात ही शिष्टमंडळे यशस्वी झाली नाहीत. दीर्घ शिलाशासनांमध्ये त्याचा उल्लेख आहे त्याचे कारण ती नुकतीच पाठविलेली असल्याने उत्साहाच्या भरात राजाला त्याच्या यशाविषयी विश्वास होता, या वस्तुस्थितीत आहे. या शिष्टमंडळानी भारतीय गोष्टींविषयी औत्सुक्य वाढविले असेल परंतु त्यांनी ज्या देशांना भेटी दिल्या तेथे धम्माचे आचरण प्रस्थापित करण्याच्या दृष्टीने प्रत्यक्षात काही यश मिळाले नाही याची जाणीव होण्याइतका पुरेसा वेळ व अनुभव आपल्या कार-किर्दीच्या अठ्ठाविसाव्या वर्षापर्यंत राजाला मिळाला. अपयशाची कबुली देण्यापेक्षा त्यांचा उल्लेख करण्याचे राजाने टाळले. पण या आज्ञालेखात या शिष्टमंडळांकडे दुर्लक्ष करण्यात आले याचे जास्त खरे कारण हे आहे की या घोषणेत राजाने संपूर्णपणे अंतर्गत धोरणाच्या विषयाचे बंधन स्वतःवर घालून घेतलेले होते. श्रीलंकेत पाठविलेली शिष्टमंडळे यशस्वी झाल्याचे दिसते. तेथे तिस्स हा धम्माच्या कल्पनेचा निष्ठावंत अनुयायी बनला. इतर देशांमध्ये जी शिष्टमंडळे पाठविली होती त्यांचा उल्लेख वगळूनही या आज्ञालेखात हे यश उल्लेख करण्याजोगे होते.

मौर्यपूर्वकाळात अखमोनीय साम्राज्यात असलेला व आता अँटिओकसच्या ताब्यात असलेला, अशोकाच्या साम्राज्याच्या पश्चिम सीमेलगतचा प्रदेश हा विचार आणि कृती या दोन्ही दृष्टींनी निकटचा शेजारी होता. इराण आणि भारत यांच्यामधील संबंधाचा भरपूर पुरावा आहे. वायव्य सरहद्दीवरील भारतीय भाडोत्री सैनिक अखमोनीय सैन्यामधून अनेक वेळा लढले, यासारखे काही वरवरच्या स्वरूपाचे संबंध होते तर डरायसच्या पर्सेपोलीस येथील कोरीव लेखात सांगितल्याप्रमाणे सायरसच्या साम्राज्यात सिंधु हा भारतीय प्रांत व गांधार समाविष्ट झाले होते या सारखे अधिक टिकाऊ प्रकारचे इतर संबंध होते.[1]

१. सरकार, सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स... पृ. ६–८.

चालीरीती व संस्कृती याच्यातील काही सारखेपणांचे वर्णन, भारतावरील इराणचा प्रभाव, असे केलेले आहे. भूतकाळाकडे पाहण्याची ही वृत्ती धोकादायक आहे कारण दोन हजार वा त्याहून अधिक वर्षांपूर्वीच्या संस्कृतींच्या पद्धतींवर विसाव्या शतकातील राष्ट्रीय सीमारेषा लादण्यामधून ती वृत्ती प्रामुख्याने निर्माण झाली आहे. आजच्या इतिहासकारांनी आपल्या विषयाचा विचार एका नव्या आणि अधिक अचूक दृष्टिकोनातून करण्याची गरज, आधुनिक पुरातत्त्वशास्त्रज्ञांनी चालविलेल्या संस्कृतींच्या अभ्यासामुळे निर्माण झालेली आहे. अखमोनीयांच्या प्रभावाबाबतच्या प्रश्नासंबंधी यापूर्वी मांडलेल्या दोन विचारांपैकी एकही स्वीकारार्ह नाही. एक विचार असे सांगतो की अशोककालीन कलेतील प्रत्येक गोष्ट अखमोनीयकालीन इराणकडून उचललेली होती तर दुसरा विचार तितक्याच जोरदारपणाने असे प्रतिपादन करतो की, ती सर्व कला एतद्देशीयच आहे. अखमोनीयकालीन इराण व वायव्य भारत हे अत्यंत निकटचे सांस्कृतिक गट होते आणि त्यांच्यामध्ये साम्य असणे अपरिहार्य होते, हे पुरातत्त्वशास्त्राने दाखवून दिलेले आहे. त्या काळी ज्ञात असलेले जग लहान होते परंतु परस्परांमध्ये होणारी बरीचशी वाहतूक व व्यापार यामुळे ते गजबजलेले होते, यामुळे स्थानिक गरजांपेक्षा अधिक असा सांस्कृतिक प्रगतीचा व्याप वाढला व धर्मशास्त्रातील ठराविक मतांपेक्षा धार्मिक चळवळींचा प्रभाव वाढला.

इराण आणि भारत यांच्यातील काही समान चालीरीती हा व्यावहारिक गरजेचा परिणाम होता आणि अनेक संस्कृतींमध्ये अशा समान चालीरीती असतात. उदाहरणार्थ, काही विशिष्ट प्रसंगी डोक्याचे मुंडन करणे ही एक इराणी पद्धतीची शिक्षा आहे असे वर्णन केलेले आहे.[1] **अर्थशास्त्र** आणि **महावंस** या दोन्ही ग्रंथांमध्ये त्याची नोंद एक शिक्षा म्हणूनच केलेली आहे.[2] परंतु ही शिक्षा आजच्या भारतातही व्यवहारात रुढ झालेली आहे. गुन्हेगार अधिक उठून दिसावा म्हणून त्याच्या भुवया कापल्या जातात. याच कारणाने पूर्वीच्या काळीही शिक्षेचा एक प्रकार म्हणून त्याचा उपयोग केला जाई यात शंका नाही. इतर चालीरीतींपैकी बऱ्याच चालीरीती समान वंशपरंपरेमुळे रुढ होत्या. पूर्वकालीन आर्यांच्या समान गटामधून इराणी व भारतीय आर्य आलेले असल्याने नव्या प्रदेशांमध्ये दोन्ही गट स्थायिक

---

१. किंगस्मिल, **ॲथेनियम**, १९ जुलै १९०२, स्मिथ, **अर्ली हिस्ट्री ऑफ इंडिया**, पृ. १३७ अं. २.

२. **अर्थशास्त्र**, चार, ९, **महावंस**, सहा. ४२.

झाले तरी त्यांनी आपल्या जुन्या चालीरीती पुढे चालू ठेवणे साहजिकच आहे. राजाच्या जन्मदिवशी समारंभपूर्वक केस धुण्याची प्रथा ही अशीच असावी.[1]

समान संस्कृतीबाबत पुढचा पुरावा म्हणजे डरायसचे आज्ञालेख आणि अशोकाचे आज्ञालेख यांच्यामधील साम्य. अशोकाला डरायसच्या आज्ञालेखांविषयी ज्ञान होते की नाही याविषयी निश्चितता नाही. अखमोनीय राज्यकर्त्यांनी शिला-पृष्ठांवर कोरीव लेख कोरले हे अशोकाला माहीत असावे आणि त्याने तसे करण्याचे ठरविले असावे. संबोधण्याच्या पद्धतीमधील सारखेपणावरून अशोकाने एखाद्या इराणी आज्ञालेखातील मजकूर वाचलेला असावा असे सूचित होते.

'थतिय दरयवुश क्षयाक्षय...'[2]

'असे डरायस राजा म्हणतो.'

असे शब्द डरायस वापरतो.

अशोक पुढील शब्द वापरतो.

'देवानंपिय पियदस्सि राजाएवम् अह.'[3] 'देवांचा प्रिय, प्रियदर्शि राजा असे म्हणतो...' 'असे राजा म्हणतो...' असे फक्त आज्ञालेखांची सुरुवात करणारे सूत्र अशोकाला माहित होते हीही शक्यता आहे आणि इराणी आणि भारतीय राजांपैकी बऱ्याच जणांनी बहुधा ते वापरले असावे.

डरायसच्या आज्ञालेखांपेक्षा अशोकाच्या आज्ञालेखांमधील सूर नक्कीच कितीतरी अधिक विनम्र आहे.[4] आज्ञालेखांमधील मजकुरांमध्ये फरक असल्यामुळे प्रामुख्याने हा फरक आहे. डरायसला प्रामुख्याने स्वतःचा मोठेपणा आणि आपल्या यशाची थोरवी जाहीर करावयाची होती. जरी काही आज्ञालेखांमध्ये आपल्या यशाविषयीचा अभिमान व्यक्त करण्याचा मोह अशोकाने आवरला नसला तरी अधिक करून त्याचा हेतू धम्माची शिकवण देणे हाच होता. दोन्ही राजांनी धारण. केलेल्या बिरुदांमध्ये हा फरक अधिक स्पष्टपणे दिसतो: 'महाराज, राजाधिराज, ज्या देशांमध्ये सर्व प्रकारची माणसे राहतात अशा देशांचा राजा, या थोर विस्तीर्ण पृथ्वीचा राजा असा मी डरायस .' असे डरायस स्वतःविषयी लिहितो.[5]

---

१. हिरोडोटस्, हिस्ट्रीज, नऊ, ११०, स्ट्रॅबो, पंधरा, ६९.

२. सनार, आयए, व्हॉ. वीस, पृ. २५५–६.

३. तिसरे शिलाशासन, गिरनार, ब्लोख, ले एंस्क्रेपसिऑं द अशोक, पृ. ९५.

४. सीएफ्, कोसंबी, इंट्रोडक्शन टु दि स्टडी ऑफ इंडियन हिस्ट्री, पृ. १८९

५. घिर्षमन, इराण, पृ. १५३.

तितकाच प्रभाव असलेला आणि तितकेच मोठे साम्राज्य असणारा अशोक स्वतः-विषयी, 'देवांचा प्रियदर्शि राजा..' असा उल्लेख करतो.[1]

मौर्य साम्राज्याच्या वायव्य भागातील रहिवासी व अखमोनीयकालीन इराणमधील रहिवासी यांच्यामधील भाषिक साम्यावरून संस्कृतींमधील हे साम्य केवळ कल्पनांपुरतेच मर्यादित नाही हे स्पष्ट आहे. उत्तरेकडील शाहबाझगढी व मानसेहरा येथील आज्ञालेखांमध्ये केलेला खरोष्ठीचा वापर हा इराणशी घनिष्ट संबंध असल्याचा पुरावा आहे. तक्षशिलेतील अॅरेमिक कोरीव लेखाचा अवशेष व कंदहार येथील अॅरेमिक कोरीव लेख हे या दोन प्रदेशांमध्ये परस्परात दळणवळण चालू असल्याचे दर्शवितात. दीर्घ शिलाशासनांमधील उत्तरेकडच्या मजकुरांमध्ये 'डिपि' व 'निपिष्ट' या इराणी शब्दांचा केलेला वापर या कल्पनेला अधिक पुष्टी देणारा आहे.[2]

अशोकाचा राज्यपाल, योनराज तुषास्प हा अपरांताच्या भागाचा राज्य-कारभार पाहात होता असे रुद्रदामनचा जुनागड येथील कोरीव लेख सांगतो.[3] तो ग्रीक असल्याचे वर्णन हा कोरीव लेख करतो. परंतु ते नाव निश्चितपणे इराणी आहे. अलेक्झांडरच्या मोहिमेनंतर वायव्य भागात ग्रीक वसाहती निर्माण झाल्या. या वसाहतवाल्यांचे मूळ ग्रीक सैन्यातील पळून गेलेल्या सैनिकांमध्ये होते किंवा बुद्धिपुरस्सर मागे राहणाऱ्यांमध्ये होते. इराणी संस्कृतीचा प्रभाव असलेल्या एखाद्या भागात काही काळ राहिलेला तुषास्प इराणी किंवा भारतीयही असू शकेल. अलेक्झांडरच्या स्वारीचे अवशेष पार भडोचपर्यंत शोधावयाचे होते असे पेरिप्लस हा ग्रंथ सांगतो.[4] अलेक्झांडरची मोहीम या भागापर्यंत कधीच पोहोचलेली नव्हती तरी मौर्यांच्या काळात गुजरातशी ग्रीकांचा संबंध असावा व भडोचमधील एखाद्या लहानशा ग्रीक वसाहतीच्या आधारावर पेरिप्लसने हे खोटे विधान केले असावे.[5] भारतावरील मोहिमेच्या वेळी अलेक्झांडरने भाडोत्री इराणी सैनिकांना

---

१. अशोकाने घेतलेल्या बिरुदांविषयीच्या पुढील चर्चेसाठी दुसरे परिशिष्ट पाहावे.
२. हुल्टश, **कॉपर्स इन्स्क्रिप्शनम इंडिकारम्**, व्हॉ. एक, पृ. त्रेचाळीस.
३. सरकार, **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स** .पृ. १६९.
४. **दि एरिथ्रिअन सी** ४१, ४७.
५. या विषयावरील अधिक चर्चेसाठी नारायण, **दि इंडो-ग्रीक्स** पृ. ३४, ८९, ९३–९४ पाहावे.

घेतले असावे यात शंका नाही आणि असे सैनिक या जागी पळून आले असावेत याचीही तितकीच शक्यता दिसते. म्हणजे तुषास्प हा भारतीय ग्रीक किंवा भारतीय इराणी कुळातील एखाद्या महत्त्वाच्या ग्रीक किंवा इराणी कुटुंबातून आलेला असावा.

अखमोनीयकालीन इराण व मौर्यकालीन भारत यातील काही बांधकामांच्या वास्तुकलेतील साधर्म्याने टीकेला खूपच वाव मिळालेला आहे. पाटलिपुत्राचा राजवाडा हे एक विशेषत्वाने लक्षात येण्याजोगे उदाहरण आहे व सुसा, एक्बटाना आणि पर्सिपोलिस येथील राजवाड्यांशी त्याची तुलना करण्यात आलेली आहे.[1] पर्सिपोलिस येथील राजवाड्यासारखाच त्याचा जमिनीवरील आराखडा आहे. पर्सिपोलिस येथील मध्यवर्ती सभागृहात सरळ रेषेत शंभर खांब आहेत तर पाटलिपुत्रातील सभागृहात ऐंशी खांब आहेत. पाटलिपुत्रातील दगडापैकी एका दगडावर असलेल्या पाथरवटाच्या चिन्हाशी पर्सिपोलिसमध्ये आढळणाऱ्या चिन्हांशी इतके साम्य आहे की कारागिरांचे मूळ समान असावे असे सुचविता येईल. याच आधाराने स्तंभशीर्षावर प्राणी असलेल्या अशोकस्तंभासंबंधी चर्चा केलेली आहे. आम्ही सुचविल्याप्रमाणे जर ते खरोखरच तक्षशिलेत घडविले गेले असतील तर हे साम्य तर्कशुद्ध वाटण्याजोगे आहे आणि त्याचे आश्चर्य वाटण्याजोगे नाही.

मौर्यकालाने आणखी पश्चिमेकडे, बाबिलोनियाशी व्यापार व वाणिज्य यांबाबत प्रगती झालेली पाहिली.[2] भारत आणि पश्चिमेकडील देश यांच्यात दळणवळण होण्यास या गोष्टींची खूपच मदत झाली कारण त्यामुळे सागरी मार्ग खुला राहिला आणि ग्रीकांबरोबर संबंध ही काही एक नवी प्रगती नव्हती. ग्रीकांसाठी वापरला जाणारा **योन** किंवा **यवन** हा शब्द इराणकडून आलेला होता. इराणी लोकांचा प्रथम आयोनियन ग्रीकांशी संबंध आला आणि म्हणून ग्रीका-विषयी सर्वसाधारण उल्लेख करताना त्यांनी **योन** ही संज्ञा वापरली. संस्कृतमध्ये हा शब्द **यवन** झाला. तो बहुधा ' पश्चातबुद्धिजन्य ' असावा असे दिसते. प्राकृतात तो **योन** असा येतो.[3] अलेक्झांडर येण्यापूर्वीच्या काळात सिंधूच्या पलिकडच्या भागात आणि अफगाणिस्तानात ग्रीक वस्ती असल्याचा पुरावा आहे बाल्ख आणि

---

१. वॅडेल, **डिस्कव्हरी ऑफ दि एक्झॅक्ट साइट ऑफ अशोकाज क्लासिक कॅपिटल अॅट पाटलिपुत्र.**

२. **बेव्हन, हाऊस ऑफ सेल्युकस,** व्हॉ. एक, पृ. २३९.

३. रॅप्सन, **इंडियन कॉइन्स,** पृ. ८६.

समकंद यांमधील भागात झर्सेस याने आयोनियन ग्रीकाची वसाहत वसविल्याचा दावा करण्यात आलेला आहे. **ब्रांकिडाए** असा त्यांचा उल्लेख करण्यात आलेला आहे व नंतरच्या काळात जेव्हा या भागात अलेक्झांडरची मोहीम सुरू झाली तेव्हा त्यांची कत्तल करण्यात आली.[1] स्वात नदीच्या खोऱ्यातील निसा येथील लोकांना अलेक्झांडरने प्रश्न विचारले तेव्हा त्यांनी आपण ग्रीकांचे वंशज असल्याचे सांगितले.[2] पाणिनीच्या ग्रंथात यवन-लिपीचा उल्लेख आहे आणि हा ग्रंथ मौर्यपूर्व आहे असे मानले जाते.[3] तत्कालीन भारतावर अलेक्झांडरच्या मोहिमेचा फारच थोडा तात्कालिक ठसा उमटलेला दिसत असला तरी स्थानिक लोकांना त्या मोहिमेमुळे ग्रीकांच्या पद्धतींचा निश्चितपणे परिचय झालेला असला पाहिजे.

वेगवेगळ्या ग्रीक राजांनी भारतीय राजदरबारात, विशेषतः मौर्यकाळात आपले वकील पाठविले. यावरून त्यांना भारताविषयी आस्था वाटत होती हे उघड आहे. मेगॅस्थिनिस, डैमॅकस, डायोनिसिथिस हे पाटलिपुत्राच्या राजदरबारात होते. मेगॅस्थिनिस हा अधिकृत वकील म्हणून आला होता की एक खाजगीरीत्या भेट देण्यास आला होता याविषयी निश्चिती नाही कारण या मुद्यावर वेगवेगळ्या साधनांचे एकमत होत नाही. पूर्वकालीन संबंध लक्षात घेता भारतीय लोक अशोकाने शिष्टमंडळे पाठविण्यापूर्वीच्या काळातही ग्रीकांच्या केंद्राना भेटी देत असण्याचा संभव आहे. परंतु अशा भेटींचे वृत्तान्त अजूनपर्यंत तरी सापडावयाचे आहेत. अशोकाच्या शिलाशासनांमध्ये योनांचे उल्लेख आहेत. संदर्भानुसार काही वेळा तो शब्द वायव्य भागातील ग्रीक वसाहतींना किंवा इतर वेळी हेलेनिक राज्यांना उद्देशून वापरलेला आहे. सिरियाचा दुसरा अँटिओकस थिऑस याचे नाव अधिक वेळा सांगितलेले आहे. पूर्वीच्या कौटुंबिक संबंधामुळे व भौगोलिक दृष्टया अँटिओकस हा सर्वात निकटचा ग्रीक राज्यकर्ता असल्यामुळे इतर ग्रीक राजांपेक्षा अशोकाला त्याची अधिक माहिती असावी हे समजण्याजोगे आहे. अशोकाने ज्यांच्याकडे शिष्टमंडळे पाठविली होती ते इतर हेलेनिक राजे म्हणजे इजिप्तचा दुसरा टॉलेमी फिलॅडेल्फस, सायरेनेचा मगस, मॅसिडोनियाचा अँटिगोनस गोनाटास व एपिरसचा अलेक्झांडर.

---

१. स्ट्रॅबो, अकरा, ११, ४, चौदा, १, ५, नारायण, **दि इंडो–ग्रीक्स**, पृ. ३.

२. ॲरियन, **इंडिका**, एक, ४–५.

३. पाणिनी, ४, १, ४९, कात्यायन, **वार्तिक**, पाणिनीवरील तिसरे, ४, १, ४९.

वायव्य सीमेवर बहुधा नेमकी सीमारेषा नसावी. कदाचित सबंध सीमेवर ग्रीकांच्या लहान लहान वसाहती असाव्यात आणि मौर्यांच्या राज्याशी त्यांचे संबंध मित्रत्वाचे राहावयाचे की शत्रुत्वाचे राहावयाचे ते प्रामुख्याने तक्षशिलेतील स्थानिक राजप्रतिनिधीशी असलेल्या त्यांच्या संबंधावर अवलंबून असावे. मौर्यांच्या राज्याचे त्यांच्यावर बरेचसे प्रत्यक्ष नियंत्रण असले पाहिजे यात शंका नाही. या वसाहतींमध्ये जरी प्रामुख्याने ग्रीकांची वैशिष्टचे असली तरी भारताच्या निकट सानिध्यामुळे त्यांच्यावर भारतीयांची बरीच छाप पडली असावी. साम्राज्यात आणि साम्राज्यालगत असलेल्या या केंद्रांमध्ये **धम्म–महामत्तांनी** काम केलेले असले पाहिजे. या कामाला बाहेरच्या भागातही जोराचा आक्षेप घेतला गेला नसावा कारण हे काम म्हणजे रस्ते बांधणे आणि औषधी वनस्पतींची लागवड करणे यासारख्या कल्याणकारी योजनांना मदत करण्यासाठी होते. त्यांच्या भौगोलिक सानिध्यामुळे ते मौर्यांच्या ' वर्चस्वक्षेत्रात ' आलेले असावेत.

उत्तरेकडे काश्मीरबरोबरचे संबंध वेगवेगळ्या विद्वानांनी गृहीत धरले आहेत परंतु अशोकाच्या नियंत्रणाचा विस्तार नेमका किती होता याविषयी प्रत्यक्ष पुरावा नाही. श्रीनगर अशोकाने वसविले असे **राजतरंगिणीमध्ये** कल्हण सांगतो.[1] दुसऱ्या एका आख्यायिकेनुसार, तक्षशिलेतील बंडाळी मोडून काढल्यानंतर अशोकाने खश हा आजच्या काश्मीरच्या नैर्ऋत्येकडील भाग जिंकला.[2] कुणालाला आंधळा करण्यास जे जबाबदार होते व ज्याना खोतानच्या पूर्वेकडील भागात हद्दपार करण्यात आले होते अशा अधिकाऱ्यासंबंधी एक गुंतागुंतीची कथा ह्यूएन्त्संग सांगतो.[3] अगदी याच वेळी खोतानच्या पश्चिमेकडील भागात स्थिर झालेल्या एका परागंदा चिनी राजपुत्राशी त्याचा या पूर्व भागात संघर्ष घडला. वाङ्मयीन पुराव्यावरून काश्मीर भागात बऱ्याच घडामोडी होत होत्या असे दिसते. पण दुर्दैवाने अशोकाच्या काळातील म्हणून निश्चितपणे सांगता येतील असे कोणतेही अवशेष या भागाने दिलेले नाहीत. तौलनिकदृष्टया हा भाग दुर्गम

---

१. एक, १०१–७; हे नगर म्हणजे आजच्या श्रीनगरच्या उत्तरेला तीन मैलांवर असलेले पंद्रेथान, असे दाखविण्याचा प्रयत्न कनिंगहॅमने केलेला आहे. (**एन्शंट जॉग्रफी ऑफ इंडिया**) पृ. ११०.

२. तारानाथ, **गेशिश्ट डेस बुद्धिस्मुस इन इंडिएन**, सहा, पृ. २७; स्टाईन **जेएएसबी**, जादा अं. क्र. २, १८९९, पृ. ६९.

३. वॅटर्स, **ऑन युआन च्वांग्ज ट्रॅव्हल्स इन इंडिया**, व्हॉ. दोन, पृ. २९५.

असल्यामुळे वायव्य सीमेइतके महत्त्व या भागाला निश्चितच नव्हते. साम्राज्यामध्ये खश हा भाग समाविष्ट झालेला होता यावर विश्वास न ठेवण्यास कोणतेही कारण नाही. जरी काश्मीर हा भाग प्रत्यक्ष साम्राज्यात नव्हता तरी तो सर्व भाग मौर्यांच्या वर्चस्वक्षेत्रात येत असला पाहिजे व या भागातील लोकांना इतर सीमावासीयांप्रमाणेच दर्जा असला पाहिजे.

बुद्धाच्या मृत्यूनंतर २५० वर्षांनी, इ. स. पू. २३६ मध्ये अशोकाने खोतानला भेट दिली असे तिबेटी परंपरा सांगते.[1] अशोकाच्या कारकिर्दीत भारतीय व चिनी यांनी खोतानचे राज्य स्थापन केले याचीही नोंद आहे व यात सांगितलेल्या घटनाही ह्यूएन्त्संगने सांगितलेल्या आहेत तशाच आहेत. कदाचित त्याने खोतानला भेट दिली तेव्हा प्रथम हे ऐकले असावे. अशोकाचा खोतानचा प्रवास ही काही विशेष खात्रीलायक गोष्ट वाटत नाही. आपल्या कारकिर्दीच्या तेहेतिसाव्या वर्षी तो निदान साठ वर्षांचा तरी असला पाहिजे व पर्वतराजीमधून असा कष्टदायक प्रवास त्याला करता येणे क्वचितच शक्य आहे. खोतानमध्ये त्याने धम्मासाठी शिष्टमंडळे पाठविलेली असण्याची मात्र शक्यता आहे.

आधुनिक नेपाळच्या भागाशी अशोकाचे निकटचे संबंध असावेत असे दिसते. त्याचा एखादा भाग तरी त्याच्या साम्राज्यात असावा कारण रुम्मिनदेइला अशोकाने दिलेली भेट ही काही परक्या देशाला दिलेली भेट म्हणून मानता येणार नाही. या भेटीच्या वेळी त्याची मुलगी चारुमती त्याच्याबरोबर होती व देवपाल या नेपाळमधील क्षत्रियाबरोबर तिचा विवाह झाला होता अशी आख्यायिका आहे.[2] अशोक राजपुत्र असतानाच त्याने नेपाळमधील बंड दडपले, असे मानले जाते, ही गोष्ट जरी बाजूला ठेवली आणि जरी नेपाळचा भाग त्याच्या प्रशासनाखाली येत नसला तरी तराईचा भाग निश्चितच त्याच्या प्रशासनाखाली येत असला पाहिजे. अशोकाने स्वतः नेपाळला प्रत्यक्ष भेट दिली असे नेपाळी आख्यायिका सांगते. हा उल्लेख त्याच्या रुम्मिनदेइच्या भेटीविषयी असावा किंवा याच वेळी त्याने आणखी पुढे जाऊन नेपाळमध्ये प्रवास केला असावा.[3] नेपाळमधील काही मंदिरांचा संबंध अशोकाशी जोडण्यात आलेला आहे. यात पश्चिम

---

१. जेएएसबी, १८८६, पृ. १९५–७.

२. ओल्डफिल्ड, **स्केचेस फ्रॉम नेपाळ,** व्हॉ. दोन, पृ. २४६–५२. **आयए** व्हॉ. तेरा, पृ. ४१२, राइट, **हिस्ट्री ऑफ नेपाळ,** पृ. ११०.

३. तारानाथ, **गेशिश्ट डेस बुद्धिस्मुस इन इंडिएन,** पृ. २७.

नेपाळमधील स्वयंबुनाथच्या टेकडीवरील बौद्ध भिक्षूंनी बांधलेल्या पवित्र ठिकाणाचा समावेश होतो.[१] या देवळाला प्राचीनत्व व प्रतिष्ठा मिळवून देण्यासाठी ही नंतरच्या काळात रचलेली कथा असणे शक्य आहे.

पूर्वेकडे वंग हा प्रांत मौर्यसाम्राज्यात समाविष्ट झालेला होता. कारण या भागातील एक प्रमुख बंदर, ताम्रलिप्ती हे मौर्यकालातील अनेक सागरी केंद्रांपैकी एक अतिशय महत्त्वाचे केंद्र होते. श्रीलंकेकडे जाणारी व येणारी भारतीय शिष्ट-मंडळे या बंदरातून प्रवास करीत असे सांगितले जाते.[२] कलिंग जिकल्यामुळे पूर्व भारतात मौर्यसत्ता बलिष्ठ झाली असली पाहिजे. अलीकडील उत्खननांमध्ये गंगेच्या त्रिभुज प्रदेशातील विस्तीर्ण मौर्य वसाहतींचा पुरावा मिळालेला आहे यात आश्चर्य नाही.[३]

दक्षिण भारतातील अशोकाच्या सत्तेचा विस्तार व प्रभाव यांविषयी उत्तर भारतापेक्षा अधिक चांगले पुरावे सापडलेले असले तरी येथेही बऱ्याच गोष्टींसाठी तर्काचाच आधार घ्यावा लागतो. वाङ्मयीन व उत्कीर्ण अशा दोन्ही साधनांमध्ये याविषयी पुरावा मिळतो. अशोकवर्मन हा कांचीच्या राज्यकर्त्यांपैकी एक होता, असे एक उत्तरकालीन पल्लव सनद सांगते.[४] हा उल्लेख मौर्यसम्राटाचा किंवा हेच नाव धारण करणाऱ्या दक्षिण भारतीय राजाचाही असू शकेल. काही बौद्ध ग्रंथांपेक्षा दक्षिण भारतीय साधने काही मर्यादेपर्यंत अधिक विश्वसनीय मानता येतील कारण विशेष महत्त्वाच्या उत्तर भारतीय राज्यकर्त्यांशी घटनांचा संबंध जोडून प्रतिष्ठा मिळविण्याचा प्रयत्न दक्षिणेकडील आख्यायिकांमध्ये दिसत नाही. याशिवाय अशोकाच्या कारकिर्दीविषयी विचार करताना मूळ आख्यायिकांमध्ये फिरवाफिरव करायला तेथे बौद्ध बखरकार नव्हते. गाविमठ, पालकिगुंडु, ब्रह्मगिरी, मस्की, येर्रगुडी, सिद्दापूर आणि जटिंग–रामेश्वर या दक्षिण भारतातील जागी

---

१. लिव्ही, **ल नेपाळ**, पृ. १०, ११.

२. **महावंस**, अकरा, ३८.

३. **एआय**, १९५३, व्हॉ. नऊ, पृ. १५४. कलकत्ता विद्यापीठाच्या अशुतोष संग्रहालयाने चंद्रकेतुगड (गंगेच्या त्रिभुज प्रदेशातील दक्षिण भागात) या ठिकाणी चालविलेल्या उत्खननामध्ये अनेक मौर्यकालीन पुरावशेष आढळले आहेत.

४. **साऊथ इंडियन इन्स्क्रिप्शन्स**, व्हॉ. दोन, पृ. ३४२.
**एपिग्राफिया इंडिका**, व्हॉ. वीस, पृ. ५०.

सापडलेल्या अशोकाच्या आज्ञालेखांचा समावेश उत्कीर्ण पुराव्यांमध्ये होतो. या जागांमुळे त्याच्या साम्राज्याच्या दक्षिण सीमा काहीशा दाखविल्या जातात. या आज्ञालेखांमध्ये या भागातील लोकसमूहांचेही उल्लेख आलेले आहेत.

दगडावर कोरीव काम करण्यात विशेष कुशल असणाऱ्या अशा परकीय स्थलांतरितांकडून इ. स. पू. तिसऱ्या किंवा दुसऱ्या शतकात तांत्रिक काव्य लिपिबद्ध करण्याचे काम प्रथम झाले अशी एक आख्यायिका आहे.[१] परकीय स्थलांतरित म्हणजे दक्षिणेकडे पसरत जाणाऱ्या आर्यांच्या टोळ्या होत्या. दगडावरील कोरीव कामाचा उल्लेख हा निश्चितपणे अशोकाचा काळ सूचित करतो. जर ही आख्यायिका स्वीकारता आली तर उत्तरेकडून ब्राह्मी लिपी येईपर्यंत, दक्षिण भारतात लिपी माहितच नव्हती असे आपण म्हणू शकू. साम्राज्यातील दक्षिणेकडील भाग जिंकल्याची जबाबदारी प्रामुख्याने बिंदुसारावर पडते.[२] इसवी सनाच्या पहिल्या तीन शतकांमधील तामिळ वाङ्मयात ममुलनर व इतर तामिळ कवी नंदांचा व मौर्यांचा उल्लेख करतात. पाटलिपुत्रामध्ये खजिना जमा करणारे व नंतर तो गंगेच्या पाण्यात लपविणारे असे नंदांचे वर्णन करण्यात आलेले आहे.[३] तामिळ काव्यसंग्रहामध्ये मोरियरच्या स्वारीचा उल्लेख आहे तो मौर्यांविषयीचा आहे असे दिसते.[४] वडुकर या तामिळ प्रदेशाच्या उत्तरेकडील भागातून येणाऱ्या या सैन्याला एका अरुंद खिंडीतून आत शिरणे शक्य झाले नाही म्हणून त्याना माघार घेणे भाग पडले, असे त्याचे वर्णन आहे. एका प्रसंगी त्यांना यश मिळाले पण त्या खिंडीचे संरक्षण करणारांनी त्यांचे तेजस्वी चक्र खाली आणले. सूर्याची भूमी म्हणून वर्णन केल्या जाणाऱ्या एका मोठ्या राज्यातून ते आले असल्याचे सांगितलेले आहे यावरील टीका असे स्पष्टीकरण देते की ही टेकडी वेल्लीमल्लाय किंवा चंदेरी पर्वतातील असावी आणि तिचे संरक्षण करणाऱ्या वडुकर भागाचा जो उल्लेख आहे त्यावरून आंध्र किंवा कन्नड–तेलगू लोकांना उद्देशून तो असावा असे सुचविता येईल.[५] या टीकेमध्ये सूर्याची भूमी म्हणजे आदित्यमंडळ असे स्पष्टीकरण

१. अयंगार, दि हिस्ट्री ऑफ दि तामिळस्, पृ. २१५.
२. पहिले प्रकरण पहा.
३. अहम्, २६५.
४. पुरम्, १७५, ६–९, अहम्, ६९, १०-१२, अहम्, २८१, ८-१२, अहम्, २५१, १०.
५. एज् ऑफ दि नंदाज् अँड मौर्याज्, पृ. २५५.

दिलेले आहे. दक्षिणेकडील राज्यांवर मौर्यांनी मिळविलेला विजय त्यांना सहजासहजी मिळालेला नव्हता असे दिसते. कदाचित या आठवणीने आणि इतर काही कारणांनी अती दक्षिणेकडील प्रदेशावर विजय मिळविण्यासाठी जाण्यास अशोकाला थोपविले असावे. इसवी सनाच्या पहिल्या शतकातील तामिळ वाङ्मयात करकडचा एक उल्लेख आहे.[१] ही उत्तरेकडील साम्राज्याची सीमारेषा होती. अशोकाच्या साम्राज्याच्या दक्षिणेकडील मर्यादांशी बरीचशी जुळणारी अशी ही रेषा आहे.

दक्षिण भारतात चोलांच्या राज्यात एक व पांड्यांच्या राज्यात एक असे दोन स्तूप पाहिल्याचे व ते दोन्ही अशोकाने बांधले असे सांगितले असल्याचे ह्यूएन्त्संग सांगतो.[२] बौद्धधर्मप्रचारक या भागामध्ये पोहोचलेले असावेत असे यावरून सुचविता येते. कावेरी नदीच्या दक्षिणेकडील राज्यात अशोक व महिंद यांनी बांधलेल्या स्तुपांचा उल्लेख पुढे हा चिनी यात्रेकरु करतो. त्याने भेट दिलेल्या जागांशी अशोकाचे साहचर्य जोडून, त्या जागांची प्राचीनता व महत्त्व त्याच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न त्याला माहिती पुरविणारे लोक करीत होते, अशी खात्री देणे आम्हाला शक्य नाही. कदाचित दोन आख्यायिकांचा गोंधळ झाल्यामुळेही असे असेल. दक्षिण भारतातील या राज्यांमध्ये अशोकाने आपली धम्माविषयक शिष्टमंडळे पाठविली असली पाहिजेत. ही शिष्टमंडळे कदाचित निवासी शिष्टमंडळे असावीत. बौद्धधर्मप्रचारकही याच सुमारास येथे आले असावेत व ते मठ बांधीत असावेत आणि अशोक हा निष्ठावंत बुद्धानुयायी असल्याचे जाहीर करीत असावेत. महिंद जर समुद्रमार्गाने श्रीलंकेला गेला असेल तर श्रीलंकेला जाताना वाटेवरच्या या जागी तो थांबला असला पाहिजे.

ही दक्षिणेकडील भारतीय राज्ये सुधारणेच्या दृष्टीने कोणत्या पातळीवर होती हा एक कुतूहलजनक प्रश्न आहे. आणखी तीन शतकांनी रोमन साम्राज्याबरोबरच्या महत्त्वपूर्ण व्यापाराचा विकास करण्यास ती राज्ये समर्थ ठरली यावरून अशोकाच्या काळात ती बरीचशी प्रगत असली पाहिजेत असे सूचित होते. अशोकाच्या काळात मौर्यांच्या अधिसत्तेला या राज्यांचा संपूर्णपणे विरोध नसावा ही शक्यता आहे आणि त्यामुळे आणखी दक्षिणेकडे जाऊन विजय मिळविण्याची अशोकाला गरज भासली नसावी. कलिंगच्या अनुभवामुळे

---

१. अय्यंगार, **दि बिगिनिंग्ज ऑफ साऊथ इंडियन हिस्ट्री**, पृ. ८३.

२. वॅटर्स, **ऑन युआन च्वांग्ज ट्रॅव्हल्स इन इंडिया**, व्हॉ. दोन, पृ. २२५, २२८.

युद्धासाठी युद्धात पडण्यास तो फारसा उत्सुक राहिला नसावा. तामिळ काव्यात मौर्यांच्या सैन्यबलाचे जे वर्णन आहे, त्यावरून मौर्यांच्या सैन्य-दलाचा दक्षिणेकडील लोकांवर दांडगा प्रभाव पडलेला असावा व एकाच पिढीपूर्वी दक्षिणेकडील विजय या सैन्याने मिळविलेला असल्यामुळे मौर्यांविषयी जबरदस्त दरारा निर्माण झाला असावा यात शंका नाही. मौर्यसम्राटापुढे मान तुकविण्याच्या त्यांच्या निर्णयाला कलिंगयुद्धाच्या हकिगतीने महत्त्वपूर्ण हातभार लावला असावा. अशोकाच्या साम्राज्याच्या बाहेर असलेल्या या राज्यांनी अशोकाचे नाममात्र सार्वभौमत्व स्वीकारले असावे व इतर सीमांवरील लोकांप्रमाणे **धम्म-महामत्तांना** आपल्या राज्यात प्रवेश करण्यास अनुमती दिली असावी पण प्रत्यक्षात ती राज्ये साम्राज्याचा भाग बनली नसावीत.

अशोकाच्या संपूर्ण कारकिर्दीत श्रीलंका हे दक्षिणेकडील शेजारी असलेले राज्य मित्रभावाने वागले. तंबपन्नीच्या नावावर काढलेल्या आज्ञालेखांमध्ये याचा उल्लेख आलेला आहे.[1] भारत व श्रीलंका यांच्यामधील संबंधाविषयी श्रीलंकेच्या बखरींमध्ये माहिती मिळते. पुढच्या शतकांमध्ये यात जरी काही गोष्टी घुसडलेल्या असल्या तरी पुरावा म्हणून आपण त्यांचा उपयोग करू शकू. महिंदाचे श्रीलंके-मधील आगमन हा काही या दोन्ही देशांमधील पहिला अधिकृत संबंध नव्हता. महिंद्राच्या प्रवासापूर्वीच श्रीलंकेमध्ये **धम्मविषयक** शिष्टमंडळे पाठविलेली होती हे तेराव्या शिलाशासनावरून स्पष्ट होते. अशोकाच्या पूर्वी भारताबरोबर श्रीलंकेचा संबंध होता इतकेच नाही तर महिंदाच्या आगमनापूर्वीच श्रीलंकेमध्ये बौद्धधर्म येऊन पोहोचलेला होता हे या पुराव्यावरून बरेचसे स्पष्टपणे दिसते. देवानम्पिय तिस्स या राजाचे बौद्धधर्म स्वीकारण्यासाठी महिंदाने मन वळविले हे त्याचे प्रामुख्याने महत्त्व आहे व त्यामुळे या धर्माला श्रीलंकेमध्ये जवळ जवळ अधिकृत स्थान प्राप्त झाले. श्रीलंकेच्या उत्तर भागात

---

१. काही लोकांच्या मते तंबपन्नी म्हणजे दक्षिण भारतातील तिन्नेवेल्ली जिल्ह्यातील ताम्रपर्णि नदी. हे मत आता साधारणतः चुकीचे ठरले आहे कारण इतर अनेक साधनांमध्ये तंबपन्नी हे नाव श्रीलंकेसाठी वापरण्यात आलेले आहे. (उदाहरणार्थ **दीपवंस**, पाच, ८०, नऊ, २० सतरा, ५. **रामायण**, चार, ४१, १७). तेराव्या शिलाशासनात ज्या संदर्भात हे नाव आलेले आहे त्यामुळे दुसऱ्या मताला पुष्टी मिळाली आहे.

महिंद आला. दक्षिण भागात अतिशय प्राचीन स्तुपांचे अवशेष आहेत.[1] यावरून तेथे आधीच्या काळापासून बौद्ध मंदिरे अस्तित्वात असावीत असे दिसते. संख्येच्या दृष्टीनेही मंदिरांचे अवशेष उत्तरेकडील भागात कमीच आढळतात.

श्रीलंकेतील बौद्धधर्माच्या आगमनामुळे, धर्मप्रचारकांनी वापरलेली भाषा कोणती हा प्रश्न उपस्थित होतो. पूर्वीच्या बौद्धधर्मप्रचारकांनी प्राकृतमधून शिकविण्यास आधीच सुरुवात केलेली होती असे दिसते. दक्षिण भारतातील आज्ञालेख प्राकृतमध्ये कोरलेले आहेत यावरून दक्षिणेकडील भागामध्ये ही भाषा संपूर्णपणे अज्ञात नसावी असे सूचित होते. भारतातून विजयचे आगमन म्हणजे सुधारणेचा प्रवाह अशी जी कथा श्रीलंकेच्या बखरींमध्ये आहे तिला काही महत्त्व आहे.[2] कदाचित, भारतातून फार मोठ्या प्रमाणावर सागरी दलाचे स्थलांतर झाल्याने या बेटावर मिळविलेला सांस्कृतिक आणि राजकीय विजय, या कथेच्या आवरणाखाली असावा. विजयच्या कुळाविषयी असलेली विचित्र आख्यायिका त्याचप्रमाणे परिनिर्वाणाच्या दिवशी त्याने श्रीलंकेच्या भूमीवर पाऊल टाकणे, यावरून विजयला असामान्य व्यक्ती बनविण्याचा एक उघड उघड प्रयत्न असावा असे दिसते. विजयच्या दौऱ्याचा एक भाग म्हणून बुद्धानुयायी त्याच्याबरोबर आले असावेत हे शक्य आहे व त्यानी आपल्याबरोबर प्राकृत भाषा आणली असावी यात शंका नाही. श्रीलंकेमधील प्राकृत कोरीव लेखांपैकी सर्वात जुना लेख, तिस्साचा वारस उत्तिय याच्या काळातील आहे आणि भाषेच्या दृष्टीने अशोककालीन प्राकृतापेक्षा त्यात विशेष फरक नाही व ते लेख ब्राह्मी लिपीत कोरलेले आहेत.[3] यावरून महिंदाच्या आगमनाच्या पूर्वीपासूनच प्राकृत भाषेला इतिहास होता, त्यामुळे अधिकृत लिखाणात तिचा वापर करणे अधिक न्याय्य ठरले असावे.

---

१. उपराजपालक असलेला तिस्साचा भाऊ दक्षिण श्रीलंकेतील रोहेन येथील बौद्धमठात पळून गेला असे वर्णन महावंस या ग्रंथात (बावीस, २-९) आहे. अगदी दक्षिणेकडे असलेल्या या मठाचे अस्तित्व, महिंदाच्या आगमनापूर्वीच तो मठ प्रस्थापित झालेला असावा असे दर्शविते.

२. महावंस. सात.

३. एपिग्राफिया झेलानिका, व्हॉ. एक, पृ. १३९, तळटीप. रितिगाल इन्स्क्रिप्शन्स.

पूर्व भारतातील वंगराज्यातून विजय आल्याचे वर्णन श्रीलंकेतील बखरी करतात. परंतु त्याच्या मूलस्थानाविषयी काहीसा गोंधळ असावा असे दिसते. श्रीलंकेचा प्रवास करीत असताना सुप्पारकमध्ये तो प्रथम उतरला असे वर्णन आहे.[1] सुप्पारक म्हणजे आजचे सोपारा असल्याने भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील एखाद्या भागातून तो आला असावा असे सूचित होते. आपले पूर्वज भारताच्या पश्चिम किनाऱ्याकडून आले अशी सिंहली लोकांमध्ये जी ठाम समजूत आहे तिला यामुळे पुष्टी मिळते.[2] जुन्या सिंहली भाषेवर जरी पूर्वेकडील प्राकृत भाषेचा पगडा होता तरी 'स' ऐवजी 'ह' वापरण्याच्या पद्धतीमुळे तिचे मूळ पश्चिमेकडे असावे असे सूचित होते. ज्यावेळी अरिथ्य पाटलिपुत्राचा प्रवास करतो. तेव्हा तो समुद्रमार्गाने जातो व नंतर विंध्य पर्वत ओलांडतो हे लक्षात घेण्याजोगे आहे. त्यावरून त्याने प्रथम पश्चिम किनाऱ्याने व नंतर विंध्य पर्वत ओलांडून पाटलिपुत्रापर्यंत प्रवास केला असे दिसून येते.[3] यावरून श्रीलंकेतील भारतीय वसाहतवाले पूर्व आणि पश्चिम या दोन्ही बाजूंनी आले असावेत असे दिसते आणि श्रीलंकेतील बखरींमधील गोंधळ या दोन आख्यायिकांमुळे झाला असावा. महिंदाच्या आगमनापूर्वी श्रीलंकेमध्ये सर्व पंथांचे लोक राहात होते असे महावंस सूचित करतो. विजयची पत्नी झालेली राजकन्या पाण्ड्यांच्या राज्यातून आलेली होती. यावरून त्या कालात दक्षिण भारत व श्रीलंका यांचा बराच संबंध होता.[4] तिचे बुद्धाशी नाते होते असे सांगण्यात आलेले आहे. ती व तिच्या सख्या भिक्षुणींच्या वेषाने आल्या हेही चमत्कारिक आहे. प्रवासामध्ये संरक्षणाचे एक साधन म्हणून त्यांनी तसे केले असावे. महिंदापूर्वीच श्रीलंकेत बौद्धधर्म परिचित होता हे यावरूनच सूचित होते. अशोकाच्या कारकिर्दीच्या चौदाव्या वर्षी अशोकाचे **धम्ममहामत्त** आल्याने अस्तित्वात असलेले संबंध दृढ झाले यात शंकाच नाही. यानंतर तिस्स राजाचे धर्मांतर करण्यासाठी व श्रीलंकेमध्ये बौद्ध संघाची संघटना करण्यासाठी महिंद आला.[5]

---

१. **महावंस**, सहा, ४६, **दीपवंस**, नऊ, २६.
२. **सीएच्क्यू**, १९५२, जानेवारी, अं. २, व्हॉ. एक, पृ. १६३ तळटीप.
३. **दीपवंस**, पंधरा, ८७.
४. **महावंस**, सात, ४८.
५. अधिकरम, **अर्ली हिस्ट्री ऑफ बुद्धिझम इन सिलोन**, पृ. ४८.

अशोकाचा श्रीलंकेशी असलेला संबंध केवळ राजकीय स्वरुपाचा नव्हता. तो आणि तिस्स यांच्यात अतिशय निकटचे संबंध होते. तिस्साच्या राज्याभिषेका-पूर्वी पाच वर्षे श्रीलंकेमध्ये पाठविलेल्या **धम्म–महामत्तांच्या** सहवासात तरुण तिस्स आलेला असला पाहिजे. अर्थातच या अधिकाऱ्यांच्या कार्यामधून अशोकाच्या व्यक्तिमत्त्वाची छाप तिस्सावर पडली असावी. कदाचित आपल्यापेक्षा वडील असणाऱ्या या राजाचा आदर्श त्याने आपल्यापुढे ठेवण्याचे ठरविले असेल. अशोकाच्या कारकिर्दीच्या सतराव्या वर्षी त्याचा पहिला राज्याभिषेक झाला आणि काही काळाने दुसरा राज्याभिषेक झाला तेव्हा त्याने या भारतीय राजाच्या प्रतिनिधीला आमंत्रण दिले. या सन्मानाची परतफेड करण्यासाठी अशोकाने देणग्या व एक शिष्टमंडळ पाठविले. अशोकाचा वैयक्तिक प्रतिनिधी या नात्याने बहुधा महिंद या शिष्टमंडळाबरोबर आला असावा आणि इतर भिक्षू त्याच्या बरोबर आले असावेत यात शंका नाही.[1] तिस्साने बौद्धधर्माचा स्वीकार केला आणि तो राज्यधर्म म्हणून मान्य केला असे दिसते. अशोकाविषयी त्याला वाटत असणाऱ्या कळकळीमुळे बहुधा त्याने 'देवानम्पिय' हे बिरुदही स्वीकारले.[2] तिस्साच्या उत्साहावरून तो अशोकाचा मांडलीक होता असे मात्र म्हणता येणार नाही. इतर गोष्टींप्रमाणेच परस्परांविषयी वाटणाऱ्या कौतुकावर आधारलेले ते नाते होते. जरी अनेक शिष्टमंडळांची बरीचशी देवाण घेवाण झालेली असली तरी श्रीलंका हे एक स्वतंत्र राज्य राहिले. या दोन देशांमध्ये व्यापारविषयक सवलती दिल्या जात होत्या यात शंका नाही आणि त्यामुळे राजकीय बंध दृढ झाले



---

१. दुसरे प्रकरण पाहावे.

२. हे एक राजकीय बिरुद होते असे समर्थन करता येण्याजोगे आहे. परंतु श्रीलंकेतील राजांपैकी हे बिरुद धारण करणारा तोच पहिला राजा होता हे महत्त्वपूर्ण आहे.

# ५ : धम्म विषयक धोरण

'न्यायीपणाची भावना निष्कारणच तिचा (कर्मे आणि कर्मगती यांच्या ज्या साखळीकडे महत्त्वाकांक्षी माणसे खेचली जातात तिचा) निषेध करण्याच्या फंदात पडते. गांजलेल्या लोकांच्या लक्षावधी प्रार्थना उगीचच सूडदेवतेला आवाहन करतात, हा थोर पुरुष वारंवार, अजाणता उच्चतर इच्छा पुऱ्या करतो आणि या व्यक्तीच्या रुपाने एक युगारंभ व्यक्त होतो; परंतु आपणच आपल्या काळावर राज्य करीत आहोत आणि त्याचे स्वरुप ठरवीत आहोत, असा त्याचा स्वतःविषयी समज असतो. कॉन्स्टंटाईन आणि त्याचा काल, याविषयीचा बर्कहार्डट्चा निर्णय साररुपाने असा व्यक्त होतो.[१] कॉन्स्टंटाईन किंवा त्याच्यासारखा कोणताही महत्त्वाकांक्षी पुरुष म्हणजे संपूर्णपणे त्याच्या काळाचे तो फळ असतो असे बर्कहार्डट् येथे सुचवित नाही तर कोणताही मनुष्य आपल्या काळाच्या बाहेरचा वा फार आधीचा नसतो असे तो सुचवित आहे. स्वदेशबांधवांच्या मोठ्या गटाचा विरोध पत्करून, आपला वंश, आपला समाज, आपला समुदाय यांवर वर्चस्व गाजविणारा एक मनुष्य हा काही स्वतःच्या काळात एखादा अवचित अवतरलेला प्रेषित किंवा एखादा आसुरी बुद्धिमंत किंवा एखादा अलौकिक द्रष्टा म्हणून जन्माला आलेला नसतो. ज्या गटातून त्याचा उत्कर्ष झाला त्याचे पृथक्करण केल्यावर आपले स्थान आणि सत्ता यांचा पाया घालण्यासाठी ज्या गोष्टींचा उपयोग स्वतःला करता येईल अशा गोष्टींची पाळेमुळे त्या गटातच दडलेली त्याला दिसतात. एखाद्या समाजातील व्यक्तींच्या प्रवृत्तींना जबाबदार असणाऱ्या विशिष्ट परिस्थितींच्या त्या प्रामुख्याने प्रतिक्रिया असतात. त्या परिस्थितींशी केलेली तडजोड वा त्यांचा स्वीकार वा धिक्कार यातून त्या प्रवृत्ती निर्माण झालेल्या असतात.

सत्तेवर असणाऱ्या माणसाच्या धोरणाला अनेकदा व्यक्तिगत स्वभाव-वैचित्र्ये जबाबदार असतात आणि तो मनुष्य ज्या मोठ्या समाजातील आणि काळातील असतो त्यांच्याशी त्यांचा संबंध नसतो असे काही वेळा म्हटले जाते. पण व्यक्तीची ही उघड दिसणारी स्वायत्तताही फक्त वरवरची आहे. अनेक वैयक्तिक कृतींमागे सामाजिक दडपण किंवा निदान त्या एकाकी माणसांच्या बाहेरचा सामाजिक दबाव असतो असे चौकशीअंती जाणवते. ज्या विश्वसनीय गूढ पुरुषांचे आंतरिक जीवन एकाकी असते आणि त्यांच्या भोवतालच्या स्त्रीपुरुषांच्या कृतींवर

---

१. दि एज ऑफ कॉन्स्टंटाईन दि ग्रेट, पृ. २६२.

ते अवलंबून नसते (जरी हाही एक वादग्रस्त मुद्दा आहे तरी) त्यांचा अपवाद वगळला तर इतर माणसांच्या कृतींना, ते ज्या लोकांमध्ये राहात असतात त्यांच्या विचारांच्या व कृत्यांच्या अनुभवामुळे वळण लागत असते.

अशोक काही मनोराज्यात गुंगणारा नव्हता. तसेच बौद्धधर्मीचे वा इतर खास ज्ञान लाभलेला तो एखादा प्रेषितही नव्हता. त्याच्या कालाच्या मानाने त्याच्या कल्पना फार प्रगत होत्या व त्या अकाली व्यक्त केल्यामुळे अपयशी ठरल्या या मताशीही आम्ही सहमत नाही. अशोक हा एक वेगळाच चमत्कार होता असे न मानता त्या कल्पनांच्या ऐतिहासिक पार्श्वभूमीच्या संदर्भात आपण विचार केला तर अशोकाने धम्माचे धोरण का स्वीकारले व त्यामुळे कोणता हेतू साध्य झाला ते स्पष्ट होते. त्याच्या कालाचा अधिक चांगला परिचय होण्यासाठी आपल्याला मौर्यांच्या पूर्वीची परिथिती, मौर्यकालात झालेली बौद्धधर्माची प्रगती आणि बौद्धधर्म व अशोकाच्या कल्पना यांच्यामधील संबंध यांचा अधिक विचार केला पाहिजे.

मौर्यांचे आपल्या काळातील सामाजिक व बौद्धिक जीवनाशी जे विविध संबंध होते त्यावरून तत्कालीन कल्पनांविषयी व बौद्धिक प्रवाहांविषयी मौर्यांनी असाधारण सक्रिय आस्था दाखविली हे स्पष्ट होते. आपल्या उत्तर आयुष्यात चंद्रगुप्ताने जैन धर्माचा स्वीकार केला, सनातनी जैन पद्धतीला साजेसे उपासमारीने येणारे मरण स्वीकारण्यासाठी सिंहासनाचा त्याग करून भटके संन्यस्त जीवन पत्करले, असे सांगितले जाते.[1] स्वतः राजा बनण्यासाठी व साम्राज्य निर्माण करण्यासाठी त्याला कोणत्या अडचणींना तोंड द्यावे लागले त्यांचा विचार करता भटका संन्यासी होण्यासाठी त्याने आपल्या कारकिर्दीच्या शेवटी राज्यत्याग करावा ही गोष्ट क्वचितच संभवनीय वाटते. तरीही जर त्याने महावीराची शिकवण अंगिकारली असेल व तो जैन झाला असेल तरच हे शक्य आहे. त्याचे कूळ हलके म्हणजे वैश्य होते या वस्तुस्थितीत या आस्थेचे मूळ कारण असावे आणि जैनधर्माचा स्वीकार करून त्याने उच्च जातीच्या सरदारवर्गाचा तिरस्कार टाळला. परंतु या कालात महावीराची शिकवण म्हणजे हिंदुधर्माचीच एक शाखा, एक कडकडीत शिस्तबद्ध आचरण मानले जात असल्याने आणि जैनधर्मीय स्वतःला पूर्वीच्या धर्माचाच एक उपपंथ मानीत असल्याने वरील कल्पना आपण त्याज्य ठरवू शकतो. ही आस्था प्रामुख्याने बौद्धिक होती. जातींच्या नियमांच्या आधारावर ज्यांचे

---

१. परिशिष्टपर्वन आठ, ४३५–४५.

सामाजिक नीतिशास्त्र आधीच ठरून गेलेले होते त्या उच्चवर्णीय हिंदूंच्या नजरेतून जैनधर्माचा स्वीकार केल्याने कोणाचीही सामाजिक प्रतिष्ठा वाढली नाही.

बुद्धाला अगदी समकालीन असणाऱ्या महावीराने जैनधर्म प्रस्थापित केला. साहजिकच बौद्धधर्म आणि जैनधर्म यांच्यात काही समान गोष्टी आहेत. निर्ग्रंथ या नावाने ओळखल्या जाणाऱ्या साधूंच्या मेळघात सामील होऊन महावीराने आयुष्यक्रमाला सुरुवात केली. यानंतर हीच संज्ञा जैन साधूंसाठी वापरण्यात येऊ लागली. जैनांच्या समजुतीप्रमाणे निसर्गनियमाला अनुसरून विश्वाचे कार्य चालू असते. यामुळे परमेश्वराच्या अस्तित्वाविषयी कोणताही विचार करण्याची गरज राहात नाही. प्रगती आणि अधोगती यांच्या नियमित हालचालीसारख्या लाटांच्या एका मालिकेमध्ये विश्व चालते. मानवी शरीर म्हणजे आत्म्यावर चढलेले निव्वळ एक पुट आहे आणि आत्मा जेव्हा त्याच्या मूळच्या शुद्ध स्थितीत येतो तेव्हाच पुनर्जन्मातून मुक्ती मिळविणे शक्य होते. आजच्या प्रमाणे त्याही काळात जैन-धर्माला प्रामुख्याने व्यापारी वर्गातून पाठिंबा मिळाला.

तथापि, चंद्रगुप्ताच्या दरबारात जैनधर्म हाच एकटा प्रभावी नव्हता. येथे निश्चितपणे उपस्थित असलेल्या काही थोडया ग्रीकांसारख्या परकीयांनीही धर्म-विचारांना काही अंशी हातभार लावला असावा. चंद्रगुप्त अलेक्झांडरला प्रत्यक्ष भेटला होता असे काही युरोपीय ग्रंथांनी सांगितलेले आहे. परंतु आजच्या काळातील निदान एका तरी इतिहासकाराने या घटनेविषयी शंका घेतलेली आहे.[1] सेल्यूकसचा मित्र म्हणून मेगॅस्थिनिस आला आणि काही काळ पाटलिपुत्राच्या दरबारात तो राहिला हे आपल्याला माहित आहे. ग्रीस आणि आशिया मायनर येथील विचारधारा आणि संस्था यांच्याशी त्याचा परिचय असल्याने त्याला खूपच मोठया प्रमाणावर अनेक प्रश्न निश्चितपणे विचारले गेले असले पाहिजेत. त्याने भारताविषयी जी माहिती लिहीली आहे त्यावरून तो उत्साही निरीक्षक व बुद्धिमान मनुष्य असावा असे दिसते. ते लक्षात घेतल्यास त्याने या प्रश्नांना उत्साहाने प्रतिसाद दिलेला असला पाहिजे.

राज्याच्या वायव्य भागात तक्षशिला नगरीमध्ये या परकीय लोकांचे आणि भारतीय व ग्रीक यांच्या संमिश्र बौद्धिक जीवनाचे केंद्र होते. सिंधुप्रदेशामधील व त्याच्याही पलीकडील पश्चिम भागातील ग्रीक वसाहतींच्या सीमेजवळ असल्याने आणि महत्त्वाच्या राजरस्त्यावर असल्याने भारतीय व पाश्चात्य कल्पनांच्या दोन

१. पहिले प्रकरण पाहावे.

प्रवाहांचे एकत्रीकरण करण्यासाठीही या नगराने एखाद्या मुशीसारखे काम केले. त्याचप्रमाणे प्रांतिक राजधानी असल्याने अधिकृत प्रतिष्ठा या नगराला होती व ते वाणिज्य व्यवहाराचे केंद्र होते. यामुळे जरी भारतीय सनातनी पद्धतीला या परकीय कल्पनांमुळे मुरड घातली गेली नाही तरी त्यांना निदान सहजीवनास मुभा मिळण्यासारखी संतोषजनक परिस्थिती होती. परस्परांविषयी सामंजस्य आणि आदर बऱ्याच मोठ्या प्रमाणावर निश्चितपणे निर्माण झालेला असला पाहिजे.

चंद्रगुप्त आणि सेल्यूकस यांच्यामधील वैवाहिक स्नेहबंधाविषयी सुरस शक्यतांविषयी आपण पुन्हा एकदा तर्क करू शकतो. त्याविषयीचे कलम कागदोपत्रीच राहिलेले असो किंवा प्रत्यक्षात आलेले असो, एक किंवा त्याहून अधिक ग्रीक स्त्रियांचा मौर्यांच्या दरबाराच्या वर्तुळात प्रवेश झालेला असला पाहिजे. यावरून सनातनी हिंदुधर्मातील ताठरता वेळप्रसंगी सुधारकी मतांना सामावून घेण्याइतपत लवचिक असावी असे सूचित होते. यापुढच्या काळातील अनेक राजघराण्यांच्या राजवटींपेक्षा मौर्यांच्या दरबारातील वातावरण बरेच मोकळे होते असे दिसते. एक लहान मुलगा म्हणून अंतःपुरातील या ग्रीक स्त्रियांच्या सहवासात अशोक राहिलेला असला पाहिजे.

अशोकाचा पिता बिंदुसार याला समकालीन प्रवृत्तींविषयी जाणीव असावी असे दिसते. त्याचा पिता चंद्रगुप्त हा जैनधर्मीय होता, असे जे सांगितले जाते तसाच तोही जैनधर्मीय होता असे सांगणारा पुरावा नाही. जर चंद्रगुप्त जैनधर्माचा कट्टर अनुयायी असेल तर बिंदुसारही जैनधर्माचा पक्षपाती असू शकेल. म्हणजे बौद्धधर्म किंवा जैनधर्म यांसारख्या सुधारकी पंथांमध्ये अशोकाला रस असावा अशी अपेक्षा करणे गैर नाही. तो तरुण असताना खुद्द राजदरबारातच जो धार्मिक अभिरुचीबाबतचा मनाचा उदारपणा होता त्याचा प्रथम अशोकाला चांगला अनुभव आला असावा. मौर्यांच्या दरबारामध्ये वेगवेगळ्या पंथांचे अनुयायी बहुधा अगदी मोकळेपणाने वावरत असावेत.

अशोक गर्भावस्थेत असताना व त्याच्या जन्माच्या वेळी एका आजीविक साधूने त्याच्याविषयी भाकित वर्तविले होते. यावरून राजदरबारात आजीविकांचे स्वागत केले जाई हे आपल्याला माहीत आहे.[१] ग्रीसमधून भेट म्हणून एक सोफिस्ट विचारवंत पाठवावा अशी विनंती बिंदुसाराने केली होती.[२] यावरून विविध कल्पनांच्या चर्चेमध्ये बिंदुसाराला पुरेसा रस वाटत होता हेही आपल्याला माहीत

---

१. **दिव्यावदान**, सव्वीस, पृ. ३७०, तळटीप.

२. **अथेनिअस**, तीन, ४४.

आहे. अशोक ज्या वातावरणात राहात होता व लहानाचा मोठा झाला ते पाहता सनातनी धर्ममतांशी संपूर्णपणे न जुळणारे असे जीवनाचे सुधारकी तत्त्वज्ञान त्याने स्वीकारले असावे अशी शक्यता नाकारता येणार नाही.

मौर्यकालाच्या आधीपासूनच ब्राह्मणीधर्माचा विकास एका जटिल धार्मिक पद्धतीत झालेला होता. धार्मिक तत्त्वज्ञानाचे मंथन व धर्मविधी या अनेक धर्मांमध्ये असलेल्या दोन प्रवृत्तींनी ब्राह्मणीधर्मात अतिशय गुंतागुंत करून ठेवलेली होती. वैदिक धर्मविधी अजूनही प्रचलित होते परंतु त्यांचे बाह्योपचार समकालीन गरजांना साजेसे असे झालेले होते. धर्मविधीचा एक महत्त्वाचा भाग म्हणून यज्ञ टिकून राहिले होते परंतु पुरोहित आणि महाजन यांसारख्या द्विज जातींनाच ते करता येत असत. काही प्रसंगी व्यापारी समाजातील बरेच श्रीमंत असलेले लोकही ते करीत. दुसरी प्रवृत्ती म्हणजे धार्मिक तत्त्वज्ञानाच्या मंथनाची. हिचे मूळ खुद्द ऋग्वेदातच होते. यातून हळूहळू अनेक पंथांचा उदय झाला. प्रत्येक पंथ विश्वाच्या रहस्याविषयी वेगळ्या पद्धतीने किंवा वेगवेगळ्या पद्धतींचे एकीकरण करून स्पष्टीकरण देऊ लागला. या पंथांमध्ये बौद्ध, आजीविक व निग्रँथ हे सर्वात महत्त्वाचे पंथ होते.[१] या तीन पंथांचे सिद्धांत केवळ तत्त्वज्ञानात नवे बदल घडवून आणण्यापुरतेच नव्हते, तर सर्वसाधारण लोकांवरही त्यांचा प्रभाव पडला.

या तीन पंथांपैकी बौद्धधर्म नक्कीच सर्वात अधिक महत्त्वाचा होता. सनातनी वृत्तीच्या ब्राह्मणधर्मातून फुटून निघण्यासाठी त्याने चळवळ सुरू केली. संसारातून, ऐहिक जीवन आणि पुनर्जन्माचे चक्र यांच्या शृंखलांमधून मुक्त होण्याच्या हेतूची प्रेरणा त्यामागे होती. बऱ्याच अंशी तर्कशुद्ध विचारावर आधारलेल्या 'मध्यम मार्गाच्या' कल्पनेत यावर उपाय सापडला. मध्यम मार्गाचा सिद्धांत पूर्वकालीन हिंदु परंपरेत रुजलेला होता परंतु अशिक्षित लोकांना तो कधी उमगण्यासारखा नव्हता. या दृष्टीने हिंदूंचे धर्मविधी आणि धर्मविचार यांमध्ये जो अनाचार घुसलेला होता त्याला बौद्धधर्माचा विरोध होता. धर्मविचारातील अनिष्टता ही प्रामुख्याने ब्राह्मणांना असलेल्या अधिकारामुळे आलेली होती. हे ब्राह्मण स्वतःला देवाचे लाडके समजत. त्यांना प्रतिष्ठित आयुष्य उपभोगावयास मिळे व त्यामुळेच अधिकाधिक ऐहिक सत्ताही त्यांच्याकडे चालत आली.

अशा प्रकारे जरी कोणत्याही एका दीर्घ काळात बौद्धधर्माने भारतातील एक स्वतंत्र राज्यधर्म बनण्याइतका टप्पा गाठलेला नसला तरी त्याच्या सुरवा-

---

१. सातवे स्तंभशासन, दिल्ली-टोप्रा. ब्लोख.
**लॅ एंस्क्रेपसिओं व अशोक, पृ. १७०.**

तीच्या काळात, ब्राह्मणीधर्माने राजकीय व सामाजिक जीवनावर जी पकड बसविली होती तिच्याविरुद्ध एक जबरदस्त चळवळ त्याने चालविली. युरोपमधील धर्मसुधारणेच्या चळवळीच्या काळात प्रॉटेस्टंटपंथाने कॅथॉलिक चर्चशी फारकत घेतल्याने जी पोकळी निर्माण झाली तिच्याशी या कालातील पोकळीशी तुलना करता येईल. परंतु हे साम्य तंतोतंत नाही कारण युरोपमधील प्रॉटेस्टंटपंथाप्रमाणे बौद्धधर्म ही काही ब्राह्मणीधर्मापासून केवळ फुटून निघण्याची चळवळ नव्हती. कारण त्याच्या धर्मविधींमध्ये लोकप्रिय संप्रदाय आणि प्रथा यांचा समावेश झालेला होता व हळूहळू ब्राह्मणी धर्मापासून तो एक वेगळा धर्म म्हणून मानला जाऊ लागला. वस्तुतः भारतामध्ये बुद्धाला प्रवचने करावी लागली व एक संपूर्णपणे नवी धर्मसंघटना उभी करावी लागली कारण हिंदुधर्माच्या सुरवातीपासूनच अशा प्रकारच्या संघटनेचा अभाव होता. जर हिंदुधर्माची उभारणी एखाद्या ऐतिहासिक व्यक्तीच्या शिकवणुकीवर आणि एखाद्या धर्मपीठाच्या नित्य कार्यावर झाली असती तर बौद्धधर्माचा आरंभ आणि अंत हा फुटीर वृत्तीच्या लोकांची एक दुफळी पाडणारी चळवळ म्हणून झाला असता.

सैद्धांतिक मतभेद हे वेगवेगळ्या पंथांमधील परस्परांमधील विरोधाचे कारण होते. धर्मशास्त्राच्या वर्तुळात आणि सामान्य अनुयायांमध्ये त्यांची चर्चा होई. ही परिस्थिती परत युरोपमधील धर्मसुधारणेच्या आणि प्रतिधर्मसुधारणेच्या काळातील विविध ख्रिस्ती मतांच्या विरोधासारखीच आहे. ब्राह्मणांकडून सातत्याने विरोध झाल्याने व समाजातील इतर वर्गात वाढती समज आल्याने व त्यांच्याकडून वाढता पाठिंबा मिळाल्याने बौद्धधर्म म्हणजे फुटीर मताच्या लोकांचा एक गट म्हणून न राहता एक स्वतंत्र धर्म म्हणून विकसित होण्यास सुरवात झाली.

सुरवातीच्या अवस्थांमध्ये बौद्धधर्माला व्यापारी वर्गाकडून मोठ्या प्रमाणावर पाठिंबा मिळाला, याचे स्पष्टीकरण त्याच्या जातिव्यवस्थेविषयीच्या दृष्टिकोनात मिळते. बुद्ध स्वतः क्षत्रिय होता आणि ब्राह्मणांची सत्ता कमी करण्याच्या विरुद्ध ही चळवळ नव्हती. तत्त्वतः त्याने जातिव्यवस्थेला थोडासा किंवा जराही पाठिंबा दिलेला नव्हता. व्यापारी वर्गांना झपाट्याने आर्थिक महत्त्व मिळू लागले असले तरी सामाजिक दृष्ट्या अजूनही ते हलके मानले जात होते व ब्राह्मण आणि क्षत्रिय यांच्याकडून दिली जाणारी ही हीन वागणूक त्यांना सलणारी होती यात शंका नाही. तत्त्वतः वैश्यांचा समावेश द्विजांमध्ये होत असला तरी व्यवहारात त्यांना साधारणतः तिरस्कृत वागणूक मिळत होती.[1] म्हणूनच जे सामाजिक दृष्ट्या

१. ऐतरेय ब्राह्मण. सात २०.

हीन मानले जात असत अशांना बौद्धधर्माने पुरस्कारलेली सामाजिक समता अतिशय आकर्षक वाटणे साहजिक होते.

समाजातील खालच्या वर्गांना बौद्धधर्माने निश्चितच आवाहन केले. त्यातील अत्यावश्यक गोष्टी साध्यासुध्या मनाला सहज समजल्या. जीवनातील समस्यांवर त्याने मध्यम मार्गाचा व्यवहारी तोडगा दाखविला. गूढ अध्यात्मविद्येचे सूक्ष्म ज्ञान व्हावे किंवा अव्यवहार्य असा संयमाचा आणि तपश्चर्येचा मार्ग स्वीकारावा अशी मध्यम मार्गाची अपेक्षा नव्हती. शिवाय धर्मविधींसाठी खर्चिक मागण्याही त्यानें केल्या नाहीत.

अशोकाच्या काळात बौद्ध भिक्षू आणि भिक्षुणी यांच्या संघांमार्फत बऱ्याच मोठ्या प्रमाणावर बौद्धधर्माचा प्रचार झालेला होता. हिवाळ्यात व उन्हाळ्यात भिख्खू बौद्धधर्माची शिकवण देत असत व पावसाळ्यामध्ये आपापल्या मठांमध्ये परतत असत. कष्टेकारक यज्ञाऐवजी चैत्यसंप्रदाय आणि स्तूपपूजा यांच्याभोवती बौद्धधर्मातील विधी केंद्रित झालेले होते. पूर्वीच्या काळी चैत्य म्हणजे पृथ्वीवरील आत्मे व सुपीकतेचा संप्रदाय यांच्याशी साहचर्य असलेली एक पवित्र बंदिस्त जागा असे.[१] अशा प्रकारे बौद्धधर्माने साध्या समाजाला आकर्षून घेण्यावर व लोकप्रिय संप्रदायांचा समावेश करण्यावर भर दिला पण त्याचवेळी त्यांमध्ये जो जादु-टोण्याचा वा अंधश्रद्धेचा भाग होता त्याविषयी आग्रह धरला नाही. बुद्ध किंवा बौद्ध संघांमधील श्रेष्ठ भिक्षू यांची रक्षा ज्यात ठेविलेली असते असा करंडक म्हणजे स्तूप. सांचीप्रमाणेच बहुतेक ठिकाणी चैत्याचे साहचर्य असलेल्या जागी मठ किंवा विहार बांधला गेला. लिंगप्रतिकाचा किंवा चिन्हांकित मोठ्या दगडाचा अवशेष म्हणून वाटोळा स्तंभ हे बौद्धसंप्रदायाचे आणि एक लक्षण असावे असेही सूचित करण्यात आलेले आहे.[२] जरी याबाबतीत अजून काही निश्चित संबंध प्रस्थापित केला गेलेला नसला तरी ही विचार करण्याजोगी कल्पना आहे. अशोकाच्या काळात मोठी देवळे किंवा मंदिरे यांचा अभाव दिसतो. पूजेसाठी बुद्धप्रतिमेचा वापर करण्याची सर्वसामान्य प्रथा त्या काळात पडली नव्हती या वस्तुस्थितीत त्याचे स्पष्टीकरण देता येण्याजोगे आहे. इसवी सनाच्या पहिल्या

---

१. सांची येथील प्रवेशद्वारांवरील शिल्पामध्ये याचे स्पष्ट दर्शन होणे शक्य आहे. येथे झाड व स्त्री या विषयांचा जो संबंध आहे त्याचे स्पष्टीकरण वरील कल्पनेच्या आधारे करता येण्यासारखे आहे.

२. बॅशॅम, **दि वंडर दॅट वॉज इंडिया.** पृ. २६३

शतकातील बुद्धप्रतिमा टिकून राहिल्याची उदाहरणे गांधार येथे सापडली आहेत. तथापि, बुद्धाच्या पहिल्या प्रतिमा गांधारमध्ये नव्हे तर मथुरेमध्ये घडविल्या गेल्या, असे सुचविण्यात आलेले आहे.[1] परंतु त्यांचे मूळ कोठेही असले तरी टिकून राहिलेल्या प्रतिमा मौर्योत्तर काळातील आहेत.

मौर्यकाळ म्हणजे तर्कशुद्ध विचार आणि सांस्कृतिक प्रगती यांच्या सर्वोच्च विकासाचा काही थोडया शतकांचा काळ होता. पूर्वकालीन आर्यांच्या भटक्या पशुपालन-संस्कृतीपासून नागरी स्वरुपाच्या अधिक स्थिरावलेल्या संस्कृतीपर्यंत झालेल्या बदलास, लोखंडाच्या वाढत्या वापरामुळे सुधारलेले तंत्रज्ञान बऱ्याच अंशी कारणीभूत झाले. नवीन जमिनींची साफसफाई झाली व लोकसंख्या पूर्वेकडे सरकू लागली. गंगेच्या खोऱ्यातील सुपीक जमीन हे सुस्थिर होण्यास व वसाहती करण्यास चांगले क्षेत्र होते. इ. स. पू. ८०० ते ६०० यामधील काळात हा बदल होत होता.[2] इ. स. पू. सहाव्या शतकापर्यंत उत्तरेकडील राज्यांचा उदय झाला आणि मगधाचे राज्य महत्त्व पावू लागले. खुद्द गंगा नदीलाच एका नवीन आर्थिक जीवनाची, नदीतून होणाऱ्या व्यापाराची ओळख झाली. गंगातीरी वसल्यामुळे चंपा या नगराला लाभ झाला, या व्यापारावर नियंत्रण ठेवणे त्याला शक्य झाले. त्या काळातील आर्थिक जीवनातील या प्रचंड बदलांबरोबर समाजरचनेत बदल होणे अपरिहार्य होते. सामाजिक दृष्टचा हलके स्थान असल्यामुळे होणाऱ्या अप्रतिष्ठेखाली व्यापारी वर्गांनी दडपून जाणे व गुदमरणे साहजिक होते. त्यांना सामाजिक प्रतिष्ठा नव्हती तरीही त्यांच्या आर्थिक धाडसामुळे अनेक तांत्रिक सुधारणा होणे शक्य झाले. तत्कालीन अनेक विचारधारांमधून हा संताप व्यक्त झाला. आपल्यालाच फक्त ब्रह्मज्ञान प्राप्त झालेले आहे या ब्राह्मणांच्या गर्वाला विरोध म्हणून या विचारधारांनी अनुभवजन्य ज्ञानावर भर दिला. धर्मविधी किंवा तपश्चर्या यांत अतिनिमग्न होण्याचे टाळणे हा सामान्य माणसाच्या पातळी-वर एक समाधानकारक व्यवहार्य तोडगा काढण्यात आला.

प्रचलित सामाजिक नीतिशास्त्राच्या पद्धतीवर या नव्या कल्पनांचा सूक्ष्मसा का होईना पण सार्वत्रिक स्वरुपाचा परिणाम झाला. नागरी संस्कृतीपर्यंत होत गेलेला हा बदल म्हणजे अधिक सुस्पष्ट, नियमबद्ध सामाजिक संघटन. सामूहिक जीवन गुंतागुंतीचे झाल्याने, सामूहिक जीवनातील व्यक्तिगत भागाविषयीच्या जुन्या कल्पनांमध्ये सुधारणा करण्याची गरज होती. जातिसंस्थेची ताठरता

---

१. फान लोहुहायझेन डे लीउव, **दि सिथियन पिरिअड.** पृ. १४५ तळटीप.

२. **बीएस्ओएएस्** वॉर्डर, १९५६, पृ. ४३, तळटीप.

वाढविणे हा या समस्येवरील ब्राह्मणीधर्मांचा तोडगा होता. बौद्धधर्मीयांनी हा प्रश्न जास्तीत जास्त चांगला समजावून घेतला आणि समाजातील प्रत्येक व्यक्तीवर जबाबदारी टाकणारी अशी एक सामाजिक नीतिशास्त्राची पद्धती विकसित केली. ब्राह्मणी धर्मातील सामाजिक नियमांमधील भयानक निश्चिततेने खालच्या जातींमध्ये जन्माला आलेल्या माणसाचा काही विचारच केला नाही. सामाजिक जीवनाच्या चौकटीत राहूनही मानवी मोहांच्या पलीकडे जे जातील त्यांनाच अक्षय स्वर्गाचे आश्वासन देण्यात आलेले होते.

या नव्या कल्पना आणि तत्कालीन राजकीय संघटना यांच्यामधील संबंधांचेही काही पृथक्करण केले पाहिजे. पशुपालन अवस्थेपासून नागरी संस्कृतीकडे झालेल्या संक्रमणाबरोबर जुनी राजकीय बंधने बदलणेही अपरिहार्य होते. पूर्वी उत्तर भारतातील जुन्या वसाहतींनी सोयीप्रमाणे आपापसात गट बनवून स्थूलमानाने टोळीजन्य निष्ठांवर आधारित असे संघ किंवा गणराज्ये बनविली होती. परंतु आता योग्य पद्धतीने निश्चित केलेल्या राजकीय संघटनेची गरज होती. टोळीजन्य बंधांपेक्षां नागरी घटकांमधील सामाजिक जबाबदारीवर भर देण्यात आला. पशुपालकांच्या लहानशा वसाहतींच्या जागी नागरी जीवनातील गुंतागुंती आल्याने व एक प्रमुख व्यवसाय म्हणून व्यापाराचा उदय झाल्याने एका अधिक सुव्यवस्थित संघटनेची मागणी केली जाऊ लागली. सभा आणि समितीची प्राथमिक स्वरुपाची लोकशाही बाजूला पडली आणि नव्या समाजाच्या कार्यावर अधिक यशस्वी रीतीने नियंत्रण ठेवणाऱ्या व त्यात सुसूत्रता निर्माण करणाऱ्या एका लहान केंद्रित मंडळाच्या हाती सत्ता केंद्रित झाली. या कालातील सामाजिक संक्रमण आणि प्रादेशिक विस्तार यामुळे त्या कालखंडाला आणिबाणीचे स्वरुप प्राप्त झाले व त्यामुळे एका बलिष्ठ नियंत्रक शक्तीची गरज पूर्वी कधी भासली नव्हती इतकी भासली. अशा प्रकारे राज्यसंघ व प्रजासत्ताके यांच्या जागी लहान घटकांना मोठ्या घटकांमध्ये दृढ रीतीने सामावून घेणाऱ्या प्रवृत्तीची राज्ये आली व या प्रवृत्तीचा कळस मौर्यसाम्राज्यात गाठला गेला. या राजकीय बदलामुळे केवळ स्थानिक घडामोडींशी संबंध असणाऱ्या नागरिकत्वापेक्षा अधिक विशाल नागरिकत्वाच्या कल्पनेची ओळख झाली. प्रत्येक जातीच्या चौकटीतील सामाजिक जबाबदारीला प्रामुख्याने महत्त्व देणाऱ्या ब्राह्मणधर्मापेक्षा अधिक व्यापक सामाजिक जाणिवेचा आग्रह धरणारा बौद्धधर्म या परिस्थितीला अधिक साजेसा ठरला.

अशोकाने पुरस्कारलेल्या धम्माविषयीच्या धोरणाच्या स्वरुपाचे पृथक्करण करण्यापूर्वी, आपल्याला या नव्या धोरणामागच्या कारणांची चौकशी करणे आवश्यक आहे. राजाचे व्यक्तिगत पूर्वग्रह कोणते असतील, ते दोन हजार वर्षांहून अधिक काळानंतर आपल्याला निश्चितपणे सांगतां येणे अशक्य आहे. जास्तीत जास्त आपण त्याच्या आज्ञालेखांचा आधार वापरून जास्तीत जास्त तर्क करू शकू. याविषयीची चर्चा आपण नंतर करू. तथापि बाह्य कारणांनी म्हणजे परि-स्थितीने या धोरणाची का मागणी केली ते स्पष्ट करण्याचा प्रयत्न आपल्याला करता येईल. नंद घराण्याच्या उत्तरकालातील वर्षांमध्ये महापद्माच्या कारकिर्दीत मोठ्या प्रमाणावर एक केंद्रित साम्राज्य निर्माण करण्याचा पहिला प्रयत्न झाला होता. यात संपूर्णपणे यश मिळाले नाही याचे प्रमुख कारण म्हणजे एखाद्या साम्राज्याचे कामकाज कसे चालते हे समजावून घेण्यात व्यक्तिशः त्या राज्यकर्त्यांना अपयश आले. नंदांचा मुलुख जिंकून घेतल्यानंतर चंद्रगुप्त मौर्याने केंद्रीकरणाचे धोरण खूपच यशस्वी रीतीने पूर्ण केले. हे साम्राज्य, कार्यक्षम नोकरशाहीकडून चालविले जात असल्याने, त्यात चांगल्या दळणवळणाची विस्तृत सोय असल्याने व ते एका बलशाली राज्यकर्त्याच्या नियंत्रणाखाली असल्याने त्या काळात जितके शक्य होते तितके अधिक ते केंद्रित झालेले होते. कार्यक्षम नोकरशाही, चांगले दळणवळण व बलिष्ठ राज्यकर्ता ही तीन्ही वैशिष्टये मौर्यांच्या साम्राज्यात होती हे अर्थशास्त्रा-वरून स्पष्ट होते. काहीही करून राज्यकर्त्याला केंद्रीय नियंत्रण ठेवणे भाग होते व पुढील दोन धोरणांपैकी कोणते तरी एक धोरण स्वीकारल्यानेच ते शक्य होते. एक धोरण म्हणजे अशोकाच्या जवळच्या काळातील चीनमधील शि हुआंग टी याने स्वीकारलेल्या धोरणाप्रमाणे, सैन्यदलाच्या जोरावर, स्वतःला देवस्वरुप मानून आणि इतर विविध मार्गांनी कठोर नियंत्रण ठेवणे. दुसरे धोरण याहून निश्चितपणे अधिक मार्मिक होते. अशोकाने आपण स्वतः नव्या धर्माला (किंवा प्रस्थापित धर्मांपैकी कमी प्रस्थापित असलेल्या धर्माला) अनुकूल असल्याचे जाहीर केले. कदाचित या नव्या धर्मात विविध गटांच्या निवडक मतांचा समावेश झालेला असण्याची शक्यता होती. यामुळे इतर प्रभावी गटांना बाजूला सारणे व केंद्रीय सत्तेला आपली ताकद वाढविणे शक्य झाले असावे. अधिकाऱ्यांच्या मार्गदर्शना-खाली लोकांनी राज्यकर्त्यांच्या कल्पनांपुढे निदान मान तरी तुकविली असावी. नंतरच्या काळात अठरा शतकांनी अकबराने स्वीकारलेल्या धोरणाचा गाभा असाच होता पण अशोकाने जरा वेगळ्या स्वरुपात या धोरणाची निवड केली.

अशोक राज्यावर आला तेव्हा तो बौध धर्माचा निस्सीम उपासक नव्हता.

बौद्धधर्माविषयीची त्याची आस्था काही वर्षांनी वाढली हे आपल्याला माहित आहे.[1] सिंहासनावर येण्यासाठी त्याला बरीच यातायात करावी लागली हेही आपण पाहिलेले आहे. त्याच्या कारकिर्दीच्या सुरवातीच्या काही वर्षांमध्ये जेव्हा तो आपले स्थान बळकट करीत होता त्यावेळी राजदरबारातील ज्येष्ठ व सनातनी गटांनी त्याला मनापासून पाठिंबा दिला नसावा अशी खूपशी शक्यता दिसते. सनातनी ब्राह्मणधर्माला विरोध न करता पण त्याच्यापासून दूर जाऊन आणि बौद्धधर्माला व आजीविकांसारख्या इतर काही पंथांना उघड उघड पाठिंबा दाखवून तो सुधारकी गटांचा सुप्त पाठिंबा मिळवू पाहात होता. त्यामुळे सनातनी धर्मापासून लोकांना हळूहळू दूर करण्यात त्याला यश आले असावे व शेवटी लोकांना आपलीच मते अधिक स्वीकारार्ह वाटतील असे त्याने केले असावे. नव्याने उदय पावलेल्या व्यापारी वर्गाचा या पंथांना पाठिंबा होता व सर्वसामान्य लोकांचा त्यांना विरोध नव्हता, या परिस्थितीची त्याला मदत झाली. याशिवाय आणखी एक गोष्ट म्हणजे हे नवे धर्म जुन्या धर्माच्या अतिशय विरोधी होते असे नाही, त्यामुळे एखादी तडजोड घडवून आणणे शक्य होते. अशा प्रकारे, अशोकाने धम्माची कल्पना स्वीकारताना व्यावहारिक फायदा पाहिला.

छोट्या राजकीय घटकांचे एकीकरण करून भिन्न भिन्न गटांना एका किमान समान पायावर एकत्र आणणे हा आणखी एक घटक केंद्रीकरणाच्या सर्वसामान्य योजनेशी संबंधित असतो. वांशिक आणि सांस्कृतिक प्रकारांची विविधता जेथे असते अशा खूप मोठ्या भूभागावर केंद्रित सत्ता गाजवावयाची असेल तेथे तर या गोष्टीला विशेष महत्त्व आहे. विस्तृत सरहद्दीवर राहणाऱ्या गटांची निष्ठा मिळविणे ही गोष्ट स्वतःच्या जवळपासच्या गटांच्या निष्ठेपेक्षाही अधिक अगत्याची असते. मौर्य साम्राज्यात वांशिक वैविध्य जरी फार मोठे नसले तरी सांस्कृतिक भिन्नता मात्र प्रचंड प्रमाणावर होती. मौर्यसाम्राज्याची संपूर्ण सांस्कृतिक व्याप्ती आणि त्यात राहणाऱ्या लोकांचा सांस्कृतिक दर्जा समजण्यासाठी आपल्याला फक्त तक्षशिला, तोसली, उज्जयिनी व सुवर्णगिरी या चार प्रांतिक राजधान्यांचासुद्धा विचार करता येतील. नव्या धर्माचा अंगिकार आणि त्याचा सक्रिय प्रचार हे लहान लहान घटकांना एकत्रित करून त्यांच्यातील समबंध टिकवून धरण्याची ताकद असणारे एक साधन होते. त्याचा वापर जर शहाणपणाने केला असता व नाराज लोकांवर ते साधन लादले गेले नसते तर विजित प्रदेशाचे संघटन कितपत दृढ झाले हे

१. दुसरे प्रकरण पाहावे.

अजमावण्याचे साधन म्हणून ते वापरणे शक्य झाले असते. अशोकाने निश्चितच बऱ्याच अंशी समंजसपणा दाखविला.

अनेक संस्कृतींच्या इतिहासामध्ये या धोरणांची उदाहरणे पाहता येण्यासारखी आहेत. उदाहरणार्थ, शार्लमेनने सॅक्सन लोकांना जिंकले व त्यांच्यात समबंध निर्माण करण्यासाठी ख्रिस्ती धर्माचा त्याने उपयोग केला. सॅक्सन लोकांना त्याने स्वतःचा धर्म स्वीकारावयास लावला आणि कॅरोलिजियन साम्राज्याच्या सर्वसाधारण पद्धतीमध्ये त्यांना अधिक सरळपणाने सामावून घेतले.[1] नवा धर्म हा नव्या ऐक्याचे एक प्रतीक किंवा मानचिन्ह म्हणून वापरता येणे शक्य आहे. प्रचाराचे ते एक सर्वोत्तम परिणामकारक साधन होऊ शकते. काही वेळा योग्य परिस्थितीत एखाद्या कल्पनेचा वापर केवळ न्यायबुद्धिने केला तरी एक नवा पंथ असल्यासारखा दिसतो. अशोकाची ज्याच्याबरोबर वारंवार तुलना केली जाते, त्या सम्राट कॉन्स्टंटाईनने काही प्रसंगी ख्रिस्ती धर्माचा वापर राजकीय हेतू साधण्यासाठी केला. याचे एक स्पष्ट उदाहरण म्हणजे (XPIOTOS) ख्रिस्टोस या शब्दापासून काढलेले ☧ हे ग्रीक अक्षर गुंफलेले चिन्ह त्याने आपल्या ध्वजासाठी स्वीकारले पण आपल्या नाण्यांवरील जुन्या देवता त्यानें तशाच ठेवल्या. म्हणजे तो स्वतः जरी ख्रिस्ती धर्माला अनुकूल होता आणि त्याची प्रतिके त्याने स्वीकारलेली होती तरी जुना धर्म चालू राहिला आणि सर्व धर्मांना पूजेचे स्वातंत्र्य राहिले. घरी यज्ञ करण्याच्या प्रथांसारख्या काही ख्रिस्तपूर्व प्रथांना प्रतिबंध करण्यात आला परंतु तो धार्मिक कारणांसाठी नाही. या प्रकारच्या संमेलनांमधून राजकीय दृष्टया विध्वंसक गटांचा विकास होईल या भीतीमुळे बहुधा ही बंदी करण्यात आलेली होती.[2] ख्रिस्ती धर्मीयांना इतरांवर कुरघोडी करता येईल असे अधिकार न देता, त्यांना सुरक्षितता वाटावी इतपत स्थान प्राप्त करून देण्यात आले होते. त्यांचा छळ करणे बंद केले व नित्य मानवी जीवन जगण्याची त्यांना परवानगी देण्यात आली.

अशाच प्रकारची पार्श्वभूमी अशोकाच्या काळातही होती यात शंका नाही. यापूर्वी बौद्धधर्मीयांकडे तिरस्काराने पाहिले जाई व बहुधा पाखंडी म्हणून त्यांचा छळही केला गेला असावा. परंतु अशोकाच्या वेळेपर्यंत त्यांना सन्माननीय स्थान मिळू लागले होते व एक धार्मिक पंथ म्हणून त्यांना मान्यता मिळालेली होती.

---

१. विन्स्टन, शार्लमेन, पृ. १०४.

२. दि एज् ऑफ कॉन्स्टंटाईन दि ग्रेट पृ. २९४, तळटीप.

अशोकाच्या नव्या धोरणाच्या राजकीय परिणामांचे पृथक्करण करताना **चक्रवर्तिन्** या ध्येयाविषयीचा प्रश्न काहीसा महत्त्वाचा आहे. बौद्ध वाङ्मयामध्ये एका चक्रवर्तिन्चे वर्णन करण्यात आलेले आहे.[1] त्याचे विश्वसम्राट असे वर्णन केलेले असून त्याच्या मुलुखात संपूर्ण जंबुद्वीपाचा समावेश होता. त्याचा राज्यकारभार न्यायी होता व त्याची कारकीर्द भरभराटीची होती. तो इतका सद्गुणी राजा होता की त्याच्या अंगी दैवी शक्ती असल्याचे मानले जाऊ लागले. संपूर्ण जंबुद्वीप जिंकण्यावर इतका भर दिलेला आहे की ही कल्पना बरीच नंतरची, कदाचित मौर्योत्तर कालातील असावी. या संकल्पनेचा परिचय जैनांना होता हे आपणास माहित आहे आणि युधिष्ठिर, राम यांच्यासारख्या महाकाव्यांमधील नायकांचा उल्लेख **दिग्विजयिन** असा केला जाई.[2] पूर्वकालीन वाङ्मयामध्ये अनेक वेळा वापरलेली आहे त्याप्रमाणे **दिग्विजयिन** ही संज्ञा नायकांसाठी अलंकारिक अर्थाने वापरली गेली असावी. परंतु त्याचे निश्चित उदाहरण अशोकाच्या कारकिर्दीनंतरच देणे शक्य झाले असावे असा संभव अधिक दिसतो.[3] तथापि, **चक्रवर्तिन** ही कल्पना मौर्यपूर्वकाळात एक संपूर्णपणे विकसित झालेली राजकीय संकल्पना असावी किंवा अशोकाच्या बऱ्याचशा कल्पनांची प्रेरणा त्याच्या **चक्रवर्तिन** होण्याच्या महत्त्वाकांक्षेत असावी हे फारसे संभवनीय दिसत नाही. जर असा काही प्रकार असता तर त्याने आपल्या आज्ञालेखांमध्ये कोठेतरी त्याचा नक्कीच उल्लेख केला असता, कारण त्याने आपल्या अनेक महत्त्वाकांक्षा या साधनांमध्ये विशेषत्वाने व्यक्त केलेल्या आहेत. **दीपवंशा**मध्ये अशोकाशी संबंधित असणाऱ्या एका श्लोकाचा शेवट पुढील शब्दांनी केलेला आहे.

---

१. **दीघ निकाय**, तीन, **चक्कवत्ति सिंहनादसुत** पृ. ५८, तळटीप.

२. वॅशॅम, **दि वंडर दॅट वॉज इंडिया**, पृ. ८३.

३. अशोकाच्या कालात किंवा तत्पूर्वी या संकल्पनेचा परिचय नव्हता आणि त्याची स्तुती करण्यासाठी बौद्ध भिक्षूंनी त्याच्या जीवनावर आधारलेली अशी ही संकल्पना निर्माण केली, असे केर्न (**अशोक**, पृ. ३४) यांचे मत आहे. परंतु जर असा प्रकार असता तर त्यांनी त्या कल्पनेशी अशोकाच्या नावाची सरळ सांगड घातली असती. परंतु असे कोणतेही निदर्शक कोणत्याही ग्रंथात नाही.

... जंबुद्वीपाच्या महान साम्राज्यामध्ये त्याच्या सत्तेचे चक्र फिरले.'[१]

अशोकाच्या कारकिर्दीशी **चक्रवर्तिन्** या कल्पनेचा संबंध जोडण्याचा हा सुरवातीचा प्रयत्न असू शकेल किंवा बौद्ध आख्यायिकांमध्ये अशोकाला **चक्रवर्तिन्** म्हणून शिक्का बसल्यानंतर मागाहून कोणीतरी हे घुसडले असावे. तत्त्वज्ञ ज्यावेळी **चक्रवर्तिन्**चे वर्णन करीत होते तेव्हा त्यांचा भर राजकीय आणि प्रादेशिक सत्तेवर होता. **चक्रवर्तिन्च्या** प्रतिमेशी संबंधित असणारी प्रतिके सप्तरत्ने म्हणून ओळखली जात व त्यामध्ये विश्वावरील सत्तेचे निदर्शक म्हणून चक्र, भाग्यदेवता, राणी, युवराज, मंत्री, सम्राटाचा हत्ती व घोडा यांचा समावेश होत असे.[२] अशोकाच्या आज्ञालेखांचे परीक्षण केल्यास, अशोकाच्या वैश्विक सत्तेच्या कल्पनेत बऱ्याच अंशी लीनभाव व मानवतावाद असलेला दिसून येतो.

अशोकाने बौद्धधर्माचा उपयोग जरी राजकीय हेतूने केलेला असला तरी प्रामाणिक अनुयायांच्या मालिकांमधून तो वगळला गेला नाही असे म्हणण्यात खरोखरच विरोधाभास नाही. एक मनुष्य व एक राज्यकर्ता म्हणून त्याच्या दृष्टीने बौद्धधर्माची जी व्यावहारिक उपयुक्तता होती तिकडे त्याने दुर्लक्ष केले नाही. धर्मानुयायी असलेल्या प्रत्येक व्यक्तीला स्वतःच्या वैयक्तिक गरजा व स्वतःभोवतीची विशिष्ट परिस्थिती यानुसार विचार व आचार यांचा मेळ घालावा लागतो. त्यामुळे इतर धर्मांप्रमाणे बौद्धधर्मातही विचार व आचार यांच्यात विसंगती होती. अशा लहान लहान तडजोडी जेव्हा समाजात एकत्रित होतात तेव्हा कोणत्याही धार्मिक नेत्याच्या मूळ शिकवणुकीला त्या रंग देऊ शकतात. अशोकाच्या संदर्भात राजकीय क्षेत्रातील याचे एक उदाहरण म्हणून बौद्धधर्माची राजपदाविषयीची कल्पना येथे सांगणे शक्य आहे. सुरवातीच्या बौद्धधर्माने **महासम्मत** किंवा निवडून आलेला ज्येष्ठ पुरुष याविषयीचा विचार मांडला. लोकसमूह व त्याने राजा म्हणून निवडलेली व्यक्ती यांच्या संमतीवर आधारलेला करारात्मक असा हा

---

१. सहा, २.

२. बॅशम, दि **वंडर दॅट वॉज इंडिया**, पृ. ८८. ही कथा ज्या वेगवेगळ्या ग्रंथांमध्ये सांगितलेली आहे तेथे सप्तरत्नांच्या यादीमध्ये फरक दिसतो.

विचार होता. राजा हा राज्याचा सेवक मानला जाई व गोळा केलेला कर हा त्याचा वाटा असे.[1]

परंतु अशोकाच्या आज्ञालेखांचा सूक्ष्म अभ्यास केल्यास आपल्या प्रजेकडून निवडून आलेला एक थोर मनुष्य असे तो स्वतःला समजत नव्हता तर पितृसदृश मानीत होता हे उमगते. राजा आणि प्रजा यांच्यातील नातेसंबंध हा पितापुत्रासारखा असावा याविषयी तो सतत आग्रह धरतो.

**सव्वे मुनिस्से पजा ममा. अथा पजाये इच्छामि हकं किंति सव्वेन हितसुखेन हिदलोकिकपाललोकिकेन युज्जेवुति तथा ... मुनिस्सेसु पि इच्छामि हकं...**[2]

'सर्व माणसे माझी मुले आहेत, आणि ज्याप्रमाणे माझ्या मुलांनी इहलोकी आणि परलोकी कल्याण व सौख्य साधावे असे मी इच्छितो त्याप्रमाणेच सर्व माणसांच्या बाबतीतही (माझी हीच इच्छा) आहे.

ही पितृवत्सल मनोवृत्ती म्हणजे राजा व प्रजा यांच्या संबंधांमधील एक नवा पैलू आहे. **महासम्मत** सिद्धांत आता मागे पडत चालला असावा अशी शक्यता आहे. आम्ही यापूर्वी स्पष्ट केल्याप्रमाणे प्रत्यक्ष लोकशाहीला बाव न राहता केंद्रीय नियंत्रणाकडे प्रवृत्ती होऊ लागली होती म्हणून असे झाले. राजसत्ता केंद्रित झाली की प्रजेचे परावलंबन अधिक वाढते. राजा हा राज्याचा सेवक राहात नाही तर तो पित्यासारखा कल्याण साधणारा असा मानला जातो. अशा पितृसदृश दृष्टिकोनामुळे हुकुमशाहीच्या शक्यता निर्माण होतात व केंद्रीय अधिसत्तेपासून हुकूमशाहीचे पाऊल काही फार दूर नसते.

अशोकाने लाविलेल्या, बौद्धधर्माच्या अर्थाचे नेमके स्वरुप कोणते याविषयी अनेक मते व्यक्त करण्यात आलेली आहेत. आपल्या आयुष्यातील अगदी अल्पकाळ

---

१ .**दीघ निकाय** तीन, **अर्थशास्त्र**, पृ. ९२, ९३. भारतीय राजकीय विचारांत हा पहिलाच उल्लेख असा आहे की ज्याला सामाजिक करार सिद्धांत म्हणता येईल. कुटुंब, मालमत्ता, न्याय यांसारख्या काही सामाजिक संस्थांचे संरक्षण करण्यासाठी लोकांनी राजा निवडला व जोपर्यंत तो त्यांच्या गरजा भागवी तोपर्यंतच अधिकारावर राहू शके, त्या मोबदल्यात ते आपल्या उत्पादनाचा एक भाग त्याला देत.

२. पहिला वेगळा आज्ञालेख, धौली, ब्लोख, **ले एंन्स्क्रेपसिओं द अशोक** पृ. १३७.

अशोक बौद्ध भिक्षू झाला होता असे काही इतिहासकारांचे मत आहे.[१] काहींच्या मते तो **उपासक** (सामान्य अनुयायी) व **भिख्खु** यांच्यामधील स्थिती म्हणजे, **भिख्खुगतिक** होता.[२] काही विशिष्ट काळ मठामध्ये राहणारा गृहस्थाश्रमी म्हणजे **भिख्खुगतिक** व या पद्धतीला बौद्धधर्माने मान्यता दिलेली होती.[३] यामुळेच **संघम् उपागते** या राजाने आपल्या आज्ञालेखामध्ये वापरलेल्या संज्ञेविषयी वाद निर्माण झालेला आहे. जर तो अल्पकाल का होईना पण भिक्षू झालाच असता तर साहजिकच त्याने त्या काळाचा उल्लेख केला असता तथापि, जर तो सामान्य अनुयायापेक्षा अधिक असा काही कधीच नसेल तर धार्मिक बाबतीतील शिक्षणासाठी किंवा मदतीसाठी तो संघाकडे गेला असावा पण त्यासाठी तात्पुरता भिक्षू होण्याची काही गरज नव्हती. अशोक संघाचा धर्मविषयक प्रमुख होता असेही मत मांडण्यात आलेले आहे पण हे मत अजून सिद्ध झालेले नाही. अशोक स्वतः या धर्माचा अनुयायी होता व त्याचे राजकीय स्थान इतके बलिष्ठ होते की त्याच्या क्रियाशील आस्थेचे संघाने स्वागतच केले असावे. परंतु जरी त्याने संघाला उद्देशून अध्यादेश काढलेले असले तरी तो स्वतःला संघाचा धर्मविषयक प्रमुख

---

१. स्मिथला असे वाटते की (**अर्ली हिस्ट्री ऑफ इंडिया**, पृ. १६८) अशोक एकाच वेळी भिक्षूही होता व राजाही होता व यासाठी पुरावा म्हणून इत्सिंगचा अभिप्राय (इत्सिंग, तक्कुसु, भाषां, पृ. ७ ) तो ग्राह्य मानतो. बौद्ध भिक्षू वापरीत असलेल्या छाटयांची, इत्सिग ज्या परिच्छेदात चर्चा करतो त्यात त्याने, आपण अशोकाची प्रतिमा पाहिली व त्यात राजा भिक्षूच्या वेषात होता असा उल्लेख केलेला आहे. या उदाहरणातील इत्सिंगचा हा पुरावा फारसा महत्त्वाचा नाही कारण बौद्ध भिक्षूंच्या बाबतीत असलेल्या केवळ अपेक्षित विचारामुळे अशोक भिक्षूच्या वेषात असल्याचे वर्णन त्याने केले असावे. बौद्धांविषयी अशोकाला असणारी सहानुभूती सुपरिचित होती त्यामुळे अशा प्रकारचा एखादा पुतळा असण्यात काहीच आश्चर्य नाही व विशेष म्हणजे हा पुतळा राजाच्या हयातीत तयार झाला होता वा नाही याविषयी इत्सिंग काहीच सांगत नाही.

२. **मुकर्जी, अशोक**, पृ. २३, **भांडारकर अशोक** पृ. ७९–८१

३. अल्पकाळ मठामध्ये राहण्याची पद्धती आजही ब्रह्मदेश, थायलंड व आग्नेय आशियातील बौद्धांच्या प्रदेशात प्रचलित आहे.

समजत नव्हता हे स्पष्ट आहे कारण पाटलिपुत्र येथे भरलेली, बौद्धधर्मीयांच्या तिसऱ्या धर्मसंगीतीसारखी अतिशय महत्त्वाची सभा बोलाविण्यास किंवा तिचे नियमन करण्यास तो जबाबदार नव्हता.

अशोकाच्या धर्मनिष्ठेविषयीच्या पुराव्याच्या अर्थासंबंधी अनेक मतमतांतरे आहेत. अशोक हा बौद्धधर्मीय नसून एक ब्राह्मणी हिंदू होता असेही काहीजणांचे मत आहे.[1] त्याच्या कारकिर्दीविषयीचे बहुसंख्य साधनग्रंथ बौद्ध आहेत व त्यांना अशोकाविषयी सहानुभूती आहे ही वस्तुस्थिती व त्याच्या स्वतःच्या आज्ञालेखांमधील पुरावा पाहता तो ब्राह्मणी हिंदू नव्हता हे बरेचसे स्पष्ट आहे. तारानाथच्या गोंधळात टाकणाऱ्या आणि काल्पनिक वृत्तांतामध्ये अशोकाचे साहचर्य तांत्रिक बौद्धधर्माशी दाखविण्यात आलेले आहे. हा राजा मातृदेवतेचा भक्त होता असे तिबेटी बखर सांगते.[2] अशोकाच्या कालात खालच्या वर्गातील लोकांमध्ये मातृदेवतेचा संप्रदाय प्रचलित होता परंतु तांत्रिक बौद्धधर्माचा विकास अनेक शतकानंतर झाला.

अशोकाचा **धम्म** म्हणजे वस्तुतः बुद्धाने सांगितलेला मुळ बौद्धधर्म होता आणि आपण ज्याला आज बौद्धधर्म समजतो तो म्हणजे अनेक शतकांमध्ये त्यावर चढलेली धर्मज्ञानविषयक पुटे आहेत, असे एक मत मांडण्यात आलेले आहे[3]. दुर्दैवाने या मतातील सत्य सिद्ध करण्याच्या दृष्टीने पुरेसा छेदक पुरावा नाही. बौद्ध साहित्याच्या कालानुक्रमाने झालेल्या मांडणीच्या सखोल पृथक्करणाचे काम अद्याप कोणी हाती घेतलेले नाही. आणि अशा पृथक्करणातील निष्कर्षही कदाचित त्या मांडणीविषयी आपल्याला संभ्रमात टाकतील. आतापर्यंत जे काही काम झाले आहे त्यावरून **निकायग्रंथातील** आज आढळणाऱ्या बऱ्याच भागांशी अशोक परिचित होता.[4] आणि इ. स. पू. चौथ्या शतकामध्ये **निकायग्रंथामधील** बहुतांशी भाग अस्तित्वात होता असे वाटते.

---

१. दिक्षितार, **मौर्यन पॉलिटी**, पृ. २७६.

२. **गेशिष्ट देस बुधीझमुस् इनं इंडिअन**, सहा, पृ. २८.

३. सनार, **ले एंस्क्रेपसिओं द पियदस्सि** व्हॉ. दोन, पृ. ३२१. मिसेस ऱ्हीस डेव्हिडस, **बुद्धिझम**, पृ. २२६, तळटीप, भांडारकर, **अशोक**, पृ. ७२ तळटीप.

४. पांडे, **स्टडीज इन दि ओरिजिन ऑफ बुद्धिझम** पृ. १५.

**धम्म** हा अशोकाचा स्वतःचाच शोध होता असे आमचे मत आहे. बौद्ध आणि हिंदू विचारांची त्यात उसनवारी केली असेल परंतु आचरणात आणण्याजोगा आणि सोयीचा, त्याचप्रमाणे नैतिक दृष्टया उच्च प्रतीचा असा जीवनमार्ग सुचविण्याचा राजाचा तो एक प्रयत्न होता असे थोडक्यात सांगता येईल. तात्त्विक विचारमंथनात रममाण होण्यास ज्यांना फुरसत नव्हती अशांसाठी सुखद तडजोड करण्याचा त्यामागे हेतू होता. आणि प्रत्यक्षात त्याच्या प्रजाजनांपैकी बहुसंख्य लोक असेच होते. याविषयीचा भरपूर पुरावा त्याच्या आज्ञालेखांमध्ये मिळतो. त्याचे धम्मविषयक धोरण म्हणजे केवळ बौद्धधर्माच्या तत्त्वांच्या नोंदी असत्या तर अशोकाने ते अगदी खुलेपणाने सांगितले असते कारण बौद्धधर्माला असलेला आपला पाठिंबा लपवून ठेविण्याचा प्रयत्न त्याने कधीच केला नाही.

आज्ञालेखांमधील धार्मिक बाबींच्या संदर्भात, स्वर्गप्राप्ती म्हणजे नैतिक जीवनाचे फळ असे जे सांगण्यात आलेले आहे त्याचे काहीसे स्पष्टीकरण करणे जरुर आहे. केवळ स्वर्गाच्याच इच्छेने, धम्माची व्यवस्थित मांडणी करण्यास अशोक उद्युक्त झाला होता की काय असा प्रश्न आपल्याला निश्चितपणे उपस्थित करता येईल. जर असे असेल तर, धम्माच्या नैतिक आदर्शांच्या उदात्ततेशी तुलना करता हा खरोखरच क्षुद्र विचार आहे. अशोकाचा पारलौकिक जीवनावर विश्वास नव्हता असे आम्हाला येथे सुचवावयाचे नाही, तर तो आज्ञालेख वाचणाऱ्या सर्वसामान्य माणसाचे मन जे प्रतीक जाणीत होते व मानीत होते त्याच्याशी प्राप्त होणाऱ्या फळाची सांगड घालण्याच्या प्रयत्नात अशोकाने स्वर्गाचा उल्लेख केला असावा असे आम्हाला वाटते. तत्कालीन धार्मिक आणि तात्त्विक विचारसरणींनुसार स्वर्गप्राप्ती हे इप्सित होते. आपल्या धम्माच्या तत्त्वांनुसार जीवन व्यतीत केल्यास हे इप्सित साध्य होण्यासारखे आहे असे अशोक सुचवीत होता. केवळ स्वर्गप्राप्ती हेच अशोकाचे ध्येय असते तर आणखी एका प्रचलित श्रद्धेचा अशोकाने निश्चितपणे उल्लेख केला असता आणि ती श्रद्धा त्या काळात एक नवी व महत्त्वपूर्ण मानली जात होती. ती श्रद्धा म्हणजे आत्म्याच्या पुनर्जन्माविषयीचा (देहांतर प्रवेशाविषयीचा) सिद्धांत.[1] या श्रद्धेचा येथे उल्लेख नाही यावरूनच स्वर्गप्राप्तीच्या धार्मिक बाजूचा अशोक विचार करीत नव्हता हे सिद्ध होते.

अशोकाच्या धार्मिक मतांचे स्वरुप व गुणवत्ता निश्चित करणे कठीण आहे. तो एक भाविक मनुष्य होता यात शंका नाही. परंतु आपल्या आयुष्याच्या उत्तर-

---

१. केर्न, अशोक, पृ. ३२. याज्ञवल्क्याच्या काळापासून आत्म्याच्या देहांतर-प्रवेशाच्या सिद्धांताविषयीची चर्चा चालू होती.

कालपर्यंत तो धार्मिक शिष्टाचाराच्या आहारी गेला नव्हता असे दिसते. अल्पकाल का होईना पण त्याने भिक्षूवेष परिधान केला होता की नव्हता हा प्रश्न अंतिम पृथक्करणाच्या वेळी कमी महत्त्वाचा आहे. सर्व विरोधाला तोंड देऊन राजा होण्याचा जो निश्चय या तरुण राजपुत्राने केला होता. त्यावरून तो असामान्य महत्त्वाकांक्षी आणि दूरदृष्टीचा होता हे दिसते. अनेक वेळा मानले जाते त्याप्रमाणे जर त्याने एकाएकी बौद्धधर्माचा स्वीकार केला असता तर, आम्हाला असे वाटते की या बदलामुळे तो एकदम दुसऱ्या टोकाला गेला असता. तो काही अर्धवट उपाय योजणारा मनुष्य नव्हता. जर त्याने भिक्षू होण्याचा विचार केला असता तर त्याने सिंहासनाचा त्याग केला असता व तो एखाद्या मठात जाऊन राहिला असता. भिक्षू होण्याची इच्छा आणि एक राज्यकर्ता म्हणून त्याची जबाबदारी यांच्याबाबत त्याच्या मनात संघर्ष माजला असावा असे मानून बरेच काही म्हटले गेले आहे पण अशा संघर्षाचा कोठेही स्पष्ट पुरावा नाही.[1]

जरी अशी स्थिती निर्माण झालीच असली तरी ती, त्याचे मन एकाएकी उद्युक्त झाल्यामुळे नक्कीच निर्माण झाली नसावी. एक तरुण राजपुत्र म्हणून सिंहासनासाठी संघर्ष करण्याइतकी महत्त्वाकांक्षा असतानाही त्याला या संघर्षाची जाणीव झाली असावी. हा संघर्ष म्हणजे एक पेच होता असे स्पष्टीकरण करणे हे सत्याच्या अधिक जवळचे होईल. आपण एक व्यक्ति आणि आपला धर्म म्हणजे बौद्धधर्म, या दोहोंमधील व्यक्तिगत संबंध त्याने एका बाजूला लक्षात घेतला. या चित्राची दुसरी बाजूही तितकीच ठळक होती. मौर्यांच्या राज्याचा एक राज्यकर्ता म्हणून स्वतःच्या कल्पना प्रत्यक्षात आणण्यासाठी बौद्धधर्माच्या काही अंगांचा तो उपयोग करून घेऊ शकत होता. बौद्धधर्म म्हणजे केवळ बुद्धाने शिकविलेले धार्मिक तत्त्वज्ञान असे न मानता समाजातील ती एक सामाजिक व बौद्धिक शक्ती आहे असे तो मानीत होता व ते खरेही होते. या पेचावरील तोडगा त्याच्या धम्मविषयक विचारांमधून व्यक्त झालेला होता.

अशोकाला आपल्या धम्माचे विवरण करण्याची संधी त्याच्या आज्ञालेखांमुळे मिळाली म्हणून त्याच्या आज्ञालेखांमधून व्यक्त झालेल्या तत्त्वांच्या परीक्षणाने त्याच्या धम्माची पुनर्रचना केली तर ते उत्तम होईल. आज्ञालेखांची दोन प्रकारांमध्ये विभागणी करणे शक्य आहे. एका गटात त्याच्या जाहीर निवेदनांचा समावेश करता येईल, तर दुसऱ्यात संघाला उद्देशून पाठविलेली वैयक्तिक पत्रे घालता येतील. तथापि, सध्या त्यांचा विचार ज्या क्रमाने ते प्रसृत केले त्या कालानुक्रमाने

---

१ केर्न अशोक, पृ. ३४–३९.

करावा असे आम्ही म्हणतो. कारण त्यामुळे त्याच्या कल्पनांच्या क्रमाची पुनर्रचना करण्याचाही प्रयत्न होईल.

सुरुवातीची दीर्घ शिलाशासने इ. स. पू. २५६ पासून पुढे काढण्यात आलेली आहेत. पहिल्या शिलाशासनात पशुयज्ञ आणि आनंदमेळावे यांवर बंदी घालण्यात आलेली आहे. त्याविषयीचा संबंधित मजकूर असा आहे.

... इध न किंचि जीवम् आरभत्पा प्रजूहितव्यम् न च समाजो कतव्यो...[1]

'... येथे कोणत्याही सजीवांची हत्त्या करू नये, बळी देऊ नये आणि मेळावेही भरवू नयेत.

पहिल्या ओळीचा अर्थ निखालसपणे निश्चित नाही. इध हा शब्द पाटलिपुत्रांला किंवा ज्या जागेवर आज्ञालेख कोरला गेला त्या स्थानिक भागाला उद्देशून असू शकेल. एक विद्वान सुचवितात त्याप्रमाणे तो शब्द केवळ पाटलिपुत्राला किंवा केवळ राजवाड्याला उद्देशून असू शकेल.[2] हे आम्हाला शक्य वाटत नाही, कारण राजवाड्यातील स्वयंपाकघरात अजूनही दोन मोर व एक हरीण मारले जाते अशी कबुली तो याच आज्ञालेखात देतो. ही आज्ञा फक्त राज्याच्या काही विशिष्ट राखीव जनावरांच्या बाबतीत लागू होत असावी असे एक स्पष्टीकरण देता येण्याजोगे आहे. अवध्य प्राण्यांच्या यादीतील प्राण्यांची हत्त्या करणे हा शिक्षेस पात्र ठरणारा गुन्हा असल्याचे आपल्याला अर्थशास्त्रावरून समजते.[3] याच धोरणाला पुस्ती म्हणून कदाचित अशोकाची ही आज्ञा असावी.

तथापि या परिच्छेदाचे एक पर्यायी भाषांतर आहे.[4] येथे यज्ञात बळी देण्यासाठी कोणाही प्राण्याची हत्त्या करू नये... या ठिकाणी पशुहत्त्येपेक्षा पशुबळी देण्याबर अधिक जोर दिलेला आहे. पशुबळी देणाऱ्या धर्मविधीवर ही बंदी आहे. अन्नासाठी होणाऱ्या प्राणीहत्त्येवर जर सार्वत्रिक बंदी घातली असती तर सर्वांत प्रथम राजाने स्वतःच ती प्रथा निश्चितपणे बंद केली असती. राजाच्या स्वयंपाकघरात मारल्या जाणाऱ्या प्राण्यांचा उल्लेख, (भविष्य काळात ही प्रथा बंद करण्याची आपली इच्छा आहे असे जरी या आज्ञालेखाच्या पुढच्या भागात राजा म्हणत असला तरी) राजाची स्वतःची अहिंसेवरील श्रद्धा मोठ्या प्रमाणावर

१. ब्लोख, ले एन्स्क्रिपसिओं द अशोक, पृ. ९१.

२. उपरोक्त, पृ. १९, नं. ५.

३. एक, २६.

४. प्रा. ए. एल्. बॅशॅम यांनी मला हे भाषांतर सुचविले.

पसरावी ही राजाची आज्ञा राहिलेली नसून इच्छा राहिलेली आहे हेच दर्शविते. इतर आज्ञालेखांमध्ये निरर्थक प्रश्नांविरुद्ध दिलेले इषारे आणि समाजासारख्या उत्सवांवर घातलेली बंदी यावरून असे सूचित होतें की ज्या विधींची समाप्ती पशुहत्येमध्ये होते, अशा प्रकारच्या विधींना तो संमती देत नसावा. पशुहत्येच्या प्रत्यक्ष कृतीपेक्षा ती केवळ कल्पनाच त्याला अधिक घृणास्पद वाटत असावीही शक्यताही आहे, कारण त्याने तिची सांगड प्राथमिक स्वरूपाच्या धर्मपंथाशी घातली होती.[1] अशा प्रकारे त्याच्या दृष्टीने पशुबळी देणे हे मागासलेपणाचे लक्षण असावे. यज्ञामध्ये पशुबळी देण्यावर घातलेली बंदी ब्राह्मणांना आवडली असावी असे दिसत नाही. कारण त्यांच्या दृष्टीने त्यांच्या चरितार्थाचे यज्ञ हे एक नित्याचे साधन होते.

या संदर्भात एके ठिकाणी असे म्हटले आहे की, 'जेव्हा लहान लहान स्वतंत्र राज्ये निपटून काढली गेली तेव्हा पशुपालन अर्थव्यवस्थेबरोबरच पशुयज्ञ किंवा वैदिक यज्ञ हे कालबाह्य ठरले. शेवटी कृषि-अर्थव्यवस्थेचा विजय झाला व पशुपालन-अवस्थेतील जीवन आणि धर्मविधी यांचा पराभव झाला.'[2] तौलनिक दृष्ट्या जी एक सरळ कृती होती तिला अशा प्रकारचा अर्थ लावण्यामुळे फारच महत्त्व दिले गेले आहे. पशुपालन-अर्थव्यवस्थेकडून ग्रामीण अर्थव्यवस्थेकडे असा झालेला ह्या बदल त्या काळापर्यंत परिणामकारक ठरलेला होता. तसा तो झाला नसता तर मौर्यांच्या साम्राज्यासारखे एक विस्तृत केंद्रित साम्राज्य टिकवून धरणे अशक्य झाले असते. पशुपालन-अवस्थेतील अनेक धर्मकृत्ये आपल्याच मरणाने नाहीशी झाली असावीत व यज्ञांची संख्याही कमी झालेली असावी. म्हणून अशोकाने घातलेली बंदी म्हणजे आधीच अस्तित्वात आलेल्या प्रवृत्तीला दिलेली मान्यता असे म्हणणे शक्य आहे.

दुसरी बंदी म्हणजे समाज किंवा तत्सम समारंभ यावर घातलेली बंदी, परमतसहिष्णुतेचा ज्या कळकळीने त्याने एरवी आग्रह धरलेला होता तिच्याशी ही बंदी विसंगत आहे. अशा प्रकारच्या समारंभात त्याला फारच अनिष्ठता दिसते. तो वापरीत असलेली समाज ही संज्ञा धार्मिक स्वरूप नसलेल्या इतर लौकिक मेळाव्यांना उद्देशूनही असू शकेल. दुसऱ्या एका आज्ञालेखात तो समारंभाविषयी

---

१. या बाबतीत शार्लमेनशी तुलना करता येणे शक्य आहे. अशाच कारणामुळे त्याने यज्ञांना बंदी घातली होती कारण त्यांचे साहचर्य खोट्या देवाच्या पूजेशी होते. (विन्स्टन, शार्लमेन पृ. १६८.)

२. कोसंबी, इंट्रोडक्शन टु दि स्टडी ऑफ इंडियन हिस्ट्री. पृ. १८९.

बोलतो (बहुधा ते राज्यपुरस्कृत असावेत). या ठिकाणी दिव्य विभूतींचे दर्शन होऊ शके.[1] या उपाययोजनेच्या मागची नेमकी कारणे अनिश्चित आहेत. या समारंभात आर्थिक उधळपट्टी व अनैतिक आचार यासारखे 'अनिष्ट' असावे व म्हणून राजाचा आक्षेप शुद्धाचरणाच्या दृष्टीने असावा. पुढे तो असे म्हणतो की काही समारंभ राजाला गुणांनी युक्त असे वाटतात. अधिकृत रीत्या होणाऱ्या ज्या समारंभाचा वर उल्लेख केलेला आहे तेच हे समारंभ असावेत यात शंका नाही. '**समाज**' या शब्दाचा उपयोग कुतूहल निर्माण करणारा आहे. बौद्ध वाङ्मयात **समज्ज** किंवा **समजो** हा शब्द मेळावा अशा अर्थाने वापरलेला आहे.[2] या संज्ञेला काही सांप्रदायिक महत्त्व आहे असे समजले जाते. परंतु सर्वसाधारण सोहोळ्यांसाठी होणाऱ्या समारंभानाही ही संज्ञा वापरली जात होती.[3] अशा प्रकारे समाज व पशूंचा बळी देण्यात येणारे यज्ञ हे, प्राथमिक स्वरूपातील संप्रदायांवर आधारलेल्या एकाच धर्मविधीचे भाग असावेत व अशोकाची त्या संप्रदायांना संमती नसावी.

या लोकप्रिय सभा किंवा मेळावे दडपणे हे/कट्टर केंद्रीकरणाच्या कल्पनेला पुष्टी देणारेच आहे. अशा प्रकारचे मेळावे म्हणजे राजाच्या नव्या कल्पनांवर हल्ले चढवण्याची संधी, अशी भीती वाटत असावी. जुने परंपरागत सर्व उत्सव चालू ठेवल्याने या मेळाव्यात सहभागी होणाऱ्या लोकांच्या जुन्या कल्पना जागृत राहिल्या असत्या आणि अधून मधून नव्या शिकवणुकीविषयी त्यांच्या मनात शंका निर्माण झाल्या असत्या. उलटपक्षी संघटित उत्सव योग्य प्रकारे पार पाडण्याने अपेक्षित भावनिक परिणाम झाले असते व म्हणूनच त्यांचा उपयोग प्रचारयंत्रणेसारखा करून घेता येण्याजोगा होता. परत एकदा शार्लमेनच्या कारकिर्दीतील असेच एक उदाहरण आपल्याला पाहता येण्याजोगे आहे.[4] त्याने सॅक्सन लोकाना सभास्वातंत्र्य नाकारले व त्यामध्ये जुने उत्सव साजरे करण्यासाठी जमणाऱ्या मेळाव्यांचाही समावेश होता. न्यायदानविषयक सभांखेरीज इतर सभांना राजाच्या उच्च अधिकाऱ्यांकडून किंवा राजदरबारकडून परवानगी मिळाली तरच त्या होऊ शकत. सॅक्सन लोकांच्या विरोधाला शार्लमेन घाबरत होता व त्या लोकांना एकत्र येण्यास मनाई करण्याचा हा एक मार्ग होता.

---

१. पाचवे शिलाशासन, गिरनार, ब्लोख, ले एन्स्क्रेपसिओं द अशोक पृ. ९८.

२. पाली टेक्स्ट सोसायटी डिक्शनरी पृ. ४२५.

३. पांडे, स्टडीज इन दि ओरिजिन ऑफ बुद्धिझम पृ. ३१९-३२०.

४. विन्स्टन, शार्लमेन पृ. १६९.

धम्मविषयक कार्यात ज्याचा समावेश आहे अशा काही समाजकल्याणविषयक उपाययोजना दुसऱ्या शिलाशासनात सांगितलेल्या आहेत.[1] माणसे आणि प्राणी यांच्यासाठी वैद्यकीय केंद्रे, विहिरी आणि दोन्ही बाजूंनी सावल्या देणारी झाडे असलेल्या रस्त्यांची बांधकामे व औषधी वनस्पतींची लागवड अशा काही उपाय-योजना त्यांपैकी आहेत. उत्तम दळणवळणाचे महत्त्व अशोकाने ओळखले होते हे येथे लक्षात घेण्याजोगे आहे. ते केवळ व्यापार व वाणिज्य यांना मदत करण्या-पुरतेच नव्हते तर त्यामुळे त्याच्या कल्पनांचा अधिक व्यापक प्रमाणावर प्रसार करणे सुलभ झाले.

तिसऱ्या शिलाशासनात धर्माविषयी एक अस्पष्टसा उल्लेख आहे. ब्राह्मण व श्रमण यांना औदार्याने वागविणे हा एक गुण असल्याचे त्यात जाहीर करण्यात आलेले आहे[2] त्या काळातील कोणत्याही सहिष्णु व मोठ्या मनाच्या माणसाला असे विधान करता आले असते. ते धम्मांचे एक तत्त्व होते हे आपल्याला पुढील आज्ञालेखावरून पाहता येईल.

धम्माच्या विकासक्रमात चौथे शिलाशासन हा एक महत्त्वपूर्ण लेख आहे.[3] भूमीवर दीर्घकाळ नीतिमत्तेचा अभाव जाणवत होता असे स्पष्टीकरण या लेखातील सुरुवातीच्या भागात दिलेले आहे. जनावरांची व सजीवांची हत्या, आप्तजनांविषयी औद्धत्य, ब्राह्मण व श्रमण यांच्याविषयी औद्धत्य यावरून हे स्पष्ट होते. अनैतिक-तेच्या या वर्णनात बौद्धधर्मातील विशेष असे काही नाही. या ठिकाणी व इतरत्र येणारा ब्राह्मण व श्रमण यांच्याविषयीचा एकत्रित उल्लेख हा त्यांच्या धार्मिक पंथाविषयीच्या सहिष्णुतेचा पुरावा आहे.

नंतर या आज्ञालेखात पुढील विधान आहे.

**...त अज्ज देवानंप्रियस्स प्रियदसिनो राञो धम्मचरणेन भेरीघोसो अहो धम्मघोसो विमानदर्सणा च हास्तिदस्सणा च अग्गिखंधानि च अञानि च दिव्यानि** रुपानि दस्सयित्पा जनम्...[4]

'पण आज देवांच्या प्रिय प्रियदर्शी राजाच्या धर्माचरणामुळे भेरीघोषाऐवजी धर्मघोष होत आहे, लोकांपुढे स्वर्गीय रथ, हत्ती, अग्निगोल व इतर दिव्य रुपे यांचे देखावे मांडले जात आहेत.'

---

१. दुसरे शिलाशासन, गिरनार, ब्लोख ले एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. ९३.
२. तिसरे शिलाशासन, गिरनार, उपरोक्त पृ. ९५.
३. चौथे शिलाशासन, गिरनार, उपरोक्त, पृ. ९८.
४. चौथे शिलाशासन. गिरनार, उपरोक्त, पृ. ९८.

आपल्या धम्मविषयक धोरणामुळे नैतिक प्रगति फारच झालेली असल्याने लोकांची सर्वसाधारण स्थिती सुधारलेली आहे हे संपूर्णपणे पक्के गृहीत धरूनच राजा सुरुवात करतो. 'भेरीघोषाऐवजी धम्मघोष होत आहे.' या वाक्यांशाच्या अर्थावर अनेक विद्वानांच्यामध्ये वादंग माजले आहे.[1] तथापि, रणघोषाचे साहचर्य, आता बोधप्रद दृष्यांशी आहे असे लेखक सांगू इच्छितो हे संदर्भावरून बरेचसे स्पष्ट दिसते. भेरी या शब्दाचा अर्थ म्हणजे रणभेरीच असा नाही असे एक विद्वान सांगतात कारण भेरीचा उपयोग रणभूमीकडे सैन्य नेण्यासाठी केला जात असे किंवा नगरांमध्ये व खेडयांमध्ये दवंडी पिटविण्यासाठी होत असे. रणभेरी असा अर्थ करणे म्हणजे उगीचच त्याचा अर्थ संकुचित करणे आहे.[2] जातकग्रंथामध्ये भेरी हा शब्द ढोल या अर्थाने सर्रास वापरलेला आहे.[3] नट व वादक यांच्या तयारीसाठी लागणाऱ्या वस्तूंपैकी एक महत्त्वाचे वाद्य म्हणून वीणा व शंख यांच्या बरोबरीने भेरीचा उल्लेख अनेक वेळा केलेला आहे.

या वाक्यप्रयोगाची रचना करताना अशोकाच्या मनात जी कल्पना होती तिच्या सर्वांत जवळचा दृष्टिकोन भांडारकरांचा असावा असे आमचे मत आहे. ते लिहितात, 'लढाई, दवंडी, किंवा एखाद्या दृष्याचे लोकांपुढे प्रदर्शन यांची पूर्वसूचना देण्यासाठी कटाक्षाने भेरीघोष केला जाई. पण अशोकाने जेव्हा आपल्या धर्मप्रवण कारकिर्दीची सुरुवात केली तेव्हा लढाईसाठी भेरीघोष होणे थांबले व काही देखावे पाहण्यासाठी आमंत्रण म्हणून त्यांचा उपयोग होऊ लागला आणि हे देखावे सद्‌गुणांची निर्मिती व वाढ होईल अशा स्वरूपाचे असत. त्यामुळे भेरी ही सद्‌गुणांचा पुकारा करणारी ठरली.'[4]

हवेतून जाणारे रथ, हत्ती आणि इतर स्वर्गीय रुपे यांच्या देखाव्याकडे नेहमीच विस्मयाने पाहिले जात असे. ज्या थोडया समारंभांना अशोकाने मान्यता दिलेली होती त्या समारंभाच्या वेळी अशा देखाव्यांचे प्रदर्शन भरविले जात असावे असे दिसते. लोकमानसात असलेली प्रतीके व पुराणकथा यांची गुंफण करून पण त्याचवेळी त्यातून धम्माचा प्रचार होईल अशी काळजी घेऊन अधिकृत रीत्या

---

१. द ला वाले पुसें, लेंद ओ तो दें मौर्य पृ. १००, सनार, ले एन्स्क्रेपसिओं द पियदसि पृ. ११३.

२. रायचौधरी, पोलिटिकल हिस्ट्री ऑफ एन्शंट इंडिया, पृ. ३२७.

३. भेरी जातक, व्हॉ. एक, पृ. २८३–४. ढोल वाजविणाऱ्यांचा उल्लेख साधारणपणे भेरीवादक असा केलेला आहे.

४. आयए १९१३, पृ. २५ तळटीप.

असे कार्यक्रम होत असतील. उदाहरणार्थ, रथ, हत्ती, दिव्याकृती व प्रचलित असलेले लोकसंप्रदाय यांचा समावेश असलेली एखादी कथा समारंभाच्या वेळी सादर केली जात असेल व धम्माच्या तत्त्वांवर आधारित अशा एखाद्या परिणाम-कारक नीतिपाठावर ती कथा आधारलेली असेल. इंग्लंडमध्ये प्रारंभीची ख्रिस्ती नीतितत्त्वांवर आधारलेली नाटके केल्यावर जो परिणाम होई त्यापेक्षा ही परिस्थिती काही वेगळी नाही. फरक इतकाच की अशोककालीन देखावे प्रशासनामार्फत आयोजित केले जात असतील. अर्थशास्त्र असे सांगते की दिव्य आकृती रंगमंचावर सादर करून त्यांचा प्रचारासाठी उपयोग करून घेता येणे शक्य आहे.[1] अशोकाने याच हेतूने त्यांचा उपयोग करून घेतला यात शंका नाही.

अशोकाने आपल्या कारकिर्दीच्या त्याच म्हणजे तेराव्या वर्षी आजीविकांना बराबर टेकड्यांमधील दोन गुहा दान दिल्या.[2] अशोकाच्या आयुष्याशी वेगवेगळ्या काळात आजीविकांचा संबंध आलेला होता हे आपणास माहित आहे. पिंगलवत्स या आजीविक साधूने अशोकाच्या थोरपणाविषयीचे भाकित वर्तविलेले होते.[3] व अशोक या साधूंशी अतिशय स्नेहाने वागत असे, असे दिसते. राणीचा गुरु एक आजीविक होता हे जर खरे असेल तर बाल्यावस्थेतील अशोकावर त्याची बरीच छाप पडली असेल. त्यांच्याविषयी अशोकाजवळ भावनिक पक्षपात असावा व त्यांच्या संरक्षणाचीही तो काळजी घेत असावा. सातव्या स्तंभशासनात, ब्राह्मण व आजीविक यांच्या बाबतीत स्वत: लक्ष घालावे, अशी आज्ञा तो आपल्या धम्म महामात्तांना देतो.[4] धम्माविषयी त्याला अत्युत्कट आत्मविश्वास असला तरी इतर पंथाच्या कल्याणाचीही त्याला काळजी होती. इतर धर्मपंथ बाजूला सारण्याची मागणी करण्याइतका तो दुराग्रही किंवा धर्मवेडा नव्हता. तिसरी बौद्धधर्मसंगिती बोलाविण्यापूर्वीच्या घटनांविषयी ज्या आख्यायिका आहेत त्यावरून बौद्धधर्मीयांची आजीविक व निग्रंथ या दोघांनाही मान्यता नव्हती हे स्पष्ट होते.[5]

राज्यारोहणाच्या तेराव्या वर्षी एक लघु शिलाशासन प्रसृत करण्यात आले व तो लेख मध्यभारतात बैराट, रुपनाथ, सहस्राम या ठिकाणी व पुढे दक्षिणेकडे

---

१. दहा, ३, तेरा, १.

२. ब्लोख, ले एन्स्क्रेपसिओं द अशोक पृ. १५६, वटगुहा आणि खलतिक पर्वतावरील गुहा.

३. दिव्यावदान, पृ. ३७०, तळटीप.

४. ब्लोख, लें एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. १७१.

५. दुसरे प्रकरण पाहावे.

ब्रह्मगिरी, गाविमठ, सिद्धापूर, येरंगुडी व मस्की या ठिकाणी कोरविण्यात आला. आम्ही यापूर्वीच्या प्रकरणात दाखविल्याप्रमाणे, अशोक ज्यावेळी दौऱ्यावर होता त्यावेळी हा आज्ञालेख प्रसृत करण्यात आला होता.[1] त्या प्रकरणात सघम् उपायते किंवा उपयते या शब्दांविषयी आम्ही यापूर्वी जी चर्चा केलेली आहे, ते शब्द याच कोरीव लेखात येतात, तसेच आम्ही या पूर्वीच्या प्रकरणात ज्यांचा विचार केला त्या २५६ रात्रींचा उल्लेखही याच लेखात आहे.[2] या आज्ञालेखातील ज्या वाक्यावर विशेष वादंग माजलें ते पुढीलप्रमाणे आहे.

...या इमाय कालाय जंबुदिपस्सि अमिस्सा देवा हुसु ते दानि मिस्सा कटा.[3]

'...जे भारतातील देव, आतापर्यंत माणसांमध्ये मिसळत नव्हते, ते आता त्यांच्यात मिसळू...'

हा परिच्छेद अशोकाच्या निष्पाप श्रद्धेचे उदाहरण म्हणून सांगता येण्याजोगा आहे. आपले धम्मविषयक धोरण परिणामकारक ठरले म्हणून स्वर्गातील देव पृथ्वीवर, विशेषत: जंबुद्वीपामध्ये अवतरले आहेत असा त्याचा विश्वास होता. हे आपल्या कळकळीचे फळ आहे असे तो वर्णन करतो. हा विश्वास लाक्षणिकही असू शकेल. परंतु त्या काळात ही कल्पना परिचित होती हे निश्चित.[4]

मिश्र (मिसळलेला), या मूळ संस्कृत शब्दाच्या आधारे 'अमिस्सा' म्हणजे न मिसळलेला असे या शब्दांचे वाचन केलेले आहे. मृष या शब्दाच्या आधारे 'खोटे' असे एक पर्यायी भाषांतरही केलेले आहे. या भाषांतराच्या आधारावर एक असे विधान करण्यात आले आहे की, अशोक या वाक्यात खऱ्या व खोट्या देवांबाबत बोलत आहे. आणि हेच वादाचे कारण होऊन बसले आहे.[5] मिस्सा म्हणजे मिसळलेला किंवा साहचर्य असलेला हाच अर्थ आम्हाला पसंत आहे. मुनिसा ,लोकांबरोबर' या शब्दाचा संबंध लक्षात घेतला तर या वाक्यप्रयोगाचा अर्थ अधिक स्पष्ट होतो तथापि. आपल्या धोरणाला मान्यता दर्शविणारे काही दैवी साक्षात्कार झालेले आहेत अशी जरी अशोकाची श्रद्धा असली

---

१. उपरोक्त.
२. उपरोक्त.
३. ब्लोख ले एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. १४६.
४. आपस्तंब धर्मसूत्र, दोन, ७, १६, हरीवंस, तीन, ३२, १.
५. जे आर ए एस, हुल्टश, १९१०, पृ. १३१०, कॉर्पस इन्स्क्रिप्शनम इंडिकारम् व्हॉ. एक, पृ. १६६, द ला वाले पुसें, लेंद ओ तॉ दे मोर्य, पृ. ११२.

तरी आपल्या धम्माच्या प्रसाराच्या कळकळीमुळेच जंबुद्वीपातील लोकांमध्ये मिसळण्यासाठी स्वर्गातून प्रत्यक्ष देव स्वतः खाली आलेले आहेत याच अर्थाने शब्दश: ते वाक्य म्हटलेले नसावे, असे आम्हाला वाटते. ते वाक्य लाक्षणिक अर्थाने घेण्यासाठी असावे. आपले धम्मविषयक धोरण देशामध्ये चांगुलपणा निर्माण करण्यात इतके सफल झाले आहे की कृतयुगात जसे चांगले दिवस असल्याने मनोरंजनासाठी देव पृथ्वीला भेट देत असत व लोकांशी संबंध ठेवीत असत तशीच परिस्थिती आज आहे, असा अशोकाला विश्वास होता. या ठिकाणीही त्याच्या सर्वसामान्य वाचकाला परिचित असणाऱ्या एका मौलिक निर्णयाचा तो उपयोग करीत होता. लोक देवाप्रमाणे वागत होते व लोकांमध्ये मिसळण्यास देवांना भीती वाटत नव्हती असा वैभवाचा आणि पावित्र्याचा काळ म्हणजे आदर्श राज्य ही संकल्पना या काळातील लोकांच्या मनात सतत होती यात शंका नाही. पुढील काळात रामराजाच्या कल्पनेत ती संपूर्णपणे स्पष्ट झाली. धम्माच्या प्रभावामुळेच असे एक सुवर्णयुग निर्माण झाले, असे अशोक सुचवीत आहे.

याच सुमारास पाचवे शिलाशासन प्रसृत करण्यात आले.[१] या कालापर्यंत ज्याला प्रजाकल्याणाचे धोरण म्हणता येईल असा राजाचा हेतू स्पष्ट झालेला आहे आणि त्या विषयीच्या त्याच्या उल्लेखांमध्ये धार्मिक सूर दिसत नाही. राज्यकर्त्यांची स्वत:ची धार्मिक मते कोणतीही असली तरी त्याला ज्यात साधारणत: लक्ष घालावे लागते अशा, स्वामी व सेवक यांचे संबंध, कैद्यांना देण्यात येणारी वागणूक, वगैरे विषयाबाबत तो बोलतो आहे. स्वामी–सेवक संबंधाचा फार मोठा परिणाम कोणत्याही समाजात होत असतो व या कामासाठी अशोकाने अधिकाऱ्यांचे एक खास मंडळ नेमले ही गोष्ट अशोकाला भूषणावह आहे.

कैद्यांच्या कल्याणाकडे लक्ष पुरविणाऱ्या अधिकाऱ्यांविषयी जे विधान आहे त्यावरून अशोकाच्या धोरणाची मानवतावादी बाजू विशेषत्वाने लक्षात येते. ते विधान असे,

**. . . बंधनबद्धस्स पटिविधानाये अपलिबोधाये मोखाये च इयम् अनुबंध पजावति दा कटाभिकाले ति वा महालके ति वा वियापटा ते. . .**[२]

---

१. ब्लोख, ले एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. १०१.

२. पाचवे शिलाशासन, कळशी, ब्लोख, ले एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. १०४.

'...जर कैदी बेजबाबदारपणाने वागणारे असतील तर त्यांचे कल्याण साधण्यात ते गर्क आहेत. किंवा जर त्या कैद्यांना मुलेबाळे असतील वा ते पंगु किंवा वृद्ध असतील तर ते त्यांची सुटका करीत आहेत...'

केर्न यांनी या परिच्छेदाचा विचित्र अर्थ लावला आहे. 'आत्म्याभोवतालच्या शृंखला व त्याचो त्यांतून सुटका यांना उद्देशून हा परिच्छेद आहे असे त्यांना वाटते. पण हा ओढून ताणून लावलेला अर्थ आहे. हा आज्ञालेख सामाजिक व प्रशासकीय कल्याणाविषयीचा असून त्यात ज्या कैद्यांचा उल्लेख आहे ते अर्थातच राज्याचे कैदी आहेत. तुरुंग म्हणजे छळ करण्याची जागा किंवा शिक्षेची अंमल-बजावणी करण्याची जागा नव्हती असे दिसून येईल. त्यापेक्षा काही तरी अधिक, सुधारणागृहासारखे असे काही होते असे या आज्ञालेखावरून सूचित होते. कोणत्याही परिस्थितीत आपली सुटका होण्यासारखी आहे अशी आशा कैद्याला सतत वाटत राही. कैद्याच्या कुटुंबियांची देखभाल करणे ही आधुनिक शिक्षापद्धतीमधील एक संकल्पना आहे आणि मौर्यप्रशासनाच्या दूरदृष्टीचे ते बोलके उदाहरण आहे.

**धम्मासाठी** अधिकाऱ्यांची, **धम्म–महामत्तांची** नेमणूक करण्याची प्रथा अशोकाने प्रथम सुरू केली हे पाचव्या शिलाशासनावरून दिसून येते. त्याच्या कारकिर्दीच्या चौदाव्या वर्षी त्याने अधिकाऱ्यांचा हा एक खास वर्ग निर्माण केला. आज्ञालेखांवरून हे स्पष्ट होते की अधिकाऱ्यांचा हा एक गट म्हणून त्याला अतिशय महत्त्व होते. कारण धम्माच्या आचरणासंबंधी ते प्रत्यक्षपणे जबाबदार होते· या गटाला खास अधिकार होता. ते राजाच्या मर्जीतील असत व ते राजाच्या प्रत्यक्ष संपर्कात असत. सुरुवातीच्या वर्षामध्ये त्यांचे काम सर्वसाधारण लोक-कल्याणाशी संबंधित असे होते व **धम्माची** शिकवण व आचरण यांवर विशेष भर होता. समाजातील सर्व वर्गातील लोकांच्या घरांमध्ये, प्रत्यक्ष राजकुल व त्याचे आप्त यांच्या घरांमध्येही प्रवेश करण्यास त्यांना मुभा होती. पुढील काळात लोकांच्या जीवनात हस्तक्षेप करण्याची **धम्ममहामत्तांची** सत्ता हळूहळू कशी वाढत गेली ते आपणास आज्ञालेखांच्या पृथक्करणावरून दिसून येईल. पाटलिपुत्रासारख्या साम्राज्याच्या ऐन गाभ्यामध्येच हे अधिकारी कार्यरत होते असे नाही तर दूरवरच्या सीमा प्रदेशांमध्ये व शेजारच्या देशांतील लोकांमध्येही ते काम करीत होते.[२] याखेरीज धार्मिक समुहात व इतर निधर्मी गटांमध्येही ते काम करीत होते.

---

१. अशोक, पृ. ६४.

२. पाचवे शिलाशासन, ब्लोख, ले एस्क्रेपसिओं द अशोक, पृ. १०१.

अशोकाचा धम्म म्हणजे तत्कालीन विविध धर्मापैकी कोणत्याही एका धर्माविषयी निष्ठा असा प्रकार नाही, इतकेच नव्हे तर ते एक निव्वळ धार्मिक धोरण होते असेही नाही, उलट आर्थिक, सामाजिक आणि राजकीय जीवनाची स्थूल अंगे ज्यात अंतर्भूत होऊ शकतील असे विस्तृत क्षेत्र धम्माने व्यापले होते. या मताच्या समर्थनार्थ सर्वात बळकट पुरावा म्हणून धम्म महामत्त ही संस्था सादर केली जाते. जर धम्म कोणत्या तरी एकाच धर्माशी विशेषत: बौद्धधर्माशी संबंधित असता तर धम्ममहामत्त या संस्थेचे स्वरूप दिखाऊ ठरले असते. प्रत्येक धर्माच्या बाबतीत एखादा निष्ठावंत अनुयायांचा गट किंवा साधूंची संघटना होती व त्यांची निष्ठा कट्टर असल्यामुळे धर्माचा प्रचार करण्यासाठी म्हणून त्यांना संघटित केले असते तर त्यांनी अधिक कार्यक्षमतेने कार्य केले असते. उदाहरणार्थ, पंगु व वृद्ध लोकांना मदत करणे, दुर्दैवी लोकांच्या गरजा भागविण्याचा प्रयत्न करणे अशी कामे करून अशोकाच्या प्रजाकल्याणाच्या कामात सहभागी होण्यात बौद्ध श्रमणांना काही विशेष अडचण आली असती असे नाही.

परंतु परिस्थिती अशी नव्हती. वस्तुत: धार्मिक संघटना व धर्मपंथ यांच्या कल्याणासाठी झटणे ही धम्ममहामत्ताच्या अनेक जबाबदाऱ्यांपैकी एक जबाबदारी होती. वेगवेगळ्या धार्मिक गटांपासून धम्म हा निराळा होता व तो त्यांच्या वरचा होता. चीनशी जर तुलना केली तर भारतात जातिसंस्थेच्या घडणीची प्रक्रिया सुरू झाल्यानंतर सामाजिक नीतिमत्ता मागे पडू लागल्याची प्रवृत्ती दिसते. खुद्द बुद्धाचा प्रयत्न सुद्धा शेवटी अयशस्वी ठरला. या कालातील साधूंच्या संघटनांचा विचार केला तर त्या प्रामुख्याने एकांतवास व तपश्चर्या यांच्या आधारे व्यक्तिगत मुक्तीच्या मागे लागलेल्या दिसतात.[1] धर्मांतरे आणि दान या दोन गोष्टी सोडल्या तर एकूणात हा निधर्मी समूह आपल्या स्वत:च्याच गुणावर अवलंबून होता. खालच्या स्तरावर जन्मलेला नेहमीच बहिष्कृत राही, सामाजिक दडपणामुळे ब्राह्मण व श्रमण हे इतके बांधले गेले होते की एक मानवी जीव म्हणून त्याचा विचार करण्यास ते धजत नव्हते. धम्ममहामत्त ही संस्था म्हणजे खालच्या जाती व समाजातील दुर्दैवी लोक यांच्यासाठी समाजकल्याणाची एखादी पद्धती उभी करण्याचा अशोकाचा प्रयत्न होता. हा एक समाजकल्याणाचा प्रकार होता पण व्यवहारात जातिसंस्थेच्या ताठरतेमुळे तो बाजूला सारला गेला आणि बौद्ध भिक्षूकांकडूनही तो दुर्लक्षिला गेला.

---

१. केर्न, मॅन्युअल ऑफ बुद्धिझम, पृ. ७३

ही पद्धती अशोकाने सुरू केल्यामुळे दया व सहानुभूती या भावना तात्काळ बळावल्या असतील. परंतु त्यासाठीही एक व्यावहारिक गरज होती. जर सर्व स्तरांवर सामाजिक कल्याण साधावयाचे असेल तर केंद्रीत प्रशासन हे नेहमीच अधिक कार्यक्षम ठरते. अशोकाच्या केंद्रीकरणाच्या संकल्पनेत प्रजा कल्याणाचा अंतर्भाव निश्चितपणे होत होता. ज्यांना बेसुमार सत्ता दिलेली आहे असे हे केवळ अधिकारी आहेत, हा दोषारोप होऊ नये म्हणून अशोकाने त्यांना धम्ममहामत्त हा हुद्दा देऊन खात्री दिली. आता राजाचे खास कार्य पार पाडणारे असे ते एक विशेष अधिकार असलेले मंडळ बनले. नीच वा उच्च, धार्मिक वा. लौकिक अशा सर्व बाबतीत त्यांना विस्तृत नियंत्रणाचे अधिकार देण्यात आल्यामुळे समाजाच्या सर्व स्तरांशी सतत सानिध्य राहील अशी त्याला खात्री वाटली. समाजाच्या सर्व विभागांमध्ये धम्मविषयक धोरण खोलवर रुजावे हा त्याचा हेतूही या नियंत्रणामुळे सफल झाला.

पुढच्या म्हणजे सहाव्या शिलाशासनावरून, या महामत्तांमार्फत निर्माण झालेले, राजा व त्याची प्रजा यांच्यातील नाते याहून अधिक स्पष्ट होते.[१] व पूर्वीच्या पद्धतींपासून तो नव्याने दूर गेल्याचे जाणवते. राजा प्रासादातील विविध करमणुकींमध्ये रममाण झालेला असो, किंवा खाजगी स्वरूपाच्या कामात गुंतलेला असो, किंवा बाहेर उद्यानात असो, धम्महामत्तांना त्याच्याकडे केव्हाही जाता येत असे व त्यांनी आपापले अहवाल कोणत्याही वेळी राजाला सादर करावेत असे त्यांना सांगण्यात आलेले होते. जेव्हा अशा प्रसंगी अशोकाकडे ते येत तेव्हा संबंधित विषयावर तो निर्णय घेई. राजाच्या कृतीविषयी जेथे चर्चा होत असे त्या मंत्रि-परिषदेत येणारा कोणताही विषय किंवा मंत्रिपरिषदेने एखाद्या विषयासंबंधी तात्पुरता निर्णय घेतला असला तरी जो त्यांना राजापुढे ठेवावाच लागे असा विषय, यांच्या संदर्भात या निकडीचे महत्त्व आवर्जून सांगण्यात आले आहे.

लोकांविषयींच्या बातम्या राजाकडे घेऊन येणाऱ्या अधिकारीवर्गाचा उल्लेख, अशोकाने पाटिवेदिक असा केलेला आहे.[२] तर मंत्रिपरिषदेची मते प्रजेला खास करून महामत्तांमार्फत कळविली जात असत. हे दोनही गट वैशिष्टपूर्ण होते. पण पहिला गट म्हणजे 'वार्ताहर' हे महामत्तांच्या सर्वसाधारण गटाचा एक उपविभाग असण्याचीही अधिक शक्यता आहे असे दिसते. चांगल्या राजाचे

१. सहावे शिलाशासन, कळशी, ब्लोख, लं एन्स्क्रेपसिओं द अशोक पृ.१०६.
२. उपरोक्त.

एक महत्त्वपूर्ण वैशिष्ट्य म्हणजे संपर्क साधण्यासाठी तो सतत उपलब्ध झाला पाहिजे व या गोष्टीवर सर्व सैद्धांतिक ग्रंथांमधून जोर देण्यात आलेला आहे. अर्थशास्त्राने जरी राजासाठी कामाच्या प्रत्येक दिवसाचे भरगच्च वेळापत्रक दिलेले असले तरी जो राजा स्वत: प्रजेला दर्शन देत नाही असा राजा सार्वत्रिक अप्रीतीस कारणीभूत होतो. इतकेच नव्हे तर स्वत:च्या स्थानासही धोका निर्माण करतो. असे त्यात आवर्जून सांगितले आहे.[1] अंगमर्दन चालू असतानासुद्धा राजा राज्य-विषयक प्रश्नांकडे दुर्लक्ष करीत नसे किंवा ज्या लोकांची त्याला भेटण्याची इच्छा असेल त्यांना तो दर्शन देत असे, या मेगॅस्थिनिसच्या विधानावरून[2] चंद्रगुप्त वरील गोष्टीकडे केवळ एक वैचारिक तत्त्व म्हणून पाहात नसावा हे स्पष्ट होते.

या आज्ञालेखाच्या उत्तरार्धात आपल्या प्रजेच्या कल्याणाकडेच आपले पूर्ण लक्ष आहे हे अशोकाने पुन्हा एकदा ठामपणे सांगितले आहे. या प्रजाकल्याणाच्या यशाचे मूळ त्याविषयांच्या कामांची अंमलबजावणी व तीही तत्परतेने करणे यात आहे असे तो मानतो. या ठिकाणीही पुन्हा जोर दिलेला आहे तो, प्रशासकीय पद्धतीच्या कार्यक्षम संघटनेवर. सजीव प्राण्यांचे तो जे ऋण लागतो ते फेडण्याची त्याची इच्छा हे या कृतीमागचे कारण आहे असे वर्णन तो करतो. या कल्पनेचा उगम कोणत्याही धार्मिक निष्ठेमधून झालेला नसून अशोकाच्या व्यक्तिमत्वातून, प्रजेविषयीच्या जबाबदारीची त्याला स्वत:ला जी जाणीव आहे त्यातून झालेला आहे. प्रजेच्या कल्याणाविषयीचा आग्रह ही गोष्ट तत्कालीन सैद्धांतिक कल्पनांनाही परकी नाही. अर्थशास्त्रातील एका श्लोकामधूनही या आज्ञालेखाच्या काही भागां-बाबत स्फूर्ती मिळालेली असेल. राजाच्या कर्तव्यांबाबत विवेचन करताना कौटल्य लिहितो, ' आपल्या प्रजाजनांच्या सौख्यातच त्याचे सौख्य आहे, त्यांच्या कल्याणात त्याचे कल्याण आहे, जी गोष्ट त्याला स्वत:ला आनंद देते ती गोष्ट चांगली असे तो मानील.'[3] या आज्ञालेखामुळे असे मत होते की अधिकारी आणि दूत यांच्या सुसंघटित पद्धतीमार्फत अशोक राज्यावर नियंत्रण ठेवीत असावा. साम्राज्याच्या सर्व भागांशी त्याचा संपर्क आहे. राजपदाचा त्याचा स्वत:चा अनुभव, राजपदा-विषयीच्या तत्कालीन तात्त्विक ग्रंथांचे त्याला असलेले ज्ञान आणि त्याचे स्वत:चे व्यक्तिमत्व यांनी त्याला इतक्या विस्तृत प्रदेशाचा राजा बनल्यावर त्या विषयीच्या जबाबदाऱ्यांबाबत जागरूक बनविले.

---

१. एक, १९.
२. स्ट्रॅबो, पंधरा १, ५५.
३. एक, १९.

सातवे शिलाशासन लहान असून सर्व पंथांमध्ये सहिष्णुता असावी असे त्यात पुरस्कारले आहे.[1] विविध धार्मिक पंथ आपापसातील मतभेद सरळ सरळ व परस्परांना विरोध करून व्यक्त करीत असत असे दिसते. प्रत्येक पंथ संयम आणि मानसिक पावित्र्य यांची इच्छा करतो. असे समान तत्त्व काढणाऱ्या माणसाचे अधिक व्यापक तत्त्वासाठी हे आवाहन आहे. पंथोपपंथातील संघर्षातून कोणता धोका निर्माण होईल या विषयी अशोकाला जाणीव झालेली असली पाहिजे. अशा संघर्षामुळे धम्माचा प्रभाव नाहीसा होण्याचीही शक्यता होती कारण त्याचा धम्म म्हणजे आणखी एका धर्मपंथाची केवळ तत्त्वे असे लोकांना वाटण्याचा धोका होता व तसे त्यांना वाटले असते तर धम्माचे भवितव्यच नष्ट झाले असते. विविध समूह आणि धर्मपंथ यांनी आपापल्या जागी एकमेकात मिसळावे असेही सांगितलेले आहे. यामुळे धार्मिक सहिष्णुतेला मदत व राजकीय–सामाजिक सांप्रदायिकतेला प्रतिबंध असा दुहेरी हेतू साध्य झाला असता. सहिष्णुतेचे आवाहन करण्यामागे अशोकाचा केवळ राजकीय हेतूच होता असे येथे सुचवायचे नाही. इतर परिस्थितीमध्येही त्याची इच्छा अशीच राहिली असती यात शंका नाही. परंतु सहिष्णुतेचा हा आग्रह धम्मामुळे अधिक निकडीचा ठरला.

धार्मिक पंथांबाबतच्या अशोकाच्या सहिष्णुतेच्या प्रश्नाबाबत असे म्हटले गेले आहे की, त्याला केवळ इतर पंथांच्या बाबतीतच सहिष्णुतेची गरज भासत होती.[2] बौद्धधर्माचे नियम पाळण्याच्या बाबतीत मात्र तो कठोर आहे. बौद्धसंघाला उद्देशूनच लिहिलेला एक विशेष लेख म्हणून दुफळीसंबंधीच्या आज्ञालेखाचा केर्न उल्लेख करतात. अशोक आणि संघ यांच्यामधील नात्याविषयीच्या गैरसमजातून हे मत पुढे आलेले आहे. एक सामान्य अनुयायी व एक राजा या दोन्ही नात्यांनी बोलताना, त्याचा सूर एकदम एका अनुकूल उत्तेजकाचा व कठोर शिस्तपालकाचा होणे अपरिहार्य होते. एकाच धर्मपंथाला उद्देशून तो बोलत असल्याने साहजिकच त्याच्या सभासदांना तो आपली तत्त्वे व धोरण या बाबतीत एकी राखण्याचे आवाहन करीत आहे. दुसऱ्या एखाद्या अगदी निराळ्या संघटनेस उद्देशून जरी त्याने असाच आज्ञालेख लिहिला असता तरी त्याने तीच वृत्ती दाखविली असती. बौद्धांनी इतर पंथांविषयी सहिष्णुता बाळगू नये असे तो कोठेही म्हणत नाही किंवा या पंथांच्या कृती वा भाषण यांच्या

---

१. सातवे शिलासन, ब्लोख, ले एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. ११०

२. केर्न अशोक, पृ. ८२.

स्वातंत्र्यात अडथळे निर्माण करावेत असेही सांगत नाही. आयुष्याची जी विशेष हेतुपूर्ण ध्येये आहेत त्यांपैकी सहिष्णुता हे एक आहे असे त्याने मानलेले त्याच्या आज्ञालेखांवरून दिसते. त्याच्या स्वत:च्या धम्माबाबतच्या शिस्तीची त्याला इतर कोणत्याही पक्षाच्या शिस्तीपेक्षा अधिक कळकळ होती असे म्हणणेच इतर कोणत्याही मतापेक्षा अधिक अचूक ठरेल. त्याच्या धोरणाच्या दृष्टीने विविध गटांमधील शांतता हीच सर्वात महत्त्वाची होती.

आपल्या कारकिर्दीच्या दहाव्या वर्षी बोधिवृक्ष पाहण्यासाठी अशोक बोधगयेला भेट देण्यासाठी गेला. या घटनेनंतर त्याने धम्मा-यातांची पद्धती सुरू केली व त्याचे वर्णन आठव्या शिलाशासनात आहे.[1] धम्मांची वाढ व्हावी म्हणून देशामध्ये त्याने जे दौरे काढले ते प्रसंग म्हणजे धम्म–याता. अशोकाच्या पूर्वीचे राजे लष्करी मोहिमाखेरीज केवळ शिकारीकरिता आणि मनोरंजनासाठी सहल म्हणून दौरे काढीत असत. मेगॅस्थिनिसने चंद्रगुप्ताच्या कारकिर्दीतील एका शिकारीचे जे तपशीलवार वृत्त लिहून ठेवलेले आहे त्यावरून अशा दौऱ्यांमध्ये जो मनोरंजनात्मक भाग असे त्याच्याशी आपला परिचय झालेला आहे.[2] अशा प्रकारच्या शिकारीसाठी होणाऱ्या मोहिमा अशोकाने बंद केल्या, अकारण होणाऱ्या प्राणिहत्येवर आणि विहार-यातांमध्ये होणारा अनावश्यक खर्च व शक्तीचा व्यय यांवर अशोकाने जो हल्ला चढविलेला आहे तो पाहता अशी बंदी घातली.जाणे अपेक्षितच असावे. अशोक दौऱ्यावर गेला पण शिकारीऐवजी आपण होऊन धम्माच्या तत्त्वांचा प्रचार करण्याचे काम त्याने स्वीकारले. एखाद्या कल्पनेचा प्रसार करण्यासाठी ठिकठिकाणी प्रवास करणे व प्रवचने करणे या पद्धतीचा अवलंब जगभरच्या गुरुंनी केलेला आहे. तेव्हा राजाच्या दौऱ्यांच्या पद्धतीचा वापर अशोकाने धम्माच्या प्रसारासाठी केलेला असला तरी हा कोणत्याही प्रकारचा तऱ्हेवाईकपणा नव्हता.

तो स्वत:च सांगतो त्याप्रमाणे, श्रमण व ब्राह्मण यांच्या भेटी घेऊन त्यांना देणग्या देणे, वृद्धांची भेट घेऊन त्यांना चरितार्थासाठी सोने देणे, देशातील लोकांच्या भेटी घेऊन त्यांना उच्च नीतिपाठांचे शिक्षण देणे व त्यांच्या नीतिमत्तेची तपासणी करणे असा बहुविध हेतू या दौऱ्यांचा होता. या यादीवरून, हा हेतू केवळ

---

१. सातवे शिलाशासन, ब्लोख, ले एन्स्क्रेपसिओ द अशोक, पृ. १११. (या ठिकाणी आठव्या शिलाशासनाऐवजी सातव्या शिलाशासनाचा उल्लेख नजरचुकीने झाला असावा–भाषांतरकर्ता)

२. स्ट्रॅबो, पंधरा, १, ५५.

धार्मिक स्वरुपाचा होता असे नाही, तर धर्मपंथाना भेटी देणे हा एकूण सर्व हेतूचा एक लहानसा भाग होता, हे स्पष्ट दिसते. बोधिवृक्षाला त्याने दिलेल्या भेटीच्या आधारावर सुचविल्याप्रमाणे,[1] बौद्धधर्मीयांना पवित्र वाटणाऱ्या स्थळांची तीर्थयात्रा करणे एवढेच या धम्म–यातांचे स्वरुप नव्हते. या आज्ञालेखातील मजकुरातही अशोकाने त्यांचे अशा प्रकारे वर्णन केलेले नाही. श्रमणांच्या बरोबरीने ब्राम्हणांचा उल्लेख केलेला आहे त्यावरून निदान या बाबतीत तरी अशोक कोणत्या तरी एका पंथापेक्षा दुसऱ्या एका पंथावर अधिक कृपा करीत नव्हता, असे अगदी स्पष्ट होते. तसेच कोणत्याही एका स्थळाचा प्रवास. किंवा एखादा धार्मिक दौरा या ठिकाणी अभिप्रेत नाही हेही निश्चित दिसते. एखाद्या विशिष्ट भागातील समाजातील धर्मपंथांना आणि वृद्ध लोकांना भेटी देणे यांसारखे विविध मार्ग चोखाळून आपल्या प्रजाजनांबरोबरचे स्वतःचे संबंध वाढविण्याचा आणि आपल्या प्रजेपैकी अधिक व्यापक अशा स्तरामधील लोकांना आपली धम्मविषयक धोरणे जाहीर करण्याचा अशोकाचा प्रयत्न म्हणजे धम्म–याता अस अर्थ आपण लावू शकतो. म्हणजे लोकांची धम्माशी अधिकाधिक ओळख व्हावी या आद्य हेतूने केलेला दौरा अशा अर्थाने तो धम्म–याता या संज्ञेचा वापर करतो.

राज्याकडून होणाऱ्या. विविध ठिकाणांच्या तपासणीचा समावेश या दौऱ्यांमध्ये होत असलाच पाहिजे. आपल्या राज्यात काय काम घडते आहे याविषयी अशोकाला पराकाष्ठेची आस्था असल्यामुळे देशामध्ये दूरवर दौरे काढणे ही गोष्ट त्याच्या दृष्टीने काही असामान्य कार्यपद्धती होती अशातला भाग नसावा. एखाद्या बुद्धिमान राज्यकर्त्याला असा प्रवास म्हणजे स्थूलमानाने जनमत अजमावण्याचे एक समाधानकारक साधन मिळते. अशोकानेही या हेतूने या दौऱ्यांचा उपयोग करून घेतलेला असलाच पाहिजे. शिवाय स्थानिक अधिकाऱ्यांवर नियंत्रण ठेवण्याचे कामही या दौऱ्यांमुळे झाले. आणि अशोकाच्या साम्राज्यासारखा विस्तृत साम्राज्याच्या बाबतीत राज्यकर्त्याने ग्रामीण भागांना व अधिक दूरवरच्या भागांना भेट देणे हे अत्यंत जरुरीचे ठरले असावे. ब्रह्मगिरी व त्याच्या आसपासच्या भागांमध्ये सापडलेले लघु–शिलाशासन, हा अशोकाने आपल्या साम्राज्याच्या अगदी दक्षिण भागापर्यंतही प्रवास केला होता याचा पुरावा म्हणून दाखविता येईल, कारण आपण पाहिले आहे त्याप्रमाणे हा विशिष्ट आज्ञालेख त्याने दौऱ्यावर असतानाच प्रसृत केला होता.

---

१. एगरमाँट, दि क्रॉनॉलॉजी ऑफ दि रेन ऑफ अशोक मोरिय, पृ. ८१.

कदाचित सुरुवातीच्या या दौऱ्यांवर असतानाच धम्म-महामत्त नेमण्याची कल्पना त्याला सुचलेली असणे संभवनीय आहे. एखाद्या नोकरशाहीतील नित्याचे काम करणाऱ्या अधिकाऱ्यापेक्षा काही वेगळ्या अधिकाराने हे अधिकारी, राजा व त्याची प्रजा यांच्यातील मध्यस्थ म्हणून काम करीत. त्यामुळे धम्माच्या अंमल-बजावणीचे दुष्कर कार्य कार्यक्षम आणि पारखून घेतलेल्या माणसांमध्ये चांगल्या तऱ्हेने वाटून देता आले. परंतु यामुळे त्यांच्या कामाचे फळ काय मिळत असे याबाबतीत तो कोणत्याही प्रकारे अनभिज्ञ राहात नसे. कारण या महामत्तांबरोबर तो सतत संपर्क राखून असे. त्यानंतर सुसूत्रीकरण करणारा व नियंत्रक या नात्याने, एक प्रचंड जाळे त्याने आपल्या हुकमतीखाली तयार केले आणि त्याच वेळी धोरण व राज्य यांच्याबाबतच्या इतर विषयांकडे त्याला स्वत:ला लक्ष देता येऊ लागले.

ग्रामीण लोकसंख्येचे महत्त्व लक्षात घेणारा या दृष्टीने ज्याची नोंद झालेली आहे असा अशोक हा पहिला भारतीय राजा आहे हेही लक्षात येण्याजोगे आहे. जास्तीत जास्त लोकांची जितकी मते जाणून घेता येणे शक्य आहे तितकी घ्यावीत या त्याच्या प्रमुख इच्छेमुळेच हे झाले.[1] ही गोष्ट साध्य होण्याच्या दृष्टीने इतर उपाययोजनांप्रमाणेच हे दौरेही अशोकाला उपयुक्त ठरले. शहरांमधील संबंधामुळे बातम्या व कल्पना यांचा प्रसार एका शहरातून दुसऱ्या शहरात होई. शहरांमध्ये संपर्क साधण्याची सहज सुलभता आणि त्यांना जोडणारी दळणवळणाची चांगली सोय यामुळे हा आंतरप्रवाह वाहात राही. पण ग्रामीण भागांमध्ये राहणारे लोक अजूनही एकाकी होते. आपल्या प्रजेपैकी या विभागाशी साहजिकच अशोकाला संपर्क साधावयाचा होता. शिवाय ग्रामीण प्रजेला धम्माच्या बाबतीत काही स्पर्शच झाला नसता तर धम्माच्या यशाबाबतचा दावा सांगणे क्वचितच शक्य झाले असते. हे दोनही हेतू साध्य करण्याकरिता विस्तृत दौरे काढणे व प्रजाजनां-मध्ये प्रवास करणे यापेक्षा दुसरा कोणताही चांगला मार्ग नव्हता.

---

१. सीएफ्, ब्लोख, ले एन्स्क्रिप्सिओं द अशोक पृ. ११२. ब्लोख दर्शनम् या शब्दाचा अर्थ राजा स्वत: लोकांना दर्शन देतो अशा पारंपारिक अर्थाने घेतो. तसे असेलही. असे समारंभपूर्वक दर्शन म्हणजे निष्ठेचे केंद्र ठरे व विस्तृत आणि कह्यात ठेवण्यास काहीशा कठीण राज्याच्या बाबतीत तर ती विशेष गरज असे. अशोकाच्या बाबतीत असे दर्शन हेही लोकमताकडे पाहण्याचा झरोका ठरत असे.

पशुपालन अवस्थेतील अर्थव्यवस्थेचे प्रामुख्याने कृषिप्रधान अर्थव्यवस्थेत रुपांतर झाले या वस्तुस्थितीमुळे शेतकरी वर्गाला प्राप्त झालेल्या महत्त्वाची जाणीव अशोकाला झाली असावी असेही मत मांडता येण्याजोगे आहे. अशा प्रकारे जमीनमहसुलाच्या संघटनेमार्फत खेडी व शेतकरी हे राज्याचा प्रमुख आधार बनले. राज्याच्या उत्पन्नाचे सर्वात मोठे असे एक साधन म्हणजे जमीनमहसूल. त्यावर वाढत्या प्रमाणात अवलंबून राहावे लागल्याने देशाच्या प्रशासकीय संघटनेत शेतकऱ्याकडे एक नवीन महत्त्वाची भूमिका आली.

अशोकाच्या स्वभावातील काहीशी कठोर छटा परत नवव्या शिलाशासनात उमटलेली दिसते.[1] या कोरीव लेखाच्या पहिल्या भागात अत्यंत मोठ्या प्रमाणावर सर्वत्र साजऱ्या केल्या जाणाऱ्या काही समारंभांच्या मूल्यांवर हल्ला चढविलेला आहे. परंतु दुसऱ्या भागात अशोकाचा कठोरपणा काहीसा कमी झाला आहे असे समारंभ साजरे करण्यापेक्षा नीतीचे आचरण करणे हे निश्चितच अधिक मोलाचे आहे असे तो पुन्हा एकदा बजावतो. लोकांसाठी वेगवेगळे सणसमारंभ साजरे करण्याकरिता जे विधी करावे लागतात त्यावरच संपूर्णपणे जगणारे ब्राह्मण व इतर धार्मिक गटांचे तत्सम अनुयायी यांच्यावर अप्रत्यक्ष हल्ला म्हणजे हा आज्ञालेख, असे विधान करता येण्याजोगें आहे. आजारीपण, मुलाचा जन्म वा विवाह किंवा प्रवासाचे प्रस्थान यांसारख्या प्रसंगी करण्यात येणाऱ्या समारंभाचा अशोक विशेषत्वाने उल्लेख करतो. बीभत्स आणि निरर्थक समारंभ साजरे करण्याबाबत माता व पत्नी यांना विशेष करून तो दूषण देतो.

त्याच्या काळात धार्मिक आचरणामध्ये धर्मविधींवर प्रमाणापेक्षा अधिक भर दिला जात असल्याची जाणीव त्याला झाली होती यात शंका नाही. त्यांपैकी बरेचसे निरर्थक होते व धर्मकृत्ये करणाऱ्या पुजारीवर्गाचे ते एक केवळ उत्पन्नाचे साधन होते ही जाणीवही त्याला होती. अशा समारंभातून फारच कमी फलनिष्पती होते व त्यांच्याशी तुलना केली तर नीतीचे आचरण हे खरे मौल्यवान आहे हा त्याचा मुद्दा म्हणजे अशा धर्मविधींकडे तार्किक दृष्टिकोनातून पाहण्याचा त्याचा प्रयत्न आहे. जे श्रमण आणि ब्राह्मण धर्मविधींना उत्तेजन देतात त्यांची तो अवहेलना करीत नाही. वस्तुतः त्यांच्याविषयी औदार्य दाखवावे असे तो म्हणतो. तो फक्त, या विषयाबाबत तर्कास पटणारी वृत्ती असावी असे म्हणतो आहे. या समारंभांच्या ऐवजी जे विधी सुरू करण्याची त्याची इच्छा आहे ते खरोखरच साधे आणि

१. ब्लोख, ले एंन्स्क्रेपसओ द अशोक, पृ. ११३.

समाजातील मानवी नातेसंबंध विकसित करण्याच्या दृष्टिकोनातून अर्थातच अधिक मोलाचे आहेत. गुलाम आणि सेवक यांच्याविषयी योग्य ते सौजन्य, वडील मंडळी-विषयी आदर आणि जनावरांविषयी मृदुता इत्यादी गोष्टींची मागणी तो करतो.[1] याचे पारितोषिक म्हणून इहलोकातील इच्छित वस्तूची प्राप्ती व परलोकी अनंत पुण्य असल्याने तो सांगतो. थोडक्यात हा पुण्यकारक आचार आहे व त्याची परिणती सर्वसाधारण कल्याणात होऊ शकते व वैयक्तिक स्वरुपाचे खर्चिक धर्म-विधी व समारंभ यांच्यापेक्षा हे उद्दिष्ट निश्चितच जास्त चांगले आहे.

या प्रथांना असणारा अशोकाचा आक्षेप हा संपूर्णपणे धार्मिक हेतूवर आधारलेला नव्हता. यांपैकी प्रत्येक समारंभासाठी जो मोठा खर्च करावा लागे त्या विषयी अशोकाला चिंता होती. हा खर्च काही थोड्याजणांनाच परवडत असे, आणि अर्थशास्त्राच्या परिभाषेत त्यांचे मूल्य ठरवावयाचे झाल्यास पैशाचा वापर अनाठायी होता कारण समाजातील एका लहान विभागाच्या हाती तो जमा होत जाण्याची प्रवृत्ती होती. त्यानंतर तो पैसा अनावश्यक गरजा भागविण्यासाठी मोठ्या प्रमाणावर खर्च होत असे. लोकप्रिय प्रथांच्या या धिक्काराचा संबंध तिसऱ्या शिलाशासनातील वाजवी खर्च व वाजवी परिग्रह करण्याच्या विनंतीशी संबंधित आहे.

दहाव्या शिलाशासनात अशोक कीर्ती आणि वैभव यांच्या विरुद्ध बोलतो आणि आपल्या प्रजाजनांनी धम्माच्या तत्त्वाचे पालन करावे या एकाच वैभवाची आपल्याला इच्छा आहे असे तो आवर्जून सांगतो.[2] या दिशेने चाललेल्या त्याच्या प्रयत्नांच्या मागे, परलोकी पुण्य मिळविणे व या जगातील माणसांना असलेला धोका नाहीसा करणे असे दुहेरी कारण असल्याचे तो सांगतो. पहिल्या कारणाचा उल्लेख आहे पण त्याची चर्चा केलेली नाही. पापाचा धोका, असे तो दुसऱ्या कारणाचे स्पष्टीकरण देतो. पुढे तो म्हणतो की उच्च पदावर असलेल्या माणसाला धम्माच्या तत्त्वाचे पालन करणे अधिक कठीण असते कारण त्याला अधिक त्याग

---

१. या आज्ञालेखात व्यक्त करण्यात आलेली भावना सिगलओवाद सुत्त यामधील भावनेसारखीच आहे. (दीघ निकाय, व्हॉ. तीन, पृ. १८०–९३ अपदान, दोन ६०४) काही पारंपारिक प्रथांची उपयुक्तता व त्यांच्या जागी काही व्यवहार्य कृतींमधील फायदे, बुद्धाने एका तरुण गृहस्थाश्रमी माणसाला दाखवून दिलेले आहेत.

२. ब्लोख, ले एन्स्क्रिपसिओं द अशोक, पृ. ११७.

करण्याची गरज असते. उच्च पदावर असणाऱ्याला देऊ करण्यात येणाऱ्या वस्तू व सेवा यांचा त्याग करावा लागण्याचा संभव त्यामुळे निर्माण होतो. यावरून त्याला दैनंदिन नित्यक्रमाच्या संदर्भातील मानवी दौर्बल्याची जाणीव कशी होते हेच दिसते. प्रत्येक माणसाकडून अशक्य ते मागण्याची अशोकाची इच्छा नाही, उलट धम्मानुसार आचरण करीत असताना येणाऱ्या अडचणींचे स्वरुप फारच भिन्न असणार हे त्याला उमगलेले आहे आणि म्हणून यातून काही प्रश्न निर्माण होतील हे मान्य करण्यास तो तयार आहे. या आज्ञालेखातील त्याचा सूर प्रचारकाचा आहे आणि त्याचवेळी आपल्या कल्पनांमधील अंगभूत गुणांविषयी ज्याला श्रद्धा आहे अशा माणसाच्या संपूर्ण आत्मविश्वासाचाही आहे.

पुढच्या म्हणजे अकराव्या शिलाशासनात धम्माचे अधिक स्पष्टीकरण दिलेले आहे.[१] या ठिकाणी धम्माची देणगी (दान) धम्माची वाटणी व धम्मामधून नाते यांचा उल्लेखतो करतो. या आज्ञालेखातील मजकूर बराचसा नवव्या शिलाशासनासारखाच आहे. या ठिकाणीही परत कोणत्याही धर्माचा उल्लेख नाही पण धम्माचे स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न करण्यात आलेला आहे. जर धम्म म्हणजे बौद्ध धर्माचा प्रचार करण्याचा एक प्रयत्न असता तर सामान्य माणसाने बौद्ध भिक्षू व प्रचारक यांच्या शब्दांकडेही विशेष लक्ष द्यावे असे आणखी सांगणे अशोकाला भागच पडले असते, असे आपण जास्त खात्रीपूर्वक सांगू शकू. धम्म म्हणजे काय याविषयी अशोकाचे स्पष्टीकरण पाहता ती एक निधर्मी शिकवण होती असे दिसते. थोरांविषयी, मग ते धार्मिक दृष्टया थोर असोत किंवा कुटुंबातील थोर मंडळी असोत, दोघांविषयीही आदर दाखविण्यावर भर दिलेला आहे. ज्या समुहाला आपली सामाजिक नीतिमत्ता विकसित झाल्याचा अभिमान असेल अशा कोणत्याही समुहाला उद्देशून मित्र, परिचित आणि धार्मिक संघटनेचे अनुयायी यांच्याविषयी उदारता आणि दया दाखवावी असे आवाहन करता येण्याजोगे आहे. प्राणिहत्त्येपासून दूर राहावे ही विनंती म्हणजेही एक दयाळूपणे केलेले आवाहन आहे व अनेक संस्कृतीमध्ये अनेक शतके ते ऐकले जात आहे.

अशोकाच्या दृष्टीने धम्म म्हणजे एक जीवनपद्धती होती. त्याला परिचित असलेल्या विविध विचारवंतांच्या नैतिक शिकवणुकीतून व बहुधा त्याच्या स्वतःच्या जीवनानुभवातून वेचून घेतलेल्या गोष्टींचे ते सार होते. उच्च दर्जाची सामाजिक नीतिमत्ता व नागरिकांची जबाबदारी यांच्यावर तो आधारलेला होता. अशोक

---

१ उपरोक्त, पृ. ११९.

स्वत: सिद्धांत मांडणारा ब्राह्मण नसल्याने जातिरचनेच्या आदर्शभूत सिद्धांताऐवजी त्याने दैनंदिन जीवनातील व्यावहारिक शब्दांमध्ये आपला धम्म सांगितला. निधर्मी नातेसंबंधांच्या साध्या तर्कशुद्ध समजावर आधारलेले सावध सामाजिक वर्तन हे त्याच्या दृष्टीने कोणत्याही समाजासाठी अत्यावश्यक होते. त्याच्या कालातील समाजामध्ये ब्राह्मणी धर्माच्या प्रभावामुळे ही प्रवृत्ती मृतप्राय होऊ लागली होती. द्विजांना जे अधिकार व अग्रमान मिळत होते ते त्यांच्या व्यक्तिगत गुणांमुळे नसून सुखद अपघातातून त्यांना लाभलेल्या जन्मामुळे. ब्राह्मणी शिकवणुकीचे हे लक्षण अनेकांच्या ठिकाणी असल्याने, अशोकाच्या शिकवणुकीमुळे त्याविषयी वाद उपस्थित होणे अपरिहार्य होते. त्याने दयाळू सामाजिक वर्तनाचा आग्रह धरला त्यामुळे त्याला अनेक समाजांमध्ये सामान्यपणे आढळणारी सामाजिक दांभिकता टाळण्याचा प्रयत्न करता आला.

अशाप्रकारे दैवी कृपा वा तत्सम फळाची शक्यता पुढे ठेवून, केवळ शिष्टाचारातून भासणारी जबाबदारीची कल्पना त्याने इतकी उन्नत करण्याचा प्रयत्न केला की ती जबाबदारी खरोखरीचीच वाटावी, त्या कल्पनेची गुंफण काही अध्यात्मिक महत्त्वाच्या गोष्टीशी केली कारण त्यामुळे धर्मातील अध्यात्मिकतेच्या कल्पनेचा ज्या लोकांना आधीच परिचय होता त्यांना ती सहज समजावी.

आपल्या सर्व आज्ञालेखांमधून त्याने कुटुंबाचे महत्त्व आग्रहाने प्रतिपादन केले आहे. धम्माचा विकास व प्रसार या दृष्टीने कुटुंब हे एक आदर्श केंद्र होऊ शकेल असे त्याला वाटले यात शंका नाही. मौर्यकालीन परिणत समाजव्यवस्थेत, नात्याच्या बंधनांवर अतिशय जोर देणाऱ्या जातिव्यवस्थेने एक आद्य महत्त्वाची संस्था या दृष्टीने कुटुंबाच्या विकासास चालना दिली. वंशपरंपरेने ठरणारी जात व पूर्वजांचे व्यवसाय यामुळे पिढ्यानुपिढ्यांमधील नातेही अगदी निकटचे असे निर्माण झाले आणि म्हणूनच तितक्याच सरळपणाने कल्पनाही प्रचलित होत गेल्या. पितृसत्ताक पद्धतीनुसार वडील किंवा आजोबा यांच्यापासून ते थेट पगारी नोकर व दास यांच्यापर्यंत सर्वांचा समावेश एकाच घरात करणारे कुटुंब हे एक महत्त्वाचे सामाजिक परिमाण होते. पैशावर आधारलेल्या अर्थव्यवस्थेचा उदय होऊन या काळात ती मूळ धरू लागली होती. नव्या व्यापारी व्यवसायांचा उदय झालेला होता. यामुळे एक अधिक बळकट परिमाण म्हणून कुटुंबाचे स्थान प्रस्थापित होण्यास मदतच झाली, कारण अशा कुटुंबामध्ये मोठे भांडवल गोळा करणे ही एक महत्त्वाची प्रेरणा ठरली होती. त्यामुळेच मित्र आणि शेजारी यांच्याप्रमाणेच पिता व पुत्र, बंधु व स्वामी यांच्या बाबतीतही धम्माप्रमाणे वागण्याचे आवाहन अशोक वारंवार करतो.

धौली आणि जौगडा येथे अकरावे, बारावे व तेरावे ही शिलाशासने वगळण्यात आली आहेत आणि इतर लेखांमध्ये दोन वेगळया आज्ञालेखांचा समावेश केलेला आहे. इतर जागांच्या बाबतीत या दोन वेगळया आज्ञालेखांचा समावेश करण्यात आलेला नाही. वरील तीन लेखांची छाननी करणे व कलिंगाच्या प्रदेशात त्यांचा समावेश का केला नाही याची माहिती काढणे महत्वाचे आहे. आताच आपण पाहिले त्याप्रमाणे अकरावा आज्ञालेख हा नीतिमत्तेच्या आचरणाविषयी आहे व मजकुराच्या दृष्टीने तो नवव्या शिलाशासनासारखाच आहे. बारावे शिलाशासन म्हणजे विविध पंथामधील सहिष्णुतेविषयी केलेले सरळ आणि जोरदार आवाहन आहे.[१] वेगवेगळया पंथांमध्ये स्नेहपूर्ण नाते निर्माण करण्याच्या आड येतील असे बरेच मतभेद अजूनही होते हे दिसून येते. या मतभेदांना अर्थातच काही महत्त्व असावे नाहीतर एक संपूर्ण आज्ञालेख व तोही इतक्या लांबीचा खर्ची घालून अशोकाने या विषयाला इतकी प्रसिद्धी दिली नसती. लोकांकडून धम्माला ज्या प्रमाणात प्रतिसाद मिळत होता तो पाहता ही नवी शिकवण कदाचित आपल्या पायाखालची जमीनच काढून घेईल हे इतर पंथांच्या नेत्यांना उमगले असावे किंवा त्याची त्यांना कल्पना आली असावी. अशा नेत्यांकडून अशोकाच्या धोरणावर जी टीका झाली असेल तिचा परिणाम म्हणूनही हा आज्ञालेख असू शकेल. ब्राह्मणांसारख्या काही गटांनी कदाचित, धम्माचा लेखक इतर प्रत्येक धर्माला हुसकून लावून आपल्या स्वतःच्या कल्पना लादू पाहात आहे, असे मत मांडले असावे. किंवा धम्माचे अनुकरण केल्याने परंपरागत प्रथा पाळण्याची वृत्ती कमी झाली असावी व त्यामुळे स्थानिक पुरोहितांच्या प्रभावावर त्याचा काहीसा परिणाम झाला असावा, त्यामुळे लोक अधार्मिक झाल्याच्या तक्रारी करण्यात आल्या असाव्यात.

आपण अजूनही साधू व गृहस्थाश्रमी या दोन्हींच्या बाबतीत सर्व पंथांचा सन्मान करतो असे स्पष्टीकरण (राजा) अशोक देतो. तथापि तो पुढे असे म्हणतो की, 'सर्व पंथांमधील अत्यावश्यक तत्त्वांची प्रगती म्हणजेच सर्वोच्च सन्मान असे मी मानतो.' ही प्रगती सहिष्णुतेमध्ये आहे, येथे निष्क्रीय सहअस्तित्त्व नको तर मनाची एक अशी सक्रीय चौकट पाहिजे की ज्यात इतर लोक कोणत्याही प्रकारे दुखावले जाणार नाहीत अशा पद्धतीने मत व्यक्त करता आले पाहिजे. विविध पंथांविषयी बोलताना तो संयम बाळगण्यास सांगतो नाहीतर स्वतःच्या पंथाची अवास्तव स्तुती व इतर पंथांचा अपमान होईल. इतर पंथांचा सन्मान करण्यामध्ये स्वतःच्या पंथाचे कल्याण व सन्मान आहे. परत एकदा सामाजिक वर्तनाची कल्पना

१. ब्लोख, ले एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. १२१.

पुढे आलेली आहे. श्रेष्ठ दर्जाचा मनुष्य स्वतःच्या निष्ठेच्या बाबतीत ठाम असला तरी आपल्या बरोबरीच्या माणसांच्या मतांच्या बाबतीत उक्ती व कृती या दोन्ही दृष्टींनी अत्यंत सहिष्णु असतो व अशा सहिष्णुतेमुळेच तो स्वतःचे व तो ज्या गटाशी एकनिष्ठ असतो त्याचे स्थान उंचावतो. ' सद्गुणांच्या ' संदर्भात अगदी कन्फ्यूशिअसचीच वाटणारी एक संकल्पना या आज्ञालेखात उमटलेली दिसते. लेखक पुढे सांगतो की तडजोड ही नेहमीच गुणावह असते आणि सर्व पंथांनी परस्परांच्या नैतिक शिकवणुकीचे पालन करावे व ती ऐकावी. या दृष्टिकोनामुळे त्याच्या धम्माची प्रगती झाली कारण विविध पंथांतील मूलभूत बाबींवर त्याचा धम्म आधारलेला होता. अशाप्रकारे, सर्व पंथांच्या मूलभूत गोष्टींच्या विरोधी असे निदान वैचारिक दृष्टचा तरी, धम्मामध्ये काहीही नाही हे दाखवून त्याने आपल्या स्वतःच्या भूमिकेचे समर्थन केले आणि त्याच वेळी, आपला हेतू धम्माने इतर पंथांच्या शिकवणुकीवर मात करावी असा नसून परस्परांना सहिष्णुता दाखविण्याचा आग्रह धरणे हा आहे हे स्पष्ट करून या पंथांच्या नेत्यांचे समाधान केले.

या मूलभूत गोष्टींची वाढ व्हावी या दृष्टीने त्याचा स्वतःचा कार्यभाग म्हणजे महामात्तांच्या अधिकारांमध्ये वाढ करणे. परत एकदा तो असे सांगतो की धम्माच्या प्रचाराच्या कार्यात धम्ममहामत्त गुंतलेले आहेत. त्याचप्रमाणे स्त्रियांच्या बाबतीत ज्यांच्यावर जबाबदारी टाकलेली आहे ते इथीजख–महामत्त हेही या कार्यात मग्न आहेत. या अधिकाऱ्यांचे नेमके काम कोणते हे अजून अनिश्चित आहे.[1] परंतु समाजातील प्रत्येक व्यक्तीपर्यंत धम्म पोहोचला पाहिजे हे त्यातून स्पष्ट होते. हेच तत्त्व पशुसंगोपनकेंद्रावर देखरेख करणारे अधिकारी व ज्यांना इतर काही कामे नेमून दिलेली आहेत असे अधिकारी, यांनाही लागू होते. त्या सर्वांना धम्मासंबंधीचे व धार्मिक सहिष्णुतेविषयीचे शिक्षण देण्यात आलेले होते व आपले दैनंदिन कार्य करीत असताना या शिक्षणाचा ते प्रसार करतील अशी त्यांच्याविषयी अपेक्षा आहे. या दृष्टिकोनाविषयीच्या राजाच्या मताचा सारांश म्हणजे या आज्ञालेखाच्या शेवटी असलेले वाक्य. तो म्हणतो,

**... अयम् च एतस्स फल य आतपपासंदवढि च होति धम्मस्स च दीपना ..**
' याचे फल म्हणजे आपल्या स्वतःच्या पंथांचा वाढता प्रभाव व धम्माचे वैभव...' धम्माचे पालन करताना जरी काही विशिष्ट धर्मविधींचा त्याग करणे भाग पडले तरी त्याचा अर्थ आपल्या स्वतःच्या पंथाविषयीची निष्ठा सोडावी असा होत नाही, हा मुद्दा स्पष्ट करण्याची अशोकाची इच्छा आहे. उक्ती व कृती यांच्यासाठी

१. या अधिकाऱ्यांच्या कामाच्या तपशीलवार चर्चेसाठी चौथे प्रकरण पाहावे.

धम्माचा आधार घेणे म्हणजे स्वतःच्या पंथातून बहिष्कृत होणे अशी टीका जे करीत होते त्यांना उत्तर देण्यासाठी केलेले हे धम्माचे समर्थन आहे. आपली स्वतःची कृत्ये व सर्व पंथांच्या अनुयायांबरोबर असलेले चांगले संबंध यामुळे धम्माची वाढ झाली आहे, मनापासून सहिष्णुवृत्ती बाळगणे हा मार्ग अंगिकारला तर असे संबंध प्रस्थापित करता येणे शक्य आहे, असे अशोक दाखवून देतो.

अशोकाच्या इतिहासाच्या अत्यंत महत्त्वाच्या लिखित पुराव्यांपैकी तेरावे शिलाशासन हा एक पुरावा आहे.[1] या आज्ञालेखात गोषवारा देण्याचा सूर आहे त्यावरून आधीचे आज्ञालेख प्रसृत केल्यानंतर काही महिन्यांमध्येच हा लेख कोरविण्यात आला असे दिसते. युद्ध व हिंसा यांच्याऐवजी धम्माने विजय मिळविण्याच्या एका नव्या कल्पनेचा आविष्कारही त्यात आहे. हा अशोकाचा पश्चात-विचार असला पाहिजे नाहीतर त्याने आपल्या आधीच्या आज्ञालेखांमध्ये तो सांगितला असता. आपल्या कारकिर्दीच्या सुरवातीच्या भागाकडे मागे वळून पाहात असताना, कलिंगयुद्धाने निर्माण झालेल्या भीषणतेमुळे तो अत्यंत अस्वस्थ झाला असावा असे दिसते. युद्धाविषयीचा त्याचा पश्चात्ताप उत्तरोत्तर वाढत गेला असावा, परंतु युद्धानंतरच्या नजीकच्या काळात तो इतक्या मोठ्या प्रमाणात प्रत्यक्षात नसावा असे दिसते. लघुशिलाशासनासारख्या सुरवातीला प्रसृत केलेल्या काही आज्ञालेखांमध्ये अशोकाने आपला पश्चात्ताप जाहीर केलेला नाही हे खरोखरच विचित्र आहे. पण या पश्चातापाचा परिणाम म्हणून तो स्वतः धम्माच्या काळजीपूर्वक अभ्यासात गर्क झाला. युद्धामुळे होणारे मृत्यू व वाताहात तो अत्यंत शोकप्रद समजतो. ब्राह्मण आणि श्रमण यांच्यासारख्या आदरणीय लोकांनाही अशा प्रकारच्या दुर्दैवाला सामोरे जावे लागते या वस्तुस्थितीविषयी त्याला याहून अधिक दुःख होते. सामाजिक वर्तनाचे नित्याचे नियम पार कोलमडतात.

धम्म म्हणजे काय याचा संदर्भ लक्षात घेतला तर अशोकाने केलेला ब्राह्मण आणि श्रमण या संज्ञांचा वापर लक्षात घेण्याजोगा आहे. तो या आज्ञालेखात असे सांगतो की, ग्रीकांचा एक अपवाद सोडला तर हे दोन वर्ग नाहीत असे लोकसमूह अस्तित्वात नाहीत.[2] जंबुद्वीपांच्या सीमांवरील देशच त्याला माहीत होते, त्या देशांमध्ये भारतीय धर्मांचा परिचय होता व अनेक ठिकाणचे धर्म त्याच्या राज्यातील धर्मांप्रमाणेच होते ही वस्तुस्थिती लक्षात घेतली तर त्याचा असा

---

१. ब्लोख, ले एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. १२५.

२. उपरोक्त, पृ. १२८.

अभिप्राय पडणे साहजिकच आहे. ग्रीकांना वगळण्यात आलेले आहे. कारण त्यांचे धर्म संपूर्णपणे वेगळे होते हे माहीत होते व त्यामुळेच त्यांच्या धर्मसंघटनाही वेगळ्याच होत्या. भारतीय समाजात ब्राह्मण हे अधिक महत्त्वाच्या वर्गांपैकी एक होते हे ग्रीकांना माहीत होते व मेगॅस्थिनिसने त्यांचा उल्लेख तत्त्वज्ञानी म्हणून केला होता.[१] परंतु ब्राह्मण व श्रमण यांच्यामध्ये फरक कोणता याविषयी त्यांच्या मनात काहीसा गोंधळ होता. मेगॅस्थिनिसच्या एका उताऱ्यात साधूंना हायलोबिओइ म्हटले आहे व पुढे त्यात असे म्हटले आहे की 'बौट्ट'चे नियम अनुसरणारे काही तत्त्वज्ञानी आहेत.[२] हायलोबिओइ म्हणजे बुद्धाचे अनुयायी की त्यांचा एक वेगळाच गट होता, यापैकी लेखकाला काय अभिप्रेत आहे ते या परिच्छेदावरून नीटसे समजत नाही. एक वेगळा गट हाच अर्थ अधिक संभवनीय दिसतो. हायलोबिओइ म्हणजे बहुधा ब्राह्मण साधु असावेत व बुद्धाचे अनुयायी म्हणजे श्रमण असावेत. लेखकाने या दोन्ही गटांचा गोंधळ केला असावा. या वृत्तांतावरून ब्राह्मण व श्रमण हे अतिशय सन्माननीय गट असावेत असे दिसते.

अशोकाच्या दृष्टिकोनातून ब्राह्मण व श्रमण हे दोघेही जवळ जवळ सारखेच होते कारण ते समाजाचे धार्मिक नेते असल्यामुळे दोन्ही गट अतिशय सन्माननीय होते. तो जेव्हा कटाक्षाने आपला बौद्धधर्मावरील विश्वास बोलून दाखवितो असे काही प्रसंग सोडल्यास आपल्या आज्ञालेखांमधून उल्लेख करताना तो या दोन्ही गटांमध्ये कोणत्याही प्रकारचा फरक करीत नाही. एखादे संयुग असल्यासारख्या या संज्ञा नेहमी बरोबरीने येतात, एकाच्या नंतर दुसऱ्याचा उल्लेख करणे ही गोष्ट अगदी अहेतुक आहे.[३] या मुद्द्यावरून, अशोकावर बौद्धधर्माबाबत पक्षपाती असल्याचा आरोप करता येण्याजोगा नाही.

धम्माने विजय मिळविण्याची कल्पना हा धम्माच्या तत्त्वाचा तर्कशुद्ध विकास आहे. सैन्यबळाने मिळविलेल्या विजयाला तो विरोधी असल्याने आक्रमक युद्ध

१. स्ट्रॅबो, पंधरा, १, ५९.

२. क्लेमेंट ऑफ अलेक्झांड्रिया, स्ट्रोम, एक, पृ. ३०५, ए, बी.

३. ब्राह्मण हा शब्द श्रमण या शब्दाच्या पूर्वी किंवा नंतर किती वेळा आज्ञालेखांमधून येतो ती संख्या आम्ही मोजलेली आहे. आणि ही संख्या दोन्ही पद्धतीच्या बाबतीत जवळ जवळ सारखीच आहे असे आढळते ब्राह्मण हा शब्द सुमारे वीस वेळा अगोदर येतो तर श्रमण हा शब्द सुमारे सोळा वेळा अगोदर येतो आणि फक्त ब्राह्मण हा शब्द पाच वेळा येतो. (तिसरे, चौथे, पाचवे, आठवे, नववे, अकरावे, तेरावे शिलाशासन.)

बाजूला पडते. अशोकाला अभिप्रेत असणाऱ्या विजयात परकीय प्रदेशावर आक्रमण करणे वा त्यावर नियंत्रण ठेवणे हे बसत नाही. त्या संबंधित देशाने धम्माच्या तत्त्वांचा अंगीकार करणे या अर्थाने विजय ही संज्ञा लागू पडते. त्यामुळेच सिरिया, इजिप्त, सायरेन, मॅसिडोनिया व एपिरस या ग्रीक राज्यांचा समावेश तो धम्म-विजयात करतो, पण प्रत्यक्षात मात्र राजदूत किंवा शिष्टमंडळे यांची स्नेहभावाने देवाणघेवाण झाली किंवा वर सांगितलेल्या ग्रीक राजांकडे या दोहोंपैकी अशोकाने एकाची पाठवणी केली इतकेच घडलेले असू शकेल. येथे एक विशेष लक्षात घेण्याजोगा मुद्दा असा की, जरी अशोकाला धम्मविजयाने अतीव समाधान मिळाले होते व आपले वारसही नेहमीच्या अर्थाने विजय मिळविण्याची इच्छा करणार नाहीत अशी त्याला आशा असली तरी आपल्या वारसांवर त्याबाबतीत तो संपूर्णपणे बंदी घालत नाही. जर विजय मिळविणे आवश्यक असेल तर त्यावेळी दयाबुद्धी व सौम्य शिक्षा यांची कास धरावी असे म्हणून तो फक्त आंतरराष्ट्रीय नीतिमत्तेचे जुने पारंपारिक विचार बदलतो.[1]

अशोकाच्या कारकिर्दीच्या नवव्या वर्षी कलिंग जिंकण्यात आला. या विजयानंतर आक्रमक युद्धांमध्ये पडण्याचे अशोकाने बंद केले. आपले ध्येय साधण्याचे एक साधन म्हणजे युद्ध ही कल्पना आपण संपूर्णपणे त्याज्य ठरविली आहे असा दावा जरी तो करीत असला, तरी आम्हाला असे वाटते की आक्रमक युद्धे थांब-विण्याचे खरे कारण कलिंगविजयामुळेच साम्राज्याचे दृढीकरण पूर्ण झाले हे असावे. याशिवाय आणखी एक भाग म्हणजे साम्राज्यांतर्गत भागात आता विरोधी सत्ता राहिलेली नव्हती. सीमांवरचे लोक इतके दुबळे होते की त्याच्याविरुद्ध लढण्याचा त्यांनी विचारच केला नसता. आशिया मायनरमधील ग्रीक राज्यांच्या विरुद्ध मोहीम हा एकच संभव होता. पण ते फार दूर अंतरावर होते आणि त्यांचे प्रदेश मिळ-विण्यात अशोकाच्या साम्राज्याचे काही विशेष हित होते अशातला भाग नव्हता.

दक्षिण भारतातील मौर्यांची मोहीम पुढे चालू ठेऊन संपूर्ण द्वीपकल्प अशोकाने आपल्या साम्राज्यात का समाविष्ट केले नाही असा प्रश्न आपण विचारू शकू. अशा प्रकारचे युद्ध त्याच्या दृष्टीने अनावश्यकही ठरले असते व त्याच्या तत्त्वांच्या विरुद्धही ठरले असते. आज्ञालेखांवरून असे दिसते की दक्षिण भारतातील ही राज्ये मौर्य साम्राज्याशी अतिशय स्नेहभाव राखून होती. जोपर्यंत ही राज्ये धम्म-महामत्ताचे स्वागत करीत होती आणि निदान वरकरणी तरी धम्मविषयक धोरणाला मान देत होती तोपर्यंत अशोकाला त्यांच्याकडे वक्रदृष्टीने पाहण्याचे कारण नव्हते. आपण इतरत्र जे तामिळ साहित्यातील उतारे पाहिले

---

१. तेरावे शिलाशासन, कळशी, ब्लोख, लें एग्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. १३२.

आहेत त्यावरून, जेव्हा मौर्यांच्या स्वाऱ्या प्रथम या भागात झाल्या तेव्हा दक्षिणेकडील लोकसमूहांमध्ये मौर्यसत्तेविषयी दरारा निर्माण झाला, असे सूचित होते.[१] अशोकाच्या कृपादृष्टीखाली राहण्याची ही प्रवृत्ती श्रीलंकेच्या बाबतीतही विशेषत: तिस्साच्या राज्यारोहणापासून लागू पडते. हिंदु सिद्धांतवाद्यांनी युद्धाचे महत्त्व फारच वाढविले आहे.[२] युद्ध म्हणजे सत्ता आणि सामर्थ्य यांच्या प्रदर्शनाची संधी असा अर्थ लावणे शक्य आहे. कोणत्याही राजाचा मोठेपणा साधारणत: त्याच्या लष्करी शौर्यावरूनच अधिक करून ठरविला जाई. या प्रवृत्तीचा अशोकाकडून स्वीकार होण्याजोगा नव्हता. निष्क्रीय विरोधावर अशोकाचा विश्वास नव्हता तरीही युद्ध ही अंतिम उपाययोजना असल्याने तशीच आत्यंतिक गरज भासल्याशिवाय त्याचा वापर त्याला करावयाचा नव्हता. जर त्याच्या जागी एखादा समुद्रगुप्त असता तर तो थेट कन्याकुमारीपर्यंत चालून गेला असता, इतकेच नव्हे तर कदाचित आपले आरमार घेऊन, समुद्रपार होऊन श्रीलंकेपर्यंत गेला असता. अशोकाला मात्र म्हैसूरलाच थांबण्याची इच्छा होती आणि त्यावेळी मित्रभाव राखून असणारी दक्षिणेकडील राज्ये जोपर्यंत त्रासदायक ठरणार नव्हती तोपर्यंत ती तशीच राहू देण्यास तो राजी होता. मौर्यसाम्राज्याच्या संदर्भात मोक्याचे स्थान व अर्थव्यवस्था या दोन्ही दृष्टींनी कलिंगविजय महत्त्वाचा होता. आम्ही यापूर्वी सुचविलेले आहे त्याप्रमाणे गंगेच्या खोऱ्याकडून दक्षिणेकडे जाणाऱ्या मार्गाच्यामध्ये कलिंग होते, तसेच ते एक प्रभावी सागरी क्षेत्रही होते. जर ते साम्राज्यात समाविष्ट झाले असते तर उत्पन्नाचे एक सोयीस्कर साधन मिळाले असते. कलिंग जिकल्यानंतर

१. तिसरे प्रकरण पाहावे.

२. मनु धर्मशास्त्र, सात, आठ.

३. चौथे प्रकरण पाहावे. अशोक कलिंग या प्रदेशाचा उल्लेख बहुवचनी, करतो. एका मध्ययुगीन कोरीव लेखात ' त्रिकलिंग ' असा शब्द आहे. त्यावरून अशोकाच्या उल्लेखाचा अर्थ तीन कलिंग असा असावा असे केर्न यांना वाटते. ( अशोक पृ. ८४). कलिंग जिकण्यापूर्वी किंवा खारवेलानंतर या देशाचा आकार केवढा असावा याविषयी आपल्याजवळ चांगला पुरावा नाही. त्रिकलिंग हा शब्द नंतरच्या कालातील आहे व ज्या काळात या भागाची तीन राज्यांमध्ये विभागणी झाली होती त्या कालातील तो उल्लेख आहे. गुप्तकालानंतर त्रिकलिंग हा शब्द कधी वापरला गेल्याचा पुरावा नाही. या शब्दाचा आज्ञालेखातील संदर्भ असे दर्शवितो की तो शब्द कलिंगाच्या राज्याला उद्देशून वापरलेला नसून कलिंगातील प्रजाजनांना उद्देशून वापरला होता. अशा प्रकारचा वापर अशोकाच्या आज्ञालेखांमध्ये अनेक वेळा केलेला आहे व पाली आणि संस्कृत साहित्यातही तसा वापर मोठ्या प्रमाणावर आढळतो.

अधिकाधिक प्रदेश जिंकणे ही गोष्ट, जर एकाद्या देशाने अशोकाला प्रक्षुब्ध केले नसते तर, त्याच्या दृष्टीने संपल्यासारखीच होती. ज्याची भीति वाटावी असे थोडेच शत्रू राहिल्याने व बलिष्ठ केंद्रित प्रशासनाची घडी वेगाने बसू लागल्यामुळे साहजिकच धम्मविजयाच्या तत्त्वाविषयी अशोकाला खात्रीपूर्वक समाधान वाटू लागले असावे.

दीर्घ शिलाशासनापैकी चौदावा आज्ञालेख हा शेवटचा आज्ञालेख.[1] या लहानशा आज्ञालेखात लेखक असे स्पष्ट करतो की आपले हे आज्ञालेख संपूर्ण किंवा सारांशाच्या रूपाने देशभर सर्वत्र कोरण्यात आलेले आहेत. यावरून असे दिसते की आज उपलब्ध झालेले कोरीव लेख आहेत तेवढेच प्रकाशित करावयाचे नसावेत तर याहून अधिक विविध रूपातील मजकूर खडकांवर कोरले गेले असावेत, पण ते अजून सापडले नसावेत किंवा इतर स्वरूपात त्यांना प्रसिद्धी दिली गेली असावी. धम्माविषयीच्या उत्साहामुळे, आपल्या राज्याच्या प्रत्येक भागात हे आज्ञालेख प्रसारित करण्यासाठी अशोकाने जास्तीत जास्त प्रयत्न केले असावेत कारण त्यामुळे धम्माचा शब्द संपूर्ण देशभर पोहोचला असता. ज्या ठिकाणी योग्य शिळा सापडल्या नसतील तेथे हे आज्ञालेख लाकडांच्या ठोकळ्यांवर किंवा कापडी फलकांवर लिहून प्रत्येक शहरातील विशेष महत्त्वाच्या जागी लावले असावेत. त्यामुळे त्यांना शक्य तितकी जास्तीत जास्त प्रसिद्ध मिळाली असावी. सार्वजनिक सभांमध्ये व तत्सम इतर प्रसंगी ते मोठ्याने वाचून दाखविण्यात आलेले असावेत असे दिसते.[2]

धौली आणि जौगडा येथे अकराव्या, बाराव्या व तेराव्या आज्ञालेखांऐवजी वेगळ्या आज्ञालेखांचा समावेश करण्यात आलेला आहे. यावरून ज्या ज्या ठिकाणी हे लेख कोरविण्यात आलेले होते तेथील परिस्थितीनुसार आज्ञालेख वेगवेगळे असत असे दिसते. कलिंग प्रदेशात तेरावा लेख गाळून टाकण्याचे कारण उघड आहे. कलिंगयुद्धामुळे सहन कराव्या लागलेल्या यातनांबाबत कलिंगमधील लोकांच्या भावना इतक्या तीव्र होत्या की या आज्ञालेखातील त्यांचा उल्लेख वाचण्याने त्यांना आनंदही वाटण्यासारखा नव्हता व त्यातून शिक्षणही मिळाले नसते. याशिवाय ज्या लोकांविरुद्ध युद्ध लढले गेले त्या लोकांमध्ये त्या युद्धा-विषयीच्या राजाच्या पश्चात्तापाची जाहीर कबुली देणे ही गोष्ट राजकीय दृष्ट्या शहाणपणाची ठरली नसती.

---

१. ब्लोख, ले एन्स्क्रेपसिऑं द अशोक, पृ. १३३.

२. उपरोक्त, पृ. १३९

पहिले वेगळे शिलाशासन तोसली व समाप येथील महामत्तांना उद्देशून लिहिलेले आहे आणि त्यामध्ये प्रामुख्याने त्या प्रदेशात न्यायदानाचे बाबतीत योग्य प्रशासन व्हावे म्हणून या अधिकाऱ्यांना सूचना देण्यात आलेल्या आहेत.[१] महामत्त ही संज्ञा, नगलवियोहलक म्हणजे नगरन्यायाधीश यांच्या उल्लेखामुळे त्यांच्यापुरतीच मर्यादित आहे. राजाने या अधिकाऱ्यांकडून केलेली पाहिली अपेक्षा म्हणजे प्रजाजनांचे प्रेम जिंकणे हे त्यांचे ध्येय असावे, कारण पुढे तो म्हणतो,

सव्वे मुनिस्से पजा ममा[२]

'सर्व माणसे माझी मुले आहेत.'

आपल्या मुलांचे ज्याप्रमाणे कल्याण व्हावे असे तो इच्छितो, त्याचप्रमाणे आपल्या प्रजाजनांचेही कल्याण इच्छितो. पजा या शब्दांचे मुले किंवा राजाचे प्रजाजन असे दोन्ही अर्थ होत असल्याने व दोन्ही अर्थ या ठिकाणी चपखल बसत असल्याने या विधानाच्या पहिल्या भागात श्लेष अलंकार होऊ शकेल. दुसरा अर्थ या ठिकाणी लागू पडेल कारण या अधिकाऱ्यांच्या कार्यकक्षेत येणारी सर्व माणसे म्हणजे त्याचेच प्रजाजन आहेत व म्हणून अधिकाऱ्यांनी त्यांचे प्रेम मिळवावे अशी अपेक्षा तो करतो. पण या विधानाच्या पुढच्या भागावरून पजा हा शब्द वापरताना त्याला 'मुले' हा अर्थ अभिप्रेत आहे हे अगदी स्पष्ट होते.

अनेक कारणांमुळे न्यायदानाच्या कामात उणीवा आहेत याची राजाला जाणीव आहे व त्यातील काहींचा संबंध त्या अधिकाऱ्यांच्या व्यक्तिगत वैशिष्ट्यांशी आहे. न्यायदानातील निःपक्षपातीपणा व न्यायदानव्यवस्थेचे कार्यक्षम कामकाज यांच्यावर तो अतिशय भर देतो. हे अधिकारी राजाचे कोणते देणे लागतात या विषयी तो बोलतो व आपल्या कार्यक्षमतेने ते केवळ राजाचे समाधान व खुषी जिंकतील असे नाही तर स्वर्ग मिळविण्यासाठी पुण्यप्राप्ती करून घेतील असे तो जाहीर करतो. या ठिकाणीही तो पुन्हा राजाच्या खुषीपेक्षाही स्वर्ग या पारितोषिकाचे आमिष जास्त दाखवितो.

तिष्य नक्षत्राच्या प्रत्येक दिवशी व मध्यंतरातील अनेक प्रसंगीही या आज्ञालेखाचे जाहीर वाचन व्हावे असा तो आग्रह धरतो. विशेष मेळाव्यांच्या प्रसंगी व एरवीही नगरांच्या नित्याच्या कामकाजांच्या प्रसंगी हे आज्ञालेख लोकांपुढे वाचले जात असत, हेहि आमचे मत या माहितीवरूनच बनले आहे. आज्ञालेखांविषयीच्या राजाच्या इच्छा प्रजाजनांना कळाव्यात आणि अधिकारी

---

१. उपरोक्त, पृ. १३६

२. ब्लोख, ले एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. १३७.

व प्रजाजन यांच्यात त्याला हवे असलेले संबंध प्रस्थापित व्हावेत असा दुहेरी हेतू यामागे होता यात शंका नाही. या अधिकाऱ्यांवर आणखी एक नियंत्रण म्हणजे दर पाच वर्षांनी देखरेख करणारा एक अधिकारी, दौऱ्यासाठी व न्यायदानपद्धतीच्या तपासणीसाठी आणि राजाच्या आज्ञांचे पालन होत आहे हे पाहण्यासाठी पाठविला जाई. दुसऱ्या वेगळ्या आज्ञालेखात तो सांगतो की अगदी एका मनुष्याला सुद्धा आपल्यासाठी आज्ञालेख वाचला जावा अशी मागणी करणे शक्य आहे.

तोसली व समाप येथील जे अधिकारी सीमांवरील प्रदेशातील लोकांमध्ये काम करीत होते त्यांना उद्देशून प्रामुख्याने दुसरे वेगळे शिलाशासन आहे. कदाचित हे लोक म्हणजे पूर्व भारतातील कमी सुधारलेल्या टोळ्या असाव्यात व कलिंगयुद्धानंतर त्यांचा समावेश साम्राज्यामध्ये झाला असावा किंवा साम्राज्याशी त्यांचा अगदी निकटचा संबंध येऊ लागला असावा. पुन्हा एकदा राजा सांगतो की, त्याचे प्रजाजन त्याला आपल्या मुलांप्रमाणे आहेत आणि यावेळी तो प्रजाजनांमध्ये सीमावासीयांचा किंवा सरहद्दीवर राहाणाऱ्यांचा समावेश करतो. या लोकांच्यामध्ये सरकारविषयी विश्वासनिर्माण करणे हेहि या अधिकाऱ्यांचे कर्तव्य आहे.राजाला आपल्याविषयी पितृवत् प्रेम आहे व तो आपली चांगली काळजी घेईल असे त्यांना वाटलेच पाहिजे. आपल्या प्रजाजनांना मुलांप्रमाणे वागविण्याची ही राजाची कल्पना पुढे प्राचीन भारतीय राजकीय विचारांमध्ये बरीच प्रचलित व्हावयाची होती. राजाने आपल्या अत्यावश्यक कर्तव्यांमध्ये आपल्या प्रजाजनांच्या कल्याणाला स्थान द्यावे, आणि राजा आपल्या मुलांची जशी काळजी घेतो तशीच त्याने आपल्या प्रजाजनांचीही काळजी घेतली तरच त्याचे राज्य भरभराटीस येते हा विचार सांगणारे परिच्छेद अर्थशास्त्रात येतात.[1] अश्वघोषही अशाच स्थिरभावांची बरीचशी पुनरावृत्ती करतो.[2] विश्वास संपादन करण्यावर, विशेषत: सीमाप्रदेशातील लोकांचा विश्वास संपादन करण्यावर प्रामुख्याने भर दिलेला आहे. इतर प्रजाजनांपेक्षा या लोकांविषयीची अशोकाची वृत्ती अगदी वेगळी आहे, यावरून त्याला अतिशय वैविध्य असलेले लोकसमूह हाताळावे लागले होते, इतकेच नाही तर प्रत्येक गटाला कोणत्या प्रकारचे आवाहन करावयास पाहिजे याचीही त्याला जाणीव होती, असे दिसते. अर्थातच पूर्वसीमेवरील टोळ्यांच्या बाबतीत त्यांचा विश्वास संपादन करणे हीच प्रमुख गोष्ट होती. त्यानंतर ते धम्मापुढे अधिक विनम्र होण्याची शक्यता होती.

---

१. एक, १९.

२. बुद्धचरित, दोन, ३५.

शेवटच्या दीर्घ शिलाशासनांनंतर आज्ञालेखांचा दुसरा एक संच म्हणजे स्तंभ-शासने प्रसृत होईपर्यंत मध्यंतरी काही थोड्या वर्षांचा काळ आहे. या सुमारे बारा वर्षांच्या काळात अनेक लघु–स्तंभशासने कोरविली गेली व त्यांपैकी काहींमध्ये एखाद्या विशिष्ट जागेचा वा संस्थेचा उल्लेख होता. या कालात काही दीर्घ शासने प्रसृत केली गेली किंवा नाही याविषयी शंका आहे. अशा काही शासनांचा अजून पुरावा मिळालेला नसल्यामुळे, जे काही आज्ञालेख प्रत्यक्षात उपलब्ध आहेत त्यांच्या आधारेच आपल्याला काम केले पाहिजे. या मध्यंतरामुळे, अशोकाच्या प्रजाजनांना धम्माच्या कल्पना आत्मसात करण्याच्या दृष्टीने सोयीस्कर अवधी मिळाला. या विषयावरच्या त्यांच्या विचारांची वाढ व बदल होण्यास काही काल मिळाला आणि दीर्घ स्तंभशासनाच्या पुराव्यावरून तसे घडले असे दिसते.

लघु स्तंभशासने ही आज्ञालेखांच्या दुसऱ्या गटात म्हणजे जे केवळ बौद्धांच्या कार्याशी संबंधित होते अशांच्या गटात मोडतात. हे आज्ञालेख संघा-बरोबर असलेल्या त्याच्या संबंधांवर आधारलेले होते किंवा त्याने भेट दिलेले एखादे तीर्थयात्रेचे ठिकाण दाखविणारे होते. लघु स्तंभशासने कोरून पूर्ण झाल्या-नंतर बहुधा त्याला जाहीर आज्ञालेख स्तंभावर कोरण्याची कल्पना सुचली असावी व त्याचा परिणाम प्रभावी ठरला. लघु स्तंभशासने पाहिल्यानंतर शिळांचे पृष्ठभाग शोधीत बसण्याऐवजी उत्तम गुळगुळीत स्तंभ उभारून त्यावर लेख कोरण्याचे त्याने ठरविले असावे. तथापि, या कालात त्याने दोन लघु शिलाशासने प्रसृत केली. त्यांपैकी एक दक्षिण भारतात अनेक ठिकाणी सापडलेले आहे व ते निश्चित-पणे स्तंभावरील लेख कोरण्यापूर्वीचे आहे. दुसरे, कंदहरचा लेख. हे काहीसे नंतरचे असावे असे त्यातील मजकुरावरून दिसते.

ज्या काळात दीर्घ शिलाशासने प्रसृत करण्यात आली त्याच सुमारास प्रामुख्याने दक्षिणेत कोरलेले शिलाशासन प्रसृत करण्यात आले.[1] अशोक आणि बौद्धधर्म यांच्या संबंधीचा विचार करताना, यापूर्वीच्या प्रकरणात आपण लघु शासनांचा उल्लेख केलेला आहे. प्रथम अशोकाचा दर्जा एक सामान्य उपासक असा होता पण नंतर संघाबरोबर त्याचे निकटचे संबंध प्रस्थापित झाले आणि परिणामी आपल्या धर्माबाबतची त्याची कळकळ अधिक वाढली. या कळकळीचा

---

१. आम्ही लघु शिलाशासनांच्या आधी दीर्घ शिलाशासनांची चर्चा केली कारण आम्हाला असे वाटते की त्याचे धम्मविषयक धोरण दीर्घ शिला-शासनांची मालिका लक्षात घेऊन अभ्यासिले तर अधिक स्पष्ट होते व त्यातून धम्माचा विकासक्रम चांगल्या तऱ्हेने दिसतो.

परिणाम म्हणजे देशामध्ये चांगुलपणात बरीचशी वाढ झाली. तो आपल्या प्रजाजनांना आस्था बाळगण्यास सांगतो. कारण त्यामुळे प्रगती होईल, परंतु धम्म आणि बौद्ध शिकवण ही समान असल्याने तो मानीत नाही. बौद्धधर्म हा त्याचा वैयक्तिक धर्म राहतो. येरंगुडी येथील लघु शिलाशासनातील मजकुरावरून, समाजाच्या सर्व स्तरांपर्यंत अगदी ब्राह्मणापासून ते माहुतापर्यंत धम्म रुजावा अशी त्याची इच्छा आहे आणि याविषयीची जबाबदारी अधिकाऱ्यांवर आहे, हे आणखी जास्त निश्चितपणे दिसते.[1] आपल्या तत्त्वांबाबत बोलताना तो हेतुपुरस्सर कुटुंबाच्या महत्त्वावर भर देतो आणि प्राचीन रुढी व प्रथा यांचा त्या संदर्भात उल्लेख करतो. आज्ञालेखांमध्ये इतरत्र कोठेही इतक्या कटाक्षाने कुटुंबसंस्थेचा उल्लेख केलेला नाही.

या लघु शिलाशासनाच्या प्रकारांमध्ये प्रामुख्याने खाजगी बाबीचा, म्हणजे अशोकाच्या बौद्धधर्माविषयीच्या व्यक्तिगत निष्ठेचा उल्लेख आहे. म्हणून असे म्हणता येईल की दक्षिणेकडील लोकांविषयीच्या आदराचे प्रतीक म्हणून ते प्रकार होते. हाच आज्ञालेख इतरत्रही आढळतो पण दक्षिणेइतक्या विविध प्रकारांनी नाही. दक्षिणेकडील लोक बऱ्याच दूर अंतरावर होते आणि त्यांच्या कल्पनांच्या विकासाशी त्यांचा फारसा परिचय नव्हता म्हणून आपला स्वतःचा व्यक्तिगत धर्म प्रथम जाहीर करून नंतर धम्मविषयक धोरण स्पष्ट करण्याने आपली भूमिका अधिक स्पष्ट होईल असे अशोकाला वाटले असावे. त्यामुळे या आज्ञालेखाच्या शेवटच्या अर्ध्या भागात धम्माच्या कल्पनेचा परिचय करून देण्यात आलेला आहे आणि ती कल्पना कृतीत आणण्यासाठी व्यवहार्य मार्ग सुचविण्यात आलेले आहेत. दीर्घ शिलाशासनांशी तुलना केली तर, वाचकांना व श्रोत्यांना आपल्याला जे काही सांगावयाचे आहे ते त्यांना पूर्णपर्ण समजेल की नाही याविषयीचा लेखकाचा एक प्रकारचा अस्वस्थपणा या आज्ञालेखात व्यक्त होतो. फारच थोडे उत्तर भारतीय राज्यकर्ते इतके दक्षिणेत गेलेले होते. त्यामुळे ही वृत्ती समर्थनीय आहे. या प्रदेशातील भूमी व लोक यांचा अजूनही अशोकाला परिचय नव्हता. लेखनकलेतील प्रतीकांचा परिचय त्यांना जर खरोखरच ब्राह्मी लिपीमुळे झालेला असेल तर आपले स्वतःचे स्पष्टीकरण त्यांना अधिकात अधिक चांगल्या रीतीने कसे देता येईल याविषयी अशोकाचा उडालेला बराचसा गोंधळ क्षम्य आहे.

बारा वर्षांच्या या मध्यंतरामध्ये बौद्धजगात अनेक घटना वेगाने घडत होत्या. इ. स. पू. २५० मध्ये बौद्धांची धर्मसंगीती भरविण्यात आली व नंतर

१. ब्लोख, ले एन्स्क्रेपसिओं व अशोक, पृ. १५१.

भारतीय उपखंडाच्या विविध भागांमध्ये धर्मप्रचारकांना पाठविण्यात आले.[1] एक बौद्ध म्हणून या घटनांमध्ये अशोकाला निश्चितच अत्यंत रस असला पाहिजे. असे असूनही, फुटीर वृत्तीचे तण काढून टाकण्यात व इतर पंथांवर हल्ले चढविण्यात धर्मसंगीती मग्न असताना, आपल्या कारकिर्दीच्या विसाव्या वर्षी अशोकाने बरोबर टेकडीतील आजीविकांना आणखी एक गुहा दान केली.[2] यावरून त्याच्याजवळ संकुचित सांप्रदायिकतेचा अभाव होता हे सिद्ध होते. अशोक स्वतः जरी बौद्धधर्मीय असला तरी इतर पंथांच्या, अगदी ते बौद्धधर्माला विरोधी असले तरी, कल्याणाची काळजी त्याला वाटत होती, हे स्पष्ट आहे. धर्मसंगीती का बोलवावी लागली याविषयीच्या घटना सांगणाऱ्या आख्यायिका आजीविकांविषयी काही स्नेहभावाने बोलत नाहीत.[3] राज्याचा प्रमुख या नात्याने आश्रय देताना आपण निःपक्षपाती राहिले पाहिजे, अशा प्रकारच्या जबाबदाऱ्यांची जाणीव अशोकाला होती हे त्याला भूषणास्पद आहे.

दीर्घ स्तंभशासनांमध्ये जी हमी दिलेली आढळते ती प्रथम कंदहर कोरीव लेखाने जाहीर केली.[4] पश्चिम सीमेवरील ग्रीक व ॲरेमिक बोलणाऱ्या वसाहतींमध्ये धम्मापासून मिळणारे फायदे जाहीर करण्यासाठी, एक प्रचाराचा नमुना म्हणून हा भाग लिहिला गेला हे कबूल करावयास हवे. धम्मावरील एक लेख म्हणून इतर आज्ञालेखांपेक्षा यातुन काही अधिक माहिती मिळते असे नाही त्यात जे काही आहे ते म्हणजे धम्माचे अत्यंत संदिग्ध वर्णन असून, प्राण्यांच्या हत्येवर घातलेल्या बंदीवर सर्वात जास्त जोर देण्यात आलेला आहे. राजाने माणसांना अधिक शुद्धाचरणी बनविले एवढेच नाही तर सर्व जगभर आता सर्व गोष्टींची भरभराट होते आहे असे त्यात आपल्याला सांगितलेले आहे. स्थानिक लोकांमधीलच नव्हे तर कंदहरमधून जाणाऱ्या मार्गाचा वारंवार उपयोग करणाऱ्या व्यापाऱ्यांमधीलही कुतूहल वाढावे व आपल्या स्वतःच्या देशामध्ये पोहोचल्यानंतर त्यांनी तेथे उत्सुकता निर्माण करावी यासाठीच निश्चितपणे हा आज्ञालेख होता.

अशाच आत्मविश्वासपूर्ण ठाम प्रतिपादनाच्या सुरामध्ये आपल्या कारकिर्दीच्या सत्ताविसाव्या वर्षी अशोकाने पहिली सहा स्तंभशासने प्रसृत केली. आज्ञालेखांचा हा नवा संच पुन्हा एकदा प्रामुख्याने लोकांसाठीच होता आणि

---

१. दुसरे प्रकरण पाहावे.

२. ब्लोख, ले एन्स्क्रिपसिऑं द अशोक, पृ. १५६.

३. दुसरे प्रकरण पाहावे.

४. जेए, १९५८, व्हॉ. शोनशे सेहेचाळीस, पृ. २–३, २२.

म्हणून त्यातील वृत्ती दीर्घ शिलाशासनासारखीच आहे. त्यांना खूप प्रसिद्धी मिळावी म्हणून जेथे लोक जमत अशा जागी स्तंभ उभारून त्यावर ते कोरले आहेत. या आज्ञालेखांमध्ये परत धम्माचे स्पष्टीकरण दिले आहे.

अनेक वर्षे धम्माने प्रगती केली आहे, असे अशोक पहिल्या स्तंभशासनात म्हणतो.[1] पाठीमागे वळून धम्मचा आढावा घेतल्यावर दिसलेल्या परिणामांमुळे तो समाधानी आहे. धम्माचे आचरण करीत असताना जे लोक गोंधळलेल्या अवस्थेत होते त्यांच्यात जागृती निर्माण करण्यात आपले विविध दर्जाचे अधिकारी यशस्वी झालेले आहेत, असे तो सांगतो. ( धम्ममहामत्ताच्या कार्याला उद्देशून जे म्हटले आहे, हे गृहीत धरता येईल) मूळ मजकुरात धम्माच्या बाबतीत जे अजून चपलम् म्हणजे दोलायमान स्थितीत आहेत त्यांचा हा उल्लेख आहे.[2] पण लक्षात घेण्याजोगा मुद्दा असा की, जेव्हा आणि जेथे शक्य असेल तेथे धम्माचा प्रचार हे एकमेव कार्य अधिकाऱ्यांनी केलेले आहे, असा या वाक्याचा व खरे म्हणजे या आज्ञालेखाचा सूर आहे. प्रत्येकाने धम्माचे आचरण केलेच पाहिजे या कल्पनेने राजाचा संपूर्ण ताबा घेतला असावा असे दिसते. पूर्वी धम्माच्या गुणांविषयी राजा उत्साहाने बोलला व समाजातील अनिष्ट गोष्टींवर एक व्यवहार्य नवा उपाय म्हणून त्याने लोकांपुढे तो ठेवला पण आता त्याच्यामध्ये हुकमी सूर शिरलेला दिसतो. धम्म या शब्दाची सतत पुनरावृत्ती असे दर्शविते की त्याचा उत्साह आता एखाद्या नव्या कल्पनेचा प्रचार करणाऱ्याचा राहिलेला नाही तर तो त्याच्या स्वतःच्या अस्तित्वाचाच एक भाग बनून राहिला आहे.

या पूर्वी पुण्य मिळविण्यासाठी साधे गुण व औदार्यपूर्ण सामाजिक नियम पुरेसे होते. आता धम्माचे अतिशय प्रेम, काळजीपूर्वक परीक्षण, अत्यंत आज्ञाधारकता, अतिशय भीती व मोठा उत्साह यावर पुण्य अवलंबून आहे.[3] सामाजिक वर्तनाची सर्वश्रेष्ठता प्रस्थापित करण्याचा निश्चय केलेल्या माणसाची स्पष्ट विचारसरणी यात दिसते; परंतु आज जी काही स्पष्टता दिसते तिला आपल्याला या समस्येची जी जाणीव आहे तीच जबाबदार आहे, या चुकीच्या विश्वासाने झाकोळून गेलेली आहे. कारण पुढे तो म्हणतो की धम्माची जी प्रगती झाली आहे ती आपण दिलेल्या शिक्षणामुळेच झाली आहे. चंचल लोकांचे मन महामत्त वळवीत आहेत हे चित्र काही संपूर्णपणे सुखद नाही. धम्माच्या पूर्वीच्या उच्चारणांमध्ये त्याच्या स्वतःच्या जबाबदारीचा अंश स्पष्ट दिसत असे पण त्याची

---

१. ब्लोख, ले एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. १६१.

२. उपरोक्त.

३. पहिले स्तंभशासन. ब्लोख, ले एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. १६१.

जागा आता आज्ञांकित दृष्टिकोनाने घेतल्याने व्यक्तीच्या दृष्टीने फारच कमी पसंती राहाते. संपूर्णपणे व्यक्तीच्या इच्छेप्रमाणे नव्हे, तर धम्म-महामत्तांनी घालून दिलेल्या नियमांचा एक अतिशय संघटित संच, असे स्वरुप धम्माला प्राप्त झालेले दिसते. सर्व समस्या सोडविण्याचे एक जादूचे सूत्र असे स्वरुप धम्माला प्राप्त होऊ लागले आणि धम्माचे कामगार म्हणजे एक धार्मिक संस्था असे गृहीत धरण्यास सुरुवात झाली. या आज्ञालेखाचे शेवटचे वाक्य असे.

**...एसा हि विधि या इयम् धम्मेन पालना धम्मेन विधाने धम्मेन सुखियना धम्मेन गोत्ति ति...**

'यासाठी हे माझे तत्त्व आहे: धम्माने संरक्षण करणे, धम्मानुसार काम-काज पाहणे, धम्माने लोकांना सुखी करणे, धम्माने साम्राज्याचे रक्षण करणे.

धर्मवेड आणि भव्यतेची हाव यांचा अंकुर या आज्ञालेखात दिसावयास सुरूवात झालेली आहे.

दुसरे स्तंभशासनही याच सुरात लिहिले गेलेले आहे.[1] धम्म म्हणजे कमीत कमी पापे, अनेक गुण, दया, औदार्य, सत्यवादित्व आणि पावित्र्य असे अशोक वर्णन करतो. पुढे तो म्हणतो की आपण चखुदानें म्हणजे दृष्टिज्ञान अनेक मार्गानी दिलेले आहे.[2] धम्माच्या आचरणामुळे समाज व व्यक्ती यांच्यामधील परस्परां-मधील नाती स्पष्ट होतात व त्यामुळे सामाजिक जीवनाची आणि सत्कृत्यांमधून खरे पुण्य कसे उद्भवते याची अधिक चांगली जाणीव होते, ही कल्पना पटवून देण्याचा 'प्रयत्न तो करीत आहे. अशोक सूक्ष्मज्ञान देत होता किंवा 'मी खरा मार्ग दाखवलेला आहे' असे सांगत होता हे सुचविण्यासाठी 'चक्षुदान' या शब्दप्रयोगाचा फक्त उपयोग करून घेतला असावा. माणसे आणि प्राणी यांना आपण अनेक अमूल्य भेटी दिलेल्या आहेत आणि असंख्य सत्कृत्ये केलेली आहेत. हा त्यांचा या आज्ञालेखातील अभिप्राय म्हणजे त्याच्या वाढत्या आत्मश्लाघेचे आणखी एक प्रदर्शन आहे. ही आत्मश्लाघा म्हणजे एक अत्यंत दुर्दैवी प्रवृत्ती होती. कारण तिच्यामुळेच तो अनेक वेळा आत्मसंतुष्ट राहिला असला पाहिजे व त्याचा परिणाम म्हणजे आपल्या प्रजाजनांच्या मताशी पूर्वी त्याचा जो संपर्क राहात असे तो बंद झाला असावा यात शंका नाही. धम्माचा संचार त्याच्यामध्ये वाढत होता त्या अवस्थेत सुद्धा, धम्म ही एक नैतिक संकल्पना आहे, धार्मिक

---

१. दुसरे स्तंभशासन उपरोक्त, पृ. १६२.

२. सीएफ, हुलटझ, कॉर्पस इन्स्क्रिप्शनम् इंडिकारम.

३. व्हॉ. एक, पृ. १२०, ब्लोख, लें एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. १६२.

कल्पना नाही असेच त्याला वाटते. त्याला प्रसिद्धी देण्यासाठी त्याने जी साधने वापरली त्यांनी कदाचित धार्मिक पद्धतीशी स्पर्धा केली असेल पण प्रत्यक्ष त्याच्या शिकवणुकीने मात्र धर्माचे आवरण घेतले नाही.

तिसऱ्या स्तंभशासनात सत्कृत्ये आणि दुष्कृत्ये यांच्यामधील फरक स्पष्ट केलेला आहे.[1] भयानकता, क्रौर्य, क्रोध, गर्व आणि मत्सर यांचा पापी प्रवृत्तींमध्ये समावेश केलेला आहे. यांच्या आहारी जाणे म्हणजे नाश पावणे असे म्हटलेले आहे. लोभ ही एक पापी प्रवृत्ती असल्याचा अप्रत्यक्ष उल्लेख काही प्रसंगी आहे. धम्माच्या तत्वांनुसार, लालसा, विशेषतः कशाची तरी तीव्र इच्छा होणे वा त्यात संपूर्णपणे रममाण होणे, ही गोष्ट म्हणजे पाप आहे, असे अशोकाने कोठेही यात म्हटलेले नाही हे विचित्रच आहे. धम्माचा प्रत्यक्ष आचार कोठेही तपशीलवार दाखविलेला नाही. आज्ञालेखांमधील अशोकाची निवेदनेसुद्धा सर्वसाधारण स्वरूपाची आहेत. सामाजिक वर्तणुकीचे स्पष्टीकरण करीत असताना त्यात स्त्रिया व पुरुष यांच्यामधील नात्याचा समावेश केलेला नाही हेही महत्त्वपूर्ण आहे. यावरून असे दिसते की स्त्रियांची भूमिका या काळापर्यंत इतकी पूर्णपणे नियमबद्ध केलेली होती की त्याविषयी एखादा अभिप्राय देण्याचीही त्याला जरूर वाटली नाही. या आज्ञालेखाचा शेवट पुढील वाक्याने होतो.

... इयम् मे हिदत्तिकाये, इयम् मन मे पालत्तिकाये.

'इहलोकातील आणि त्याचप्रमाणे परलोकातील माझ्या सौख्यासाठी हे महत्त्वाचे आहे.'

यामुळे आपण नीतिशास्त्रातील एका मूलभूत संकल्पनेकडे, तौलनिक नीतिमत्तेकडे येतो. याच ठिकाणी आज्ञालेख संपतो आणि शेवटच्या वाक्याचे काहीही स्पष्टीकरण दिलेले नाही हे खरोखरच दुर्दैवाचे आहे. हे वाक्य जसे आहे तसेच पाहिले तर, इहलोकीचे सुख साधणे व स्वर्गीय सौख्य मिळविणे अशा दुहेरी परिणामांची भाषा सत्कृत्यांच्या संदर्भात वापरण्याचा विचार करण्यास अशोकाने सुरुवात केली होती असे दिसते. येथील व पुढील जन्मातही पुण्यकारक ठरतो तो सद्गुण या अशोकाच्या मूळच्या नैतिक संकल्पनेपासून बाजूला जाण्याचे हे गंभीर पापकृत्य आहे असेच दर्शविले जाते. तथापि, पूर्वीची पाप व पुण्य यासंबंधीची चर्चा चालू आहे असे मानून या वाक्याचा विचार केला तर त्याचा अर्थ काहीसा वेगळा आहे. एखाद्या इच्छेचे समाधान झाल्याने जो थोडासा आनंद मिळतो तो म्हणजे पृथ्वीवरील सौख्य आणि इच्छेचा त्याग केल्यामुळे मिळते ते स्वर्गातील शाश्वत सौख्य.

---

१. उपरोक्त, पृ. १६३.

धम्माच्या आधीच्या कल्पनांमधील आणखी एक बदल म्हणजे पाप व पापकृत्ये यांना सतत दिलेले महत्त्व. कदाचित बौद्धधर्माच्या त्याच्या वाढत्या साहचर्यामुळे त्याला पापाची व ज्या कृतीला पापी मानले जाई त्यात गुंतले जाण्याची भीती वाटू लागली असावी. पुढच्या कालातील या आज्ञालेखांमधून एक अशी ठाम सूचना मिळते की पाप व पुण्य या विषयीच्या अत्यंत कर्मठ कल्पनामध्ये तो गुंतत चालला होता आणि सुरुवातीच्या त्याच्या सामाजिक नीतिकल्पनेला प्रेरणा देणारा मूळचा जोर नाहीसा होण्यास सुरुवात झाली होती.

चौथ्या स्तंभशासनात परत दीर्घ शिलाशासनांमधील सूर उमटलेला आहे.[1] धौली आणि जौगडा येथील दोन वेगळ्या आज्ञालेखांशी या आज्ञालेखाचा काही अंशी संबंध आहे. त्या ठिकाणी अधिकाऱ्यांनी जबाबदार व कार्यक्षम असावे म्हणून आवाहन केलेले आहे. पण या ठिकाणी हे दोन्ही गुण अधिकाऱ्यामध्ये आहेत हे मान्य केलेले दिसते कारण त्या स्थानिक अधिकाऱ्यांना पारितोषिक आणि शिक्षा देण्याची सत्ता प्रदान करण्यात आलेली आहे. पंचवार्षिक तपासणी व धम्ममहामात्ताच्या संस्था यामध्ये दिसून आलेल्या केंद्रीकरणाच्या प्रवृत्तीनंतर ही गोष्ट म्हणजे उलट दिशेने टाकलेले पाऊल असे दिसेल. याच आज्ञालेखात इतरत्र वेगवान प्रशासनाच्या प्रकाशात त्याचे स्पष्टीकरण करण्यात आलेले आहे.[2] या अधिकाऱ्यांना आपली कर्तव्ये निर्भयपणाने व आत्मविश्वासाने करता यावीत व तरीही त्यांनी शांतचित्त असावे, म्हणून राजाने त्यांना पारितोषिक आणि शिक्षा देण्याची सत्ता दिलेली आहे. हे खरोखरच एक अतिशय प्रगट पाऊल आहे आणि अधिकाऱ्यांच्या बाबतीत राजाला बराच विश्वास वाटला असला पाहिजे. नोकरशाही व देशाचे प्रशासन चांगल्या रीतीने कार्य करीत असावे असे दिसते. त्याशिवाय हा अधिकार प्रदान करण्यात आला नसता. तथापि, अशोकासारखे स्थान प्राप्त झालेल्या कोणत्याही राजाने, वाढत्या वर्षाबरोबर काही ना काही सत्ता प्रदान केली असती याकडे आपण दुर्लक्ष करता कामा नये. कारण सुरुवातीच्या वर्षांमधील उत्साहपूर्ण औत्सुक्य टिकून राहण्यास वाढते वयोमान साथ देत नाही.

न्यायदानपद्धती आणि शिक्षा यांच्या बाबतीत धरलेला सारखेपणाचा आग्रह हा एक मोठा महत्त्वाचा पवित्रा होता. हा काही केवळ एक पवित्र विचार नव्हता. जर तो विचार कृतीत आणावयाचा हेतू नसता तर तो येथे

१. चौथे स्तंभशासन, ब्लॉख, लें एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. १६३.
२. चौथे प्रकरण पहावे.

सांगण्याचीही काही गरज नव्हती. या वाक्याचा दोन प्रकारांनी अर्थ लावता येणे शक्य आहे. कायद्याच्या दृष्टीतून सर्व प्रजाजनांची समानता किंवा देशात सर्वत्र समान कायदा.[1] कोणताही अर्थ घेतला तरी हे एक अद्वितीय पाऊल टाकलेले होते आणि सामाजिक न्यायाचा आग्रह धरण्याची अशोकाची किती इच्छा होती ते त्यावरून दर्शविले जाते. आपल्या प्रजाजनांचे अधिकाधिक कल्याण साधण्याचे त्याचे प्रयत्न चालू असतानाच मृत्यूदंडाची अमलबजावणी करण्यापूर्वी तीन दिवस सूट देण्याची तो आज्ञा करतो. हे सवलतीचे कृत्य आहे. कारण काहींच्या बाबतीत हा वेळ कदाचित शिक्षेस पात्र ठरलेल्या माणसाचे निरपराधित्व सिद्ध करण्याचा किंवा त्याला पश्चात्ताप झाला आहे याची खात्री करून घेण्यास उपयुक्त ठरू शकेल हे तो मान्य करतो. बौद्धधर्मावर त्याची स्वतःची दृढ श्रद्धा असतानाही त्याने क्रूर शिक्षा रद्द केल्या नाहीत हे लक्षात घेण्याजोगे आहे. कायदा आणि सुव्यवस्था राखण्यासाठी क्रूर शिक्षा अत्यावश्यक आहेत असे तो निःशंकपणाने मानीत होता आणि जरी त्याचा व्यक्तिगत दृढ विश्वास यांच्या विरोधी असला तरी राज्यातील न्याय हा सर्वमान्य दुःखद शिक्षा किंवा आनंददायक पारितोषिके यावर आधारलेला असला पाहिजे असे त्याला जाणवलेले होते.[2]

पाचव्या स्तंभशासनात एक बरीचशी अशीच कल्पना व्यक्त झालेली आहे. काही विशिष्ट दिवशी विशिष्ट प्राण्यांची हत्या करू नये आणि इतर प्राण्यांची मुळीच हत्या करू नये अशी आज्ञा तो देतो.[3] यात दिलेली यादी अत्यंत गोंधळात टाकणारी आहे. यातील काही पशू निश्चितपणे ओझे वाहून नेणारे आहेत. इतर काही खाद्य आहेत. उदाहरणार्थ माशांचे काही प्रकार. पण कोणतेही खास कारण नसताना अनेक प्राणी अवध्य म्हणून जाहीर करण्यात आलेले आहेत[4] कुतुहल वाटण्याजोगी एक विशेष गोष्ट म्हणजे, एक धर्मनिष्ठ बौद्ध म्हणून आपल्या संपूर्ण साम्राज्यात तो अहिंसेचा आदेश देत नाही, तर फक्त ज्यांची हत्या करावयाची नाही असे विशिष्ट प्राणी खुलासेवार सांगतो. प्राणीहत्येपासून संपूर्णपणे

---

१. उपरोक्त.

२. महाभारतात एक रसप्रद परिच्छेद आहे. (शांतीपर्वन्, २५९) अशोकाच्या या बाबतीत असलेल्या वृत्तीसारखीच वृत्ती त्यात व्यक्त झालेली आहे. पुढच्या शतकामध्ये क्रूर शिक्षा रद्द करण्यात आल्या असे चिनी प्रवाशांच्या वृत्तांवरून दिसते.

३. पाचवे स्तंभशासन, ब्लोख, ले एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. १६५.

४. तिसऱ्या प्रकरणात आपण या विषयाची बरीच चर्चा केलेली आहे.

दूर राहाण्याचा कायदा अशक्यप्राय ठरेल व त्याची अंमलबजावणीही कधी करता येणार नाही याची त्याला बहुधा जाणीव असावी.

आज्ञालेखांचा उद्देश कोणता याविषयीचे थोडक्यात, सर्वसाधारण स्पष्टीकरण अशोक सहाव्या स्तंभशासनात देतो.[१] आपल्या प्रजाजनांच्या कल्याणाची काळजी हा आद्य हेतू होता व जर प्रजानन आपल्या जीवनाला धम्माच्या तत्वांनुसार वळण लावतील तर त्यांना सौख्य प्राप्त होईल. लोकांपर्यंत धम्म पोहोचविण्याच्या प्रयत्नामध्ये आपण सर्व वर्गाच्या आणि पंथांच्या बाबतीत नि:पक्षपाती राहिलेले आहोत आणि लोकांना व्यक्तिश: भेटणे हे आपले कर्तव्य आहे असे आपण मानीत असल्यामुळे हे शक्य झाले, असा दावा तो करतो. प्रजाकल्याणाची पद्धती व त्याचा स्वत.चा मानवतावादी दृष्टिकोन याची सांगड धम्मामध्ये घातलेली होती. आपण व आपले प्रजाजन यांच्यात हे धम्म विचार-विनिमयाचे साधन व्हावे असे त्याला खरोखर वाटत होते. इतर कोणत्याही कारणापेक्षा केवळ या कारणाने धम्म आणि राज्यकर्ता या नात्याने स्वत: अशोक, यांनी सर्व पंथांच्या आणि श्रद्धांच्या बाबतीत नि:पक्षपाती राहावे हे अत्यावश्यक ठरले.

अशोकाच्या कारकिर्दीच्या अठ्ठाविसाव्या वर्षी सातवे स्तंभशासन कोरविण्यात आले.[२] हा आज्ञालेख फक्त दिल्ली–टोप्रा येथील स्तंभावरच आढळतो. पश्चात विचार म्हणून अशोकाने आज्ञा दिलेली नसेल तर इतर स्तंभांच्या बाबतीत हा आज्ञालेख का वगळण्यात आला याचे स्पष्टीकरण करणे कठीण आहे.[३] एका स्तंभावर हा आज्ञालेख कोरून झालेला असला तरीही तो मागे घेण्यात आला असावा. धम्माविषयी त्याने केलेल्या कामाचा सारांश प्रामुख्याने त्यात असल्याने व धम्माचे त्याहून काही अधिक स्पष्टीकरण त्यात नसल्याने त्या आज्ञालेखाने काही विशेष हेतू साध्य होण्यासारखा नव्हता म्हणून तो मागे घेणे जास्त चांगले, असा विचार बहुधा अशोकाने केला असावा. परंतु दिल्ली–टोप्रा स्तंभावर तो राहू देण्यास परवानगी दिली.

लोकांच्या भल्यासाठी अनेक सुधारणा अंमलात आणलेल्या असल्याचे हा आज्ञालेख सांगतो. उदाहरणार्थ,.रस्ते बांधलेले आहेत आणि त्यांच्या बाजूने छाया देणारे वटवृक्ष आणि आंबराया लावलेल्या आहेत. दर आठ कोसांवर विहिरी

---

१. ब्लोख, लें एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. १६७.

२. उपरोक्त, पृ. १६८.

३. सीएफ् सेन, अशोक, पृ. १४२–४३.

खणलेल्या होत्या आणि माणसे व जनावरे यांच्यासाठी पाण्याची सोय केलेली होती. पण धम्माचे आचरण व प्रसार या अशोकाच्या राज्यकारभाराच्या एकमेव महत्त्वाकांक्षेशी तुलना करता या उपाययोजनांचे मोल कमी आहे. इतर कोणतेही कल्याणकारी काम कितीही मोठ्या प्रमाणावर केलेले असले तरी धम्माचे आचरण व प्रसार यामुळे त्याला खरे समाधान प्राप्त होते. राजा असे सांगतो की, पूर्वी जरी धम्माच्या प्रगतीची इच्छा होती तरी ती फलद्रूप झाली नव्हती. म्हणून अशोकाने दुहेरी धोरण स्वीकारले. एक म्हणजे धम्माचे स्पष्टीकरण करणारे आज्ञा लेख प्रसारित करणे व दुसरे म्हणजे धम्माला प्रसिद्धी देण्यास व लोकांनी तो अंगिकारावा म्हणून उत्तेजन देण्यास जबाबदार राहतील अशा अधिकाऱ्यांची नेमणूक करणे.

धम्ममहामत्तांच्या हालचाली समाजातील कोणत्याही एकाच गटापुरत्या मर्यादित नाहीत. समाजाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत संपूर्ण प्रमाणावर किंवा अशोक म्हणतो त्याप्रमाणे गृहस्थाश्रमी लोकांपासून संन्यासाश्रमी लोकांपर्यंत त्यांचा व्याप आहे. राजाचे मनोव्यापार या ठिकाणी उघड असल्यामुळे या अभिप्रायास थोडेसे महत्त्व आहे. ब्राह्मणांपासून शूद्रांपर्यंत समाजाचे वर्गीकरण करण्याची ब्राह्मण सिद्धांतवाद्यांची जी पद्धती होती; तिच्याप्रमाणे अशोक आपल्या प्रजाजनांचे वर्गीकरण करीत नाही.[१] समाजातील गटांचे मूल्यमापन तो सामाजिक प्रतिष्ठेच्या आधारावर करीत नाही तर सामाजिक जबाबदारीच्या आधारावर करतो. गृहस्थ हा कुटुंबाचा प्रमुख असल्याने तो समाजाच्या मूलभूत परिमाणाचे प्रतिनिधित्व करतो आणि त्याच्यावर जास्तीत जास्त सामाजिक जबाबदारी असण्याची गरज आहे संन्यासी जाणून बुजून समाजाच्या नित्य जीवनापासून दूर राहात असल्याने अशा प्रकारची जबाबदारी त्याच्यावर कमीत कमी प्रमाणावर असते धम्ममहामत्तानी विविध पंथीयांच्यामध्ये नि:पक्षपातीपणाने काम करावे अशी अपेक्षा आहे. अर्थात काहीजणांकडे विशिष्ट पंथ खास करून सोपविलेले आहेत. यामध्ये सघ, ब्राह्मण, आजीविक आणि निर्ग्रंथ यांचा उल्लेख केलेला आहे.

---

१. काही प्रसंगी तो ब्राह्मण व इभ्य यांचा उल्लेख करतो. इभ्य म्हणजे श्रीमान माणसे असा शब्दश: अर्थ असल्याने त्यांचा अर्थ वैश्य असा साधारणपणे घेतला जातो. पण या ठिकाणी समाजाचा सर्वसाधारण आवाका या अर्थाने तो घेतला नसून विविध जातींना उद्देशून वापरली जाणारी ती एक सामान्य संज्ञा आहे असे दिसून येते.

या अधिकाऱ्यांच्या आणखी एका गटाकडे, राजा आणि राजकुटुंबातील वेगवेगळ्या व्यक्ती यांनी केलेल्या धर्मदानांची देखभाल करण्याचे काम संपूर्णपणे सोपविलेले आहे. धम्माची वाढ व्हावी या हेतूने ही दाने केलेली आहेत. काही राजघराण्यातील प्रत्येक व्यक्ती एखाद्या संस्थेला वा पंथाला आश्रय देते आणि त्याच्या चरितार्थासाठी नित्य देणग्या देत राहते, या आज दिसणाऱ्या कल्पनेसारखीच कदाचित ही पद्धती आहे. अशा प्रसंगी धम्म-महामत्त या देणग्या घेऊन येत असावेत यात शंका नाही आणि शिवाय अशा प्रसंगी त्या संस्थेपुढे धम्माच्या मौलिकतेविषयी ते प्रवचने करीत असावेत. कारुवाकी राणीने दिलेल्या देणग्यांची नोंद करण्याची आज्ञा अशोकाने ज्या आज्ञालेखात दिली आहे.[1] तो राणीचा आज्ञालेख कोरविण्याचा संबंध या पद्धतीशी असावा असे दिसते.

या लेखात अशोक पुढे असे स्पष्ट करतो की, नियम आणि मतपरिवर्तन या दोन मार्गांनी धम्माची शिकवण देण्यात आलेली आहे. मतपरिवर्तनाच्या मार्गाने बरेचसे यश मिळविलेले आहे आणि नियम फारसे परिणामकारक ठरलेले नाहीत हे अशोक कबूल करतो. स्पष्टीकरणार्थ म्हणून तो असे उदाहरण देतो की, काही जनावरे अवध्य आहेत असे जाहीर करण्यात आले व म्हणून त्यांच्या हत्येवर निर्बंध घालण्यात आले. परंतु धम्माची समज आल्यामुळे आपोआपच जनावरांची हत्या होणार नाही व मग नियम करण्याची जरूरही राहणार नाही. अगदी या टप्प्यावरही निर्बंधापेक्षा अधिक जोरदार प्रेरणा म्हणून मतपरिवर्तनाचे मूल्य अशोकाने जाणलेले होते आणि या काळातील धम्म-महामत्त या संस्थेने लोकांच्या जीवनात हस्तक्षेप करण्याची जरी प्रचंड सत्ता मिळविलेली असली तरी अजूनही तात्त्विकदृष्टया, मतपरिवर्तनाचे महत्त्व किती आहे त्यावरच अशोक अधिक भर देतो.

आज्ञालेखांच्या स्थूल वर्गीकरणातील दुसऱ्या प्रकारामध्ये चार आज्ञालेखांचा समावेश होतो. यामध्ये अशोकाने बौद्धधर्माच्या शिकवणुकीवरील आपली श्रद्धा व्यक्त केलेली आहे आणि ते खास करून आपल्यासारख्याच बौद्धधर्मीयांना व संघाला उद्देशून लिहिलेले आहेत. हे आज्ञालेख म्हणजे रुम्मिनदेइचा कोरीव लेख; निगलिसागरचा कोरीव लेख, दुफळीसंबंधीचा आज्ञालेख आणि भब्रुचा आज्ञालेख. या ठिकाणी अशोक स्वतःला एक मौर्य सम्राट समजून बोलत नसून संपूर्णपणे एक खाजगी व्यक्ति म्हणून आपले विचार सांगत आहे. बौद्धधर्माचे आचरण करणारा, आवश्यक त्या तीर्थयात्रा करणारा आणि धर्मनिष्ठ अनुयायाकडून अपेक्षित अशा प्रथा मानणारा असा अशोक आपण या ठिकाणी पाहतो.

---

१. दुसरे प्रकरण पहावे, आणि ब्लोख, ले एन्स्क्रेप्सिओं द अशोक, पृ. १५९.

बुद्धाचा जन्म झालेला असल्यामुळे जी जागा पवित्र मानली जाई, त्या लुम्बिनीवनाची राजाने जी तीर्थयात्रा केली तिची नोंद रुम्मिनदेइ येथील स्तंभावरील कोरीव लेखात आहे.[1] चांगल्या बौद्धधर्मीयाने ज्या चार सर्वसामान्य तीर्थयात्रा कराव्यात अशी अपेक्षा केली जात असे त्यांच्यापैकी लुम्बिनीची तीर्थयात्रा ही एक होती. आपल्या राज्याभिषेकाच्या पंधराव्या वर्षी राजाने कोनकमल स्तुपाला भेट दिली व पुढच्या काळात त्याचा विस्तार करण्यात आला, या वस्तुस्थितीची नोंद निगलिसागरच्या कोरीव लेखात केलेली आहे.[2] हा लेख भग्न अवस्थेत असल्यामुळे हा नंतरचा काळ कोणता ते वाचणे शक्य होत नाही. विविध बौद्ध स्थळांच्या त्याने केलेल्या तीर्थयात्रांमध्ये त्याने ही भेट दिली असावी राज्यारोहणाच्या विसाव्या वर्षी त्याने लुम्बिनीला भेट दिली असे आपल्याला सांगण्यात आलेले आहे. कोनकमन स्तुपाला दिलेली दुसरी भेट याच सुमारास असली पाहिजे. सरत्या वर्षांबरोबर अशोकाची बौद्धधर्माविषयीची व्यक्तिगत आसक्ती वाढलेली आहे हे निगलिसागरच्या कोरीव लेखावरून स्पष्ट दिसून येते.

सांची, सारनाथ व कोसम अशा तीन ठिकाणी दुफळीसंबंधीच्या आज्ञालेखातील मजकूर असून तो त्याच्या कारकिर्दीच्या उत्तरकालात म्हणजे इ. स. पू. २४० मध्ये प्रसृत करण्यात आला होता.[3] संघातील ऐक्य नष्ट करण्याचा प्रयत्न जर भिक्षू व भिक्षुणी यांनी केला तर त्यांना संघातून काढून टाकले जाईल अशी धमकी हा आज्ञालेख देतो संघाचें कार्य एकमताने चालावे असे एक बौद्धधर्मीय म्हणून अशोकाला वाटते आणि संघातील फुटीर प्रवृत्ती तो सहन करणार नाही हे सर्वांना माहीत व्हावे अशी त्याची इच्छा आहे म्हणून हा लेख प्रसृत करण्यात आला. या आज्ञालेखाची एक प्रत संघाच्या कार्यालयात राहावी व सर्वसामान्य उपासक आणि तत्संबंधित अधिकारी यांना या विषयाबाबत राजाची काय इच्छा आहे ते समजावे म्हणून आणखी एक प्रत जाहीर करावी अशी तो आज्ञा देतो. हा आज्ञालेख संघाविषयी कार्य करणाऱ्या खास महामात्तांना उद्देशून आहे. हा आज्ञालेख सर्व

---

१. उपरोक्त. पृ १५७, रुम्मिनदेइ हे लुम्बिनीचे आधुनिक नाव आहे. या खेड्यातील जमिनीवरचा कर व महसुलाची आकारणी यात कपात करण्यात आली होती. आज्ञालेखाचा हा पुढचा भाग राजाच्या दप्तरखान्याचा एक भाग म्हणून मानला जात असेल. दुसऱ्या व तिसऱ्या प्रकरणामध्ये आम्ही या आज्ञालेखांची चर्चा केलेली आहे.

२. ब्लोख, ले एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. १५८

३. उपरोक्त, पृ. १५२, दुसऱ्या प्रकरणामध्ये आम्ही या कालाविषयीची कारणे दिलेली आहेत.

बौद्धकेंद्राकडे पाठविण्यात आलेला असला पाहिजे आणि स्थानिक महामत्तांना त्या सूचना मिळालेल्या असल्या पाहिजेत.

शेवटच्या उरलेल्या आज्ञालेखात, भब्रच्या अज्ञालेखात काळाचा उल्लेख नाही. परंतु अशोकाच्या कारकिर्दीच्या शेवटी शेवटी तो प्रसृत केला गेला असावा असे आम्हाला वाटते.[1] ज्या टेकडीवर तो आढळला तिच्यामध्ये दोन बौद्ध मठांचे अवशेष आहेत.[2] हे या आज्ञालेखाशी संपूर्णपणे सुसंगत आहे, कारण हा आज्ञालेख संघाला उद्देशून आहे. बौद्धधर्मावरील आपल्या विश्वासाची राजाने यात स्पष्ट कबुली दिलेली आहे आणि भिक्षू किंवा सामान्य उपासक यांना ज्या बौद्धधर्मग्रंथांचा परिचय असणे अगत्याचे आहे अशा अनेक ग्रंथांची त्यात उदाहरणे आहेत. आपण बौद्धधर्मीय असल्याची कबुली अशोकाने स्पष्ट शब्दात यात दिलेली असल्याने हा आज्ञालेख महत्त्वाचा आहे. बुद्ध धम्म व संघ यावरील त्याचा विश्वास हा आज्ञालेख सांगतो.[3] या विधानात कोणत्याही प्रकारची संदिग्धता नाही. तथापि, हा आज्ञालेख सर्वसाधारण जनतेसाठी नसून राजाने सरळ सरळ व संपूर्णपणे संघाला उद्देशून लिहिलेला वैयक्तिक आज्ञालेख आहे. भब्रच्या सध्याच्या जागे-जवळील दोन मठांमधील भिक्षूंना उद्देशूनच हा लेख लिहिलेला होता हेच जास्त करून संभवनीय दिसते. अशोकाने एक बौद्धधर्मीय या नात्याने हा आज्ञालेख प्रसृत केलेला आहे. म्हणूनच या ठिकाणी आपल्या नित्याच्या देवानम्पिय पियदसि राजा या बिरूदाने तो स्वतःचा उल्लेख करीत नाही तर पियदसि लाज मगधे, ‘ मगधाचा राजा पियदसि ’ या अगदी साध्या बिरूदाने का करतो याचेही स्पष्टीकरण मिळते.

अनेक ध्येये व आचार यांचा समावेश असलली एक जीवनपद्धती म्हणून अशोकाचा धम्म उदयास आलेला आहे. हत्येबाबत संयम हे एक महत्त्वाचे तत्त्व होते. तसेच समंजस कौटुंबिक आणि सामाजिक नातेसंबंधांचा आग्रह त्यात होता. मग ते नातेसंबंध मातापिता आणि मुले, वडीलधारी मंडळी आणि लहान मंडळी, मित्र किंवा विविध विचारधारा असलेले पंथ यांच्यामधील कोणतेही असोत. वैद्यकीय सवलतींची उपलब्धता, उत्तम दळणवळण, अंधश्रद्धांवर निष्कारण होणाऱ्या खर्चाला प्रतिबंध यांसारख्या विसाव्या शतकाच्या भाषेत ज्याला समाज-कल्याणाचा कार्यक्रम म्हणता येईल अशा गोष्टींचा समावेश त्यात होता. विचार आणि कृती यांत सौम्यपणा हा मुख्य मुद्दा होता. परंतु तरीही सुरुवातीला

---

१. ब्लोख, ले एन्स्क्रेपसिओं द अशोक, पृ. १५४, हाच लेख कलकत्ता बैराट शिलालेख म्हणूनही ओळखला जातो.

२. अर्क्यालॉजिकल रिपोर्टस् दोन, पृ. २४८.

३. हा विश्वास म्हणजे बौद्धधर्माचा एक भाग आहे.

कोणत्याही प्रकारची सक्ती करण्याचा प्रयत्न त्यात नव्हता. तत्त्वे सुचविण्यात आलेली होती आणि त्याबाबत पसंती करण्याचे काम प्रत्येक व्यक्तीच्या सारासार-विवेकबुद्धीवर सोपविण्यात आलेले होते. उत्तरकालीन आज्ञालेखांमधील एक निश्चित बदल आपण पाहिलेला आहे. दीर्घ स्तंभशासनांमधील दिलेला सल्ला जास्त संदिग्ध झालेला आहे व दीर्घ शिलाशासनांमधील सल्ल्यापेक्षा तो फारच कमी मोलाचा आहे. धम्माला यश मिळाल्याच्या कल्पनेने लेखक इतका पछाडला गेलेला आहे की त्याने वास्तवातील परिस्थितीची दखल घेतलेली दिसत नाही.

बौद्धधम्म किंवा धर्म या व्यापक संज्ञेने ओळखली जाणारी इतर कोणतीही स्वीकारलेली पद्धती म्हणजे धम्म असा या संज्ञेचा अर्थ घ्यावयाचा नाही, ही काळजी आपल्याला घेतलीच पाहिजे. धम्म ही संज्ञा कोणी आणि कोणत्या संदर्भात वापरली याचे तपशीलवार पृथक्करण केल्यानतरच तिचा खरा अर्थ लावता येणे शक्य आहे. प्राचीन भारतातील साहित्य आणि विचार यात अविष्कृत झालेले सर्व धर्म किंवा धम्म हे एकच आहेत किंवा जवळ जवळ सारखेच आहेत असे सुचविणे म्हणजे गेल्या दोनशे वर्षांमध्ये कोणत्याही संदर्भात वापरलेली समाजवाद ही संज्ञाही एकाच अर्थाने किंवा जवळजवळ सारख्याच अर्थाने वापरलेली आहे असा आग्रह धरण्याइतकेच अविचारीपणाचे आहे. पूर्वी वारंवार प्रयत्न केला आहे त्याचप्रमाणे, अशोकाच्या धम्म या शब्दासाठी समानार्थी शब्द शोध-ण्याची सुदैवाने गरज नाही. ' अशोकाचा धम्म म्हणजे काय ' या प्रश्नाला उत्तर देण्याइतके विस्तृत, पुरेसे व विश्वसनीय साहित्य त्याच्या स्वतःच्याच आज्ञालेखां-मधून मिळते.

कायदा आणि सामाजिक सुव्यवस्था अशा दृष्टीने वापरलेली धम्म ही संकल्पना मौर्यकालीन भारताला मुळीच नवी नव्हती. अशोकाने आपल्या धम्माच्या प्रसाराबरोबर तो अधिक दयामय करण्याचा आणि वस्तुत: सद्गुणी वर्तन हेच अधिक महत्त्वाचे हे दाखविण्याचा प्रयत्न केला. सद्गुणी वर्तन व दुर्गुणी वर्तन यांच्यातील भेद ओळखण्याच्या पात्रतेमुळे इतर प्राणीसृष्टीपासून मनुष्य वेगळा ओळखता येतो आणि सर्व माणसांना सामान्यत: सद्गुणांचे आचरण करणे शक्य होते. असे वर्तन अंतर्भूत करणारा धम्म सांप्रदायिक श्रद्धांचा अडसर पार उल्लंघून जातो. आम्ही पूर्वी म्हटले त्याप्रमाणे धम्म ही प्रामुख्याने आपल्या स्वतःच्या समाजाच्या संदर्भात व्यक्तीशी निगडित असणारी नैतिक संकल्पना होती. आपल्या धम्माचा प्रसार करण्यात धार्मिक शिकवणुकीमधील संकुचित वृत्ती कमी करण्याचा, सबलांपासून दुर्बलांचे संरक्षण करण्याचा आणि कोणत्याही सांस्कृतिक गटाला आक्षेप घेता येणार नाही इतकी सामाजिक वर्तनातील उदार जाणीव आपल्या संपूर्ण साम्राज्यात वाढविण्याचा प्रयत्न अशोक करीत होता. ● ● ●

# उत्तरकालीन मौर्यराजे

भारतातील एक राजकीय शक्ती या दृष्टीने झालेला मौर्य घराण्याचा शेवट अशोकाच्या मृत्यूनंतरच्या वर्षांनी पाहिला. मौर्य राज्यकर्ते आणखी एक अर्धशतक राज्य करीत राहिले. इ. स. पूर्व दुसऱ्या शतकाच्या सुरुवातीच्या भागात हे घराणे संपूर्णपणे कोलमडले आणि शुंग घराणे त्या जागी आले. या अर्धशतकात मौर्य साम्राज्याचे विघटन झाले आणि चंद्रगुप्ताने आपल्या जीवितकार्याची सुरुवात ज्या राज्यापासून केली होती त्या केंद्राच्या दिशेने अशोकाच्या विस्तृत प्रदेशाचा संकोच होऊ लागला व हे साम्राज्य कमी अधिक मानाने मगधदेशापुरते मर्यादित झाले. अशोकाच्या कारकिर्दीविषयी भरपूर पुरावा उपलब्ध आहे. त्याच्या तुलनेत उत्तरकालीन मौर्यांविषयी अगदीच अंधुक पुरावा आहे. हा पुरावाही इतका गोंधळात टाकणारा व अनिश्चित स्वरुपाचा आहे की मौर्य घराण्याच्या शेवटच्या पन्नास वर्षांची रचना करताना इतिहासकारांची मते परस्परांपासून भिन्न पडतात, प्रत्येकजण जास्तीत जास्त अनुमानजन्य रचना सुचवू शकतो.

उत्तरकालीन मौर्यांच्या वंशावळी अनेक साधनग्रंथांमध्ये उपलब्ध आहेत. राज्यकर्त्यांविषयी जो काही व्यक्तिगत पुरावा उपलब्ध आहे त्याच्याशी या याद्यांची तुलना करण्याने उत्तम आरंभबिंदु मिळू शकेल. पुराणग्रंथ उत्तरकालीन मौर्यराजांची विस्तृत यादी देतात, परंतु या याद्यांमध्ये बराच फरक पडतो हे खालील याद्यांवरून दिसून येईल.

| | वायु आणि ब्रह्मांड पुराणे[1] | कारकिर्दीची वर्षे |
|---|---|---|
| | अशोक | |
| नंतर | कुणाल | |
| ,, | बंधुपालित | ८ |
| ,, | इंद्रपालित | १० |
| ,, | देववर्मा | ७ |
| ,, | शतधनुस् | ८ |
| ,, | बृहद्रथ | ७ |

१. पार्गिटर, डायनॅस्टिज् ऑफ दि कलि एज. पृ. २९.

पुष्यमित्र या शुंग घराण्याच्या संस्थापकाकडून बृहद्रथाचा खून झाल्याने ते राजघराणे संपले. सर्व पुराणांनी या घटनेचा उल्लेख केलेला असल्याने आम्ही प्रत्येक वेळी ती घटना सांगणार नाही.

| | मत्स्यपुराण[१] | कारकिर्दीची वर्षे |
|---|---|---|
| | अशोक | |
| नंतर | दशरथ | ८ |
| ,, | संप्रति | ९ |
| ,, | शतधन्वन | ८ |
| ,, | बृहद्रथ | ७ |

| | विष्णुपुराण[२] |
|---|---|
| | अशोक |
| नंतर | सुयशस |
| ,, | दशरथ |
| ,, | संगत |
| ,, | शालिशुक |
| ,, | सोमवर्मन |
| ,, | शतधन्वन |
| ,, | बृहद्रथ |

पार्गिटर ज्याला एवायु पुराण म्हणतो त्याच्या आधारे राजांची आणखी एक यादी तो सुचवितो. यापूर्वीच दिलेल्या यादीपेक्षा ती वेगळी आहे.[३]

| | अशोक | कारकिर्दीची वर्षे |
|---|---|---|
| नंतर | कुलाल (कुणाल ?) | |
| ,, | बंधुपालित | ८ |
| ,, | दशोण | ७ |
| ,, | दशरथ | ८ |
| ,, | संप्रति | ९ |
| ,, | शालिशुक | १३ |
| ,, | देवधर्मन | ७ |
| ,, | शतधन्वन | ८ |
| ,, | बृहद्रथ | ७ |

१. उपरोक्त, पृ. २८.

२. चोविसावे प्रकरण.

३. पार्गिटर, डायनॅस्टिज ऑफ दी कलि एज्. पृ. २९.

जर या सर्व याद्यांची एक यादी केली तर आपल्याला ती खालीलप्रमाणे मिळेल.

| | | कारकिर्दीची वर्षे |
|---|---|---|
| | अशोक | |
| नंतर | कुणाल | ८ |
| ,, | बंधुपालित | ८ |
| ,, | इंद्रपालित | १० |
| ,, | दशोण | ७ |
| ,, | दशरथ | ८ |
| ,, | संप्रति | ९ |
| ,, | शालिशुक | १३ |
| ,, | देववर्मन | ७ |
| ,, | शतधन्वन | ८ |
| ,, | बृहद्रथ | ७ |

तथापि ही यादी स्वीकारार्ह नाही. हे राजघराणे १३७ वर्षे टिकले याविषयी सर्व पुराणांची एकवाक्यता आहे. या राजघराण्याच्या पहिल्या ८५ वर्षांमध्ये पहिले तीन मौर्यराजे होऊन गेले[१] त्यामुळे उरलेल्या ५२ वर्षांची विभागणी उत्तरकालीन मौर्यराजांमध्ये करावी लागते. वर दिलेली यादी बाद ठरविलेली आहे. कारण त्या यादीतील एकूण संख्या ८५ वर्षे येते व म्हणूनच पुराणांमधील इतर याद्याही बाद ठरतात कारण त्यामधील बेरजा ५२ वर्षांपेक्षा कमी किंवा अधिक येतात. अशा प्रकारे पुराणांमधील याद्यांमध्ये अनेक फरक आहेत किंवा काहीतरी वगळलेले आहे आणि म्हणूनच कोणतीही एक यादी संपूर्णपणे विश्‍वसनीय म्हणून स्वीकारता येणे शक्य नाही, हे आपण पाहिले.

उत्तरकालीन मौर्यांविषयी इतर ग्रंथांनीही याद्या दिलेल्या आहेत. त्यांपैकी अशोकावदानात खालील यादी आहे.[२]

| | |
|---|---|
| | अशोक |
| नंतर | संपदि |
| ,, | बृहस्पति |
| ,, | वृषसेन |

१. पार्गिटर, डायनॅस्टिज् ऑफ दि कलि एज, पृ. २६, २७.

२. प्रझिलस्की, ला लेजांद द लँपेरर अशोक पृ. ३०१, अं. ३.

नंतर पुष्यधर्मन

" पुष्यमित्र

जैन आख्यायिकांमध्ये आपल्याला दोन नावे मिळतात.[1] अशोकानंतर त्याचा नातू, कुणालचा मुलगा संप्रती हा गादीवर आला असे आपल्याला समजते.

तारानाथ, हा तिबेटी इतिहासकार बौद्ध ग्रंथांचा आधार घेऊन खालील नावे देतो.[2]

अशोक

नंतर विगताशोक

" वीरसेन

कल्हणाची राजतरंगिणी, अशोकाचा वारस म्हणून जालुक, हे अगदी वेगळे नाव सांगते.[3] त्याच्या नंतर दामोदर गादीवर आला.

प्राचीन युरोपीय ग्रंथांपैकी पॉलिबिअसचा ग्रंथ हा एकच पुरावा आपल्या जवळ आहे. तो लिहितो की, इ. स. पूर्व २०६ मध्ये सिरियाच्या अँटिओकस दि ग्रेटने सोफगसेनोस याच्याबरोबर परत मैत्री केली. त्याचे वर्णन 'भारतीय राजा' असे केलेले आहे.[4] पॉलिबिअस पुढे अशी माहिती देतो की, 'येथे त्याने आणखी हत्ती मिळविले त्यामुळे त्याचे हस्तिदल एकूण १५० पर्यंत गेले, यानंतर आपल्या सैनिकांना धान्य वाटल्यावर तो स्वतः आपल्या सैन्याला घेऊन निघाला. राजाने जो पैसा देण्याचे कबूल केले होते तो गोळा करण्यासाठी सायझिकच्या अँड्रोस्थेनिसला मागेच ठेवले.' सोफगसेनोस हे सुभगसेन या भारतीय नावाचे ग्रीक रुपांतर आहे हे स्पष्ट आहे. हा राजा कोण होता याविषयीची चर्चा आपण जरा नंतर करू.

पुष्यमित्राने केलेल्या बृहद्रथाच्या वधाची कथा बाणाने हर्षचरित या ग्रंथातही सांगितली आहे.[5] पुष्यमित्र या दुष्ट सेनापतीने आपला स्वामी बृहद्रथ मौर्य याला ठार मारले, हा राजा डोक्याने जरा कमी होता व सैन्याची पाहणी करण्याच्या मिषाने सेनापतीने त्याला नेले होते, असे तो लिहितो.

अशोकाचा आणखी एक संभाव्य वारस म्हणजे त्याचा मुलगा तीवर. त्याचे अस्तित्व ऐतिहासिक पुराव्याने सिद्ध झालेले आहे. त्याची आई कारुवाकी हिच्या-

१. परिशिष्टपर्वन, नऊ ३४–५४.

२. गेशिश्ट डेस बुद्धिस्मुस इन इंडियन, आठ, पृ. ५०.

३. एक, १०८–५३.

४. हिस्टरीज, अकरा, ३९.

५. सहा.

बरोबर त्याचा उल्लेख राणीच्या आज्ञालेखात आलेला आहे.[1] परंतु या राजपुत्राचा हा एकमेव उल्लेख आहे. कारण दुसऱ्या एखाद्या नावाने त्याचा उल्लेख नसेल तर वाङ्मयीन साधनात त्याचा उल्लेखच नाही. बौद्ध आख्यायिकांमध्ये असलेली तिस्सरख्खा म्हणजेच राणी कारुवाकी (दोघींचेही वर्णन अशोकाची दुसरी राणी असे असल्याने) हे आपले पूर्वी केलेले अनुमान जर बरोबर असेल तर कारुवाकी हे तिचे व्यक्तिगत नाव असेल व ती पट्टराणी झाल्यानंतर तिने तिस्सरख्खा हे अधिकृत नाव धारण केले असावे.[2] व तसे असेल तर तीवराचे नाव नाहीसे होणे समजण्यासारखे आहे. ती एक महत्त्वाकांक्षी स्त्री असल्याने वृद्धावस्थेकडे झुकणाऱ्या अशोकाच्या कृतींवर तिचे बरेचसे नियंत्रण असावे असे या साधनावरून सूचित होते.[3] अशोकाच्या वृद्धापकाळात त्याला तीवर हा मुलगा झाला असावा व म्हणून तो आवडता व लाडावलेला पोर असावा.

बौद्धधर्माविषयी अशोकाला वाटणाऱ्या आस्थेचा तिस्सरख्खाला जर क्रोध येत असेल व तिच्या विषयीच्या अशोकाच्या प्रेमात ती आस्था प्रतिस्पर्धी आहे असे ती मानीत असेल (बोधिवृक्षाची तिने हानी केल्याची आख्यायिका आहे त्यावरून हे सूचित होते) तर राजाने तीवराला आपला वारस नेमावे म्हणून तिने पिच्छा पुरविलेला असणे अगदी शक्य आहे.[4] ती एक अतिमहत्त्वाकांक्षी माता असल्याने तो तरुण राजपुत्र तिच्या अर्ध्या वचनात असावा. त्यामुळे इतर राजपुत्रांना, त्याच्या सावत्र भावांना, ज्यांच्यामध्ये कुणालासारखे काहीजण वयाने त्याच्यापेक्षा बरेच मोठे होते, त्याचा बराचसा तिरस्कार वाटत असावा, त्यामुळे त्यांच्या पित्याच्या मृत्यूनंतर त्याच्या अल्लड वयामुळे त्यानी त्याच्याकडे दुर्लक्ष केले असावे. अशोकानंतर कुणाल गादीवर आला हे जर खरे असेल आणि तिसरख्खाने कुणालाला आंधळे केले या आख्यायिकेत जर काही तथ्य असेल तर अशोकाच्या मृत्यूनंतर तिस्सरख्खा व तिचा मुलगा हे दोघेही दूर सारले गेले असतील व त्यात आश्चर्य वाटण्याजोगे काही नाही.

अशोकाचा वारस म्हणून कुणालाचा वारंवार उल्लेख केला गेला आहे. तक्षशिला येथील बंड दडपण्यासाठी त्याला पाठविण्यात आल्याची कथा बौद्ध

---

१. ब्लोख, ले एंस्क्रॅपसिओ द अशोक, पृ. १५९.

२. दुसरे प्रकरण पाहावे.

३. प्रझिलस्की, ला लेजांद द लॅपेरर अशोक. पृ. २८३, तळटीप.

४. महावंस, वीस, १–६.

आख्यायिका सांगते पण ऐतिहासिक दृष्टया ती असत्य असावी असे आम्हास वाटते.[1] दुसऱ्या एका बौद्ध आख्यायिकेत कुणालाला खूपच महत्त्व दिले गेले आहे त्यात त्याला आंधळा करण्यास तिस्सरख्खा जबाबदार आहे, पण या आख्यायिकेची विश्वसनीयता शंकास्पद आहे.[2] तरीही कुणाल हा अशोकाचा मुलगा होता, तक्षशिला येथे राज्यपाल होता आणि तो अशोकानंतर गादीवर येणे संभवनीय नसले तरी शक्य होते असे दिसून येईल.

अशोकाच्या मागून त्याचा नातू दशरथ हा सिंहासनावर आला असे मत्स्य पुराण सांगते. अशोकानंतर सुयशस व त्याच्यानंतर दशरथ गादीवर आल्याचे विष्णु पुराण सांगते. कोणत्या तरी ग्रंथामध्ये सुयशसचा उल्लेख आहे असा हा एकमेव प्रसंग. सुयशस हे कुणालाचेच एक नाव होते असे सुचविण्यात आलेले आहे.[3] ते खरेही असू शकेल. सुंदर डोळे असणाऱ्या कुणाल या पक्षावरून ते नाव ठेवण्यात आले होते. कारण त्याच्या स्वतःच्या डोळ्यांचे सौंदर्य.[4] सुयशस् म्हणजे 'थोर वैभवाचा' हे त्याने राजा झाल्यानंतर अधिकृत नाव म्हणून धारण केले असावे. हे शक्य आहे व ती प्रथा अनेक घराण्यांमध्ये प्रचलित होती. सुयशस हे नाव आणि दिव्यावदानात त्याला दिलेले धर्मविवर्धन हे नाव या दोहोत संबंध असू शकेल. परंतु हे ठामपणे सांगता येणार नाही. त्याला आंधळा करण्यात आल्याविषयीची कथा जर खरी असेल तर आपले नाव बदलण्याच्या इच्छेस त्याला आणखी एक कारण मिळाले असावे. तथापि जर त्याला आंधळा करण्यात आले असेल तर त्याचे सिंहासनावर येणे ही वस्तुस्थिती शंकास्पद होऊ शकेल. ज्या व्यक्तीचे कोणतेही महत्त्वाचे इंद्रिय गमावलेले असेल त्या व्यक्तीचा राजपदावरील हक्क आपोआप नष्ट होतो असे विधिसंहितांनी जाहीर केले व प्रथाताद्वारे त्याचा उपयोगही होत राहिला. मौर्यांच्या दरबाराने आंधळ्या राजपुत्राला राज्य करण्यास परवानगी दिली असेल असा संभव दिसत नाही. बौद्ध आख्यायिका ऐतिहासिक दृष्टया सत्य असोत वा नसोत, परंतु सर्व राजपुत्रांमध्ये कुणाल हीच दोन्ही कथांमध्ये मध्यवर्ती व्यक्ती होती या वस्तुस्थितीवरून या राजपुत्राला महत्त्व होते व तो राज्याचा नियोजित वारस असण्याचाही संभव होता हे सिद्ध होते. त्याला आंधळा करण्यात आलेल्या कथेचा लाक्षणिक अर्थ, म्हणजे बौद्धधर्माच्या बाबतीत. त्याला डोळे

---

१. दुसरे प्रकरण पाहावे.

२. उपरोक्त.

३. द ला वाले पुसं, लेंद ओ तों दे मौर्य. पृ. १६४.

४. प्रझिलस्की, ला लेजांद द लांपेरर अशोक, पृ. २८१.

झाकण्यास लावणे हाही असू शकेल. बौद्ध भिक्षूंच्या दृष्टीने बौद्धधर्मापासून कोणीही दूर जाणे म्हणजे सम्यक मार्गाच्या बाबतीत डोळे झाकणे. अशोकाच्या मुलाच्या बाबतीत बौद्धधर्मापासून दूर जाणे म्हणजे त्याला आंधळा करणे.

मत्स्य पुराणात आलेल्या उल्लेखाखेरीज नागार्जुनी टेकड्यांमधील गुहांवरूनही दशरथाची माहिती मिळते. या गुहा त्याने आजीविकांना दान केलेल्या होत्या. देवानम्पिय दशरथ याच्या आज्ञेवरून कोरलेले तीन लेख असे सांगतात की, राज्यारोहण झाल्यावर लगेच या गुहांचें दान करण्यात आलें.[१] अशोकाच्या कारकिर्दीनंतर लगेच हे लेख कोरण्यात आलें हे त्यातील लिपीवरून स्पष्ट होते. ते अशोककालीन ब्राह्मी लिपीत असून त्यांचे सर्वसाधारण स्वरूप अशोकाच्या कोरीव लेखांसारखे आहे. हे निवासस्थान यावच्चंद्रदिवाकरी टिकून राहो, ही इच्छा सातव्या स्तंभ-शासनाची आठवण करून देते. या लेखात, स्त्रीपुरुषांनी यावच्चंद्रदिवाकरी धम्माच्या तत्त्वांप्रमाणे आचरण करावे अशी अशोक इच्छा करतो.

गुहांचे दान, कोरीव लेख व देवानंपिय या बिरुदाचा वापर या सर्वांवरून आपल्या आजोबांसारखीच, अशोकासारखीच दशरथाची वृत्ती होती हे सूचित होते. दसलथेन देवानंपियेन अनंतलियं अभिसितेन या शब्दप्रयोगामध्ये देवानंपियेन या शब्दात अशोकाचा उल्लेख केलेला आहे असे एक मत मांडण्यात आलेलें आहे. देवानंपिय हे बिरुद अशोक नेहमी आपल्या पियदस्सी या नावाच्या मागे लावीत असे व वर दर्शविल्याप्रमाणें नंतर लावीत नसे या वस्तुस्थितीवर हे मत आधारलेले आहे. याच आधारावर द ला वाले पूसंवरील शब्दप्रयोगाचे भाषांतर 'अशोकाने दशरथाच्या डोक्यावर मुकुट ठेवल्यानंतर लगेच त्याने या गुहा दिल्या.' असे करतात.[२] हा अर्थ आम्ही मान्य करीत नाही. एखादा राजा वापरीत असलेले देवानंपिय हे बिरुद दशरथाने धारण केले असावे हे अगदी शक्य आहे. हे बिरुद नावाच्या मागे वा पुढे कोठेही वापरता येते. अशा प्रकारे एखाद्या राजाला आपले नाव आणि राज-घराण्यातील आपला क्रम देऊन नंतर आपली बिरुदे लावता येतात. व्याकरणाच्या दृष्टीने दशरथाचे बिरुद म्हणून कोरीव लेखातील देवानंपिय हा शब्द बरोबर आहे कारण हा शब्द राजाची गुणवत्ता दाखविणारा व राजाच्या नावाबरोबर जुळणारा असा हवा व तसा तो आहे.

बौद्धधर्माला विरोधी असणाऱ्या धर्मसंप्रदायांबाबत दशरथाने दर्शविलेल्या सहानुभूतीवर टीका करण्यात आलेली आहे.[३] दशरथाने आजीविक पंथाला

१. सरकार, सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स पृ. ७९
२. लँव ओ तों दे मौर्य... पृ. १६५.
३. उपरोक्त, पृ. १६६.

दिलेल्या देणग्या व त्याच्या कारकिर्दीविषयी बौद्धग्रंथांनी धरलेले मौन यावरून दशरथाची वृत्ती बौद्धधर्मविरोधी होती असा निष्कर्ष काढता येण्याजोगा आहे, असेही प्रतिपादन करण्यात आलेलें आहे.[१] या विषयांच्या बाबतीत अशोकाचे एखादेही पूर्वीचे उदाहरण आपल्याजवळ नसेल तर हा विचार अगदी पटण्याजोगा आहे. परंतु अशोकाने स्वत:च आजीविक पंथाला गुहा दान केल्या व तरीही त्यावेळी तो निष्ठावान बौद्ध होता हे पाहता दशरथाने तसे केले असेल तर त्यावरून तो इतर धर्मपंथांच्या विरोधी होता असे ठरविण्याची काही गरज नाही. फार तर असे म्हणता येईल. की, राज्यारोहण झाल्याबरोबर लगेच त्याने त्या गुहांचे आजीविक पंथाला दान केले, त्यावरून त्या धर्मपंथाविषयी त्याला विशेष आस्था होती. (पण इतर धर्मपंथाना वगळून नव्हे.)

अशोकाच्या नंतर लगेच दशरथ गादीवर आला ही गोष्ट निश्चितच शक्य आहे कारण इ. स. पू. २३२ मध्ये त्या दृष्टीने तो काही फारसा लहान नव्हता. अशोक सिंहासनावर आला तेव्हा वयाने तो तीस वर्षापेक्षाही अधिक असला पाहिजे. त्याची कारकीर्द सदतीस वर्षांची झाली म्हणजे मृत्युसमयी तो कमीत कमी सदुसष्ट वर्षांचा असावा. म्हणजे राजा मेला तेव्हा त्याचा नातू वीस वर्षांचा असण्याची शक्यता आहे. जर या नातवावर आपल्या आजोबांचा प्रभाव पडलेला असेल तर आपल्या मुलाचा हक्क बाजूला सारून नातवावर कृपा करण्याचे अशोकाने ठरविले असावे. जर असे घडले असेल तर अशोकाच्या मुलांच्यामध्ये प्रचंड प्रक्षोभ माजला असावा.

मत्स्य पुराणातही उल्लेखिलेल्या संप्रतीचा उल्लेख, बौद्ध व जैन या दोन्ही साहित्यात, कुणालाचा मुलगा म्हणून होतो. येथे थोडासा गोंधळ आहे कारण तो दशरथाचा मुलगा असल्याचे या पुराणात वर्णन आहे. जैन परंपरेनुसार तो अशोकाचा नातू व जैन धर्माचा आश्रयदाता होता.[२] सुहस्तिनच्या सल्ल्याने त्याने धर्मांतर केले व तो जैन झाला असेही सांगितले आहे. यानंतर राज्यकर्ता या नात्याने या धर्माला त्याने सक्रिय पाठिंबा दिला व इतर मार्गांनीही उत्तेजन दिले. पाटलिपुत्र व उज्जयिनी या दोन्ही ठिकाणाहून तो राज्य करीत असल्याचे सांगण्यात आलेले आहे. दुर्दैवाने या माहितीला पुष्टी देणारा कोरीव किंवा इतर पुरावा आपल्याजवळ नाही.

अशोकाच्या अखेरच्या दिवसांविषयीच्या एका चमत्कारिक कथेशी बौद्ध वाङ्मयाने संप्रतीचा संबंध जोडलेला आहे.[३] औदार्याच्या बाबतीत सुदत्त राजावर

---

१. दत्त, अर्ली मोनॅस्टिक बुद्धिझम, व्हॉ. दोन, पृ. २५५.
२. परिशिष्टपर्वन, नऊ, ५४
३. दिव्यावदान, एकोणतीस, पृ. ४३२, तळटीप

मात करण्याचे अशोकाने ठरविले व बौद्ध संघाला शंभर कोटी सुवर्णमुद्रा दान केल्या. ही रक्कम राजकोषातून घेतली. जेव्हा चार कोटी मुद्रा द्यावयाच्या बाकी राहिल्या तेव्हा, पुढच्या वारसाने, संप्रतीने राधागुप्त या मंत्र्याच्या सल्ल्यावरून आक्षेप घेतला. तेव्हा अशोकाने आपल्या वैयक्तिक मालमत्तेचे दान करण्यास सुरुवात केली. शेवटी अशी वेळ आली की अशोकजवळ फक्त अर्धा आंबा उरला. अखेरीस राजा ज्यावेळी मेला त्यावेळी मंत्र्यांनी चार कोटींचा भरणा केला आणि जप्त केलेले राज्य अशा प्रकारे सोडवून घेवून संप्रतीला सिंहासनावर बसविले. फा–हियान आपल्या वृत्तांतात असे सांगतो की राजगृहाजवळ एक अशोकस्तंभ होता व अशोकाने तीन वेळा लोकवस्ती झालेला जगाचा भाग भिक्षूंना दान केला व त्यांना पैसे देऊन त्यांच्याकडून तो परत विकत घेतला, या गोष्टीच्या स्मरणार्थ तो स्तंभ उभारला, असे सांगणारा कोरीव लेख त्यावर होता[1] अशा प्रकारच्या स्तंभाचा अजूनपर्यंत तपास लागलेला नाही. स्थानिक बौद्ध भिक्षूंनी फा–हियानला ही कथा सांगितली असेल व त्याच्या मनात स्तंभावरील कोरीव लेखाचा वा या कथेचा पुढच्या काळात गोंधळ झाला असावा असा एक संभव दिसतो.

कल्हणाच्या राजतरंगिणी या काश्मिरी बखरीत अशोकाचा वारस म्हणून जालौकाचा उल्लेख आहे. म्लेच्छांचे (परकियांचे) उच्चाटण करण्याची अशोकाची इच्छा होती म्हणून मुलगा होण्यासाठी त्याने प्रार्थना केली अशी माहिती आपल्याला मिळते.[2] त्याचे फळ म्हणून जालौकाचा जन्म झाला. हा राजपुत्र कट्टर शिवोपासक होता व विजयेश्वर आणि भूतेश यांचा पूजक होता. 'त्या काळातील प्रभावी व (यशाने) चढून गेलेल्या आणि वादंग माजविणाऱ्या बौद्धांची गर्दी नाहीशी करणारा' असे त्याच्या गुरुचे वर्णन करण्यात आलेले आहे. अशोकाच्या कारकिर्दीच्या बराचसा नजीकचा कालखंड यावरून सूचित होतो. धरणीवर जुलूम करणाऱ्या म्लेच्छांना जालौकाने हटविले व समुद्रवलयांकित भूमी जिंकली. प्रशासनाच्या बाबतीत त्याने राज्याच्या अधिकाऱ्यांची संख्या सातावरून अठरावर नेली. धर्माध्यक्ष, धनाध्यक्ष कोषाध्यक्ष, सम्मूलिपति, दूत, पुरोहित आणि दैवाज्ञ अशी सातजणांची यादीत नोंद आहे. जालौक आणि बौद्धधर्माशी त्याचा संबंध याविषयी एक आख्यायिका आहे. एके दिवशी त्याला एक भुकेलेली चेटकीण भेटली. तिला त्याचे मांस खाण्याची इच्छा होती. त्याने ताबडतोब स्वतःला देऊ केले, परिणामी तिने त्याच्यावर स्तुतीचा वर्षाव केला व तो साक्षात महाशाक्य असल्याचे प्रकट केले. तिने कीर्ति–आश्रम येथे

---

१. गाइल्स, ट्रॅव्हल्स ऑफ फा–हियान, पृ. ४८

२. एक, १०७–५३.

विहार बांधण्याची त्याला विनंती केली व जालौकाने तिची इच्छा पूर्ण केली.[1] यानंतर जरी तो शिवोपासक राहिला तरी या दैवी चेटकिणीची भक्ती त्याने सुरू केली. जालौकानंतर दुसरा दामोदर गादीवर आला. तो अशोकाचा वंशज असावा किंवा दुसऱ्या एखाद्या कुटुंबातील असावा असे त्याच्याविषयी सांगितले आहे.

जर जालौकाच्या गुरुचा त्याच्यावर काही प्रभाव पडलेला असेल तर तो हिंदुधर्माकडे कललेला व बौद्धधर्माला विरोधी असावा व त्यामुळे बौद्धग्रंथांनी त्याच्याकडे दुर्लक्ष केले असावे असे स्पष्टीकरण देता येईल. परंतु हे असमाधानकारक स्पष्टीकरण आहे कारण दैवी चेटकिणीच्या कथेवर नक्कीच बौद्ध भिक्षूंनी आपला रंग चढविलेला असावा. जालौकाची ओळख अनिश्चितच राहते. त्याच्या राज्यात काश्मीर व गांधार हे भाग होते. त्याच्या कारकिर्दीच्या उत्तरकाळात उत्तर भारताचे बरेचसे भाग त्यात समाविष्ट झाले होते

राजतरंगिणीत पूर्वकालीन राजांविषयी जी गोंधळात टाकणारी हकिगत आहे त्यावरून तो अशोकाचा मुलगा नसण्याची शक्यता आहे व तो कदाचित एखादा कुशाण राजा असावा व त्याच्या नावाचे वाचन चुकीचे झाले असावे. पण तो मौर्य घराण्यातील होता असे आमचे मत आहे व जालौक हे नाव म्हणजे कुणाल या नावाचे अपभ्रष्ट रूप असावे. मौर्यराजांच्या कोणत्याही यादीत जालौक हे नाव परके वाटते आणि ज्याअर्थी ते फक्त काश्मीरी बखरीत येते त्याअर्थी तो एक केवळ स्थानिक पाठभेद असणे शक्य आहे. ध्वनिशास्त्राच्या दृष्टीने दोनही नावे भिन्न आहेत, पण ही नावे लिहीत असताना कदाचित अक्षरांची उलटापालट झाली असावी व गोंधळ उडाला असावा. अशोककालीन ब्राह्मी लिपीत कुणाल हे नाव [illegible] असे व जालौक हे नाव [illegible] असे लिहिले जाते. बॅक्ट्रियन ग्रीकांच्या स्वारीनंतर आणि कुशाणांच्या परक्या नावामुळे जालौक यासारख्या नावाची फारशी तपासणी न करताच ते मान्य केले गेले असावे अशी शक्यता आहे.[2]

---

१. औ–कोंगने उल्लेख केलेला कि–श्येचा विहार (जेए, १८९५, सहा, पृ. ३५४) म्हणजेच कीर्ति–आश्रमचा विहार असा स्थाननिश्चय स्टाईन यांनी केलेला आहे. परंपरेने या प्राचीन विहाराच्या जागेचे साहचर्य अशोकाच्या मुलाशी आहे.

२. याशिवाय संस्कृतमध्ये जालौक म्हणजे, 'मासा' म्हणजे हा शब्द संपूर्णपणे परका नाही, परंतु नाव म्हणून तो क्वचितच वापरला जात असावा.

राज्याच्या महत्त्वाच्या सात अधिकाऱ्यांची नावे सांगताना त्यातील धर्माध्यक्ष हे नाव यादीत पहिले आहे हेही लक्षात घेण्याजोगे आहे. साधारणतः प्रशासनाविषयीच्या तात्त्विक भारतीय ग्रंथांमध्ये महसूल अधिकारी आणि कोषागाराचे अधिकारी यांना अग्रक्रम दिला जातो. ' न्यायदानविषयक अध्यक्षाचे ' यादीमध्ये पहिले नाव असावे ही नक्कीच विशेष पद्धती आहे. या संज्ञेने न्यायदान-विषयक अधिकारी हा अर्थ लेखकाला अभिप्रेत असावा. धम्म–महामात्तांची आठवण करून देणाऱ्या परंपरेला धरून धर्माध्यक्षाचा उल्लेख केला असावा असेही सुचविता येईल. प्रशासकीय सुधारणांचा खास उल्लेख हा मौर्यकालीन प्रशासकीय धोरणाशी खूपच मेळ घालू शकणारा होता.

जालौकाने म्लेंच्छांचे उच्चाटण केल्याची जी विशेष नोंद आहे ती महत्त्वाची आहे. बॅक्ट्रियन ग्रीक व वायव्य भागातील इतर परकीय यांचा उल्लेख म्लेंच्छ असा केला जाई असे दिसून येते. पुढील काळातील ज्या यवनांच्या स्वारीने शुंगसत्तेला धोक्यात आणले त्यांचे तुरळक हल्ले कुणालाच्या काळात म्हणजे अशोकाच्या मृत्यूनंतरच्या वर्षांमध्ये सुरू झाले असावेत. सातव्या स्तंभशासनात धम्माच्या यशाविषयीचा सारांश सांगताना, आपल्या साम्राज्यावर जे परिणाम झाले त्याविषयी अशोक मोठ्या संतुष्टतेने बोलतो. तथापि, या प्रसंगी शेजारच्या देशांशी असलेल्या संबंधांविषयी एक अवाक्षरही काढलेले नाही. उलट यापूर्वीची शासने, धम्माचे अनुयायित्व पत्करणाऱ्यांमध्ये वायव्य भागातील शेजारच्या देशांमधील लोकही असल्याचे निःसंदिग्धपणे जाहीर करतात.[1] हे शासन प्रसृत केल्यानंतर दहा वर्षांनी वायव्य सीमेवरील ग्रीकांचा वैरभाव जाणवण्यास सुरवात झाली असावी हे शक्य आहे.

अशोकाच्या मृत्यूनंतर पंचवीस वर्षांनी, इ. स. पू. २०६ च्या सुमारास वायव्य भागातील भारतीय आणि शेजारचे ग्रीक यांच्यातील संबंध अधिक निकटचा झाला होता. हा संबंध मैत्रीच्या नात्याचा होता की वैराचा होता हा मुद्दा चर्चा करण्याजोगा आहे. सोफगसेनोस या भारतीय राजाबरोबरच अँटिओकसने पुन्हा स्नेह जोडला असे सांगितले आहे. या स्नेहाचा उल्लेख करताना चंद्रगुप्त मौर्य व सेल्यूकस निकेटर यांच्यात इ स. पू. ३०३ मध्ये झालेल्या स्नेह-संधीचा पॉलिबिअस विचार करीत होता असे टार्न यांनी सुचविले आहे.[2] परंतु पुनश्च जोडलेल्या या स्नेहाचा उल्लेख, अशोक व सिरियाचा दुसरा अँटिओकस

---

१. बारावे शिलाशासन, कळशी. ब्लोख, ले एंस्क्रिपसिओं द अशोक, पृ. १३०
२. दि ग्रीक्स इन बॅक्ट्रिया अँन्ड इंडिया, पृ. १३०, १५४

यांच्यामधील मैत्रीच्या नात्याला उद्देशूनही साधारणपणे केला असावा. सोफगसेनोस हा मौर्यराजा होता असे पॉलिबिअस कोठेही सूचित करीत नाही. तो राजा कोणत्या घराण्यातील होता याची शहानिशा करण्याचे श्रम त्याने क्वचितच घेतले असावेत. तो भारतीय होता एवढे सांगणे त्याच्या दृष्टीने पुरेसे होते.

सोफगसेनोस किंवा सुभागसेन आणि अँटिओकस यांच्यामधील तह दोन समान दर्जाच्या राजांमधील स्नेहसंधी असावा असे दिसत नाही. सुभागसेनाचे स्थान निश्चितच कमी दर्जाचे होते जर अँटिओकसला फक्त अधिक हत्ती आणि सैन्यासाठी रसद पुरविली गेली असती तर युथिडेमसच्या नेतृत्वाखालील बॅक्ट्रियन ग्रीकांशी चाललेल्या युद्धात त्याला सोफगसेनोसने सैन्यभरती करून मदत केली असे म्हणता आले असते. परंतु अँटिओकसने सिझिकसच्या अँड्रास्थेनिसला, सुभागसेनाने कबूल केलेला पैसा गोळा करण्यासाठी मागे ठेवले असे हा वृत्तांत स्पष्टपणे सांगतो. यावरून हत्ती, रसद व पैसा हे सर्व सुभागसेनाला द्याव्या लागलेल्या खंडणीचे भाग होते हे स्पष्ट आहे. जर आपण या तहाची इ. स. पूर्व ३०३ मधील तहाशी तुलना केली तर सुभागसेन हा कोणत्या तरी प्रकाराने अँटिओकसपुढे दुय्यम होता हे निश्चित आहे. अँटिओकस व युथिडेमस यांच्या संघर्षात सापडण्याइतका हा भारतीय राजा दुर्दैवी होता असे दिसते बॅक्ट्रियाचा उदय आणि विस्तार यांच्यामुळे वायव्य भारतातील राजकीय दृष्ट्या डळमळीत असणारी राज्ये चिरडली जावीत हे अगदी साहजिक आहे.

आपण पाहिले त्यावरून राजांच्या कोणत्याही यादीत सुभागसेनाचा वा त्याच्या नावाशी साधर्म्य असणाऱ्या नावाचा उल्लेख नाही. तारानाथने उल्लेखिलेला गांधारमध्ये राज्य करणारा वीरसेन ही सर्वात जवळची शक्यता दिसते.[1] दोन्ही नावांच्या शेवटी सेन आहे त्यावरून त्यांच्यातील संबंध सूचित होऊ शकतो पण त्याचवेळी मौर्यराजांच्या याद्यांमध्ये या नावाचा उल्लेखही नाही. आंधळ्या कुणालाचा मुलगा, विगताशोक हा अशोकाचा नातू त्याच्यानंतर गादीवर आला अशी माहिती आपल्याला मिळते. विगताशोक हा अशोकाचा धाकटा भाऊ असल्याचे दिव्यावदानात सांगितलेले आहे व तेथून हे नाव तारानाथच्या ग्रंथात आले आहे हे उघड आहे.[2] विगताशोक हा सन्माननीय बौद्ध आहे व त्याचा मुलगा वीरसेन याच्यामुळे वारसा चालू राहिला. वीरसेनानंतर त्याचा मुलगा नंद याने एकोणतीस वर्षे राज्य केले व त्याच्यानंतर त्याचा मुलगा महापद्म याने कुसुमपुरात राज्य केले. महापद्मानंतर चंदनपाल आला. यानंतर लेखकाने बंगालमध्ये ज्या

---

१. गेशिश्ट डेस बुद्धिस्मुस इन इंडिएन, नऊ, पृ. ५०.

२. पंचवीस, पृ. ३७०.

राजघराण्यांनी राज्य केले त्यांवर लक्ष केंद्रित केलेले दिसते. या भागात हरिश्चंद्र व त्याच्या नंतर सात चंद्रांनी राज्य केले व त्या सर्वांचा बौद्धधर्माला पाठिंबा होता असें तो वर्णन करतो. यांपैकी सर्वात शेवटचा नेमचंद्र याचे सिंहासन पुष्यमित्राने बळकावले. याच सुमारास म्लेंच्छांनी स्वारी केली व त्यानंतर पाच वर्षांनी पुष्यमित्र मरण पावला. याच कालानुक्रमात बऱ्याच उशीरा चंद्रगुप्त व त्याच्यानंतर बिंदुसार आलेला दिसतो बिंदुसाराने पस्तीस वर्षे राज्य केले व त्याच्यानंतर त्याचा वारस श्रीचंद्र हा गादीवर आला. त्याच्या नंतर धर्मचंद्राने फक्त पूर्वेकडे राज्य केले.[1]

या हकिगतीतून ऐतिहासिक घटना मिळविणे खरोखर कठीण आहे. ती निःसंशयपणे गोंधळ उडवून देणारी हकिगत आहे. केवळ मौर्य घराण्यातील राजांच्या दोन याद्या आपल्याला मिळू शकतात. अशोकानंतर विगताशोक गादीवर आला असे आपल्याला सांगितलेले आहे. नंतर बिंदुसाराचा वारस श्रीचंद्र व त्याच्यानंतर धर्मचंद्र गादीवर आला असे सांगितलेले आहे. शेवटच्या दोन नावां-पैकी कोणतेही नाव मौर्य घराण्याशी संबंधित नाही हे आपणास माहित आहे. त्यामुळे अर्थातच वीरसेनाचा त्यापैकी कोणाशीही संबंध नसावा हे शक्य आहे. परंतु त्याहून अधिक शक्यता अशी दिसते की वीरसेन पुष्यमित्राच्या पत्नीचा भाऊ होता व त्याची नर्मदेच्या प्रदेशातील सीमेवरच्या किल्ल्यावर सेनापती म्हणून पुष्यमित्राने नेमणूक केली होती या वस्तुस्थितीवर तारानाथ वीरसेनाविषयीची हकिगत आधारीत असावी.[2] अशा प्रकारे वीरसेन हा मौर्यराजा असण्याची शक्यता आपण नाकारू शकतो.

तथापि, तारानाथच्या हकिगतीत सांगितलेल्या दोन मुद्द्यांबाबत बराच विचार करण्याजोगा आहे. अशोकानंतर त्याचा नातू गादीवर आला असे तो सांगतो व येथे तो दिव्यावदानातील हकिगतींना अनुसरत असावा असे दिसते. दुसरा मुद्दा म्हणजे पूर्व व पश्चिम समुद्रांच्यामधील भूमीवर बिंदुसार राज्य करीत होता असे त्याचे वर्णन आहे आणि त्याचा नातू फक्त पूर्वेकडच्या प्रदेशात राज्य करीत होता यावरून हे साम्राज्य वेगाने डळमळीत झाले असावे असे सूचित होते.

विविध ग्रंथांमध्ये सांगितलेल्या इतर मौर्यराजांच्यापैकी शालिशुक याच्या नावाला पुष्टी मिळते, विष्णुपुराणातील यादीत अशोकानंतरचा तो चौथा वारस म्हणून दिलेला आहे. गार्गिसंहिता हा ज्योतिषशास्त्रविषयक ग्रंथ, तो राजा

---

१. गेशिइट डेस बुद्धिस्मुस इन इंडिएन, आठ–अठरा, पृ.४८–९०.

२. कालिदास, मालविकाग्निमित्रम्

अन्यायी व दुष्ट आणि लोकांवर जुलूम करणारा असल्याचे सांगतो.[1] पण सर्वात महत्त्वाचा मुद्दा म्हणजे त्याच्या कारकिर्दीनंतर ग्रीक भारतावर स्वारी करतील व पाटलिपुत्रापर्यंत पोहोचतील, अशी भविष्यवाणी त्यात आहे अर्थात, शालिशुकाच्या कारकिर्दीनंतर लगेच ग्रीकांची स्वारी झाली असें लगेच सुचविण्याची जरूर नाही हे दाखवून दिलेलेच आहे.[2] पुराणांचे लेखक फक्त ठळक घटनांचे वर्णन करीत असल्याने, ज्या स्वारीचा उल्लेख झाला आहे ती शुंगकाळात, पन्नास वर्षानंतर झालेली स्वारीही असू शकेल.

अशोकावदानातील राजांची यादीही विसंगत आहे. संप्रतिनंतर वृहस्पति, वृषसेन, पुष्यधर्मन आणि पुष्यमित्र या क्रमाने राजे झाल्याचे सांगितले आहे. पुष्यमित्र या शुंग घराण्याच्या संस्थापकाला मौर्य घराण्याच्या यादीत स्थान नाही हे स्पष्ट आहे. इतर याद्यांमध्ये दिलेल्या कोणत्याही नावाशी इतर तीन नावे जुळत नाहीत. जास्तीत जास्त वृहस्पति हे बृहद्रथ या नावाचे चुकीचे रूप आहे असें म्हणता येईल पण तरीही विनाकारण हा मुद्दा ताणल्यासारखा आहे. या घराण्यातील राजांनी बौद्धधर्माला आश्रय देण्याचे बंद केल्यानंतर बौद्ध भिक्षूंना या घराण्याविषयी वाटणारी आस्था संपली. साहजिकच या घराण्याच्या त्यांनी दिलेल्या याद्या विसंगत झाल्या असाव्यात ही शक्यताच अधिक दिसते.

अशोकाच्या अखेरच्या वर्षासंबंधीच्या तीन प्रमुख आख्यायिका बौद्धसाहित्यात आहेत व त्या सर्व अशोकावदानात आलेल्या आहेत. तक्षशिलेतील लोकांनी केलेले बंड व तें दडपण्यासाठी झालेली कुणालाची पाठवणी याविषयी पहिली आख्यायिका आहे.[3] दुसऱ्या आख्यायिकेतही कुणाल आहे त्याची सावत्र आई, राणी तिस्सरक्खा हिच्या चिथावणीने त्याला आंधळा करण्यात आले, तीही कथा आहे.[4] अशोकाच्या कारकिर्दीच्या अखेरीस बौद्धसंघाला दान देण्यासाठी अशोकाजवळ फक्त अर्धा आंबा राहिला होता, ही तिसरी आख्यायिका.[5] शेवटच्या दोन आख्यायिकांमध्ये वर्णन केलेल्या घटना वास्तवात घडल्या की नाही हे आम्ही काहीच सिद्ध करू शकत नाही. कारण त्या घटनांना पुष्टी देणारा वा त्या खोडून काढणारा भक्कम पुरावा नाही. परंतु अशोकाच्या कारकिर्दीच्या शेवटच्या वर्षांमध्ये कोणती

---

१. युग पुराण, ८९–१०० (मांकड आवृत्ती)

२. नारायण, दि इंडो–ग्रीक्स, पृ ८४–८५.

३. प्राझिलस्की, ला लेजांद द लाँपेरर अशोक, पृ. २८१, तळटीप.

४. उपरोक्त.

५. उपरोक्त, पृ. २९६.

परिस्थिती होती याविषयीचे काहीसे दर्शन या आख्यायिकांमध्ये वर्णन केलेल्या स्थितीवरून होते. अशोकाचे आधीच्या काळात परिस्थितीवर जे नियंत्रण होते तसे त्याच्या कारकिर्दीच्या शेवटी राहिले नाही हे त्यातून निश्चितच सूचित होते. मृत्यूसमयी त्याचे वय निदान पासष्ट ते सत्तर वर्षे होते, ही वस्तुस्थिती आपण लक्षात घेतली पाहिजे आणि मौर्यांच्या सरकारसारखे बलिष्ठ केंद्रित सरकार असल्याने त्याच्यावरचा त्याचा ताबा सुटण्यास सुरुवात झाली यात आश्चर्य वाटण्याजोगे नाही. परंतु या आख्यायिकांमधून स्पष्ट होणारी, दरबारातील कारस्थाने करण्याची प्रवृत्ती ही शोचनीय आहे.

अशोकावदानाखेरीज या आख्यायिका वेगळ्या पद्धतीने सांगणारा दुसरा एक ग्रंथ आहे व तो याच घटनांवर वेगळा प्रकाश टाकतो. या ग्रंथाकडे सर्वसाधारणत: इतिहासकारांचे दुर्लक्ष झालेले आहे. परंतु अशोकाच्या मृत्यूनंतरच्या घटनांच्या संदर्भात तो विशेष महत्त्वाचा आहे असे आम्हाला वाटते. टोक्योच्या त्रिपिटक या ग्रंथातील या कथेच्या चिनी रुपांतरातील संबधित भागांचे प्रझिलस्की यांनी भाषांतर केलेले आहे व त्या वृत्तांताचा उल्लेख ते कुणालसूत्र असा करतात.[1] मूळात ही कथा गांधार आणि काश्मीर या भागात रचली गेली आणि ती अतिशय स्थानिक स्वरूपाची मानली गेल्याने बहुधा तिच्याकडे दुर्लक्ष करण्यात आले असावे असे ते म्हणतात पण केवळ याच कारणासाठी आम्ही तो महत्त्वपूर्ण समजतो. इतर बौद्ध बखरींच्या परंपरेत बसेल अशा रीतीने त्या आख्यायिका सांगण्याची गरज नसल्याने स्थानिक दृष्टिकोनातून हा ग्रंथ त्या आख्यायिका सांगतो अशोकाची व्यक्तिरेखा एका विशिष्ट पद्धतीने रेखाटावी म्हणून लेखकांनी कुणालसूत्र लिहिलेले नव्हते तर स्थानिक परंपरेत या आख्यायिका जशा होत्या तशा नोंदण्याची त्यांची इच्छा होती.

या ग्रंथावरून, कुणालाचे तक्षशिलेतील आगमन या नगरीतील बंडामुळे झालेले नव्हते असे दिसते. गांधारचा राजा मरण पावला आणि तेथील लोकांना अशोकाच्या संरक्षणाखाली राहण्याची इच्छा होती, अशी माहिती आपल्याला मिळते. कुणालाला तेथे कारभार पाहण्यासाठी पाठविले व तो इतका यशस्वी झाला की अशोकाने साम्राज्याची विभागणी करून सिंधू नदीपासून चिनी सरहद्दीपर्यंतचा प्रदेश कुणालाच्या हाती देण्याचे ठरविले. या प्रदेशात खोतान, काश्मीर आणि गांधार यांचा समावेश होत असावा. ज्यावेळी बॅक्ट्रियन ग्रीकांनी सतावियास सुरुवात केली त्यावेळी गांधारच्या सीमांवरील लोकांनी अधिक बळकट अशा मौर्यांचे सरक्षण मागितले असावे ही शक्यता दिसते. अशोकाच्या

---

१. उपरोक्त, पृ. १०६, तळटीप.

ह्यातीत सेल्यूकिड घराण्याविरुद्ध बॅक्ट्रियन ग्रीकांनी पहिल्या व दुसऱ्या डायो-डोटसच्या नेतृत्वाखाली उठाव केला बॅक्ट्रियामध्ये पहिल्या युथिडेमसचा उदय झालेला उत्तरकालीन मौर्यांनी पाहिला. त्याने तिसऱ्या अँटिओकसला यशस्वी रीतीने विरोध केला आणि त्यावेळी झपाट्याने विघटित होणाऱ्या मौर्य साम्राज्याच्या उत्तरभागावर स्वारी करण्याची योग्य वेळ आलेली आहे हेंही त्याने जाणले यात शंका नाही.[1] राजकीय डावपेच आणि लष्करी सामर्थ्य या दृष्टीने वायव्य सीमा सुरक्षित करणे अशोकाला भाग होते. जालौकाने गांधारमधून म्लेच्छांचे उच्चाटण केले या राजतरंगिणीमधील माहितीवरून या गोष्टीला पुष्टी मिळते असें दिसते. वायव्य भागात कुणालाच्या प्रशासनाला जे यश आले त्यावरून आपल्या मृत्यूनंतर साम्राज्याची विभागणी करण्याचा विचार त्याला सुचला असावा. अशी काही घटना होईल या भीतीने कुणालाला कोणत्या तरी मार्गाने इजा करण्यास तिस्सरक्खा प्रवृत्त झाली असावी.

कुणालाच्या अंधत्वाची आख्यायिका कुणालसूत्रातही आलेली आहे आणि पुढे घोष नावाच्या भिक्खूने कुणालाला दृष्टी कशी प्राप्त करून दिली याविषयी एक आख्यायिका सांगितलेली आहे. दृष्टी परत प्राप्त झाल्यानंतर, कुणालाने बौद्ध धर्माचा स्वीकार केला हे सांगण्याची गरज नाही, परंतु याच ग्रंथात तो यापूर्वीच बौद्धधर्माचा मोठा आधार होता असें सांगितलेले आहे. अशा विसंगतीमुळे या आख्यायिकेच्या बाबतीत बरीच फिरवाफिरव झाली असावी हे सूचित होते.

अशोकाचा प्रधानमंत्री यशस, दुष्ट असल्याचा उल्लेख हाही काहीसा विचारात घेण्याजोगा मुद्दा आहे. अशोक वदानात यशस हा अधिक पुण्यवान बौद्ध श्रेष्ठांपैकी आहे. परंतु कुणालसूत्रात तो निधर्मी (अधार्मिक) बौद्ध मनुष्य झालेला आहे. त्याची अनेक निंद्य कृत्ये सांगितलेली आहेत व तो सुमनस या सत्पुरुष असलेल्या बौद्ध श्रेष्ठाच्या विरुद्ध असल्याचे दाखविले आहे. अशोक राज्यकोषातून भिक्षूंना ज्या देणग्या दान म्हणून देत होता त्या कमी करण्याचा व शेवटी संपूर्णपणे थांबविण्याचा सल्ला या दुराग्रही मंत्र्याने त्याच्या वारसाला दिला अशी माहिती आपल्याला अशोकावदा-नात मिळते.[2] यशस हा या मंत्र्यांपैकी एक असावा असे दिसते. अशोकाला दान देण्यास प्रतिबंध करावा म्हणून वारस असलेल्या संप्रतीचे मन तो वळवू शकला यावरून त्याच्यावर त्याचा बराच प्रभाव असावा असे सूचित होते. यशस याची आठवण करून देणारे नाव आणखी फक्त एका प्रसंगी आढळते. अशोकाच्या वारसासंबंधी सांगताना विष्णुपुराणात सुयश हा अशोकाचा वारस असल्याचा व

१. नारायण, दि इंडो-ग्रीक्स पृ. १३-२०.

२. प्रझिलस्की, ला लेजांद लॅम्पेरर अशोक पृ. ३०१.

त्याच्यानंतर त्याचा मुलगा दशरथ गादीवर आल्याचा उल्लेख आहे[1] पुयशस हा अशोकाचा मुलगा असल्याचा इतरत्र कोठेही उल्लेख नाही. वस्तुतः तो अशोकाचा एक महत्त्वाचा मंत्री असावा. अशोकाच्या मृत्यूनंतर दशरथाला सिंहासनावर बसविण्यास तो कारणीभूत असावा व पुराणातील नोंदी करताना काहीसा गोंधळ झाल्यामुळे तो अशोकाचा मुलगा असल्याचे वर्णन केले गेले असावे, ही एक शक्यता दिसते.

**दिव्यावदानातील** एका आख्यायिकेच्या आधारे, राज्यत्याग करून अशोक भिक्षू बनला असे मत मांडण्यात आले आहे.[2] बिंदुसाराचा मंत्री राधागुप्त याने अशोकाच्या राजा बनण्याच्या प्रयत्नांना पाठिंबा दिलेला होता, परंतु आपल्या कारकिर्दीच्या शेवटी अशोक आपल्या प्रजाजनांना अप्रिय झालेला पाहून त्याने अशोकास राज्यत्याग करावयास लावला असे वर्णन आहे. बिंदुसार व अशोक यांच्या एकूण साठ वर्षांच्या दोन दीर्घ कारकिर्दीच्या अखेरीस राधागुप्त इतका प्रभावी मंत्री राहू शकला ही गोष्ट शक्य नाही, त्यामुळे या आख्यायिकेबाबत संशयाला फार मोठी जागा आहे. इतकी महत्त्वाची घटना बौद्ध बखरकारांनी इतर ग्रंथांमध्ये नजरेआड केली असेल असे संभवत नाही. कारण नीतीपाठाच्या दृष्टीने, त्यात असलेला चांगला भाग जरी बाजूला सारला तरी काल्पनिक आख्यायिका रचण्याची फार चांगली संधी या घटनेने त्यांना मिळाली असती.

**अशोकावदानातील** अर्ध्या आंब्याच्या आख्यायिकेत कुणालाचा मुलगा संप्रती हा अशोकाचा वारस असल्याचा उल्लेख आहे. परंतु **मत्स्य** आणि **विष्णु** या **पुराणांमध्ये** दशरथ हा अशोकाचा वारस असल्याचे सांगितले आहे आणि आपण पूर्वी पाहिल्याप्रमाणे नागार्जुनी टेकड्यांमधील कोरीव लेख दशरथाचा काळ अगदी अशोकाच्या जवळचा असल्याचे दाखवितात. अशोकाच्या साम्राज्याची विभागणी त्याच्या मृत्यूच्या अगदी आधी किंवा मृत्यूनंतर लगेच झाली असावी असे आमचे मत आहे. वायव्य प्रांत, गांधार व काश्मीर यांचा समावेश असलेल्या पश्चिम भागाचा राज्यकारभार कुणाल करीत होता व पूर्व भाग अशोकाचा नातू

---

१. चौविसावे प्रकरण.

२. एकोणतीस, पृ. ४३२, तळटीप.

दशरथ याच्याकडे राहिला.[1] साम्राज्याचा पश्चिम भाग आपल्याला मिळालेल्या वाटणीत समाविष्ट करण्याइतका विस्तार कुणालाने हळूहळू केला असावा हीही शक्यता आहे

अशोकानंतर संप्रती गादीवर आल्याचे **दिव्यावदानात** सांगितलेले आहे. तो दशरथाच्या नंतर पाटलिपुत्राच्या गादीवर आला व दशरथाप्रमाणे तोही अशोकाचा नातू होता हे लक्षात घेतल्यास वरीलप्रमाणे चूक होणे अशक्य नाही असे याचे स्पष्टीकरण देता येण्याजोगे आहे. याखेरीज, जर बौद्धधर्माला दशरथापेक्षा संप्रतीने अधिक सहानुभूती दाखविली असेल तर तो अशोकाचा वारस म्हणून त्याची नोंद करण्याचे तेही अधिक कारण असावे.

दशरथाचा परिचय हे गूढच राहिले आहे. मंत्र्यांच्या मदतीने तो जेव्हा गादीवर आला तेव्हा तो सुमारे वीस वर्षांचा तरुण होता. **मत्स्यपुराणात** संप्रती हा दशरथाचा मुलगा असल्याचा उल्लेख आहे.[2] हे बहुधा चूक असावे कारण इतर अनेक हकीगतींवरून ते दोघे चुलतभाऊ असल्याचे दिसते. तथापि जर सुयशस हे नाव कोणा मंत्र्याचे नसून कुणालाचेच दुसरे नाव होते हे सिद्ध करता आले तर दशरथ हा संप्रतीचा भाऊ होता असे दिसेल. पुराणांप्रमाणे दशरथाने आठ वर्षे राज्य केले. यावरून त्याच्या मृत्यूच्या वेळी, कोणत्या ना कोणत्या प्रकारच्या राजपालकाची गरज भासल्याशिवाय गादीवर येण्याइतका त्याचा वारस वयाने मोठा नव्हता, असे सूचित होते. हाच ग्रंथ कुणालाने आठ वर्षे राज्य केल्याचे सांगतो. म्हणजे दशरथ मेला त्याच सुमारास तोही मेला असला पाहिजे, म्हणून पश्चिमेकडच्या भागात राज्य करणाऱ्या संप्रतीला पाटलिपुत्राचे सिंहासन परत मिळविण्यात यश आले असावे व अशा रीतीने साम्राज्याचे परत एकीकरण झाले असावे. ही घटना इ. स. पू. २२३ मध्ये घडली.

तथापि, साम्राज्याचे विघटन होण्यास आधीच सुरुवात झालेली असावी. संप्रती उज्जयिनी व पाटलिपुत्र येथून राज्य करीत होता असे जैन ग्रंथ सांगतात.[3] यावरून साम्राज्याच्या पश्चिम भागाची राजधानी उत्तरेकडून उज्जयिनीला

---

१. व्हि. स्मिथनेही असेच मत मांडले आहे. परंतु त्याच्या मते दशरथ आणि संप्रती यांच्यामध्ये साम्राज्याची विभागणी झाली. (**अर्ली हिस्ट्री ऑफ इंडिया**, पृ. २०३.)

२. पार्गिटर, **डायनॅस्टिज ऑफ दि कलि एज**, पृ. २८.

३. **परिशिष्टपर्वन**, दहा, अकरा.

हलविली असावी असे सूचित होते पुढील दहा वर्षांमध्ये सिरियाचा तिसरा अँटिओकस आणि बॅक्ट्रियाचा युथिडेमस यांच्यात संघर्ष होऊन एक बलिष्ठ सत्ता म्हणून बॅक्ट्रियाचा उदय झाला व वायव्य भारताला धोका निर्माण झाला. ज्यावेळी संप्रती पाटलिपुत्रात आपले स्थान प्रस्थापित करीत होता, त्यावेळी सिंधु नदीच्या पलीकडील प्रदेशातील अनेक लहान लहान विभाग साम्राज्यापासून फुटत गेले असावेत असा अगदी संभव आहे. हळूहळू मगधाकडेच सर्व लक्ष केंद्रित होत गेले आणि मौर्यांच्या राजघराण्याची मुख्य शाखा उर्वरित कालात पाटलिपुत्रात राहिली व साम्राज्याच्या दूरवरच्या भागांची फाटाफूट थांबविण्यास वा त्यांच्यावर नियंत्रण ठेवण्यास ही शाखा असमर्थ ठरली संप्रतीच्या नऊ वर्षांच्या कारकिर्दीनंतर शालिशुकाने तेरा वर्षे राज्य केले. जर **गार्गिसंहितेचा** आधार घेतला तर त्याच्या कारकिर्दीत मौर्यसत्तेचा आणखी संकोच झाला असे दिसते.

**वायु** आणि **ब्रह्मांड** ही **पुराणे** मध्यंतरी आणखी तीन नावे सांगतात. पण त्यांचा उल्लेख इतर कोणत्याही ग्रंथामध्ये नसल्याने ती अगदीच एकाकी पडलेली आहेत.[1] ही नावे म्हणजे बंधुपालित, इंद्रपालित व दशोण. या तिघांची ओळख पटविणे अत्यंत अवघड आहे कारण त्यांच्या नांवाशी अंशतःशी जुळणारी कोणतीही नावे मौर्य राजांच्या याद्यांमध्ये मिळत नाहीत. पुराणांमध्येही त्यांचे परस्परांशी काय नाते होते याविषयी निश्चितता नाही. उदा इंद्रपालिताचा उल्लेख बंधुपालिताचा **दायद** असा केलेला आहे. या शब्दाची 'वारस' व 'भाऊ' अशी दोन भाषांतरे, केलेली आहेत. या विषयाच्या अलिकडच्या एका अभ्यासकाने असे स्पष्टीकरण दिले आहे की, बंधुपालित म्हणजे नाव समजू नये तर 'स्वकियांकडून संरक्षित' अशा अर्थाचा शब्द समजावा, त्यावरून या राजांच्यापैका एकाच्या कारकिर्दीत राजपालकांसारखी काहीतरी एखादी सोय असावी असे सूचित होते.[2] आम्ही फक्त एवढेच सुचवू शकतो, की हे सर्व राजघराण्यातील होते. मौर्यसाम्राज्यातील पाटलिपुत्राखेरीज इतर कोणत्या तरी भागात, बहुधा उज्जयिनीमध्ये त्यांनी राजे म्हणून स्थान मिळविले असावे व कदाचित मौर्यांच्या मुख्य शाखेची ती एक उपशाखा असावी **विष्णुपुराणामध्ये** शालिशुकाचा वारस म्हणून सोमवर्मन्‌चा उल्लेख आहे **वायुपुराणातील** देववर्मन या नावाशी त्याचा बराचसा मेळ बसू शकतो. हा दशोणानंतर आला व सात वर्षे राज्य केले असे

---

१. पार्गिटर, **डायनॅस्टिज् ऑफ दि कालि एज.** पृ. २९

२. आर्. स्मिथ, **जेएओएस्**, ऑक्टोबर–डिसेंबर १९५७, व्हॉ. ७७, अं. ४ पृ. २७६ तळटीप.

सांगितलेले आहे. या ठिकाणी **वायुपुराण** स्थानिक वंश बाजूला ठेवून परत पाटलिपुत्राच्या राजांची नावे यादीमध्ये समाविष्ट करते. **वायु, मत्स्य व विष्णु** या तीनही पुराणांचे मौर्य घराण्यातील शेवटच्या दोन राजांविषयी मतैक्य आहे. हे राजे म्हणजे शतधन्वन् किंवा शतधनुस्, ज्याने आठ वर्षे राज्य केले तो आणि शेवटचा बृहद्रथ, ज्याने सात वर्षे राज्य केले व जो पुष्यमित्राकडून मारला गेला तो.

उत्तरकालीन मौर्यांच्या इतिहासाच्या बाबतींत आम्ही पुनर्रचना केली ती अशी. इ. स. पू. २३३–२३२ मध्ये अशोकाचा मृत्यू झाल्यावर पश्चिम व पूर्व अशा दोन भागांत साम्राज्याची विभागणी झाली. पश्चिमेकडील भागात कुणालाने व नंतर काही काळ संप्रतीने राज्य केले. त्याच्या दक्षिणेकडच्या प्रदेशात कदाचित नंतरच्या काळात बंधुपालित, इंद्रपालित व दशोण यांनी राज्यकारभार पाहिला असावा. साम्राज्याच्या वायव्य प्रदेशातील भागाला बॅक्ट्रियन ग्रीकांकडून आणि साम्राज्यातील उत्तर दख्खनमधील आंध्रांसारख्या महत्त्वाकांक्षी गटांकडून धोका निर्माण झाला.[1]

साम्राज्याच्या पूर्वेकडच्या अर्ध्या भागात, पाटलिपुत्रात राज्य करणाऱ्या मौर्यांच्या मुख्य शाखेची वारसपरंपरा, अशोकाच्या मृत्यूनंतर पुढीलप्रमाणे निर्माण झाली असावी.

| | |
|---|---|
| दशरथाने | ८ वर्षे राज्य केले. |
| संप्रतीने | ९ वर्षे राज्य केले. |
| शालिशुकाने | १३ वर्षे राज्य केले. |
| देववर्मनने | ७ वर्षे राज्य केले. |
| शतधन्वनने | ८ वर्षे राज्य केले. |
| बृहद्रथाने | ७ वर्षे राज्य केले. |

अशा रीतीने आपल्याला बावन्न वर्षांची बेरीज मिळते. यात पहिल्या तीन मौर्यांची ८५ वर्षे मिळविली म्हणजे मौर्यांच्या राजघराण्याची १३७ वर्षे आपल्याला मिळतात. दिलेल्या वर्षांमध्ये बिनचूकपणा नसल्याने एक दोन वर्षांबाबतची विसंगती असू शकेल हे मान्य करावयास हरकत नाही. पुराणांनी कोणत्याही मध्यंतर-कालाचा उल्लेख केलेला नाही कारण त्यांचा संबंध फक्त प्रत्येक राजाने प्रत्यक्ष किती वर्षे राज्य केले याच्याशी होता. इ. स. पू. २३३–२३२ मध्ये अशोक मरण पावला असे गृहीत धरल्यास मौर्यांच्या राजघराण्याचा शेवट इ. स. पू. १८१–१८० मध्ये झाला असे आपण म्हणू शकू.

---

१. स्मिथ, अर्ली हिस्ट्री ऑफ दि इंडिया, पृ. २१७, तळटीप. पृ. २३३, तळटीप

# ७ : मौर्यांचा ऱ्हास

मौर्यांच्या राजघराण्याच्या इतिहासाचे परिशीलन केल्यानंतर त्यांच्या ऱ्हासाची कारणे पाहणे ओघानेच येते. अशोकाच्या मृत्यूनंतर या राजघराण्याला जी उतरती कळा लागली तिच्यात एक प्रकारचे नाट्य आहे. इतर अनेक साम्राज्यांच्या बाबतीत अधःपतनाची प्रक्रिया राजकीय ऱ्हासाच्या पूर्वीच सुरू झालेली दिसते. परंतु मागील प्रकरणात पाहिल्याप्रमाणे मौर्यांचे संपूर्ण पतन केवळ अर्ध्या शतकाच्या अवधीत झालेले दिसते.

या ऱ्हासाच्या महत्त्वांच्या कारणांपैकी एक म्हणजे अशोकानंतरचे राजे एका पाठोपाठ एक दुबळे निघाले. त्यानंतरचे एक तात्कालीक कारण असे की दशरथाकडे पूर्व भाग आणि कुणालाकडे पश्चिम भाग अशा दोन भागांत या साम्राज्याची विभागणी झाली. जर ही विभागणी झाली नसती तर ग्रीकांची वायव्येकडील स्वारी काही काळ थोपवून धरता आली असती व मौर्यांना आपली पूर्वीची सत्ता पुन्हा प्रस्थापित करण्याची काही अंशी संधी मिळाली असती. विभागणीमुळे साम्राज्याचा राज्यकारभारही विस्कळीत झाला. पहिल्या तीन मौर्यांनी राजकीय व शासकीय संघटनेचे जाळे सर्व साम्राज्यात अशा पद्धतीने विणले होते की त्यामुळे केंद्राकडून कडक देखरेखीची अतिशय आवश्यकता होती. विभागणीनंतर पाटलिपुत्र आणि तेथील व्यवस्था लहान प्रमाणावर का होईना पण पूर्वीप्रमाणेच चालू राहिल्याने तिचा फायदा पूर्व भागाला मिळाला. तक्षशिला व वायव्य प्रांत यांमध्ये प्रांतिक सरकारचे रुपांतर साम्राज्यसदृश सघटनेत झपाट्याने विस्तारित करावे लागले बदलाच्या या प्रक्रियेमुळे ग्रीकांच्या हल्ल्याकडे पूर्ण लक्ष देणे शक्य झाले नाही.

अशोकाच्या मागून आलेले राजे गुणवत्तेच्या बाबतीत त्याच्या बरोबर उलट होते. अशोकाचे धोरण परंपरागत पद्धतीत बसणारे नव्हते. मौर्यांचा नवा साम्राज्य-वाद व अशोकाचे त्याच्या सरकारवर प्रभाव पाडणारे ध्येयवादित्व या दोहोंमुळे त्याच्या धोरणाचा विकास झाला होता. साहजिकच अशोकाच्या वारसांपुढे चालू धोरण अंगिकारावे की परंपरागत पद्धतीचा स्वीकार करावा असा प्रश्न उभा राहिला. अशोकाचेच धोरण पुढे चालविले गेले असते तर भारताच्या पुढील राजकारणावर महत्त्वपूर्ण परिणाम झाले असते. इसवी सनपूर्व तिसऱ्या शतकातील भारतात धम्माला किती महत्त्व होते याची जाणीव जर त्याच्या वारसांना नसती

तर अशोकाचे धोरण पुढे चालू ठेवणे त्यांना शक्यच झाले नसते. भारतामधील परिस्थितीबाबतची ही मूलभूत समज नंतरच्या मौर्यांपैकी कोणाला होती वा नाही हा वादग्रस्त मुद्दा आहे. दशरथाच्या कोरीव लेखांवरून असे दिसते की अशोकाच्या धारणासंबंधीचो समज त्याला असावी व ते धोरण त्याला मान्यही असावे परंतु त्याच्या तरुण वयामुळे तो त्याचा पाठपुरावा करू शकला नसावा.

अनेक आधारग्रंथांमधून आढळणाऱ्या मौर्य राजांच्या यादांमधील बरीचशी वेगवेगळी नावे पाहता असे जाणवते की राजघराण्यातील व्यक्ती व त्यांचे पुरुष नातेवाईक यांची सिंहासनावर अधिकार सांगण्याची वा प्रांतांमधून आपण स्वतंत्र राज्यकर्ते आहोत म्हणून जाहीर करण्याची सर्वसाधारण प्रवृत्ती असावी. नांवांमध्ये आढळणारा हा वेगवेगळेपणा म्हणजे त्याच राजांची दुसरी नावे वा बिरुदे असावीत असे स्पष्टीकरण करण्याचे प्रयत्न झालेले आहेत.[1] पण हे स्पष्टीकरण पटणारे नाही. व्यक्तीच्या सुप्रसिद्ध नावाशी या बिरुदांचा अर्थाच्या दृष्टीने वा ध्वनिलेखन-शास्त्राच्या दृष्टीने कोणताही संबंध दिसत नाही. वस्तुतः पन्नास वर्षांमधील अनेक लहान लहान कारकिर्दी या काही राजे पदच्युत झाल्याचे दर्शवितात.

अशोकाचे धोरण मौर्य साम्राज्याच्या पतनाला प्रत्यक्षपणे जबाबदार आहे, या मुद्यावर बरेच लिखाण झाले आहे. हा दोषारोप दोन प्रमुख प्रतिपादनांवर आधारलेला आहे. अशोकाचे बौद्धधर्माला व त्याच्या वारसांचे जैनधर्माला अनुकूल धोरण यांच्या विरुद्ध ब्राम्हणांची प्रतिक्रिया म्हणजे पुष्यमित्राचे बंड असे एक प्रतिपादन आहे. अशोकाच्या शांततावादी धोरणामुळे साम्राज्याची ताकद खच्ची झाली असे दुसरे प्रतिपादन आहे. हरप्रसाद शास्त्री यांनी पहिले मत ठामपणाने मांडले आहे. रायचौधरींनी या मताचा काहीसा तपशीलवार परामर्ष घेतलेला आहे. दोन्ही विव्दानांच्या प्रतिपादनाचा सारांश पाहून जरूर तेथे आमच्या मतांची जोड देणे आवश्यक आहे.

ब्राम्हण हेच एकटे यज्ञयाग करून लोक व परमेश्वर यांच्यामधील मध्यस्थाचे काम करीत असल्याने त्यांना अधिकार व प्रतिष्ठा प्राप्त झाली होती. त्यामुळे यज्ञातील पशुवधावर बंदी म्हणजे ब्राम्हणावर सरळ हल्ला होता, असे हरप्रसाद शास्त्री म्हणतात.[2] रायचौधरींच्या मते ब्राम्हण दुखावले जाण्याचे कारण अशा प्रकारची बंदी हेच नसावे. ब्राम्हणी वाङ्मयातही अहिंसेवर भर दिलेला आहे व केवळ

---

१. द ला वाले पुसँ, लँद ओ तों दे मौर्य, पृ. १६४–१६५

२. हरप्रसाद शास्त्री यांचे प्रतिपादन, जेएएसबी, १९१०, पृ. २५९-६२ यात आहे.

यज्ञावरच सर्व भर देण्यातील विफलताही दाखविलेली आहे.[1] ज्या ठिकाणी लेख कोरून ठेविले आहेत त्या विशिष्ट ठिकाणी यज्ञामध्ये पशुहत्या करावयाची नाही असे अशोकाने एका लेखात स्पष्टपणे नमूद केले आहे.[2] इतर लेखात, यज्ञ त मारल्या जाणाऱ्याच नव्हे तर इतरही खाण्यास योग्य मानल्या जाणाऱ्या विशिष्ट प्राण्यांच्या हत्येवर बंदी घातल्याचे उल्लेख आहेत.

या विषयाच्या संदर्भात दुसरा मुद्दा असा की ही बंदी खास करून ब्राम्हणांना आवडली नाही याचे कारण एका शूद्र राजाने ती आज्ञा केली होती. पुराणांमध्ये नंद घराण्याविषयी सांगताना असे म्हटले आहे की महापद्मानंतर येणारे सर्व राजे शूद्र कुलांतील असतील. या माहितीच्या आधारे मौर्यांचे कुल शूद्र मानले गेले असावे. रायचौधरींच्या मते पुराणातील उल्लेख महापद्मानंतर आलेल्या नंद घराण्यापुरताच आहे. जर सर्वच राजघराण्यांना उद्देशून तो मानला तर शुंग व कण्व यांचा समावेशही शूद्रांमध्ये करावा लागेल. शुंग हे ब्राम्हण घराणे होते हे आपल्याला माहित आहेच. इतर काही साधनांमध्ये मौर्य हे क्षत्रिय कुलातील असल्याचे सांगितले आहे.[3]

ब्रम्हगिरी येथील लघु शिलाशासनात जंबूद्वीपातील देवांना उद्देशून जो वाक्प्रयोग आलेला आहे त्यावर शास्त्रींचे पुढचे प्रतिपादन आधारलेले आहे. त्या वाक्प्रयोगाचा त्यांनी असा अर्थ लावला आहे की भूदेव म्हणजे पृथ्वीवरील देव म्हणून ज्या ब्राम्हणांना मानले जाई ते देव खोटे असल्याचे अशोकाने उघडकीला आणले. आपण पूर्वीच पाहिल्याप्रमाणे हे प्रतिपादन अमिस्साला पर्यायी असलेल्या मूलधातूवर आधारलेले आहे.[4] तो वाक्प्रयोग खोटया देवांना उद्देशून नसून पृथ्वीवरील लोकांत मिसळणाऱ्या देवांना उद्देशून आहे, हे आता साधारणत: ग्राह्य मानले जाते

शास्त्रींच्या मते **धम्म-महामत्तांनी** ब्राम्हणांची प्रतिष्ठा नष्ट केली. रायचौधरींच्या मते असे असण्याची शक्यता नाही, कारण ब्राम्हणांचे अधिकार व

---

१. रायचौधरींच्या प्रतिप्रादनाकरिता पहा. **पोलिटिकल हिस्ट्री ऑफ एन्शंट इंडिया**, पृ. ३५४–५.

२. पहिले शिलाशासन, गिरनार. ब्लोख, **ले एंस्क्रेपसिओं द अशोक**, पृ. ९०.

३. **दिव्यावदान**, पृ. ३७०–४९०, राइस, **म्हैसूर अँड कूर्ग फ्रॉम इन्स्क्रिप्शन्स**, पृ. १०.

४. पाचवे प्रकरण पाहावे.

कल्याण यांच्या संरक्षणाचे काम काहींच्याकडे दिलेले होते. शिवाय **धम्ममहामत्तां-कडे** सर्वच समाजाच्या कल्याणाचे काम सोपविलेले होते ब्राम्हणांच्या कार्यक्षेत्रापेक्षा त्यांचे क्षेत्र कितीतरी मोठे होते कदाचित असे असावे की अशोकाच्या कारकिर्दीतील शेवटच्या काही वर्षात **धम्ममहामत्त** हे लोकांमध्ये अप्रिय झाले असावेत व त्यामुळे अशोकाला लोकमताशी **धर्ममहामात्रांमार्फतचा** संपर्क साधण्यात अडचणी येत असाव्यात. त्यांना हस्तक्षेप करण्याचा अधिकार हळूहळू वाढत गेल्याने स्वत:ची अशी पद्धती तयार झाली असावी व तिला सरकारी मान्यता मिळाली असावी आणि **महामत्तांना** कोठेही प्रवेश करण्याचा अधिकार मिळाला असावा. राजाची विशेष कृपा त्यांच्यावर असल्याने लोकांना त्यांचा निश्चितपणे दबदबा वाटत असावा व त्यांना खूष करण्यासाठी लोकांकडून त्यांना बरेचसे मान प्राप्त झाले असावेत. त्यांचा देखरेखीचा अधिकार सर्वसामान्य गृहस्थ आणि राजकुटूंब या दोघांवरही चालत होता. नाराज झालेल्या लोकांना मिळालेली चिथावणी ही **धम्माच्या** प्रचार व मतपरिवर्तन या कारणांपेक्षा आणखी काही तरी अधिक सूचित करणारी आहे. जे लोक शांतपणे **धम्माचे** आचरण करीत होते त्यांच्यापेक्षा जे लोक गाजावाजा करून आपल्या **धम्मानुयायित्वाची** जाहिरात करीत होते त्यांना अधिक चांगली वागणूक मिळत असावी अशी ऐक शक्यता दिसते. सद्‌हेतू मनात असणारे अधिकारीं, अगदी **धम्म-महामत्तसुद्धा** अतिमानवी पद्धतीने वागत असतील अशी अपेक्षा करणे अशक्य आहे. अशोकाला अभिप्रेत असलेल्या वा ज्ञात असलेल्या अधिकारांपेक्षासुद्धा अधिक अधिकार त्यांना आपली दैनंदिन कर्तव्ये बजावीत असताना प्राप्त होत गेले असावेत. या **महामत्तांचा** धर्मपंथ **धम्म (बौद्धधर्म)** हा होता व दूरवरच्या प्रदेशात **धम्माचा** अर्थ लावणारे तेच होते. अशा प्रकारची परिस्थिती इतर संस्कृतीमधूनही होती. ख्रिस्ती धर्मसंस्थेने ज्यांना धर्मगुरु म्हणून मान्यता दिली होती त्यांना राजकीय संघटना आपले प्रांतिक अधिकारी म्हणून मानीत असत.

**व्यवहारसमता व दण्डसमता** म्हणजे कायद्याची पद्धती व शिक्षा यांच्याबाबतची समानता या दोन उपाययोजनांचा अवलंब अशोकाने केल्यामुळे दंडाच्या बाबतीत सूट मिळण्याचे ब्राम्हणांना जे खास अधिकार होते ते नष्ट झाले. या गोष्टीचा आधार हरप्रसाद शास्त्री यांनी आपल्या प्रतिपादनाच्या समर्थना-साठी घेतलेला आहे. 'कायद्यातील एकसारखेपणा आणि शिक्षा' याबाबतच्या अर्थाच्या आधारे रायचौधरीनी वरील प्रतिपादन खोडून काढले आहे. आम्हाला

दुसरा दृष्टिकोन मान्य असून त्याचे तपशीलवार परीक्षण या आधीच केलेले आहे.[1] प्रमुख शिक्षांबाबत ब्राम्हणांना मिळणाऱ्या सवलतीच्या बाबतीत शास्त्री यांनी जे चित्र उभे केले आहे ते तितकेसे खरे नाही हे ब्राम्हणी साहित्यामधील अनेक उल्लेखांवरून दिसून येते.[2] ब्राम्हण व श्रमण यांना योग्य तो आदर दाखविण्या-संबंधी अशोकाच्या लेखांमधून वारंवार येणारे विनंतीवजा उल्लेख पाहता, त्याचा दृष्टिकोन ब्राम्हणविरोधी होता असे मानता येणे कठीण आहे.

शास्त्रींचे शेवटचे प्रतिपादन त्यांच्या आधीच्या प्रतिपादनांपेक्षा अधिक कच्चे आहे. ते म्हणतात की, 'ब्राम्हणांच्या विरोधाला तोंड देण्यास अशोक समर्थ होता पण त्याच्या मृत्यूनंतर त्याचे वारस व ब्राम्हण यांच्यात निर्माण झालेल्या संघर्षाची परिणती पुष्यमित्राने सत्ता हाती घेण्यात झाली. पुष्यमित्र म्हणजे मोठ्या ब्राम्हणी क्रांतीचे प्रतिकात्मक उदाहरण होते.' कोणत्याही उपलब्ध पुराव्यांचा आधार या विधानांना मिळू शकत नाही, हे रायचौधरींनी दाखविले आहेच. राजतरंगिणी-वरून आपल्याला असे दिसते की अशोकाच्या वंशजांपैकी निदान एक जण तरी बौद्धांना विरोधी व ब्राम्हणांना अनुकूल असा दिसतो. जालुकाचे वर्णन एकनिष्ठ शैव असे केलेले आहे.[3] पुष्यमित्र हा बौद्धांचा कट्टर द्वेष्टा होता या कल्पनेला विरुद्ध असा पुरावा उत्खननात सापडलेला आहे. 'येन केन प्रकारेण आपली ख्याती व्हावी म्हणून एखाद्याच्या दुष्कृत्याने प्रसिद्धी मिळत असेल तर त्याला क्षमा करावी असे पुष्यमित्राने ठरविले होते,' असे वर्णन बौद्ध वाङ्मयात आहे. 'अशोकाने बौद्धधर्मीयांसाठी ८४००० स्तूप बांधले म्हणून तो लोकप्रिय झाला असे उत्तर पुष्यमित्राला लोकांकडून मिळाले म्हणून ८४००० स्तूप नष्ट करून कीर्ती मिळविण्याचे पुष्यमित्राने ठरविले.[4] परंतु पुरातत्त्वशास्त्राच्या आधाराने केलेल्या अभ्यासाने हे सिद्ध झाले आहे की सांचीच्या स्तूपाचा विस्तार आणि सध्याचे दिसणारे कठडे हे शुंगकालामधील आहेत.[5] जवळच्या अशोकस्तंभाचा

---

१. चौथे प्रकरण पाहावे.

२. बृहदारण्यक उपनिषद, तीन, ९, २६, महाभारत, आदि पर्व, १०७.

३. एक, १४८.

४. प्रझिलस्की, ला लेजांद द लँपेरर अशोक, पृ. ३०१–२.

५. एआय्, नऊ, पृ. १६०.

धूर्तपणे नाश केला गेला असावा परंतु ही घटना बऱ्याच कालाने घडली असावी.[1] मौर्यांवरील पुष्यमित्राच्या हल्ल्याच्या संदर्भात अशोकावदानात बौद्धांनी जी कथा दिली आहे तिच्यावरुन असे दिसते की बहुधा राजदरबारात बौद्धांच्या वर्चस्वाला उतरती कळा लागल्याने साहजिकच बौद्ध स्मारके आणि बौद्धांच्या संस्था यांना मिळणारा राजाश्रय कमी झाला असावा. शिवाय हा पुरावा बौद्ध धर्मीयांकडूनच पुढे आलेला असल्याने साहजिकच त्यात बौद्धविरोधकांच्या दुष्कृत्यांचे अतिरंजित वर्णन केले असावे.

उत्तरकालात मौर्यसाम्राज्य बरेचसे संकोच पावल्याने व राज स्वत:चेच संरक्षण करण्यास असमर्थ असल्याने बृहद्रथाला पदच्युत करण्यासाठी क्रांतीची गरजच नव्हती. सैन्याची पाहणी करताना पुष्यमित्राने त्याचा खून केला असे सांगितले जाते. पण त्यावरून एखादी मोठी क्रांती झाल्याचे सूचित होत नाही. उलट ते एक राजवाड्यातले कारस्थान होते असेच स्पष्टपणे दिसते. राज्याची संघटना इतकी खालच्या पातळीला गेली होती की जो कोणी कार्यक्षम कारभाराचे वचन देई, त्याच्या आज्ञा पाळण्यास दुय्यम अधिकारी तयार होत असत. जर हा खरोखरच एक मोठी ब्राम्हणी क्रांती असती तर सुभागसेनाच्या वशजांना वायव्ये-कडून जशी शेजारच्या राजांकडून मदत मिळाली तशी पुष्यमित्राला मिळाली असती.

मौर्यकालातील बौद्धधर्माच्या प्रचारामुळे ब्राम्हणांच्या सामाजिक व धार्मिक व्यवस्थेला धक्का बसला असा एक दावा केला जातो.[2] पण ही गोष्ट केवळ बौद्ध-धर्मामुळेच झाली असे नाहीं. मंगल व तसेच इतर समारंभ यांच्याबाबत अशोकाच्या धोरणात जो निरुत्साहाचा भाग होता त्यामुळेही वरील परिणाम झाला असावा. पण या धक्क्यामुळे मौर्य साम्राज्य दुबळे व्हावे तितका तो मोठा नव्हता. यामुळे काही नव्या विचारांना चालना मिळाली असेल पण सामाजिक आचारविचार बरेचसे पूर्वीप्रमाणेच चालू होते.

अशोकाने अहिंसक धोरणाचा पाठपुरावा इतक्या उत्साहाने व दृढनिश्चयाने केला की त्यामुळे लष्करी दृष्ट्या सर्व राष्ट्र संपूर्णपणे नि:सत्व बनले व त्यामुळेच ते ग्रीकांच्या स्वारीला तोंड देण्यास असमर्थ ठरले या मुद्यावर रायचौधरींनी

---

१. मार्शल, **गाईड टु सांची**, पृ. ९०.

२. घोषाल, **स्टडिज इन इंडियन हिस्ट्री अँड कल्चर**, पृ. २५८.

अशोकावर हल्ला चढविला आहे.[1] अशोकाच्या मृत्यूनंतर साम्राज्याच्या झपाट्याने झालेल्या विघटनास अशोकाचे धोरणच प्रत्यक्षपणे जबाबदार आहे असे ते म्हणतात. या अहिंसेच्या धोरणाने केवळ साम्राज्याच्या लष्करी बळाचाच-ऱ्हास झाला असे नाही तर राजाचे नियंत्रणही नाहीसे झाले. या नियंत्रणाच्या अभावी प्रांतांमधील अधिकारी चढेल बनले व त्यामुळे बौद्धवाङ्मयांत उल्लेख केलेली बंडे झाली. थोडक्यात, अशोकाच्या शांततावादी धोरणाने साम्राज्याच्या शासनयंत्रणेचे विघटन झाले. लेखांतर्गत उल्लेखांच्या प्रकाशात अशोकाच्या धोरणाबाबतचा हा निर्णय मान्य करता येण्याजोगा नाही.

अहिंसेचे तत्त्व उराशी बाळगल्यामुळे अशोकाच्या राज्यकारभाराचे स्वरूप परंपरेपेक्षा वेगळे झाले होते असे नाही. मोठ्या प्रमाणावरील अहिंसा व परस्परांबद्दलचा विश्वास यामुळे समाजाचा फायदा होईल अशी त्याची व्यक्तिशः खात्री झालेली होती म्हणून त्याने तसे धोरण स्वीकारले. तसेच स्वतःची खात्री पटलेली असल्याने राजा या नात्यानेही तशा वागणुकीची लोकांना विनंती करून प्रचार करण्यास त्याने मागे पुढे पाहिले नाही. त्याचे शासकीय धोरण शक्य तितके या तत्त्वांना धरून होते. या धोरणाचा नेमका अर्थ कोणता याचा तपशीलवार विचार न करताच अशोकाच्या शांततावादाचा बाऊ केलेला आहे. यज्ञ वा अन्न यांसाठी प्राण्यांची हत्या केलेली त्याला आवडत नव्हती म्हणून तो आपल्या लेखांमधून प्राण्यांना ठार मारू नये व तसे जेथे शक्य नसेल तेथे निदान त्यांना दयाळूपणाने वागवावे असे सतत सांगतो,[2] असे असूनही अल्प प्रमाणात का होईना पण राजवाड्यामध्ये अन्नासाठी प्राणिहत्या होत होती.[3] ही प्रथा संपूर्णपणे बंद व्हावी अशी त्याची इच्छा असल्याचे तो सांगत असूनही तो त्या प्रथेपासून पूर्णपणे दूर राहिल्याचा पुरावा मिळत नाही. अवध्य प्राण्यांची जी यादी त्याने दिली आहे त्यात खाण्यासाठी उपयोगात आणल्या जाणाऱ्या मुख्य प्राण्यांचा समावेश नाही. शक्यतो मांसाशन केले जात नसे, परंतु ही प्रथा तरीही चालूच राहिली असावी असे दिसते.

रायचौधरींच्या म्हणण्याप्रमाणे जर तो खरोखरच संपूर्णपणे शांततावादी असता तर मृत्यूची शिक्षा त्याने निश्चितपणे रद्द केली असती. पण त्याच्या कारकिर्दीत

---

१. पोलिटिकल हिस्ट्री ऑफ एन्शण्ट इंडिया, पृ. ३६५.

२. तिसरे शिलाशासन, गिरनार ब्लोख, ले. एंस्क्रेपासिऑं द अशोक, पृ. ९५

३. पहिले शिलाशासन, गिरनार. उपरोक्त, पृ. ९०.

सर्वकाळ कठोर शिक्षा दिल्या जातच होत्या. या बाबतीत त्याने सौम्यपणा दाखविला तो एवढाच की त्याच्या राज्यारोहणाच्या सत्ताविसाव्या वर्षी, ज्यांना मृत्यूदंड झालेला आहे त्यांना तीन दिवसांची सूट देण्याची प्रथा त्याने चालू केली.[1] रायचौधरी म्हणतात की अशोकाचे वारस इतक्या शांततावादी अन्नावर वाढले की कोणत्याही शस्त्रसज्ज सैन्यापुढे उभे राहण्यास ते धजावेनात. भेरीघोषाऐवजी धम्मघोषच त्यांनी अधिक ऐकला.[2] (युद्धापेक्षा धम्माचेच संस्कार त्यांच्या मनावर अधिक झाले.)

उपरोक्त प्रतिपादनावरून असे दिसते की अशोकाने सर्व सैन्यांच्या हालचाली बंद करण्याची आज्ञा केली व शब्दश: अर्थ घेऊन अहिंसेचे राज्य सुरू केले. त्याच्या लेखांवरून असा कोणताही प्रकार सूचित होत नाही. त्याच्या कारकिर्दीत जरी एकच मोहीम त्याने काढली असली तरी तो करारी राजा होता असेच पुराव्यांवरून सूचित होते. उदाहरणार्थ सीमाप्रदेशातील लोकांविषयीचे आपले धोरण तो ठामपणाने सांगतो. जे दुष्कृत्ये करीत असत त्यांना क्षमा करण्यास राजा नेहमीच तयार असे, पण जी क्षम्य असत त्यांनाच क्षमा केली जाई.[3] अरण्यातील टोळयांना तो यापेक्षाही अधिक काटेकोरपणाने आपला संदेश सांगतो. त्यांनी चुका करू नयेत व चुका केल्यास त्याबद्दल ते ठार मारले जाऊ नयेत म्हणून, स्वत: पश्चात्तापदग्ध झालेला असला तरी, तो स्वत:च्या अधिकारांची जाणीव त्यांना करून देतो. प्रादेशिक विजय संपादन करण्याच्या बाबतीत आपल्या वारसांनी कसे वागावे याविषयी याच लेखात अशोकाने व्यक्त केलेली अपेक्षा रायचौधरींच्या प्रतिपादनाच्या विरुद्ध जाणारी आहे अशोक म्हणतो, 'यापुढे एखादा प्रदेश जिंकण्याची जरुर नाही असे मला वाटते.' व्यवहारात मौर्यसाम्राज्याचा विस्तार संपूर्ण उपखंडावर झालेला असल्याने त्याचे हे म्हणणे तर्कास धरून होते. पण जर भविष्यकाळात त्याच्या वारसांना प्रदेश संपादन करावयाचे असतील तर ते शक्यतो दयाळूपणाने व सौम्य शिक्षा देऊन मिळवावेत अशी त्याची इच्छा होती.

अशोक शांततावादी धोरणे राखू शकला कारण त्याच्या सीमा सुरक्षित असल्याने साम्राज्यांतर्गत प्रदेशही सुरक्षित होता. त्याच्या कारकिर्दीच्या सुरुवातीला जिंकलेल्या कलिंग देशातच फक्त अस्वास्थ्य असण्याचा संभव होता. दक्षिण भारत

---

१. चौथे स्तंभशासन, दिल्ली टोप्रा, उपरोक्त, पृ. १८३

२. पाचवे प्रकरण पाहावे.

३. तेरावे शिलाशासन, कळशी, ब्लॉख, ले एन्स्क्रिप्सिओ द अशोक, पृ. १२५

जिकणे हे काही मौर्यसेनेला मोठे कठीण होते असे नाही. पण त्याची जरुर नव्हती[१] सिरियाच्या अँटिओकसचे साम्राज्य हेच मौर्यसाम्राज्याचे एकमेव प्रतिस्पर्धक होते. हिंदुकुश पर्वताच्या पलीकडील भूमी जिकण्याचा प्रयत्न करणे म्हणजे अशोकाच्या दृष्टीने, वाळवंटातून व पर्वतराजीतून मोहीमा काढताना त्याच्या सैन्याला अविचाराने धोक्यात घालणे होते. कोणत्याही परिस्थितीत, अनेक प्रदेश जिकण्यापेक्षा अँटिओकस व तो स्वत: यांच्यामधील मित्रत्वाचे संबंध राखणे हेच सर्व दृष्टींनी फायदेशीर होते. सीमांवरील टोळ्या त्याला कदाचित त्रासदायक ठरण्याचा संभव होता, याचा उल्लेख केलेला आहेच. त्यांनी त्याच्या शासकांना चांगलेच हैराण केले असावे व तोही त्यांच्याशी ठामपणानेच वागला असावा.

अशोकाने अधिक प्रदेश संपादन केले नाहीत याचा अर्थ असा नव्हे की त्याला फक्त त्याच्या वडिलांनी व आजोबांनी जिकलेला प्रदेशच राखून ठेवावयाचा होता. तो स्वत:ही विजयाच्या मनोवेधक कल्पनांनी भारून गेला होता, याबद्दल शंका नाही. त्याच्या शांततावादाने कलिंगाला परत स्वतंत्र राज्य म्हणून मान्यता दिली नाही हे लक्षात घेण्याजोगे आहे, हे यापूर्वीच दाखविले आहे.[१] तो व्यवहारी राज्यकर्ता असल्याने कलिंगविजयाची वस्तुस्थिती त्याने मान्य केली व त्या प्रश्नाबाबत त्याने कोणत्याही नैतिक शंका उपस्थित केल्या नाहीत. त्या विजयाने आलेल्या घृणेची जाहीर कबुलीही त्याने कलिंगामध्ये दिलेली नाही. अशी कबुली देणे राजकीय दृष्टया योग्य नाही असा विचार त्याने केला यात शंका नाही. केवळ धम्मासाठी शिष्टमंडळे पाठविल्यानेच भूमध्यसमुद्राच्या पूर्वेकडील ग्रीक राजे आपल्याला वश झाले आहेत याविषयी अशोकाची खात्री पटली होती असे दिसते. त्यांच्या या अधीनतेबद्दल त्याला अभिमान वाटत असावा असे दिसते.[३] अशोक आणि गुप्त घराण्यातील समुद्रगुप्त यांच्यामध्ये असा फरक आहे की अशोकाला **धम्मविजयात** गौरव वाटतो तर समुद्रगुप्ताला युद्धविजयात गौरव वाटतो. अशोकाने प्रत्यक्षात श्रीलंका कधीच जिकलेले नव्हते तरी श्रीलंकेचा देवानम्पिय तिस्स याच्यावर अशोकाचा फार मोठा अधिकार होता.[४] जर त्याने श्रीलंकेच्या

---

१. चौथे प्रकरण पाहावे.

२. द ला वाले पुसँ, लँद्र ओ तॉ दे मौर्य, पृ. ११९

३. तेरावे शिलाशासन, कळशी. ब्लोख, ले इंस्क्रेपसियाँ द अशोक, पृ १३०.

४. **महावंस,** अकरा, १७–२४, तेरा, चौदा.

बाबतीत लष्करी कारवाई केली असती. तर दोन्ही देशांमधील संबंध बदलून अधिक वाईट झाले असते. शिवाय शासकीय स्वरूपाच्या अनेक अकल्पित समस्यांची भर त्यात पडली असती.

केवळ लष्करी विजयांनाच मूल्य असते असे नाही. तसेच राजाचा थोरपणा अशा विजयांच्या संख्येवर व गुणवत्तेवर अवलंबून असतो असेही नाही. अशोक हा सरळमार्गी आणि कट्टर शांततावादी होता असे दाखविण्याचा प्रयत्न काही इतिहासकारांनी केला आहे. पण तो तसा नव्हता हे यावरून स्पष्ट होते. संपूर्ण शांततावादा अशी एक पिढीसुद्धा साम्राज्याला दुबळे करून त्वरीत विघटन घडवून आणू शकणार नाही लढाया आणि प्रदेशसंपादन हेच केवळ साम्राज्यांच्या निर्मितीला वा नाशाला जबाबदार नसतात. इतर बाजूंनाही कारणे पाहावी लागतात.

प्रांतिक सरकारे वरचढ बनली हे मौर्यांच्या ऱ्हासाचे आणि एक कारण आहे हे सांगितलेले आहेच.[1] मंत्र्यांविरुद्ध तक्षशिलेच्या लोकांनी केलेल्या बंडाविषयी **दिव्यावदानामध्ये** ज्या दोन कथा आलेल्या आहेत त्यांवर हे विधान आधारलेले आहे. अशोकाच्या कारकिर्दीच्या शेवटी झालेले बंड मोडण्यासाठी कुणालाला पाठविले, यासंबंधीची कथा पूर्वी दाखविल्याप्रमाणे कपोलकल्पित आहे.[2] बिंदुसाराच्या कारकीर्दीतील अशोकाने मोडलेल्या बंडाचा परिस्थितीजन्य पुरावा आहे. अशोकाच्या कारकिर्दीत मंत्री वरचढ ठरल्याचा कोणताही स्पष्ट पुरावा नाही ही वस्तुस्थिती आहे. पहिल्या वेगळ्या शिलाशासनात राजा अशी आज्ञा देतो की अधिकाऱ्यांनी आपल्या ताब्यातील प्रजेला न्यायी व मानवतावादी वागणूक द्यावी. **महामत्तांना** दिलेला हा सल्ला त्यांच्या चढेलपणाला विरोध करणारा आहे हे यावरून सूचित होऊ शकते. परंतु या लेखाचे खरे महत्त्व असे आहे की धौली व जौगडा या कलिंग-प्रदेशातील **महामत्तांनाच** उद्देशून हा लेख असून साम्राज्यांतील इतर कोणत्याही भागासाठी नाही नुकत्याच जिंकलेल्या प्रदेशातील प्रजेची निष्ठा मिळविण्यासाठी अशोकाने तेथील लोकांच्या कल्याणासाठी विशेष आस्था दाखवावी हे साहजिकच आहे. या **महामत्तांना** उद्देशून बोलताना त्याचा सूर साम्राज्यवादी आहे. सम्राट आपल्या शासनावर नियंत्रण ठेवू शकत नाही. असे कोठेही जराही सूचित होत नाही. आणखी एका लेखकाने असे मत व्यक्त केले आहे की, उत्तरकालीन मौर्यांच्या

---

१. रायचौधरी, **पोलिटिकल हिस्ट्री ऑफ एन्शंट इंडिया**, पृ. ३६३.

२. पहिले व दुसरे प्रकरण पाहावे.

अर्थव्यवस्थेवर बराच भार पडलेला होता.[1] एक म्हणजे कराचे उत्पन्न वाढ-विण्यासाठी काही जरुर नसलेल्या उपाययोजना करण्यात आल्या. उदाहरणार्थ अर्थशास्त्रात सांगितलेले नट व वेश्या यांच्यावरील कर सुरू करण्यात आले. दुसरी गोष्ट म्हणजे या कालातील मौर्यांच्या आहत नाण्यांमध्ये भेसळ असल्याचे पुरावे आहेत. तत्कालीन राजकीय घटकांचा विचार न करता निवडक अर्थशास्त्रीय पुरावाच विचारात घेतल्याने वरील निष्कर्ष काढला गेला आहे. राष्ट्रीय उत्पन्नाचे प्राथमिक साधन म्हणून करयोजना पूर्णपणे राबविण्याचा प्रयत्न पहिल्या प्रथम मौर्यकालातच झाला. त्यामुळे ज्याच्या ज्याच्यावर कर बसविता येणे शक्य होते त्या प्रत्येकावर कर आकारले गेले. नट, वेश्या व त्यांच्यासारख्या व्यावसायिकां-वरील कर हे आणीबाणीच्या काळासाठी बसविण्याचे कर नव्हते हे **अर्थशास्त्रा-वरुन** स्पष्ट होते, कारण हा कर कायदेशीर मानला जात होता व शेतकऱ्यांवर जसा बसविला जात होता तसाच यांच्यावरही नित्य बसविला जात होता. वस्तुतः राजाचा खजिना रिकामा पडू लागला तर आणीबाणीच्या काळात कोणते उपाय योजावयाचे हे **अर्थशास्त्रात** स्पष्ट केलेले आहे. त्यांत दुबारी पिकांवरील करांसंबंधीचा उल्लेख आहे.[2] नट वा त्यांच्यासारख्यांच्यावरील करांचा त्यात समावेश नाही.

मौर्यकालातील चलनातील भेसळ म्हणजे सर्वसाधारण अर्थव्यवस्थेवर आलेले दडपण असे मानण्याचे काही कारण नाही. उत्तरकालीन मौर्यांच्या काळात नियंत्रणामध्ये ढिलेपणाही आला व ते कमीही होत चालले त्यामुळे साम्राज्यात, विशेषतः जे भाग हळूहळू त्यातून निसटत चालले होते त्या भागांत भेसळ असलेली नाणी प्रचारात येण्यास सुरुवात झाली. ही नाणी प्रामुख्याने निधीच्या रुपाने सापडलेली असल्याने त्यांचे मूलस्थान नेहमीच समजते असे नाही. वर उल्लेखिलेल्या भागांसारख्या प्रदेशात, तेथील अधिकाऱ्यांनी या नाण्यांवर ठसे मारले असावेत व त्यांच्या गुणवत्तेची योग्य ती शहानिशा न करता ती प्रचारात आणली असावीत. याशिवाय, इतर मालाच्या मानाने चांदीला वाढती मागणी असावी व त्यामुळे नाण्यांमधील चांदीचे प्रमाण कमी झाले असावे असेही ही भेसळ दर्शवीत असावी. याखेरीज कोसंबींनी केलेले हे विधान त्यांनी स्वतः उत्तरकालीन मौर्यांच्या नाण्यांची जो ओळख पटविलेली आहे त्यावर आधारलेले आहे, आणि अजून ते विधान खात्री करणारे नाही.

---

१. कोसंबी, इंट्रोडक्शन टु दि स्टडी ऑफ इंडियन हिस्ट्री, पृ. २११.

२. पाच, २.

इतर वस्तुरूप अवशेषांच्या पुराव्यावरून अर्थव्यवस्थेवर दडपण होते हे सूचित होत नाही. जे काही सूचित होते ते विकसित होत जाणाऱ्या एका अर्थव्यवस्थेचे चित्र. हस्तिनापूर व शिशुपालगड येथील पुरातत्वीय पुराव्यावरून असे दिसते की, तांत्रिक प्रगती व अधिक चांगल्या दर्जाच्या मालाचा वापर या दोन्ही दृष्टिकोनांतून तत्कालीन संस्कृतीमध्ये बरीच ऐहिक सुधारणा झालेली होती.[1] सुरूवातीच्या मौर्यकालापेक्षा या कालात या सुधारणेचा प्रसार जास्त व्यापक प्रमाणात झालेला होता. उदाहरणार्थ सुरूवातीच्या स्तरावर कुंभारकामाचे बहुतेक अवशेष म्हणजे ओबडधोबड करडी भांडी आहेत व फारच थोडे साठे उत्तरेकडील चकचकीत भांड्यांचे आहेत. नंतरच्या पातळीवर म्हणजे अशोकोत्तर मौर्यकाळ व सुरवातीच्या शुंगांचा काळ या पातळीवर, कुंभारकामाचा पुरावा म्हणजे चाकावर घडविलेली व उत्तम मातीची भांडी बऱ्याच भागांमध्ये विखुरलेली सापडलेली आहेत. तौलनिक दृष्टया एक नवी बाब म्हणजे नगरनियोजन व गृहनियोजन हे अधिक नित्याचे वैशिष्टय झाले आहे. मणि, आंगठ्या, मृण्मय वस्तू इत्यादी वस्तूंच्या कारागिरीमध्ये निश्चित सुधारणा आहे. अशोकाच्या कारकिर्दीचा अर्थव्यवस्थेला फार मोठा फायदा मिळाला. एकाच कार्यक्षम प्रशासनाखाली निर्माण झालेले देशाचे ऐक्य, दळणवळणातील वाढ व संघटन, आणि शांतता याचा अर्थ व्यापाराचा विकास व त्याचप्रमाणे अनेक नव्या व्यापारी हितसंबंधांना निर्माण झालेली संधी.

आत्यंतिक राजकीय अस्थिरतेच्या काळात, विशेषत: गंगेच्या खोऱ्यामध्ये व्यापाऱ्यांनी व इतर संबंधित वर्गांनी नाण्यांचे काही निधी करून ठेविले असावेत, हे शक्य आहे. या साठेबाजीमुळेच नाण्यांमध्ये भेसळ झालेली असावी, परंतु मौर्यसाम्राज्याचा राजकीय ऱ्हास होत असतानाही आर्थिक भरभराट चालू राहिली यात शंका नाही. संपत्तीमधील वाढाव्याचा उपयोग उगवत्या व्यापारी वर्गांनी धार्मिक इमारती सुशोभित करण्यासाठी केला. काही थोडा काळ आता तेच दाने देणारे होते. भारहुत व सांची येथील शिल्प व दख्खनमधील गुहा म्हणजे या नव्या मध्यमवर्गीयांचा आविष्कार आहे.

पुष्यमित्राने घडवून आणलेली क्रांती म्हणजे मौर्यांच्या दडपशाहीविरुद्धचा उठाव व मौर्यकालीन कलेसारख्या मौर्यांनी स्वीकारलेल्या परकीय कल्पनांना

---

१. एआय, व्हॉ. नऊ, पृ. १४०, १६८.

झिडकारण्याचा प्रकार होता, असे निदान एका तरी लेखकाने म्हटलेले आहे.[1] हे विधान, शुंगकला, प्रामुख्याने भारहुत व सांची येथील शिल्प, मौर्यकालीन कलेपेक्षा अधिक लौकिक आणि लोकपरंपरेत-बसणारे आहे, या कल्पनेवर आधारलेले आहे. मौर्यसम्राटांच्या साम्राज्यवादाचा आविष्कार मौर्यकलेने किती निःसंकोचपणे केलेला होता ते अशोकाच्या राजधान्यांवरून पाहणे शक्य आहे. मौर्यकालीन कलेचे हे सुस्पष्ट स्वरुप, मग तिचा आधार परकीय असो वा नसो कायमचे राहिलेच असते. शुंगकलेचे स्वरुप बदलते आहे कारण तिचा हेतू वेगळा आहे आणि तिचे आश्रयदाते वेगळ्याच सामाजिक वर्गातून आलेले आहेत. भारहुत आणि सांची येथील कठडे व प्रवेशद्वारे यांचा जितका निकटचा संबंध बौद्धधर्माशी म्हणून आहे तितका अशोककालीन स्तंभांचा नाही. शुंगकला ही लोकपरंपरेला अधिक प्रमाणात धरून आहे, कारण लोकप्रिय संप्रदायांमधील अनेक तत्त्वे बौद्धधर्माने स्वतःमध्ये सामावून घेतलेली होती आणि या कलेचे आश्रयदाते, ज्यांच्यापैकी बरेचजण कारागीरही असावेत, सांस्कृतिक दृष्टचा अधिक करून लोकपरंपरेच्या मुख्य प्रवाहामधील होते.

अशोकाने समाज व तत्सम उत्सवांवर बंदी घातली, या आधारावर पुढे लोकांच्या उठावाच्या कल्पनेचे अधिक स्पष्टीकरण केलेले आहे. सणसमारंभावर अशोकाने घातलेली बंदी व मांसाशनाविषयीचा त्याचा तिरस्कार यामुळे लोक त्याच्या विरोधी बनले असावेत ही शक्यता आहे, पण या प्रतिबंधाची अंमलबजावणी काटेकोरपणाने होत होती वा नाही हा प्रश्न अजून शिल्लकच आहे. पुढच्या वर्षांमध्ये अधिकाऱ्यांची अधिकार गाजविण्याची वाढती प्रवृत्ती दिसते हे आपण पाहिलेलेच आहे. त्याचा परिणाम असा झाला असावा की लोकांना त्रासदायक वाटणाऱ्या उपाययोजना अंमलात आल्या असाव्यात. उत्तरकालीन मौर्यांनी अशोकाचेच धोरण अगदी जसेच्या तसे पुढे चालविले असावे असेही गृहीत धरून हे लोकांच्या उठावाविषयीचे विधान केले असावे. तथापि जरी मौर्यांची अशी दडपशाही असती तरी तिच्याविरुद्ध पुष्यमित्राच्या बाजूने उभे राहण्याइतकी पुरेशी राष्ट्रीय भावना मौर्यसाम्राज्यातील वैविध्यपूर्ण लोकसमूहांमध्ये असण्याची शक्यता कमीच आहे.

मौर्यसाम्राज्यात (ग्रीक ग्रंथांनुसार) जमिनीवरील कर एक चतुर्थांश इतका असल्याचे वर्णन आहे आणि हा भारी कर शेतकऱ्यांना फारच डोईजड आहे, असे आणखी एक समर्थन, मौर्यांविरुद्ध लोकांनी उठाव केला या कल्पनेला पुष्टी देण्यासाठी केले जाते. जर हा कर खरोखरच सर्वत्र एक चतुर्थांश असा असता तर

---

१. राय. मौर्य अँड शुंग आर्ट, पृ. ६४.

ग्रामीण भागातील असंतोषास तो कारण झाला असे म्हणण्यात काहीसे तथ्य आहे. पण यापूर्वीच्या एका प्रकरणामध्ये आम्ही दाखविले आहे त्याप्रमाणे, जमिनीची सुपीकता व पाण्याची उपलब्धता यानुसार तो वेगवेगळ्या भागांमध्ये वेगवेगळा असे.[1] मेगॅस्थिनिसने सांगितलेला एक चतुर्थांश हा आकडा बहुधा, ग्रीक प्रवासी ज्या भागाशी जास्तीत जास्त परिचित असतील त्या पाटलिपुत्राच्या आसपासच्या अत्यंत सुपीक व सुजल भागाला उद्देशून असावा. उत्पन्नाच्या एक चतुर्थांश इतका भाग साधारणपणे शेतकऱ्यांकडून वसूल केला जात नसे हे अर्थशास्त्रावरून बरेचसे स्पष्टपणे दिसून येते. आणिबाणीच्या काळात राजा आपली मागणी एक तृतीयांश किंवा एक चतुर्थांश इतकी वाढवू शकेल असे त्यात सूचित करण्यात आलेले आहे.[2] म्हणूनच एक चतुर्थांश हा भारी कर मानला जात होता हे उघड आहे. सर्वसामान्य परिस्थितीत मौर्यांनी इतक्या भारी कराचा आग्रह धरलेला असणे असंभवनीय आहे. पण जर तसे असते तर न्यायदानाच्या कामी राजूकांनी न्यायी व उदार असावे हा अशोकाचा हुकूम म्हणजे निव्वळ ढोंगीपणा ठरला असता.

लष्कराची निष्क्रियता, ब्राह्मणांचा क्रोध, लोकांमधील उठाव किंवा आर्थिक दडपण अशी कारणे सांगून मौर्यसाम्राज्याच्या ऱ्हासाचे समाधानकारक स्पष्टीकरण देता येणे शक्य नाही. वर उल्लेखिलेल्या कोणत्याही कारणापेक्षा त्याच्या ऱ्हासाची कारणे अधिक मूलभूत स्वरूपाची व मौर्यकालीन जीवनाचे अधिक व्यापक व यथार्थ दर्शन घडविणारी आहेत. शिवाय इतर साम्राज्यांचा ऱ्हास आणि त्यांच्या राजकीय विस्ताराचे कालखंड यांचेही स्पष्टीकरण काही अंशी याच कारणांनी करता येण्याजोगे आहे. प्रशासनाचे संघटन आणि राज्य किंवा राष्ट्र याविषयीची कल्पना ही मौर्यांच्या ऱ्हासाच्या कारणांपैकी अतिशय महत्त्वाची कारणे होती.

मौर्यांची नोकरशाही जर वेगळ्या स्वरूपाची असती तर अजूनही ती परिस्थितीचा बचाव करू शकली असती व साम्राज्याचे असे संपूर्ण विघटन रोखू शकली असती. आपण पाहिले आहे त्याप्रमाणे प्रशासन हे अत्यंत केंद्रित स्वरूपाचे होते आणि अधिक वरच्या दर्जाची कार्ये शक्य तितकी जास्तीत जास्त राज्यकर्त्यांच्या प्रत्यक्ष नियंत्रणाखाली होती. त्यामुळेच राजाजवळ बरीचशी वैयक्तिक कर्तबगारी असणे अगत्याचे ठरले. अशा परिस्थितीत केन्द्रीय दौर्बल्यामुळे आपो-

१. चौथे प्रकरण पाहावे.

२. पाच, २.

आपच प्रशासनात दुर्बलता येते. अशोकाचा मृत्यू व त्याच्या वारसांजवळ असलेला त्याच्यासारख्या गुणवत्तेचा अभाव याबरोबरच केन्द्रसत्तेमध्ये, विशेषत: साम्राज्याच्या विभागणीनंतर दुर्बलता आली या परिस्थितीत प्रांतानी फुटून निघणे अगदी अपरिहार्यच होते.

प्रशासनाच्या अधिकाऱ्यांची निष्ठा राज्याशी नसून राजाशी होती. त्यांची निवड करण्याच्या बाबतीत राजाला व्यक्तिश: इतकी अफाट सत्ता होती की ते त्या राजाचे नोकर बनले.[१] याचा अर्थ राजा बदलला की त्याचा परिणाम म्हणून अधिकारीही बदलले जात, निदान अती वरिष्ठ व जबाबदार असलेले अधिकारी तरी बदलले जात.[२] मौर्यकालीन भारतात अशोकाच्या मृत्यूनंतर लगेच जसे झाले तसे एकापाठोपाठ एक राजे वेगाने गादीवर येऊ लागले तर त्या कालात ही गोष्ट देशाला विशेष हानिकारक ठरते. दुसऱ्या महायुद्धाच्या काळापासून जर समकालीन फ्रान्सचे प्रशासन सत्तारूढ सरकारशीच एकनिष्ठ राहिले असते तर राजकीय घटक या दृष्टीने आतापर्यंत फ्रान्स निश्चितच विघटनाच्या मार्गाला लागले असते.

निष्ठा बदलत असत, अशी जरी परिस्थिती असली तरी प्रशिक्षित नोकरशाही आपला कार्यभाग योग्य तऱ्हेने बजावेल अशी खात्री असणारी एखादी पद्धती जर मौर्यांनी वापरली असती तर राजकीय अस्वास्थ्याच्या अनेक प्रसंगी तिने प्रशासनाची गती टिकवून धरली असती. अशी पद्धती, म्हणजे स्पर्धात्मक परीक्षांची पद्धती, पुढील शतकांमध्ये भारतात ब्रिटिश प्रशासकांनी परिणामकारक रीतीने उपयोगात आणली राज्याच्या प्रशासनाविषयी बराचसा तपशील देण्यासाठी अर्थशास्त्र जरी कितीही खोलवर जात असले तरी दुय्यम प्रशासकांची भरती कशी केली जात असे याविषयी त्यात कोठेही ओझरतासुद्धा उल्लेख नाही हे आश्चर्यकारकच म्हटले पाहिजे. ज्याला स्पर्धात्मक पद्धती म्हणता येईल अशा प्रकारचा कोणताही पुरावा त्यात नाही हे निश्चित आहे. राजाच्या वैयक्तिक पसंतीनुसार उच्च पदांवरील अधिकाऱ्यांची निवड होत असे, असे आपल्याला सांगण्यात आलेले आहे. वैयक्तिक निवडीची ही पद्धती पार खालच्या पातळीपर्यंत चालू असावी हे

---

१. चौथे प्रकरण पाहावे.

२. प्रामुख्याने वंशपरंपरेने नेमणुका करण्याच्या प्रवृत्तीमुळे अधिकारी आपापल्या पदांवर राहिल्याच्या अनेक नोंदी पुढील काळात आहेत. पण मौर्यकालात ही प्रवृत्ती इतकी बळकट नव्हती हे स्पष्ट आहे.

आपणास गृहीत धरावयास पाहिजे. हाताखालच्या अधिकाऱ्यांची नेमणूक करताना आपल्याच सामाजिक गटातील व्यक्तीची किंवा मित्रांची निवड करण्याची अधिकाऱ्यांची प्रवृत्ती असणे अगदी साहजिक असल्याने सामाजिक नातेसंबंधाचा जोर अधिक बळकट झाला. यामुळे नव्या राजाविषयी निष्ठा असणाऱ्यांचा गट अगर विरोधी भावना असणाऱ्यांचा गट अशा गटांची निर्मिती झाली असावी. नव्या राजाशी निष्ठा नाही म्हणून एखाद्या अधिकाऱ्याला बडतर्फ करावे लागले तर कदाचित प्रशासनाचा एक संपूर्ण विभाग बदलण्याची वेळ येत असावी. उत्तरकालीन मौर्यराजांवर अशा परिस्थितीला तोंड देण्याची पाळी वारंवार आलेली असली पाहिजे यात शंका नाही. केंद्रस्थानी दुबळा राजा असताना एखाद्या स्थानिक राज्यकर्त्याला वा राजपुत्राला राजाऐवजी सरळ स्वत:कडे निष्ठा वळवून घेण्याचे काम अवघड नव्हते.

परीक्षापद्धतीचे दोन सरळ फायदे होते. सामाजिक गटबाजी नष्ट करता आली असती कारण तत्त्वत: तरी अर्जदारांची भरती कोणत्याही सामाजिक स्तरातून करणे शक्य होते. दुसरा फायदा म्हणजे साम्राज्यीय सेवा केंद्राकडून नियंत्रित होत असल्यामुळे साम्राज्याच्या कोणत्याही भागात अधिकाऱ्यांची नियुक्ती करणे शक्य होते. त्यामुळे केंद्रस्थानी असलेल्या राज्यकर्त्यांच्या स्थानाला धोका निर्माण करण्याइतकी सत्ता मिळविण्यास स्थानिक गटांना प्रतिबंध झाला असता. ही पद्धती तत्कालीन समाजव्यवस्थेच्या कल्पनेच्या विरुद्ध होती कारण समाजातील प्रत्येक व्यक्तीला समाजात आपले स्थान काय आहे हे माहीत असणे व तेथेच तिने राहणे यावरच समाजव्यवस्था टिकून राहणे अवलंबून होते. शूद्र कुलातील राजे स्वत:चे पद टिकवून धरण्याइतके सामर्थ्यवान असतील तर त्यांना मान्यता दिली जाऊ शके परंतु समाजातील याच वर्गातून प्रशासक आले असते तर संपूर्ण समाजव्यवस्था ढासळली असती.

समाजातील सात वर्गांपैकी दोन वर्ग प्रशासकांचे असल्याचे वर्णन मेगॅस्थिनिस करतो, त्यात आश्चर्य करण्याजोगे काही नाही. त्या दोन्ही गटांना काही खास अधिकार निश्चितच असले पाहिजेत. वरिष्ठ अधिकाऱ्यांची निवड खुद्द राजाच्या वैयक्तिक पसंतीने होत असल्यामुळे त्यांना खूपच सामाजिक प्रतिष्ठा मिळाली असावी तर कनिष्ठ अधिकाऱ्यांचा नोकरशाहीतील इतर व्यक्तींबरोबरच एकत्र येऊन एक दृढ गट बनत असावा. अर्थशास्त्रात वेतन-

प्रमाणांची जी यादी दिलेली आहे त्यावरून सामाजिक प्रतिष्ठेबरोबरच त्यांना आर्थिक सुस्थितीही प्राप्त होत असावी.[1]

राजाच्या हाती अफाट सत्ता असल्यामुळे व लोकमताचे प्रतिनिधित्व करणाऱ्या एखाद्या सल्लागार मंडळाचा संपूर्ण अभाव असल्यामुळे विविध प्रकारची अनियमित साधने व पद्धती यांच्यामार्फत त्याने लोकमताशी आपला संपर्क साधीत राहणे हे साहजिकच होते. ती साधने नेहमीच आदर्श होती असे नाही आणि काही वेळा राजाच्या विरुद्ध अशी त्यांची प्रतिक्रिया होऊ शके. असा संपर्क साधण्याच्या हेतूने मौर्यराज्यव्यवस्थेने हेरगिरीची पद्धती वापरली व ती अर्थशास्त्रालाही संमत आहे. गोपांसारख्या दुय्यम अधिकाऱ्यांना आपली नित्याची कर्तव्ये पार पाडीत असतानाच हर एक प्रकारची माहिती गुप्तपणाने शोधून काढावी लागे, इतकेच नाही तर त्याबरोबरच हेरांची एक अतिशय गुंतागुंतीची पद्धतीही निर्माण करण्यात आली होती. वार्ताहर व हस्तक यांच्या उपयुक्तते-विषयी अशोकाने आपल्या आज्ञालेखांमध्ये कबुली दिलेली आहे. त्यांना बराच अग्रहक्क आहे असे तो सांगतो.[2]

प्रातिनिधिक संस्थेचा अभाव तर होताच पण त्याबरोबरच सरकारच्या कार्यामध्ये कार्यकारीमंडळ आणि न्यायदानमंडळ यांच्यामध्ये भेद नव्हता. राजाचे तपासनीस म्हणून आपले काम पार पाडणारे महामात्र किंवा हेर आणि वार्ताहर यांचाच काय तो अंकुश म्हणून राजा उपयोग करू शके. तसेच या पद्धतीची कार्यक्षमताही राजाच्या वैयक्तिक कर्तृत्वावरच फार अवलंबून असे. चतुर राजा, लोकमत अजमविण्यासाठी किंवा जरूर तर ते आपल्या बाजूने वळवून घेण्यासाठी या अधिकाऱ्यांचा अतिशय कौशल्याने उपयोग करून घेऊ शके. पण त्याबरोबरच एखादा असमर्थ राजा या अधिकाऱ्यांचा उपयोग दडपशाहीच्या हेतूने करीत असे किंवा कोणताच चांगला हेतू नसलेल्या कामासाठी तो त्यांच्या हातचे खेळणे बने. समर्थ व जागरूक राजालाच साजेसे असे कार्यक्षम प्रशासन अशोकाच्या हयातीत होते आणि दुबळ्या व बेफिकिर राज्यकर्त्यांच्या कारभारात अपरिहार्यपणे शिर-णारा भ्रष्टाचार तेथे मुळीच सहन केला जात नसे. मौर्यांच्या प्रशासकीय धोरणाची यंत्रणा इतकी केन्द्रित होती की कोणताही समर्थ राजा तिचा उपयोग स्वतःच्या आणि आपल्या प्रजेच्या भल्यासाठी करून घेऊ शके. पण जो दुबळा राज्यकर्ता

---

१. पाच, ३.

२. चौथे प्रकरण पाहावे.

केन्द्रीय नियंत्रण ठेवू शकत नसे व साम्राज्याचे विघटन आणि फाटाफूट करणाऱ्या विनाशक शक्ती मोकळया सोडीत असे त्या राजाच्या अंमलाखाली ती यंत्रणा तितक्याच प्रमाणात दोघांनाही हानिकारक ठरत असे.

कोणत्याही राजकीय पद्धतीत, प्रशासनाचा प्रकार व राज्याविषयीची कल्पना, जर अशा प्रकारची कल्पना अस्तित्वात असेल तर, या दोन्ही घटकांचा परस्परसंबंध असतो. राज्य या कल्पनेवर भर देण्याची मुख्य गरज राजा, सरकार व समाजव्यवस्था यांच्याही वरची ती कल्पना ठरते या वस्तुस्थितीत आहे. राज्य ही अशी एक बाब आहे की तिच्याशी प्रत्येक नागरिक, इतर अडथळे अगर आपण व आपल्या बरोबरचे इतर नागरिक यांच्यातील मतभेद बाजूला सारून एकनिष्ठ राहतो. म्हणजे राज्य हे सर्वश्रेष्ठ मंडळ आहे व त्याची संपूर्ण निष्ठेची मागणी असते. एकदा ही राज्याची कल्पना अंगवळणी पडली व लोकांच्या विचारात ती स्पष्ट झाली की मग राष्ट्रीय जाणीवेचा उदय होतो.

मौर्यपूर्वकालात प्रजासत्ताके अस्तित्वात होती. त्यातून राज्य ही कल्पना सूचित होत असे आणि काही प्रसंगी राज्याची सर्वसाधारण व्याख्याही केला जात असे, तरीसुद्धा मौर्यकालीन भारतात राष्ट्र ही कल्पना अस्तित्वात नव्हती. राष्ट्र या कल्पनेच्या उभारणीसाठी लागणाऱ्या अनेक गोष्टी त्या वेळी नव्हत्या. मौर्यसाम्राज्याने व्यापलेल्या सर्व भागात समान रूढी, समान भाषा व समान ऐतिहासिक परंपरा अस्तित्वात नव्हती. मौर्यांच्या विविध प्रदेशांमध्ये ऐहिक संस्कृतीची एक समान पातळी होती असेही म्हणता येणे शक्य नाही. राष्ट्रीयत्वाची कल्पना जर इतक्या व्यापक प्रमाणावर अस्तित्वात नव्हती तर तशीच ती साम्राज्यात अंतर्भूत झालेल्या विविध लहान लहान घटकांमध्येही असणे शक्य नव्हते.

यासंबंधीची शहानिशा करण्याच्या हेतूंनी आपण या ठिकाणी मगधाच्या प्रांतापुरताच मर्यादित विचार करू या. येथे एका लहान भागात समान भाषा, समान रुढी व एक समान ऐतिहासिक परंपरा या आवश्यक गोष्टी होत्या. असे असूनही राज्य ही कल्पना ज्ञात नव्हती. जर ती कल्पना परिचित असती, तर राजकीय प्रबंध व व्यवहार यात दिसून येते त्याप्रमाणे तत्कालीन राजकीय व्यवस्थेविषयीच्या विचारांमध्ये ती आविष्कृत झालेली दिसली असती. सुदैवाने कौटल्याचे अर्थशास्त्र या ग्रंथात हे लोक व हा काळ यांचा सरळ सरळ आविष्कार झालेला आहे. यावरून राज्याविषयीच्या मौर्यकालीन कल्पना दर्शविल्या जातात, असे या काळाच्या इतिहासकारांनी आग्रहाने प्रतिपादन केलेले आहे. तथापि, दोन

पूर्वावश्यक मुलभूत गोष्टींच्या आधारे परीक्षण केले तर या मुद्यांवर हा ग्रंथ उणा पडतो. या ग्रंथानुसार, प्रजेची निष्ठा राज्याशी नसून व्यक्तिशः राजाशी आहे म्हणजे सरकारच्याही वर असणारे व राजाच्या रुपाने प्रतीत होणारे असे राज्य अस्तित्वात नाही. दुसरे असे की त्या विशिष्ट राज्याला साजेल अशी सर्वांत उत्तम पद्धती कोणती हे शोधून काढण्याचा प्रयत्न करताना राजसत्ता, महाजनसत्ता प्रजासत्ताकवाद इत्यादी विविध राजकीय पद्धतींच्या शक्यतेचा विचार हा ग्रंथ करीत नाही, तर सरकारच्या मागची प्रेरक सत्ता या दृष्टीने राजा जास्तीत जास्त चांगले कार्य कसे करू शकेल याविषयीचाच फक्त विचार करतो. अर्थशास्त्रामध्ये राज्याविषयीची भारतीय कल्पना अतर्भूत झालेली आहे असे म्हणणे म्हणजे दुसऱ्या एखाद्या संदर्भात, मॅकिअॅव्हेलीच्या अल प्रिन्सिप या ग्रंथात राज्याविषयीची युरोपीय कल्पना अंतर्भूत झालेली आहे असे म्हणण्यापैकीच आहे. मॅकिअॅव्हेलीने निदान अल प्रिन्सिपच्या मर्यादा तरी जाणल्या होत्या व अ दिसकोर्सीय या आपल्या ग्रंथात राज्याच्या कल्पनेचे बरेचसे विस्तृत परीक्षण त्याने केलेले असून त्याचा एक तपशील म्हणजे हा ग्रंथ, असे तो मानीत असे. एका गुंतागुंतीच्या प्रशासनपद्धतीमधील राजाच्या कार्याचे पृथ्थकरण आणि राजा ज्याच्या आधारे राज्य करू शकेल अशा पद्धती यांच्यापलिकडे कौटल्य गेलेला नाही. नंतरच्या भारतीय सिद्धांतवाद्यांनी कौटल्याला अनुसरून, सरकारच्या पद्धतीची चर्चा करणे आणि सामाजिक रुढींतील बदलांची नोंद ठेवणे ही प्रथा चालू ठेवली. सामाजिक व्यवस्थेत बरोबर काय आणि चूक काय यावरच नेहमी जोर दिला जाई. हे महत्त्वपूर्ण आहे.

इतर बहुतेक संस्कृतींमध्ये निष्ठेचा विषय राज्य आहे तर भारतामध्ये राजकीय कल्पनांच्या विकासातही समाजव्यवस्था हा निष्ठाविषय मानला गेला आहे. जोपर्यंत समाजरचना अभंग राहिली तोपर्यंत सर्वांच्यावर असणारे राज्य, ही कल्पना मान्य होण्यास वा पाठिंबा मिळविण्यास असमर्थ ठरली. भारतामध्ये साम्राज्यरचनेला दीर्घकाळ टिकून राहण्याची आशा का नव्हती याच्या अनेक कारणांपैकी हे एक कारण होते. भारतीय समाजव्यवस्था मंद गतीने बदलली. हा बदल कधीच आकस्मिक नसल्याने त्याची दखल फारच क्वचित घेतली गेली आणि तिच्याविषयीची निष्ठा अढळच राहिली. ब्राह्मणांना बौद्धांच्या विरूद्ध जो राग होता तो बहुधा धार्मिक राग नसावा कारण एक धर्म म्हणून बौद्धधर्म हा ब्राह्मणी विचारांपेक्षा अत्यंत भिन्न होता असे नव्हते. परंतु तो राग सामाजिक असावा कारण बौद्धधर्मामुळे समाजव्यवस्था ढासळली गेली असती व त्यातून निष्ठांची नवी विभागणी निर्माण झाली असती.

ध्येयवादाच्या दृष्टीने पाहिले तर कोणत्याही हिंदूच्या जीवनाला धर्म, अर्थ आणि काम (कायदा, कल्याण व समाधान) ही तीन तत्त्वे आकार देतात. धर्म याचा अर्थ पवित्र नियमांचे पालन करणे आणि या नियमांनुसार असलेल्या आज्ञांचे पालन करण्यास मदत करणे. हे नियम म्हणजे कोणत्याही एका विशिष्ट राज्याच्या नागरिकांवर राज्य करणारा कायदा नव्हे तर सामाजिक रुढी व समाजव्यवस्था टिकवून धरणारे नियम. हिंदु समाजाला मिळणारी मान्यता धार्मिक आधारांमुळे मिळते ही वस्तुस्थिती तो समाज नेहमीच आवर्जून सांगत आलेला आहे. पाश्चात्य विचारांचा प्रभाव पडण्यापूर्वी, जातिसंस्थेचा उद्‌भव निरपवादपणे अलौकिक गोष्टीतून झालेला होता असे वर्णन हिंदु सिद्धान्तवादी (धर्मशास्त्रज्ञ) शतकानुशतके करीत आलेले होते. त्याचप्रमाणे मनु या विधि-संहिताकाराच्या अंगी दैवी शक्ती होती असे मानीत आलेले होते. ही परिस्थिती चिनमधील परिस्थितीशी तुलना केली तर अत्यंत विरुद्ध प्रकारची आहे. उदाहरणार्थ, तेथे सामाजिक नीतिमत्ता व धर्म यांमध्ये भेद करण्यात आलेला होता व कन्फ्यूशिअसचे अगदी सगळ्यात कट्टर अनुयायीही त्याला मर्त्य मानीत होते.

मौर्यकालीन भारतातील राष्ट्रीय ऐक्याचा अभाव आपल्याला इतर घटकांवरूनही पाहता येतो. राजकीय दृष्टया भारतीय ऐक्याची कल्पना अस्तित्वात नव्हती. ग्रीकांसारख्या तिरस्कृत म्लेंच्छांचा प्रतिकार करताना सुद्धा त्यात संघटितपणा नव्हता यावरून हे स्पष्ट होते. आपला नव्याने मिळविलेला प्रदेश गमावावा लागेल या भीतीने स्थानिक राज्यकर्त्यांकडून हा प्रतिकार झाला. जेव्हा पोरस अलेक्झांडरबरोबर लढा देत होता किंवा जेव्हा सुभागसेन अँटिओकसला खंडणी देत होता तेव्हा ते वायव्य भारतातील एकेकटे राज्यकर्ते म्हणून त्या गोष्टी करीत होते हे महत्त्वाचे आहे. पाटलीपुत्राकडून त्यांना मदत मिळाली नाही इतकेच नव्हे तर तिरस्कृत यवनांना ते प्रतिकार करीत होते याचा उल्लेखही भारतीय ग्रंथांमध्ये नाही. पोरससारख्या वीरपुरुषाने शत्रू असूनसुद्धा ग्रीकांकडून वाहवा मिळविली. परंतु भारतीय ग्रंथांमध्ये त्याची दखलच घेतलेली नाही. मौर्य-साम्राज्यामधील लोकसमूहांमध्ये मुलभूत राजकीय ऐक्य नसल्यामुळे राजकीय विघटन होणे अपरिहार्य होते.

हे विघटन आणि राष्ट्रीय ऐक्याचा अभाव यांना जबाबदार असणारे इतर महत्त्वाचे घटक म्हणजे जमिनीची मालकी व आर्थिक पातळयांची असमानता.

प्रत्यक्षात जमिनीची मालकी राजाकडे असल्यामुळे तिची मशागत करणारे अधिक सहजपणाने बदलू शकत असत. जमिनीची विभागणी आणि वाटणी करण्यासाठी कोणाचीही मान्यता घेण्याची गरज नव्हती जर ती राज्याची जमीन म्हणून मानली असती तर मालकी हक्क वारंवार बदलण्याचा प्रश्न फारसा उद्‌भवला नसता. मौर्यांच्या विस्तृत साम्राज्यात काही लहान लहान क्षेत्रे अशी होती की ती आपापल्या साधनसंपत्तीचा विकास करीत होती, परंतु उत्पादन व उत्पन्न यांच्या आर्थिक पातळ्यांमधील फरक अर्थातच फार मोठा होता. गंगेच्या खोऱ्यातील प्रदेश आपल्या सुपीकतेमुळे उत्तर दख्खनमधील कमी विकसित झालेल्या प्रदेशांपेक्षा आर्थिकदृष्ट्या फारच संपन्न होता. या दोन प्रदेशांमधील अर्थव्यवस्थांमध्ये बराच फरक होता. गंगेच्या खोऱ्यातील अर्थव्यवस्था कृषिप्रधान पण त्याबरोबर व्यापारी हितसंबंधांची वाढ होत असलेली अशी होती तर उत्तर दख्खनमध्ये भटकी, पशुपालनावस्था असलेली अर्थव्यवस्था होती व थोडीशी नैमित्तिक शेती आणि व्यापार होत असे.

अशा विविध अर्थव्यवस्थांमुळे कोणते आर्थिक फायदे मिळतात हे मौर्य-प्रशासनास समजावयास नुकतीच सुरुवात झालेली होती असे अर्थशास्त्रावरून स्पष्टपणे दिसते. उत्तरेकडील अर्थव्यवस्थेचा प्रशासकांना जास्त चांगला परिचय होता. कारण विचारवंतांनी त्या पद्धतीकडे अधिक लक्ष दिलेले होते. अधिक फायदा मिळविण्याच्या दृष्टीने जर दक्षिणेकडील प्रदेशांच्या अर्थव्यवस्थेचा विकास कटाक्षाने घडवून आणला असता तर साम्राज्यात सर्वतंत्र आर्थिक सारखेपणा निर्माण होणे शक्य झाले असते.

सांस्कृतिक विकासाच्या दृष्टीनेही या उपखंडातील लोक समान पातळीवर नव्हते हे स्पष्ट आहे. अधिकाधिक सुशोभित नगरे व व्यापारी केंद्रे आणि एकाकी ग्रामसमुदाय यांच्यात फार मोठा विरोध दिसतो. वेगवेगळ्या भागांमध्ये वेगवेगळ्या परंपरा होत्या व शेकडो वर्षांची मान्यता सामाजिक रुढींना मिळालेली नसल्याने त्या अजून स्थानिक स्वरुपाच्याच होत्या. विसाव्या शतकातील भारतात गेली कित्येक दशके समानता आणण्याची प्रक्रिया चालू असून सुद्धा सांस्कृतिक असमानता हे भारताचे डोळ्यात भरण्याजोगे वैशिष्ट्य आहे. मौर्यकालीन भारतातील स्थिती निश्चितपणे याहून अधिक वाईट असणार. प्रत्येक प्रदेशातील आर्थिक व राजकीय रचनाच भिन्न भिन्न होत्या असे नव्हे तर तेथे बोलल्या जाणाऱ्या भाषाही वेगवेगळ्या होत्या आणि आपल्या साम्राज्यात सर्वत्र प्राकृत भाषेचा वापर करून राष्ट्रीय ऐक्याच्या सुप्त उदयाला मदत करण्याचा अशोकाने

प्रयत्न केलला होता हे जरी खरे असले तरी वायव्य भारतातील ग्रीक व ॲरेमिक बोलणाऱ्यांपासून ते दक्षिणेकडील तामिळ बोलणाऱ्या लोकांपर्यंत जे वैविध्य होते, ते या ऐक्याच्या आड येणारा एक गंभीर अडसर होऊन राहिलेले असले पाहिजे.

शतकानुशतकांमधील मगधाची जीवनपद्धती हीच संपूर्ण उपखंडात प्रचलित होती हे गृहीत धरणाऱ्या काही इतिहासकारांनी यापूर्वी भारताच्या इतिहासाच्या अभ्यासाची हानी केलेली आहे. या दृष्टिकोनामुळे, पृथक्करण करताना फार दूरवर असणाऱ्या भागातील विशिष्ट परिस्थितीचे मूल्यमापन करण्यात ते अनेक वेळा अयशस्वी ठरतात. भारताचा इतिहास हा एका उपखंडाचा इतिहास आहे याच पद्धतीने त्याच्याकडे पाहिले पाहिजे आणि इतिहासाचा योग्य अभ्यास करताना प्रासंगिक नातेसंबंध इतके अत्यावश्यक आहेत की भारताच्या प्रत्येक भागात त्यांचा शोध घेतला गेला पाहिजे. थोड्या व्यक्तींच्या हातात संपूर्ण सत्ता असणारे असे अतिशय अवजड प्रशासन आणि कोणत्याही प्रकारच्या राष्ट्रीय जाणिवेचा अभाव यांमध्ये प्रामुख्याने मौर्यांच्या ऱ्हासाची कारणे आहेत. ही आणि इतर कारणे कदाचित मगधात ताबडतोब दृगोचर झाली नसतील पण संपूर्ण मौर्यसाम्राज्याचे व्यापक चित्र जेव्हा डोळ्यापुढे उभे राहते तेव्हा ती पुराव्यानिशी स्पष्ट दिसतात.



# निष्कर्ष

'बाबिलोनियन आणि इजिप्शिअन, हिब्रू आणि हिंदू, इराणी, ग्रीक आणि रोमन त्याचप्रमाणे ट्यूटन्स व इतर या सर्व सुधारलेल्या प्रमुख राष्ट्रांनी आपल्या प्रारंभिक अवस्थेमध्ये आपल्या राष्ट्रपुरुषांचा, पुराणकथांमधील राजपुत्र व राजे, धर्मसंस्थापक, राजघराणी, साम्राज्ये किंवा नगरे यांचा अनेक काव्यमय कथांमधून व आख्यायिकांमधून गौरव करण्यास सुरुवात केली.'[1] या राष्ट्रपुरुषांचा संप्रदाय आजतागायत सर्व समाजांमध्ये चालत आलेला आहे. त्यांचे निर्मूलन करण्याचा प्रयत्न करणे हे इतिहासकाराचे काम नाही तर आख्यायिकांसारख्या साधनांमधून या संप्रदायविषय झालेल्या पुरुषांचा खरा इतिहास पारखून घेणे हे त्याचे काम आहे. अशा संप्रदायांच्या वाढीवर, विशेषतः, भूतकाळाशी जे संबधित आहेत त्यांच्या वाढीवर जागरूक नजर ठेवणे आणि पुराणकथा जेव्हा त्यांचा अवाजवी प्रमाणावर दावा सांगतात किंवा त्या विपर्यस्त होतात त्यावेळी चिकित्सक माहितीची त्यात भर घालणे, ही इतिहासकाराची नैतिक जबाबदारी आहे असे निश्चितपणे म्हणता येईल. आपल्या संस्कृतीमधील इतिहासकालीन उदाहरणांचा भाष्यकार असे इतिहासकाराचे खास महत्त्व असल्यामुळे, वस्तुनिष्ठतेचा दावा करताना त्याने या संप्रदायात सामील होण्याचे टाळले पाहिजे. आपल्या हेतूचे सातत्याने आत्मपरीक्षण करून, आपल्या समाजातील पूर्वग्रहांचे, ज्यांतूनच साधारणपणे त्याचे स्वतःचेही पूर्वग्रह तयार होतात आणि ज्यांतून अनेक लोकप्रिय पुराणकथांचा जन्म होतो, त्यांचे पृथक्करण करून त्याला हे उत्तम तऱ्हेने करता येणे शक्य आहे.

या ग्रंथामध्ये आम्ही एकूण इतिहासाच्या भव्य चित्रात, भारतातील इ. स. पू. तिसऱ्या शतकाच्या पार्श्वभूमीवर अशोकाचे स्थान कोणते ते ठरविण्याचा आणि त्याचप्रमाणे कालाच्या दृष्टीने इतक्या दीर्घ अंतरावरून जितका शक्य आहे तितका अशोक एक माणूस व अशोक एक सम्राट या दोहोंमधील फरक दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. ऐतिहासिक घटनेचा संदर्भ हा घटनेइतकाच महत्त्वाचा असतो कारण तिचा उद्भव त्यातूनच होत असतो. अशोक आणि मौर्यकाल यांचा अभ्यास करताना आम्ही हा दृष्टिकोन स्वीकारलेला आहे. हा दृष्टिकोन महत्त्वाचा आहे असा आमचा विश्वास आहे. कारण

---

१. रँक, दि मिथ ऑफ दि बर्थ ऑफ दि हिरो, पृ. ३.

दुर्दैवाने वर्तमानकालीन संस्थांना ज्या गुणांची आवश्यकता आहे ते गुण अनेक प्रसंगी भूतकालीन संस्थांना चिकटविले जातात व त्यामुळे ऐतिहासिक संशोधनातील तथ्य डावलले जाते. मौर्यकाल म्हणजे राजकीय दृष्टया विकेंद्रीकरणाचा काळ व व्यक्तींच्या दृष्टीने लोकशाहीचा काळ अशी एक चुकीची कल्पना लोकप्रिय आहे. उलट, आपण पाहिलेले आहे त्याचप्रमाणे वस्तुत: मौर्यकाल म्हणजे केंद्रीकरणाची सुरूवात होती व व्यक्तीच्या स्वातंत्र्याला फारशी मुभा मिळणार नाही अशा प्रकारच्या समाजव्यवस्थेचा विजयही या काळाने पाहिला. लोकशाही व व्यक्तिवाद या ध्येयांनी काही मौर्यकालाला स्फूर्ती दिली नाही आणि ती ध्येये शोधण्यासाठी आपल्याला भारतीय इतिहासामध्ये इतरत्रच पाहिले पाहिजे.

'ग्रीक चमत्कार' म्हणून ज्याचे वर्णन केले जाते, त्याचा प्रभाव अनेक शतके भारतीय इतिहासाच्या युरोपीय विद्वानांवर पडलेला आहे. ग्रीक संस्कृतीच्या श्रेष्ठतेवर इतका अवाजवी भर देण्यात आलेला आहे की इतर काही संस्कृतींच्या लोकांमध्ये एक दुर्दैवी हीनगंड निर्माण झालेला आहे. याचे अगदी साहजिकपणेच झालेले पर्यवसान म्हणजे ग्रीकांच्या वर्चस्वाखाली आलेल्या संस्कृतीमधील आणि ग्रीकेतर संस्कृतीमधील मूल्ये अगदी सारखीच होती असे सिद्ध करण्याचा प्रयत्न. परंतु प्रत्येक संस्कृतीला आणि प्रत्येक सुधारणेला स्वत:चा म्हणून 'चमत्कार' असतो असे प्रगतशील संशोधन दाखविते व तो उलगडून दाखविणे हाच ऐतिहासिक तपासणीचा हेतू आहे. हा हेतू प्रत्येक संस्कृतीमधील समान मूल्ये शोधून काढण्याचा प्रयत्न करून साध्य होणे शक्य नाही तर प्रत्येक संस्कृतीमधील महत्त्वाची मूल्ये तिच्या स्वत:च्या संदर्भात दाखवून देण्याने साध्य होऊ शकेल. यासाठी ज्या पद्धतीने साध्य झालेली उद्दिष्टे जाहीर केली जातात त्याच पद्धतीने उणिवांचीही कबुली देण्याकरिता अतिशय प्रामाणिकपणाची गरज आहे.

आजच्या भारतात, लोकमानसात एक संप्रदाय निर्माण करण्याइतके यश अशोकाच्या प्रतिमेने मिळविलेले आहे. अहिंसा आणि पंचशील धोरण यांसारख्या संकल्पनांचा संबंध त्याच्या कल्पनांशी जोडण्यात आलेला आहे. जाणीवपूर्वक अहिंसा आणि राजकीय व धार्मिक श्रद्धांबाबतची सहिष्णुवृत्ती यांची अशोकापासून सुरू झालेली एक दीर्घ राजकीय परंपरा शतकानुशतके अखंडितपणे चालत आलेली आहे आणि तिचा परमोच्च बिंदू गांधींच्या राजकीय तत्वज्ञानामध्ये गाठला गेला आहे असे वाटते. राजा म्हणून अशोकाने केलेले कार्य भारताचा इतिहास व विचार यांमधून संपूर्णपणे पुसले गेले होते या

वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष करता येणे शक्य नाही. अशोकाच्या कल्पनांचे राजकीय मूल्य भूतकाळाच्या विस्मृतीत यशस्वीपणाने गाडले गेले. त्याने ज्या लिपीत आपले आज्ञालेख कोरलेले होते ती लिपी पुढील शतकांमध्ये जितकी गूढ राहिली तितकेच गूढ असे अशोकाचे नाव राजघराण्यांमधील राजांच्या यादीमध्ये भारतीय लौकिक ग्रंथांमध्ये राहिले. फारसे महत्त्वाचे नसलेले काही थोडे मध्ययुगीन कोरीव लेख अशोकाचा उल्लेख करतात. परंतु राजकारणाच्या परिभाषेत ज्याला प्रथेपेक्षा वेगळे धोरण म्हणता येईल त्या धम्माशी असलेले अशोकाचे साहचर्य कोठेही नोंदले गेले नव्हते. पुढील काळातील कोणत्याही दर्जाच्या राजाने आपल्या धोरणाचा आधार म्हणून या तत्त्वांचा जाणीवपूर्वक स्वीकार करण्याचा प्रयत्न केला नाही. अशोकाच्या ब्राह्मी लिपीचा पद्धतशीर अभ्यास पुढच्या शतकांमधून चालू राहिला असता तर त्याच्या धोरणाच्या नोंदीचें संरक्षण केले गेले असते.

एक धर्मवेडा, आत्यंतिक दुष्टपणाकडून आकस्मिकपणे आत्यंतिक पावित्र्याकडे वळण्याइतका बदल झालेला आणि धर्मानुयायी नसलेल्यांकडून प्रसंगी ज्याला यातना सहन कराव्या लागतात असा अशोक बौद्धसाहित्यामध्ये दिसतो. आणि कोणत्याही धर्मातील साधुसंत व धर्मनिष्ठ माणसे यांचे जीवन आणि कार्य यांच्या बाबतीत असा विचार केला जाणे ही गोष्ट काही अपरिचित नाही. अशोकाचे कोरीव लेख व स्तंभ असून सुद्धा त्याच्याविषयीच्या काही कथा किंवा आख्यायिका जनमानसात टिकून राहू शकल्या नाहीत. आजकाल दिसणाऱ्या या संप्रदायाचा उगम अगदी अलिकडचा आहे. विशेष चमत्कारिक भाग असा की काही अशोक स्तंभाचा उपयोग पुन्हा प्रागैतिहासिक काळासारखा होऊ लागलेला आहे. लिंग म्हणून त्यांची पूजा होत आहे. जर इतक्या दूरवरच्या भविष्यकाळात अशोक पाहू शकला असता तर त्याच्या याविषयी काय प्रतिक्रिया झाल्या असत्या हा प्रश्नच आहे.

बौद्धग्रंथांवर विश्वास ठेवावयाचा असेल तर तेथे अशोक जसा बौद्धधर्माकडे वळलेला दयाळू धर्मांतरित दिसतो तसा तो राजा या भूमिकेतून दिसत नाही, हे त्याच्या आज्ञालेखांमधून स्पष्टपणे दिसते. आपल्या कारकिर्दीच्या पूर्वार्धात त्याने नक्कीच सहिष्णुता आणि मानवतावाद यांचा आग्रह धरला आणि त्या गोष्टी बौद्धधर्माशी विसंगत नव्हत्या; परंतु या गोष्टी म्हणजे, अशोकाला आपल्या प्रजाजनांमध्ये जी निःपक्षपाती वृत्ती जोपासण्याची इच्छा होती तिच्याशी संबंधित असलेला जास्त करून वैयक्तिक आविष्कार होता माणसांचे स्वभाव बदल-

ण्यात आपल्याला यश आले आहे या कल्पनेमुळे हळूहळू त्याचा मानवतावाद कसा झाकोळला जाऊ लागला, आपल्या कारकिर्दीच्या शेवटी या यशाविषयी अवास्तव विश्वास वाढल्यामुळे तो आपल्या अहंपणाचा कसा बळी ठरला हे आम्ही धम्मविषयक धोरण या प्रकरणामध्ये दाखविलेले आहे.

इ. स. पू. तिसऱ्या शतकात भारतातील सामाजिक व आर्थिक परिस्थिती अशी होती की अशोकाने विवक्षित धोरण राबविण्याचा प्रयत्न करणे हे अगदी साध्य होण्याजोगे होते. पशुपालनावस्थेतील अर्थव्यवस्थेकडून कृषिप्रधान, ग्रामीण अर्थव्यवस्थेकडे संक्रमण होत असताना नव्या परिस्थितीबरोबर मेळ घालण्याची गरज निर्माण झाली. हा मेळ घालताना, सामाजिक जबाबदारीत वाढ होण्याची गरज, यासारख्या अधिक महत्त्वाच्या अंगावर धम्माने जोर दिला. एका शांततामय काळात हा बदल घडून आला हे प्रामुख्याने अशोकाचे श्रेय आहे. युद्धापासून मुक्त असा तीस वर्षांचा एक कालखंड हेच मुळात काही कमी महत्त्वाचे यश नाही व त्या कालखंडामुळेच नव्या सामाजिक व आर्थिक मूल्यांचा, तौलनिक दृष्टया अधिक स्पष्ट उमज पडला असला पाहिजे.

आपल्या कल्पनांच्या प्रसारणासाठी अशोकाने ज्या मार्गांचा अवलंब केला होता तो सामाजिक–धार्मिक स्वरुपाचा होता हे धम्माच्या अभ्यासावरून स्पष्ट होते. या नव्या कल्पनांबरोबरच त्यांचे बौद्धधर्माशी असलेले साहचर्य, ही गोष्ट काही अंशी तो स्वत: व्यक्तिश: बौद्धधर्मीय होता आणि बौद्धधर्म या कल्पनांच्या विरुद्ध नव्हता या वस्तुस्थितीमुळे होती यात शंका नाही. परंतु राजकीय व आर्थिक बदलांच्या या काळाला साजेसा व समकालीन कल्पनांना तौलनिक दृष्टया नवा असलेला हा धर्म स्वीकारण्यातील स्पष्ट असणाऱ्या फायद्यांमुळेही हे साहचर्य होते. इतर अनेक सम्राटांनीही मोठ्या प्रभावी पद्धतीने या दुसऱ्या पद्धतीचा अवलंब केलेला आहे. उदाहरणार्थ इजिप्तचा अख्नाटन, किंवा डरायसकडून झरतृष्ट्राच्या धर्माचा अंगिकार, पहिल्या शापूरकडून मॅनिकॅझमचा स्वीकार आणि अकबराकडून दीन–इ–इलाहीचा अंगिकार. अशाच राज्यकर्त्यांपैकी एक राज्यकर्ता चीनमधील शि हुआंग टि. भूतकाळाशी असलेला संबंध संपूर्णपणे तोडण्याचा त्याचा आग्रह होता व त्या बाबतीत काही वेळा त्याचा अतिरेक झालेला होता. याच्याबरोबरही ही कल्पना निगडीत झालेली आहे. तथापि, आपल्या सर्व प्रजाजनांनी बौद्धधर्मात सामुदायिक धर्मांतर करावे अशी मागणी तर अशोकाने केली नाहीच परंतु सामाजिक वर्तनात मानवतावादाचा जाणीवपूर्वक अंगिकार व्हावा याचा आग्रह धरला आणि अशाप्रकारे त्याने संकुचित धार्मिक सहजप्रवृत्तींना आवाहन

केले नाही तर सामाजिक जबाबदारीच्या अतिशय व्यापक व तात्कालिक भावनांना आवाहन केले हे महत्त्वाचे आहे.

तत्कालीन राजकीय व्यवस्थेच्या संदर्भातही धम्माच्या विकासाचा विचार केला पाहिजे. इ. स. पूर्व तिसऱ्या शतकात भारत हा काही एक राष्ट्रीय घटक नव्हता. तरीही केंद्रित राजसत्तेचा राज्यकारभार तेथे चालू होता आणि प्रशासनपद्धती केंद्रीय नियंत्रणाखाली होती. जर या राज्यव्यवस्थेस यश यावयास हवे असते तर तत्कालीन, बहुविध संस्कृती असलेल्या समाजात काही ना काही राष्ट्रीय घटक असणे आवश्यक होते. धम्म हा निश्चितच एक असा जीवनमार्ग होता की सांस्कृतिक विकासाच्या कोणत्याही पातळीवर तो स्वीकारण्याजोगा होता आणि त्याचा स्वीकार ही एक संपूर्ण देशाला एकत्रित बांधून ठेवणारी प्रेरणा म्हणून चांगले कार्य करू शकली असती. या दृष्टीने अठरा शतकानंतर अकबराने केलेल्या प्रयत्नांची अशोकाच्या प्रयत्नांशी चांगली तुलना करता येण्याजोगी आहे.

खुले कराररमदार व सट्टेबाजीचा व्यवहार यांच्या रुपाने व्यापाराच्या विकासास हा कालखंड अतिशय फायदेशीर ठरला. कार्यक्षम प्रशासन म्हणजे चांगल्या दळणवळणाची सुव्यवस्था आणि व्यापार सुधारण्यासाठी तिची अत्यंत गरज होती. तीस वर्षांच्या या शांततेच्या काळात झालेल्या व्यापाराच्या विकासाला नजीकच्या पुढच्या शतकांमध्ये भरघोस फळे आली. अशोकोत्तर काळात जरी राजकीय ऱ्हास झाला तरी आर्थिक विकासाच्या दृष्टीने सुधारणा झालेली होती हे पुरातत्वीय अवशेषांनी प्रामुख्याने दाखवून दिलेले आहे ही वस्तुस्थिती लक्षात घेणे महत्त्वाचें आहे. अशोकाच्या कारकिर्दीतील स्थैर्य या गोष्टीस बऱ्याच अंशी कारणीभूत होते.

अशोकाच्या ज्या काही व्यक्तिगत उणीवा होत्या त्या त्याच्या अखेरच्या वर्षांमध्ये उघड झाल्या असल्या तरी इ. स. पू. तिसऱ्या शतकामधील भारतातील विशेष प्रकारच्या गुंतागुंतीच्या सांस्कृतिक परिस्थितीमध्ये अशोकाने ज्या धैर्याने धम्माचे विवरण करण्याचा व तो लागू करण्याचा प्रयत्न केला, त्याचा आपण विचार केला तर त्याच्याविषयी अतिशय कौतुक वाटते. तत्कालीन धार्मिक ग्रंथ आपल्या धर्माविषयी व आपल्या पूर्वजांविषयी माणसाचे कर्तव्य काय यावर जोर देत होते. यांमध्ये अशोकाने आणखी एका कर्तव्याची, कदाचित अत्यंत महत्त्वाच्या कर्तव्याची भर घातली. ते म्हणजे सहाव्या शिलाशासनात त्याने व्यक्त केले आहे ते आपल्या बरोबरच्या मानवांविषयीचे कर्तव्य.

जेव्हा आणि जेथें शक्य आहे तेथे अशोकाने धरलेल्या अहिंसेच्या आग्रहामध्ये त्याचा मानवतावाद नाही तर आपल्या सुरवातीच्या आज्ञालेखांमध्ये तो कृतीमधील सौम्यतेची शिकवण देतो त्यावेळी त्याने जो जबाबदार सामाजिक वर्तनाचा आग्रह धरला आहे त्यात आणि त्याला असलेल्या मानवी मर्यादांच्या जाणिवेमध्ये त्याचा मानवतावाद आहे. त्याने माणसाच्या प्रतिष्ठेचा सातत्याने आग्रह धरलेला होता हे त्याचे आज्ञालेख वाचल्यानंतर स्पष्ट होते. त्यात काहीतरी दिव्य नक्की आहे आणि माणसामध्ये मिसळण्यासाठी देव पृथ्वीवर येतात पण तेही मानवी पातळीवर.

तरीही त्याच्या मृत्यूनंतर लवकरच भारतीय परंपरेत फारशा खुणा न ठेवता त्याचा धम्माचा प्रयोग संपुष्टात आला. त्याच्या आज्ञालेखांतील मजकुराचा उलगडा होऊन ही कल्पना उजेडात येईपर्यंत व त्याच्या लेखकाविषयं चे कुतूहल परत जागृत होईपर्यंत तो प्रयोग सुमारे दोन हजार वर्षे दुर्लक्षित राहिला. ख्मेर राजा सातवा जयवर्मन याने बाराव्या शतकाच्या अखेरीस, अशोकाने ज्या कल्पनांचे विवरण केले होते तशाच कल्पना जारी करण्याचा कांबोडियात प्रयत्न केला तेव्हा सुद्धा त्याला आपल्या या पूर्वजाविषयी ज्ञान नव्हते. काळाचे इतके प्रदीर्घ अंतर पडल्यानंतर धम्माच्या अपयशाची नेमकी कारणे निश्चितपणे समजणे आज शक्य नाही. आम्ही फक्त इतकेच सुचवितो की, अशोकाच्या उत्तरकालीन आज्ञालेखावरून असे दिसते की धम्माच्या संस्थापकाचा अफाट उत्साह, ज्यांना त्याची झळ लागली त्या व्यक्तींच्या पातळीवर धम्माविरुद्धची प्रतिक्रिया निर्माण करण्यास कारणीभूत ठरला. हे आज्ञालेख आणि धम्म-महामत्तांचे अधिकार यांमधून कल्पनांच्या बाबतीतही लष्करी शिस्त लावणे व बुद्धिमत्तांच्या अधिकारावर कुरघोडी करणे अशी दोन्ही प्रकारची प्रवृत्ती सूचित होते. यामुळे धम्माची ताकदच कमी झाली असे नव्हे तर कल्पनांच्या कोणत्याही प्रगतीमध्ये या प्रवृत्तींनी अडथळा आणण्याचे काम केले. त्याचप्रमाणे अशोकाच्या अती उत्साहामुळे धम्म ही फक्त व्यक्तिगत श्रद्धा आहे असा चुकीचा अर्थ त्याच्या वारसांनी घेतलेला असण्याचीही अगदी शक्यता आहे आणि त्यामुळे, मूलतः त्याला जे सामाजिक व मानवतावादी महत्त्व होते त्याची जाणीव होण्यास त्यांना प्रतिबंध झाला.

अशोकाच्या व्यक्तिमत्वास प्रामुख्याने जबाबदार असणाऱ्या पार्श्वभूमीचे परीक्षण केल्यानंतर, अशोक ज्या संस्कृतीमधील होता ती संस्कृती आणि तिच्या वेगाने बदलणाऱ्या गरजा यांची समज येण्यासाठी त्याचे स्वतःचे प्रयत्न व त्याच्या भोवतालची परिस्थिती या दोनही दृष्टींनी तो सज्ज होता व या गुणवैशिष्ट्याला

असामान्य प्रतीच्या ध्येयवादाची जोड मिळाली होती या वस्तुस्थितीमध्ये अशोकाचा मोठेपणा आहे, हें आमचे सुरवातीचे अनुमान आम्ही परत ठासून सांगत आहोत. समकालीन परिस्थितीमध्ये प्रयोग करून त्यातून असामान्य उपाय शोधून ते राबविण्यासाठी आवश्यक असणारे धैर्य त्याला या दोन्ही गुणांनी दिले.



# पहिले परिशिष्ट

## अर्थशास्त्राचा काल

अर्थशास्त्राचा काल कोणता, या प्रश्नावर आधीच खूप मोठ्या प्रमाणावर लिखाण झालेले आहे. सूचित केलेले काळ हिंदु इतिहासातील मौर्यकाळ व गुप्तकाळ यांच्यामध्ये पडतात. या परिशिष्टामध्ये या ग्रंथाचा काळ ठरविण्यासाठी करण्यात आलेल्या विधानांचा थोडक्यात परामर्ष घेण्याचा आणि या विषयावर आमची स्वत:ची मते मांडण्याचा मानस आहे

या ग्रंथाच्या, शामशास्त्री यांच्या इंग्रजी भाषांतराच्या आपल्या परिचयात्मक टीपेमध्ये फ्लीट असे म्हणतात की, या ग्रंथाची आर्ष शैली, त्यातील मजकूर आणि प्राचीन भारतीय लेखकांनी त्यातून घेतलेली अवतरणे ही लक्षात घेता हा ग्रंथ प्राचीन असावा यावर विश्वास ठेवावासा वाटतो.[1] राजपद आणि सरकार याविषयींची एक नियमावली या दृष्टीनें या प्रकारचा पहिलाच व्यावहारिक मार्गदर्शक ग्रंथ म्हणून याचा चांगला उपयोग झाला असला पाहिजे पुढे फ्लीट म्हणतात त्याप्रमाणे मेगॅस्थिनिसच्या वृत्तांतातील परिच्छेदांशी आणि प्राचीन कोरीव लेखांशी त्याचा मेळ बसतो. अनेक विधाने करून शामशास्त्र्यांनी हा ग्रंथ प्राचीन असल्याचा दावा उचलून धरला आहे. या ग्रंथाच्या शेवटच्या अध्यायात एका श्लोकामध्ये कौटल्याने नंदांचे उच्चाटन केल्याचा व त्याचे दुसरे नाव विष्णुगुप्त असल्याचा उल्लेख आहे असे एक समर्थन त्या विधानांमध्ये आहे[2] याशिवाय याज्ञवल्क्याने कौटल्याचे अनुकरण केलेले आहे व त्याच्यापासून उसनवारीही केलेली आहे. व्याकरणाच्या ज्या रुपांवर पाणिनीने जोर दिलेला आहे त्यांच्याशी कौटल्य अपरिचित असल्याचे दिसते. कौटल्याची शैली, उपनिषदे आणि ब्राह्मणे यांच्या जवळची आहे आणि शिवाय कौटल्याने वर्णन केलेल्या समाजाची पद्धती जरी मौर्यपूर्व नसली तरी मौर्यकालीन निश्चितच आहे, या कल्पनांवर वरील विचारसरणी आधारलेली आहे.

---

१. अर्थशास्त्र (भाषा. शामशास्त्री), प्रस्तावना, पाचवी आवृत्ती.

२. उपरोक्त, पृ. सात–तेहेतीस, कौटिल्य हे नाव व त्याची व्याकरणाच्या दृष्टीने व्युत्पत्ती याविषयी बरीच चर्चा झालेली आहे. (जॉली, अर्थशास्त्र ऑफ कौटल्य पृ. १–४७; काणे, जेबीओआरएस, व्हॉ. सात, १९२६) आमचे असे मत आहे की हे नाव कौटिल्य असे नसून कौटल्य असे आहे आणि ते त्याच्या कुटल या गोत्रावरून पडलेले आहे.

कृष्णराव यांनीही या प्रश्नाची चर्चा केलेली आहे व त्यांच्या मते अर्थशास्त्र हा ग्रंथ मौर्यकालीन आहे.[1] तथापि कौटल्यांने पुरस्कारलेल्या धोरणाशी अशोकाच्या धोरणाशी सांगड घालण्याचा प्रयत्न करणारे त्यांचे मुख्य विधान खात्री पटवून देणारे नाही. कृष्णराव यांनी केलेले पुढचे एक विधान म्हणजे, अश्वघोषाने कौटल्याचा उल्लेख केला आहे. यावरून त्याला अर्थशास्त्र माहित असावे असे ते सुचवितात. हे समर्थन दुबळे आहे कारण त्यात ग्रंथाचा उल्लेख नाही तर फक्त कौटल्याचा उल्लेख आहे. अश्वघोषाचा काळ साधारणत: दुसऱ्या शतकाच्या नंतरचा मानला जात नाही.

जॉली आणि जयस्वाल या दोन प्रमुख विद्वानांनी या चर्चेसाठी भरपूर वेळ व श्रम खर्ची घातले आहेत. हा ग्रंथ इसवी सनाच्या तिसऱ्या शतकातील किंवा त्याच्याही नंतरचा आहे असे मत जॉली यांनी प्रतिपादन केले आहे.[2] जयस्वाल यांनी त्यांच्या बऱ्याचशा विधानांचा समर्थपणाने समाचार घेतलेला असल्याने आम्ही त्यांचा सविस्तर विचार करणार नाही. ते म्हणतात की, कौटल्य हाच अर्थ-शास्त्राचा लेखक व इ. स. पू. चौथे शतक हाच या ग्रंथाचा काळ[3] एका मुद्याच्या बाबतीत मात्र जयस्वाल खात्रीलायक पुरावा देऊ शकलेले नाहीत; व तो म्हणजे या ग्रंथात वापरण्यात आलेली चीनपट्ट ही संज्ञा. साधारणपणे तिचा अर्थ रेशमाचे कापड (चीनमधील) असा केला जातो. भारतामध्ये चिनी रेशमी कापडाची आयात पूर्व भारताच्या बाजूने बऱ्याच पुढच्या काळातील असल्याचे निदर्शक म्हणून अनेक वेळा चीनपट्टचा उल्लेख उद्धृत केला जातो. तथापि, बॅक्ट्रियामध्ये रेशीम वापरले जात होते व ते इ. स. पू. दुसऱ्या शतकाच्या आधी जरी नसले तरी त्या शतकात भारतातून तेथे आयात केले जाई हे सिद्ध करणारा पुरावा आहे.[4] इ.स.पू. १२९च्या सुमारास चँग कैन याला बॅक्ट्रियन लोक चिनी रेशमी कापड वापरीत अस-ल्याचे आढळले व तेथील रहिवाश्यांच्या म्हणण्यानुसार ते भारतातून आलेले होते. शेबुआन प्रांतातून हे रेशमी कापड येत असल्याचा उल्लेख आहे, हा मुद्दा लक्षात घेण्याजोगा आहे. रेशमी किडयांच्या जोपासनेविषयी प्रसिद्ध असलेला भाग म्हणून हा प्रांत नेहमीच ओळखला जातो. गिलगिटमध्ये रेशमाचे उत्पादन होत नव्हते हे

१. स्टडिज़ इन कौटल्य, पृ. अकरा, ६, १०.
२. कौटिल्यम्, अर्थशास्त्रम् पंजाब एस. के. सिरिज, अं. चार, इंट्रोडक्शन.
३. हिंदु पॉलिटी पृ. ३६४, परिशिष्ट सी.
४. स्स-मा-त्सिन, शि-कि १२३, भाषांतरकार हिर्थ. जेओएस व्हॉ. सदतीस, १९१७, पृ. ८९ तळटीप.

यावरून ध्वनित होते. यावरून प्राचीन काळात भारतात रेशीम कापड उपलब्ध होते व ते शेबुआनमधून येत होते हे दिसते. पण नावाचा प्रश्न सुटलेला नाही. चीनपट्ट या संज्ञेतील चीन म्हणजे साधारणत: चिनी साम्राज्याचा उल्लेख असल्याचे मानले जाते व हे साम्राज्य मौर्यसाम्राज्याच्या नंतर अस्तित्वात आले. चीनमधील (चाऊ घराण्याच्या काळातील) शिह व्हँग टी याच्या पूर्वीच्या काळातील एका सरंजामी राज्याचा हा उल्लेख असावा असे एक मत मांडण्यात आले आहे.[१] प्राचीन काळात रेशमी कापडाचा उल्लेख दुसऱ्या एखाद्या नावाने होत असावा आणि या ग्रंथाचे जेव्हा पुनर्लेखन झाले तेव्हा चीनपट्ट ही नंतर घुसडण्यात आलेली संज्ञा आहे.

कौटल्य आणि कालिदास यांच्याविषयीच्या अभ्यासात राघवन असे म्हणतात की, रघुवंशातील काही परिच्छेदांमध्ये (सतरा, ४९, ७६, अठरा, ५०) कालिदासाने अर्थशास्त्रातून उसनवारी केली आहे.[२] यातील काही संज्ञा त्या काळात प्रचलित होत्या याविषयी संदेह नाही आणि अर्थशास्त्रासारख्या आधीच्या ग्रंथावर त्या आधारलेल्या होत्या. कालिदासासारख्या विद्वान माणसांना या संज्ञांचा परिचय असला पाहिजे.

अर्थशास्त्र मुळात पद्यरुपामध्ये लिहिलेले असावे असे डी. आर भांडारकर सुचवितात. कारण ग्रंथाच्या मूळ अंगामध्ये श्लोकांचा उल्लेख केलेला आहे.[३] हे मत जर आपण मान्य केले तर त्याला सूत्ररुप कधी प्राप्त झाले हा प्रश्न उभा राहतो. हा ग्रंथ पद्यरुपात लिहिला गेल्याचा दंडीनने केलेला उल्लेख आणि तो सूत्ररूपात लिहिला गेल्याचा भवभूतीने केलेला उल्लेख भांडारकर उध्दृत करतात म्हणून इ. स. ४०० मध्ये, हा ग्रंथ जेव्हा लोकप्रिय होण्यास सुरूवात झाली तेव्हा, तो सूत्ररूपात लिहिला गेला असे मत भांडारकर मांडतात. मूळ ग्रंथाची रचना पद्यरुपातच झाली असली पाहिजे. अर्थशास्त्राची सर्वात जुनी प्रत कोणत्या रुपात होती हे निश्चितपणाने सांगणे शक्य नाही कारण जुने ग्रंथ पद्यरुपात आणि सुत्ररुपात अशा दोनही रूपांमध्ये अस्तित्वात आहेत. आज उपलब्ध असलेले पद्यरुपातील अर्थशास्त्र व अर्थशास्त्रातील गद्य उतारे यातील कोणते रुप आधीचे आहे हे ठरविण्यासाठी त्यांचा अतिशय तपशीलवार अभ्यास करावा लागेल.

काही जातकांची रचना ज्या काळात झाली त्याच काळात अर्थशास्त्राची रचना झाली, असे अर्थशास्त्रातील काही विभागावरून सूचित होते. दोन्ही

---

१. कोसंबी, इंट्रोडक्शन टु दि स्टडी ऑफ इंडियन हिस्ट्री,पृ २०२.
२. कालिदास अँड कौटिल्य, एआयओसी, तेरावी परिषद, १९४६, नागपूर.
३. एबीओआरआय, व्हॉ. सात, १९२६, पृ. ८२ तळटीप.

ग्रंथात वर्णन केलेल्या आर्थिक जीवनाच्या काही वैशिष्टयांच्या बाबतीत हे विशेष करून लक्षात येते. उदाहरणार्थ श्रेणींची प्रस्थापना. दोन्ही साधनांमध्ये जवळ जवळ सारख्याच असणाऱ्या एका विशेष श्लोकाकडे भांडारकर यांनी लक्ष वेधले आहे.[1] हा श्लोक संपत्तिसंपादनाविषयी आहे. माणसे, संपत्ती व नफा यांच्या विनाशाविषयीच्या अर्थशास्त्रातील प्रकरणाच्या शेवटी हा श्लोक येत असल्याने तो जास्त सयुक्तिक आहे, हा भांडारकरांचा अभिप्राय योग्यच आहे. अर्थशास्त्रातील मजकुराचा परिचय जातकाच्या लेखकाला असावा आणि त्याने तो श्लोक उद्धृत केला असावा. तथापि वर्तमानकालाचा उपयोग करून रचलेले अनेक लोकप्रिय श्लोक विशेष करून दोन्ही ग्रंथात उद्धृत केलेले आहेत, यावरून दोन्ही लेखक एका समान साधनाचा उतारे देण्यासाठी उपयोग करीत होते, ही शक्यताही आपल्याला नजरेआड करता येत नाही.

विटरनित्झ हे स्थूलमानाने जॉली यांच्याशी सहमत आहेत आणि कौटल्याने या ग्रंथाचे लेखन केले असावे की नाही याविषयी त्यांना शंका आहे.[2] कारण राज्याच्या सार्वभौमत्वाचे जे सप्तांगी वर्गीकरण करण्यात आलेले आहे त्याविषयी प्रामुख्याने त्यांना असे वाटते की राजकारण खेळणाऱ्या राजकारणपटूजवळ अशी सूत्रे लिहिण्याइतके पांडित्य असणे कठीण आहे. त्याच्या टीकेला लॉ यानी प्रदीर्घ प्रत्युत्तर दिलेले आहे. मंडळाविषयीचा सिद्धांत सांगण्यासाठी अशा वर्गीकरणाची गरज आहे. नाहीतर आपल्या शेजाऱ्यांची सत्ता तौलनिक दृष्टया निश्चित करणे राजाला शक्य झाले नसते या विधानावर प्रामुख्याने लॉ आपली मते आधारतात.[3] हा ग्रंथ एखाद्या लहान राज्यासाठी लिहिला आहे की मोठ्या राज्यासाठी लिहिला आहे, याविषयीही बरेच वाद झालेले आहेत. चंद्रगुप्ताच्या कारकिर्दीच्या सुरुवातीच्या काळात म्हणजे मौर्यांच्या साम्राज्याचे अजून संपूर्ण संघटन झाले नव्हते त्या काळात हा ग्रंथ मुळात लिहिला असावा असे आम्ही सुचविता. नंदांच्या साम्राज्याची माहिती होती आणि कौटल्याने बहुधा उदाहरण देण्यासाठी त्याचा उपयोग केला आणि मौर्यांचे साम्राज्य पुढील काळात जितके विस्तृत झाले तितके हे साम्राज्य नक्कीच विस्तीर्ण नव्हते. या सुरुवातीच्या काळामुळेच आंतर–राज्यीय संबंधाविषयीचा विभाग लिहिण्याची गरज भासली असावी. मौर्यांच्या साम्राज्या-

---

१. अर्थशास्त्र, चार, ९, जातक, एक पृ. २५८.

२. सीआर, एप्रिल १९२४.

३. सीआर, सप्टेंबर १९२४, पृ. ५१२ तळटीप; नोव्हेंबर १९२४, पृ. २२८ तळटीप; डिसेंबर १९२४, पृ. ४६६ तळटीप.

इतक्या विस्तीर्ण साम्राज्याची संकल्पना भारतीय राज्यव्यवस्थेला अगदी नवी असल्याने कौटल्यासारख्या विचारवंतानेही तौलनिक दृष्टचा लहान राज्य डोळ्यापुढे ठेवून त्या दृष्टीने लिहिले यात आश्चर्य वाटण्याजोगे काही नाही. मौर्यांचा प्रदेश म्हणजे त्याच्या केंद्रस्थानी असलेला मगधाचा प्रांत असे त्याला वाटले, हेही शक्य आहे. तसे पाहता, आंतरराज्यीय संबंधाविषयीचा विभागही, एका राजकीय कल्पनेचा तर्कशुद्ध आविष्कार म्हणून प्रतिनिधित्व करू शकेल.

मौर्यकालातच अर्थशास्त्र लिहिले गेले, हे रायचौधरी मान्य करीत नाहीत आणि तो नंतरच्या काळातील ग्रंथ आहे असे ते सांगतात.[1] ज्या लेखकांनी कौटल्याचा उल्लेख केला आहे त्यांपैकी कोणीही इ. स. ३०० च्या पूर्वीचा नाही असे त्यांचे मत आहे. अर्थशास्त्राची भाषा संस्कृत आहे पण मौर्यांनी प्राकृताचा उपयोग केला. अशोकाने आपल्या कोरीव लेखांसाठी प्राकृताचा वापर केला या वस्तुस्थितीवर हे विधान आधारलेले आहे. तथापि, सर्वसामान्य लोकांनी हे कोरीव लेख वाचावेत अशी अपेक्षा असल्याने ते लोकभाषेत लिहिले जावेत हे अगदी साहजिकच आहे परंतु मौर्यकालीन समाजातील उच्चशिक्षित वर्गात व राजकीय वर्तुळांमध्ये संस्कृतच्या वापरास प्रतिबंध होण्यास काहीच कारण नव्हते. कालि-दासाच्या नाटकांवरून आपल्याला असे दिसते की संस्कृतचा सार्वत्रिक वापर असणाऱ्या गुप्तकाळातही ज्यांनी संस्कृत बोलावे ते समाजातील वर्ग व जे केवळ प्राकृत बोलत असत त्यांचे वर्ग यांच्यात भेद होता. ज्या उद्देश्यांनी अशोकाने कोरीव लेख प्रसृत केले त्याच उद्देश्यांनी गुप्तराजांना कोरीव लेख प्रसृत करण्याची इच्छा असती तर त्यांनीही प्राकृताचाच वापर केला असता. प्राकृत भाषेचा वापर अधिक प्रमाणात होत असल्याने अशोकाने त्या भाषेला उत्तेजन दिले असावे. हेही शक्य आहे पण विद्वान संस्कृतचा वापर करीत.

कौटल्य, बांधकामासाठी लाकडाचा वापर करण्याच्या विरुद्ध होता आणि विटांचा उपयोग त्याला पसंत होता असा आणखी एक मुद्दा रायचौधरींनी उपस्थित केला आहे. परंतु मेगॅस्थिनिसचा हवाला देऊन नद्यांच्या आणि समुद्राच्या जवळच्या नगरांमध्ये लाकडी बांधकामे होती, असे ॲरियन सांगतो.[2] यात काही विसंगती आहे असे आम्हाला वाटत नाही. लाकडासारखा विटांपेक्षा अधिक नाशवंत माल नगरांच्या बांधकामांसाठी वापरण्यातील धोका कौटल्याने ओळखला

---

१. हिस्ट्री अँड कल्चर ऑफ दि इंडियन पीपल, व्हॉ. दोन (दि एज ऑफ इंपिरियल युनिटी) पृ. २८५–७.

२. इंडिका, दहा.

होता. त्या कालात विस्तीर्ण अरण्यांची तोड मोठ्या प्रमाणावर होत असल्याने लाकडी बांधकाम करणे आर्थिक दृष्ट्या अधिक स्वस्त असल्याने, या विषयावरील कौटल्याच्या सल्ल्याकडे दुर्लक्ष करण्याची प्रवृत्ती होती. तथापि, वर उल्लेखिलेल्या नगरांखेरीज इतर नगरे विटांनी बांधली होती व ज्या भागांमध्ये पाऊस व पूर यामुळे होणाऱ्या नाशास तोंड देण्यास विटा उपयोगी पडत नव्हत्या तेथेच फक्त लाकडाचा वापर होत होता असे काही पुढे ॲरियन सांगत नाही. बांधकामासाठी लाकडाचा वापर करण्याच्या विरुद्ध जरी कौटल्याने इषारा दिलेला असला तरी लाकडी इमारती उभ्या राहात होत्या यात्रिषयी त्याला संपूर्ण जाणीव होती हे, आग विझविण्यासाठी कोणती सावधगिरी घ्यावयाची याविषयी त्याने दिलेल्या सूचनावरून स्पष्ट होते.[1] आगडोंब उसळण्याच्या शक्यतेविषयी जी भीती व्यक्त करण्यात आलेली आहे ती पाहता, लाकडी इमारती पेट घेण्याचा सतत धोका होता, अशा काळात तो राहात असावा असे दिसते.

मौर्यराजे जी राजकीय बिरूदे वापरीत होते त्यांचा अर्थशास्त्रात उल्लेख नाही हे रायचौधरींचे पुढचे विधान आहे. त्या काळात राजकीय बिरूदांचे एक निश्चित सूत्र नव्हते हे त्याचे कारण आहे. देवानंपिय हे मौर्यांचे एक बिरूद असावे कारण ते दोन राजांनी वापरले. परंतु या दोन्ही राजांच्या बाबतीत तो वैयक्तिक पसंतीचा भाग असावा असेही असू शकेल. कौटल्याने कोणत्याही मौर्यराजाचा नावाने उल्लेख केलेला नाही. त्यामुळे ते वापरीत असलेल्या कोणत्याही बिरूदांचा उल्लेख करण्याचे साहजिकच काही कारण नाही.

रायचौधरींच्या म्हणण्याप्रमाणे समाहर्तृ आणि सन्निधातृ यांसारखी अर्थशास्त्रातील काही अधिकाऱ्यांची पदनामे मौर्यांच्या काळापेक्षा नंतरच्या काळात प्रचलित होती. या ग्रंथाच्या पुढच्या एखाद्या आवृत्तीत या बदनामांचा समावेश झाला असेल, हे शक्य आहे. परंतु निश्चितपणे मौर्यांना समकालीन असणाऱ्या ग्रंथांमध्ये ही पदनामे येत नाहीत यावरून मौर्यांच्या काळात ती उपयोगात आणली जात नव्हती, हा काही पुरावा नाही. उदाहरणार्थ अशोकाला जर आपल्या कोरीव लेखांमध्ये यांपैकी कोणत्याही पदनामाचा उल्लेख करावयाचा असता तर त्याने तो केला असता हे शक्य आहे महामात्र या अधिकृत हुद्याचा उल्लेख अर्थशास्त्रामध्ये क्वचित प्रसंगीच येतो.[2] हा जास्तीत जास्त निश्चितपणे मौर्यकालीन हुद्दा होता आणि इसवी सनाच्या सुरुवातीच्या शतकांमध्ये तो मागे

---

१. दोन, ३६.

२. एक, १०, दोन, ५.

पडला किंवा बदलला गेला असे दिसते. या ग्रंथाच्या इतिहासात कुठल्यातरी टप्प्यामध्ये, विशेषतः मौर्यकालीन प्रशासनात जेव्हा ते पदनाम व्यवहारात होते त्यावेळी या संज्ञेचा वापर मोठ्या प्रमाणावर केला जात होता असे दर्शविले जाते. हळूहळू या संज्ञेचा वापर जसाजसा कमी होत गेला तसतश्या या ग्रंथातही अधिक अधिक समकालीन संज्ञा येऊ लागल्या. अजूनही ही संज्ञा आढळते याचे कारण बहुधा पुढच्या काळात या ग्रंथाच्या नकला करताना किंवा तो संपादित करताना काही ठिकाणी तिच्याकडे दुर्लक्ष झाले असावे.

आपल्या शेवटच्या विधानात रायचौधरींनी भौगोलिक ज्ञानाचा प्रश्न उपस्थित केलेला आहे. पारसमुद्र, चीनभूमि व कम्बु या संज्ञांचा समावेश हा ग्रंथ नंतरच्या काळातील असल्याचे सुचवितो. अति प्राचीन काळापासून चिनच्या अस्तित्वाविषयीचे ज्ञान होते हे आपण आधीच पाहिलेले आहे. भौगोलिक ज्ञानावर आधारलेले हे विधान, हा ग्रंथ नंतरच्या काळातील होता हे ठरविण्यासाठी पुरेसा पुरावा होऊ शकत नाही असे आम्हाला वाटते. वेगवेगळ्या टप्प्यांमध्ये या ग्रंथात काही प्रक्षिप्त मजकुराची भर पडत गेली. ही वस्तुस्थिती आम्ही मान्य केलेली आहे. त्यामुळे नव्या स्थानांच्या नावांचा समावेश हा अशा प्रक्षिप्त मजकुराचा पुरावा म्हणता येईल हे अधिक शक्य आहे. हा ग्रंथ अद्ययावत करताना संपादकाने मूळच्या ग्रंथातील भौगोलिक कक्षेचा विस्तार करणे साहजिकच आहे.

कौटल्याऐवजी विष्णगुप्त हे नाव, हा नंतरच्या काळातील बदल होता व इसवीसनाच्या सहाव्या किंवा सातव्या शतकात ते नाव वापरले जाऊ लागले. असे ओझा सुचवितात.[1] जुन्या ग्रंथांपैकी पुराणे व महावंस यांसारखे बरेचसे ग्रंथ त्याचा कौटल्य किंवा चाणक्य असा उल्लेख करतात. महावंसाचा सध्या उपलब्ध असलेला मजकूर जरी त्याहून आधीच्या मूळच्या ग्रंथावर आधारलेला असला तरी तो इसवी सनाच्या पाचव्या शतकातील आहे. शिवाय श्रीलंकेमधील बौद्धांनी आणलेल्या माहितीवर तो बराचसा आधारित असल्याने चाणक्याविषयीच्या कथेत कपोलकल्पितता असण्याचे काही विशेष कारण दिसत नाही. विष्णुगुप्त या मुद्याच्या बाबतीत आमचे असे मत आहे की या ग्रंथाचा शेवटचा परिच्छेद महत्त्वाचा आहे.[2] त्या प्रकरणाचा शेवट करणारे हे नित्याचे सूत्र आहे. पंधराव्या पुस्तकाचे हे पहिले प्रकरण आहे व ते कौटल्यांचे अर्थशास्त्र समाप्त करीत आहे असे त्यात स्पष्टीकरण आहे. त्यानंतर येणाऱ्या दुसऱ्या एका वाक्याचे भाषांतर पुढीलप्रमाणे करण्यात आलेले आहे.[3]

---

१. आयएचक्यू, व्हॉ. अठ्ठावीस, अं. ३, सप्टेंबर १९५२, पृ. २६५ तळटीप.

२. पंधरा, १,

३. शामशास्त्री–भाषांतर.

'सूत्रांवर टीका लिहिणाऱ्यांच्या बाबतीत अनेक प्रकारांनी विसंगती आढळल्याने, विष्णुगुप्ताने स्वतःच हे सूत्र रचले आणि टीका लिहिली.'

यावरून विष्णुगुप्त हा या ग्रंथांचा मूळ लेखक नसावा तर तो त्याला सध्या उपलब्ध असलेले रूप देण्यास कारणीभूत असावा असे दर्शविले जाते, असे आमचे मत आहे. ग्रंथ सूत्रबद्ध केल्याचा जो उल्लेख आहे त्यावरून मूळचे स्वरुप पद्यात्मक असावे असे सूचित होते. विष्णुगुप्ताचा मजकूर ओझांनी सुचविले आहे, त्याप्रमाणे सहाव्या किंवा सातव्या शतकात, किंवा कदाचित दोन शतके आधी तयार झाला असावा हे अगदी शक्य आहे. विष्णुगुप्ताने त्याचे संपादन केलेले असल्याने साहजिकच त्याचे नाव या ग्रंथाशी कटाक्षाने जोडण्याची प्रवृत्ती निर्माण झाली असावी. इतकेच नाही तर प्रसंगी त्यालाच लेखक म्हणून मानण्यापर्यंत मजल गेली असावी व साहित्यिक जगात असा प्रकार कधीच नसतो असे नाही.

विष्णुगुप्ताने रचलेले अर्थशास्त्र हे मूळच्या ग्रंथापेक्षा बरेच मोठे असावे व याच विषयावरील इतर ग्रंथांचाही त्यात समावेश झाला असावा असे आमचे मत आहे. आपल्यापर्यंत जी हस्तलिखिते येऊन पोहोचलेली आहेत त्यात बहुधा एका मोठ्या ग्रंथातून कौटल्याचे अर्थशास्त्र उतरवून घेतले असावे. ज्या पुस्तकात फक्त एक प्रकरण आहे अशा पुस्तकाच्या शेवटी एक संपूर्णपणे नवा विभाग सुरू व्हावा हे खरोखर विचित्र आहे आणि विभाग म्हणजे त्या पुस्तकाचा सारांश आहे आणि तो इतका थोडक्यात आणि इतका सर्वसाधारण आहे की तो यापूर्वीच्या विभागाच्या शेवटीही जोडलेला असण्याची शक्यता आहे. विष्णुगुप्ताच्या मूळच्या व संपूर्ण ग्रंथात कौटल्याच्या ग्रंथावरील यापूर्वीच्या टीकांचा परामर्ष घेणारे किंवा याच विषयावरील इतर लहान लहान ग्रंथांचा परामर्ष घेणारे अधिक विभाग असावेत.

विष्णुगुप्ताच्या हाताखालून हा ग्रंथ गेल्यानंतर त्याच्या स्वरुपात जो बदल झाला त्यामुळे सध्याच्या स्थितीतील ग्रंथ संपूर्णपणे एकाच कालखंडातील आहे या दृष्टीने त्याच्याकडे पाहणे अशक्य आहे. त्यामुळे तत्त्वज्ञानाच्या वृत्तीने काल्यानॉव्ह यांनी केलेले पृथक्करण निश्चितपणाने उपयोगात आणता येणे शक्य नाही. तत्त्वज्ञान आणि नैसर्गिक व सामाजिक शास्त्रे यांच्यात भेद केल्याचा पुरावा अर्थशास्त्रातून मिळतो असे काल्यानॉव्ह म्हणतात.[1] ते पुढे असे स्पष्टीकरण देतात की, साधारणतः गुलामगिरीवर आधारलेल्या समाजाचा ऱ्हास आणि सरंजामशाहीचा जन्म यांच्याशी ही अवस्था निगडीत आहे व भारतात अशी अवस्था इसवी सनाच्या

---

१. तेविसावी ओरिएंटॅलिस्टस् काँग्रेस, केंब्रिज, ऑगस्ट १९५४.

पहिल्या ते तिसऱ्या शतकात निर्माण झाली असा काल ते देतात. समाजातील बदलांविषयी अति भाबडेपणाने विचार करण्याची प्रवृत्ती या विधानात आहे. असे आमचे मत आहे. गुलामगिरीवर आधारलेला समाज किंवा सरंजामी समाज यांसारख्या संज्ञा स्थूल निष्कर्षांबाबत वापरता येण्याजोग्या आहेत. परंतु प्रत्येक समाजातील बदलांची वैशिष्टये व तीव्रता वेगवेगळी असल्याने या निष्कर्षांमधील यथातथ्यता जाणण्यासाठी तपशीलवार अभ्यासाची गरज आहे. आज आपल्याला उपलब्ध असलेला अर्थशास्त्र हा ग्रंथ इसवी सनाच्या तिसऱ्या शतकातील आहे· कारण त्यात चर्चा करण्यात आलेली उत्पादनाची साधने,सामाजिक पद्धती व आर्थिक आणि राजकीय संस्था या मेगॅस्थिनिसने वर्णन केलेल्या पद्धती व संस्था यांच्यापेक्षा फार प्रगत आहेत, असे काल्यानॉव्ह यांचे मत आहे. तरीही आपल्या निबंधाच्या या आधीच्या भागात, मेगॅस्थिनिसच्या वृत्तांतावर संपूर्णपणे अवलंबून राहता येणे शक्य नाही, असे ते म्हणतात. तथापि या ग्रंथाचा प्रमुख भाग कौटल्याच्या विचार सरणीतून आलेला असू शकेल कारण चंद्रगुप्ताचा काळ हा देशात स्थैर्य निर्माण होत असल्याचा काळ होता व ते निर्माण करण्यासाठी वापरावयाच्या साधनांचा पुरस्कार करणाऱ्या तत्वज्ञानाचे चांगले स्वागत झाले असले पाहिजे. राजकीय विचारांच्या दीर्घ परंपरेवर अर्थशास्त्र आधारलेले असावे व पुढच्या काळात त्यात सुधारणा करून संपादन केले असावे असे काल्यानॉव्ह यांना वाटते. अर्थशास्त्र आणि दशकुमारचरित या दोहोंमध्ये तत्वज्ञानाचे महत्त्व आवर्जून सांगितले आहे असा मुद्दा ते मांडतात. अर्थशास्त्राच्या मधल्या भागात आर्थिक, राजकीय व सामाजिक संस्थांच्या कार्याविषयीचे वर्णन आहे. मेगॅस्थिनिसने वर्णन केलेल्या अशाच संस्थांशी तुलना करता या संस्था मौर्योत्तरकालीन असल्याचे वर्णन मान्य केले तर काल्यानॉव्ह म्हणतात त्याप्रमाणे या ग्रंथाचा मुख्य भाग मौर्यकालीन आहे असे म्हणणे कठीण आहे. या संस्था प्रामुख्याने मौर्यकालीनच आहेत असे आमचे मत आहे.

सामाजिक संस्थांच्या संदर्भात विचार करता, या ग्रंथातील काही कल्पना सामाजिक विकासाची सुरुवातीची अवस्था होती असे सूचित करतात, असे दिसते, उदाहरणार्थ नट व सर्व प्रकारचे खेळ करणारे लोक यांच्याविषयी अर्थशास्त्रात दिसून येणारी वृत्ती.[1] त्यांच्याकडे अतिशय संशयाने पाहिले जाई व सामाजिक दृष्टया ते जातिबहिष्कृत समजले जात. ज्या गुप्तकाळांत रंगभूमीची प्रतिष्ठा वाढली आणि तिच्याशी संबंधित असणारे लोक सामाजिक दृष्टया कितीतरी

१. दोन, २७.

अधिक सन्माननीय ठरले त्या गुप्तकाळात अशी तुच्छ वृत्ती असणे असंभवनीय आहे. अर्थशास्त्रात नटांविषयी असणारी कठोर वृत्ती, अशोकाच्या काही कोरीव लेखांमधील, विशेषतः ज्या एका लेखात अधार्मिक करमणुकीला प्रतिबंध करण्यात आलेला आहे. त्या लेखातील कर्मठ मनोवृत्तीशी जुळणारी दिसते.

अर्थशास्त्राच्या लेखकाच्या मनाची प्रवृत्ती संपूर्ण ग्रंथभर एकसारखीच आहे असे वर्णन करता येणे शक्य नाही. एखाद्याला आपले ईप्सित साध्य करण्यासाठी जादूगिरीची व गूढ साधने सुचविण्याची वाढती वृत्ती या ग्रंथाच्या उत्तरभागात आहे. या ग्रंथाच्या सुरुवातीच्या भागात कटाक्षाने व्यवहार्य असलेला दृष्टिकोन पुढे बदललेला दिसतो. उदाहरणार्थ, संकटे आणि साथी. मग त्या नैसर्गिक असोत वा जनावरांच्या असोत, त्यांच्या तडाख्यातून देशाला सोडविण्याच्या पद्धतीची चर्चा करणाऱ्या विभागात, प्रत्येक बाबतीत पहिली सूचना तर्कशुद्ध व व्यवहार्य आहे व त्यानंतर काही मांत्रिक विधीचा आसरा लेखक घेतो.[1] लेखक ब्राम्हण असल्याने, जे विधी व समारंभ केवळ ब्राह्मणच करू शकतील अशा काही संधी त्यांना मिळवून दिल्याच पाहिजेत असे त्याला वाटले. असे सुचविता येण्याजोगे आहे. प्रत्येक बाबतीतील पहिली सूचना बहुधा कौटल्याच्या मूळ ग्रंथातील होती आणि मांत्रिक साधनांचा समावेश असणाऱ्या पुढच्या सूचना नंतरच्या काळात जेव्हा अशी साधने वाढत्या प्रमाणात व्यवहारात येऊ लागली त्या काळातील संपादकांनी जोडल्या असाव्यात, यावर विश्वास ठेवणे आम्ही अधिक पसंत करतो.

या ग्रंथातील विवेचनात, आम्ही अनेक ठिकाणी अशोकाने योजलेले काही उपाय कौटल्याने सुचविलेल्या उपायांशी खूपच जुळणारे आहेत, हे दाखवून दिलेलेच आहे. उदाहरणार्थ राजाची देवाशी असणारी समीपता, लोकांना सांगण्यासाठी योजलेले प्रचारात्मक उपाय.[2] काही जनावरांच्या हत्येवर घातलेली चमत्कारिक बंदी ही दोन्ही साधनांमध्ये आढळून येते[3] यात आणखी भर म्हणजे अनेक तांत्रिक संज्ञा सारख्याच आहेत.[4] त्यातील काही पुढीलप्रमाणे आहेत.

| अशोकाचे कोरीव लेख | अर्थशास्त्र |
|---|---|
| युत, तिसरे शिलाशासन | युक्त, दोन, ५, ९ |
| प्रादेशिक, तिसरे शिलाशासन | प्रदेशतृ, चार, १ |
| परिस, पहिले सातवे शिलाशासन | परिषद, चार, १ |

१. चार, ३.
२. पाचवे प्रकरण पाहावे.
३. तिसरे प्रकरण पाहावे.
४. दिक्षितार, मौर्यन पॉलिटी, पृ. ४७

| | |
|---|---|
| पुलिसा, चौथे स्तंभशासन | पुरुष, दोन, ५ |
| गननायम्, तिसरे शिलाशासन | गणनयम्, दोन, ६ |
| व्रच, दुसरे, सहावे शिलाशासन | व्रज, दोन, १ |
| पलिकिलेसु, पहिला दुफळीचा आज्ञालेख | परिक्लेष चार, ९ |

सारांश, चंद्रगुप्ताचा मंत्री असलेल्या व चाणक्य याही नावाने ओळखल्या जाणाऱ्या कौटल्याने मुळात अर्थशास्त्र हा ग्रंथ लिहिला. नंतरच्या अनेक लेखकांनी इसवी सनाच्या तिसऱ्या किंवा चौथ्या शतकापर्यंत त्याचे संपादन केले आणि त्यावर टीका लिहिली. नंतर विष्णुगुप्ताने त्या कालापर्यंत या ग्रंथात जो प्रक्षिप्त मजकूर होता त्याच्यासह संपूर्ण ग्रंथावर काम केले. आज आपल्याला जो ग्रंथ प्राप्त झालेला आहे तो विष्णुगुप्ताने त्याला दिलेल्या नंतरच्या स्वरूपात उपलब्ध झालेला आहे. पुढील शतकांमधून इतर ग्रंथांतून केलेली उसनवारी आणि त्यांच्याशी दिसणारी साम्ये यांचे स्पष्टीकरण, मूळ ग्रंथ इसवी सनपूर्व चौथ्या शतकाच्या शेवटी लिहिला गेला होता या वस्तुस्थितीच्या आधारेच देता येणं शक्य आहे.

●●●

# दुसरे परिशिष्ट

## अशोकाची बिरुदे

अशोकाने धारण केलेली बिरूदेच काहीसे कुतूहल निर्माण करणारी आहेत. देवानंपिय पियदसि राजा अशोक, हे राजाचे संपूर्ण बिरुद आहे. या पुढच्या काळातील भारतातील राजांनी वापरलेल्या बिरुदांच्या तुलनेने ते फारच साधे आहे. काही वेळा संपूर्ण बिरुद न वापरता फक्त देवानंपिय, किंवा बराबर टेकडीवरील गुहेतील कोरीव लेखांमध्ये फक्त पियदसि राजा एवढेच बिरुद वापरलेले दिसते. हुल्टश यांनी स्पष्ट केल्याप्रमाणे देवानंपिय या संज्ञेचा अर्थ ' देवांना प्रिय असलेला.' असा होतो.[1] भवान, दीर्घायु आणि आयुष्मान्‌यासारख्या सन्मानार्थी संज्ञेसारखीच ही संज्ञा वापरली होती असे पतंजली महाभाष्यात सांगतो. या संज्ञेचा ' मूर्ख ' असा आणखी एक अर्थ पतंजलीला माहित होता. असे कैयत आपल्या पतंजलीवरील टीकाग्रंथात म्हणतो.[2] सुधारकी मौर्य राजघराण्याविषयी ब्राह्मणांमध्ये ज्या कटु आठवणी होत्या त्यामुळे हे असे असावे. तथापि, जैन साहित्यात ते बिरुद सन्मानार्थी म्हणूनच येते.[3]

श्रीलंकेतील वाङ्मयात देवानंपिय हे बिरुद अशोकासाठी वापरलेले नसून त्याला समकालीन असणाऱ्या श्रीलंकेमधील तिस्सासाठी वापरलेले आहे.[4] अशोकाच्या पूर्वजांनी तसेच त्याच्यापूर्वीच्या इतर कोणी राजांनी हे बिरुद वापरल्याचा आपल्याजवळ पुरावा नाही. परंतु आपल्या पूर्वीच्या देवानंपिय असलेल्यांचा उल्लेख अशोकाने आठव्या शिलाशासनात केलेला आहे. यावरून हे राजाचे बिरुद आहे हे त्याच्या वाचकांना व प्रेक्षकांना माहीत होते असे दिसते.[5] अशोकाचा

---

१. कॉर्पस इन्स्क्रिप्शनम इंडिकारम, व्हॉ. एक. पृ. एकोणतीस.

२. महाभाष्य ऑन पाणिनी, दोन, ४, ५६.

३. उपरोक्त.

४. जेआरएएस, किलहॉर्न, १९०८, पृ. ५०५, हेमचंद्र. अभिधानचिंतामणि, तीन, १७.

५. दीपवंस, अकरा, २५–२९, फ्लीट, जेआरएएस, १९०८, पृ. ४८५.

६. ब्लोख, ले एन्स्क्रिप्सिओं द अशोक, पृ. तीन.

नातू दशरथ[1] आणि तिस्सानंतरचे श्रीलंकेतील अनेक राजे[2] यांनी या बिरुदाचा अंगिकार केलेला होता या वस्तुस्थितीवरून हे राजाने वापरावयाचे बिरूद होते हे सूचित होते.

अशोकाबरोबर वारंवार येणारे दुसरे नाव म्हणजे पियदस्सि. याचा अर्थ 'जो सौजन्य दाखवतो तो' किंवा ज्याचे दर्शन सौम्य आहे तो.' असा होतो. हे अशोकाचे स्वतःचे बहुधा सिंहासनारूढ होताना घेतलेले नाव असावे असे दिसते. या नावाचा वापर त्याने फक्त कंदहरच्या कोरीव लेखात केलेला आहे. दीपवंस या ग्रंथात पियदस्सि या नावाने अनेक वेळा त्याचा उल्लेख आलेला आहे.[3] नंतरच्या वर्षामध्ये राजपदनिदर्शक बिरूद म्हणून त्याचा स्वीकार केला गेला असावा असे दिसते. प्रियदर्शन हे राजपदनिदर्शक विरूद आहे असे सांगणारे विष्णुधर्मोत्तर या ग्रंथातील एक अवतरण राजेंद्र कौस्तुभ या ग्रंथात अनंतदेव देतो.[4] रामायणामध्ये, रामाचे एक बिरुद म्हणून वाल्मीकी ते वापरतो.[5] अशोकवर्धन हे राजाचे स्वतःचे नाव होते व पियदस्सि हे बिरूद होते आणि ते त्याच्या आज्ञा-लेखांमध्ये त्याने वापरले. कारण त्याचा अर्थ 'दयाळू (परोपकारी)' असा होतो, असे स्मिथ सुचवतो.[6] अशोक हे त्यांचे स्वतःचे नाव होते. पियदस्सि हे त्याचे अधिकृत नाव असल्याने त्याने ते बहुधा राज्याभिषेकानंतर वापरावयास सुरवात केली असे आमचे मत आहे. देवानंमपिय 'हे त्या काळात सर्वसाधारणपणे प्रचलित असलेले राजाचे बिरूद होते.

---

१. सरकार, सिलेक्ट इंस्क्रिप्शन्स, पृ. ७९.
२. उपरोक्त पृ. २३१.
३. सहा. १, २, १४, २४.
४. कमल कृष्ण स्मृत्यर्थ आवृत्ती. पृ. ४३.
५. एक, १. ३.
६. अशोक पृ. ४१.



# तिसरे परिशिष्ट

## आज्ञालेखांची भौगोलिक स्थाने

आज्ञालेखांच्या स्थानांना भौगोलिक महत्त्व आहे. कारण मन मानेल तशी त्या स्थानांची निवड केलेली नव्हती. जास्तीत जास्त लोकांना आज्ञालेख उपलब्ध व्हावेत म्हणून दाट वस्तीच्या जवळच्या जागा किंवा महत्त्वाच्या प्रवासमार्गावरील जागा किंवा धार्मिक दृष्टया महत्त्वाच्या जागा अश्या जागांवर विचारपूर्वक ते कोरविण्यात आलेले होते. एखाद्या विशिष्ट जागेच्या पसंतीमागे असलेली कारणे या परिशिष्टात देण्यात येतील अशा पृथक्करणासाठी वाङ्मयीन व उत्कीर्ण पुरावे आहेत, त्यांना पुष्टी देण्यासाठी बऱ्याच पुरातत्त्वीय पुराव्यांची गरज आहे. परंतु दुर्दैवाने अजून या सर्व जागांचे उत्खनन झालेले नाही. त्यामुळे काही जागांच्या मागची कारणे फक्त सूचित करणे शक्य आहे. दक्षिण भारतातील जागांचे महत्त्व लक्षात घेताना, तेथील बरेचसे आज्ञालेख ज्या भागात सापडलेले आहेत तो भाग दक्षिणेतील सोन्याच्या खाणींच्या भागाच्या जवळपासचा आहे हे लक्षात ठेविले पाहिजे. दक्षिणेतील या व्यवहाराचा अर्थशास्त्राने उल्लेख केलेला आहे व दक्षिणेकडील व्यापारात सोने ही खास महत्त्वाची वस्तू असल्याचे सांगितले आहे.[१] म्हणजे आर्थिक दृष्टया या प्रदेशाला अतिशय महत्त्व असले पाहिजे व दक्षिणेतील काही जागांची निवड करताना हे आद्य कारण असावे. खाणींच्या प्रदेशामधील दाट लोकवस्तीच्या जागांवर किंवा त्या प्रदेशाकडे जाणाऱ्या मुख्य मार्गावर बहुधा हे कोरीव लेख होते.

जागांची यादी वर्णानुक्रमाने दिलेली आहे.

अलाहाबाद–कोसम (एक ते सहा स्तंभशासने, राणीचा आज्ञालेख आणि कौशांबीचा किंवा दुफळीविषयीचा आज्ञालेख). अलाहाबादचे किंवा जुन्या प्रयागचे महत्त्व हे प्रामुख्याने ते यात्रेचे केंद्र असल्याने होते. गंगा आणि यमुना या दोन नद्यांमधील त्या काळच्या एका मोठ्या वालुकामय मैदानावर ते वसलेले होते.[२] हिंदूंच्या दृष्टीने पवित्र स्थान असे ह्यूएन्त्संग त्याचे वर्णन करतो व तेथील देवळांविषयीच्या अनेक आख्यायिका सांगतो.[३] ज्या अर्थी कौशांबीचा आज्ञालेख

१. सात, १२.

२. कनिंगहॅम, एन्शंट जॉग्रफी ऑफ इंडिया, पृ. ४४५.

३. वॅटर्स, ऑन युआन च्वांग्ज ट्रॅव्हल्स इन इंडिया, व्हॉ. एक, पृ. ३६१. तळटीप.

कौशांबीच्या महामत्तांना उद्देशून आहे त्याअर्थी मुळात हा स्तंभ कौशांबी या जागी होता[1] यमुना नदीच्या डाव्या तीरावर अलाहाबादच्या नैऋत्येला अठ्ठावीस मैलांवर जे आजचे कोसम गाव आहे तीच ही जागा आहे. बौद्धकाळात कौशांबी ही धार्मिक महत्त्वाची जागा असल्यानें तिकडे खूपच यात्रेकरू आकर्षिले गेलें असावेत आणि म्हणूनच आज्ञालेखांसाठी ती एक सर्वोत्कृष्ट जागा असावी. पुढच्या काळांमध्ये समुद्रगुप्त आणि जहांगिर यांच्यासकट अनेक राज्यकर्त्यांनी या अशोक-स्तंभावर मजकूर कोरविला. समुद्रगुप्ताच्या कोरीव लेखावरून गुप्तांच्या काळातही हा स्तंभ कौशांबीलाच असावा असे दिसते[2] हा स्तंभ हलवून अलाहाबादच्या किल्ल्यात नेण्यास बहुदा जहांगीर कारणीभूत झाला असावा. टोप्रा आणि मीरत येथील असे स्तंभ फिरोझशहाने दिल्लीला हलविले, त्याचे अनुकरण जहांगीरने केले अलाहाबाद आणि कौशांबी ही दोन्ही ठिकाणे यमुनेच्या तीरावर असल्याने हा स्तंभ वाहून नेण्याचे काम फारसे कठीण झाले नसावे.

बैराट (लघु शिलाशासन आणि भब्रचा आज्ञालेख). बैराट हे गाव जयपूरच्या ईशान्येला बेचाळीस मैलांवर राजस्थानमध्ये वसलेले आहे. मत्स्य-राज्याची राजधानी विराट म्हणजे बैराट हे मान्य करण्यात आलेले आहे.[3] बैराटच्या नैऋत्येला सुमारे एक मैलावर असलेल्या एका टेकडीवरील दोन मठांचे अवशेष उजेडात आलेले आहेत. यावरून, विशेष करून संघाला उद्देशून असलेल्या भब्र यथील आज्ञालेखाचे स्पष्टीकरण करता येते.[4] अगदी अलिकडे याच प्रदेशातील उत्खननांमध्ये स्तुपाशी साम्य असणारी (एक विटांनी बांधलेली) खोली सापडली आहे.[5] बौद्धधर्मीयांचे एक नित्य वैशिष्टय म्हणून स्तुपाचा उदय होण्यापूर्वीच्या काळातील ते एक पूर्वकालीन बौद्ध मंदिर असावे.[6] बैराट हे बौद्धधर्माचे एक जुने व प्रस्थापित केंद्र असावे असे यावरून दिसते. म्हणजे हे बौद्धधर्मीयांच्या हालचालीचे केंद्र व खूप लोकसंख्या असलेले त्या प्रदेशातील एक महत्त्वाचें शहर असे दोन्ही होते.

---

१. कनिंगहॅम, इन्स्क्रिप्शन्स ऑफ अशोक, पृ. ३९.
२. हुलट्श, कॉर्पस इन्स्क्रिप्शनम इंडिकारम. व्हॉ. एक, पृ. वीस.
३. कनिंगहॅम, एन्शट जॉग्रफी ऑफ इंडिया, पृ. ३९०.
४. ऑर्क्यॉलॉजिकल रिपोर्टस, २, पृ. २४७–८.
५. एआय्, नऊ, पृ. १५०.
६. सीएफ पिगॉट ॲंटिक्विटी व्हॉ. सतरा, १९४३ पृ. २ तळटीप.

बराबर टेकडीवरील गुहा (आजीविक पंथाला केलेल्या दानाविषयीचे कोरीव लेख). या गुहांमधील कोरीव लेख दानाविषयांचे आहेत आणि त्य मुळे, स्थानाचे विशेष महत्त्व, या दृष्टीने त्यांना महत्त्व राहात नाही. राजगृह नगराभोवतीच्या टेकड्यांच्या एका समुहामध्ये या गुहा होत्या.[1]

भडोचचा उल्लेख कोणत्याही आज्ञालेखांमध्ये नाही किंवा अशोकाचा कोणताही कोरीव लेख या ठिकाणी नाही परंतु पश्चिमेशी चालणाऱ्या व्यापाराच्या दृष्टीने, अत्यंत महत्त्वाच्या व्यापारी केंद्रांपैकी ते एक होते हे इतर पुराव्यांवरून स्पष्ट होते व त्यामुळेच मौर्यकाळात त्या ठिकाणाला विशेष महत्त्व असले पाहिजे.[2] पेरिप्लसमध्ये त्याचा वारंवार उल्लेख आहे.[3] सौराष्ट्रामधील बंदरांचे गंगेच्या खोऱ्यातील नगरांशी दळणवळण असल्याने या व्यापाराच्या दृष्टीने त्यांचे महत्त्व वाढले. शिवाय मौर्यांच्या साम्राज्याच्या पश्चिमेकडील अपरांत या भागाचा ग्रीक व इराणी लोकांशी संबंध होता व त्या भागातील लोकांना तो राखण्याची इच्छा होती यात शंका नाही.

ब्रह्मगिरी (लघु शिलालेख). या ठिकाणी झालेल्या उत्खननात मिळालेला बराचसा पुरातत्त्वीय पुरावा असे दर्शवितो की ब्रह्मगिरी हे दक्षिण भारतातील मौर्यकालाच्या पूर्वीपासूनचे एक महत्त्वाचे केंद्र होते.[4] शेकडो वर्षे लोकवस्तीचे सातत्य असल्याने व विशेषत: मौर्यसाम्राज्याच्या दक्षिण सीमेजवळील हे एक लष्करी ठाणे झाल्याने एक महत्त्वाचे शहर म्हणून हे गाव उदयाला आले. गोदावरी आणि कावेरी या दोन नद्यांच्या उगमांच्या यात्रा या शहरापासून सुरु होत असाव्यात.

दिल्ली–मीरत आणि दिल्ली–टोप्रा (अनुक्रमे एक ते सहा व एक ते सात स्तंभशासने) दिल्ली–मीरत आणि दिल्ली टोप्रा स्तंभ अशी नावे पडली आहेत कारण ते स्तंभ मीरत व टोप्रा या त्यांच्या मूळ स्थानापासून फिरोजशहाने

---

१. कनिंगहॅम, **एन्शंट जॉग्रफी ऑफ इंडिया**, पृ. ५३०

२ टॉलेमी, **एन्शंट इंडिया**, एक, ६२; मॅक्‌क्रिंडलने उद्धृत केलेले, पृ. ३८, १५२; **जातकाज**, तीन, पृ. १८८; चार, पृ. १३७, **दिव्यावदान** सत्तावीस, पृ. ५७६.

३. **दि परिप्लियन सी** १४, २१, २७, ३२, ४३,

४. व्हीलर, **अर्ली इंडिया अँड पाकिस्तान** पृ. ८०, ८४, ९० १५४–६, १६४.

दिल्लीला वाहून नेले.[१] ही दोन्ही ठिकाणे दिल्लीच्या वायव्येस आहेत. या दोन्ही-पैकी कोणत्याच जागेचे अजून उत्खनन झालेले नसल्याने स्तंभशासनांसाठी या ठिकाणांची निवड करण्याची कारणे अनिश्चितच राहिलेली आहेत. पाटलि-पुत्राकडून वायव्येकडे जाणाऱ्या रस्त्यावर थांबण्याची ही दोन महत्त्वाची ठिकाणे असावीत असे दिसते. या दोन ठिकाणी जर धर्मशाळा असतील तर त्या ठिकाणांच्या आजूबाजूला बऱ्याच मोठ्या लोकवस्तीची वाढ झालेली असली पाहिजे.

धौली (दीर्घ शिलाशासने). सपाट प्रदेशाने वेढलेल्या जागेत एकदम खड्या असणाऱ्या टेकड्यांच्या समूहातील एका खडकावर उंच जागी धौलीचा लेख कोरण्यात आलेला आहे. ही जागा म्हणजे तोसली असावी असे मानण्यात आले आहे[२] व टॉलेमीने ती राजधानी असल्याचा उल्लेख केला आहे.[३] कोसल-गगा या पवित्र सरोवराच्याजवळ ती वसलेली होती आणि धार्मिक केंद्र म्हणूनही तिचा विकास झाला. धौली म्हणजे तोसली याची चांगली खात्री पटते व तोसलीच्या **महामात्तांना** उद्देशून लिहिलेल्या पहिल्या वेगळ्या आज्ञालेखातील मजकुरातही तोसलीचा उल्लेख आहे.[४] हे आज्ञा लेख प्रत्यक्ष शहरात नसले तरी त्याच्या शक्य तितक्या जवळ असावेत हे सयुक्तिक दिसते.

गाविमठ (लघु शिलाशासन). आजच्या म्हैसूरमध्ये (कर्नाटकात) गाविमठ वसलेले आहे आणि सिद्दापूरच्या आसपासच्या जागांच्या गटातील ती एक जागा आहे. सिद्दापूरच्या आसपास हा आज्ञालेख अनेक ठिकाणी सापडलेला आहे. ही जागा खाणींच्या क्षेत्रात असल्यामुळे किंवा एखाद्या महत्त्वाच्या मार्गावर असल्याने तिला प्रामुख्याने महत्त्व प्राप्त झाले असावे.

गिरनार (दीर्घ शिलाशासन). गिरनारचे महत्त्व सांगणे फारसे अवघड नाही. काठेवाडमधील जुनागडच्या पूर्वेला एक मैलावर ते वसलेले आहे. एकट्या अशोकाचाच नव्हे तर रुद्रदामन आणि स्कंदगुप्त यांचेही दीर्घ कोरीव लेख ज्या संख्येने सापडले आहेत त्यावरून या जागेला अतिशय महत्त्व होते हे ठामपणाने

---

१. हुल्ट्श **कॉर्पस इंस्क्रिप्शनम इंडिकारम**, व्हॉ. एक, पृ. पंधरा

२. मॅकक्रिंडल. (संपा.) टॉलेमी, **एन्शंट इंडिया**, पृ. २३०-१.

३. **उपरोक्त**, पृ. २२५

४. ब्लोख, **ले इंस्क्रिप्शिऑं द अशोक** पृ. १३६.

५. उपरोक्त, पृ. १४५.

सिद्ध झालेले आहे बृहत्संहितेत त्या जागेचा उल्लेख गिरीनगर असा आहे.[१] परंपरेने हा पर्वत ब्राह्मण व जैन या दोघांच्याही दृष्टीने पवित्र आहे.[२] गिरनारच्या परिसरातील सुदर्शन तलावाला चंद्रगुप्ताच्या कारकिर्दीत एक धरण बांधण्यात आले त्यामुळे त्याचे महत्त्व वाढले. चंद्रगुप्ताचा प्रांतिक राज्यपाल पुष्यगुप्त याने मुळात हा तलाव बांधला असे रुद्रदामनचा कोरीव लेख आपल्याला सांगतो.[३] अशोकाच्या कारकिर्दीत तुशास्प याने त्यातून पाण्याचे पाट काढण्याचे काम केले. गिरीनगर हे गाव जवळच असल्याचा त्यात उल्लेख आहे. स्कंदगुप्ताच्या कोरीव लेखावरून असे दिसते की आठशे वर्षांनंतरच्या गुप्तकाळापर्यंत या तलावातून आजूबाजूच्या प्रदेशाला पाणीपुरवठा केला जात होता. पाणीपुरवठ्याचे हे साधन होते त्यामुळे त्या प्रदेशातील ते महत्त्वाचे केंद्र असावे. पाणीपुरवठ्याच्या शक्य तितक्या जवळ गाव वसवावे हे अधिक व्यवहार्य असल्याने, आजच्या जुनागडच्या जागेपेक्षा, अशोकाच्या काळात गिरनार शहर तलावाच्या अधिक जवळ होते, हे शक्य आहे. अशा प्रकारे ज्या टेकडीवर हा कोरीव लेख कोरला गेला ते एक बरेच गजबजलेले केंद्र असावे.

गुजर्र (लघु शिलाशासन). दातिया जिल्ह्यातील झांशीजवळ गुजर्र ही जागा निश्चित करण्यात आली आहे. गंगेच्या खोऱ्यातून पश्चिम किनाऱ्याकडे जाणाऱ्या अधिक महत्त्वाच्या मार्गांपैकी एकावर, बहुधा उज्जयिनीवरून भडोचकडे जाणाऱ्या मार्गावर हे गाव असावे असे दिसते.

जटिंग-रामेश्वर (लघु शिलाशासन). ही जागा ब्रह्मगिरीपासून सुमारे तीन मैलांवर आहे आणि येथील कोरीव लेख म्हैसूरगटातील आहे. आजच्या जटिंग-रामेश्वर या देवळाच्या हद्दीत हा कोरीव लेख आहे त्यावरून मूळात ही जागा धार्मिक दृष्टया पवित्र मानली जात असावी.

जौगडा (दीर्घ शिलाशासने, धौलीच्या मजकुरासारखीच). जौगडामालिकेत समाविष्ट केलेल्या दोन वेगळ्या आज्ञालेखांवरून ते गाव कलिंगमध्ये असल्याचे दर्शविले जाते. गंजम जिल्ह्यातील बेहरामपूर तालुक्यात आता तेथे एक उध्वस्त किल्ला आहे. ऋषिकुल्य नदीच्या उत्तर तीरावर त्याची जागा आहे. दोन वेगळे

---

१. चौदा, ११

२. स्कंद पुराण, वस्त्रपथ-महात्म्य, एक, नऊ, बर्जेस, अँटिक्विटिज ऑफ काठियावाड अँड कच्छ, पृ. १७५

३. सरकार, सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स, पृ. १६९

आज्ञालेख समाप येथील **महामत्तांना** उद्देशून आहेत. बहुधा मौर्यकालात त्या शहराचे समाप हे नाव होते. ज्या भागात अवशेष सापडलेले आहेत तो भाग पाहता हे शहर बरेच विस्तृत असले पाहिजे असे सूचित होते व तेथील किल्याचे अस्तित्व ते लष्करी केंद्र असल्याचे दाखविते. त्याला समुद्राचे सानिध्य असल्याने व्यापारी आणि सागरी हालचालींचा अधिक फायदा मिळाला असावा.

कालसी (दीर्घ शिलाशासनें). तोन्स व यमुना या नद्यांच्या संगमावर कालसी हे गाव आहे आणि या संगमामुळेच त्याला धार्मिक महत्त्व प्राप्त झाले असावे. या जागेच्या अलिकडच्या उत्खननात संस्कृत श्लोक कोरलेली एक विटांची वेदी आढळली असून ती येथील शिळेवर कोरलेल्या लेखाच्या अगदी समोर बांधलेली होती.[1] इसवी सनाच्या तिसऱ्या शतकातील शीलवर्मन राजाच्या चौथ्या अश्वमेध यज्ञाची खूण म्हणजे ही वेदी, यावरुन त्या कालात या जागेला काही महत्त्व असावे असे दाखविले जाते. हिमालय पर्वताच्या पायथ्याच्या टेकड्या आणि दिल्ली हा गंगेच्या मैदानाचा भाग नेहमीच युद्धाच्या डावपेचांचे क्षेत्र ठरलेला आहे. पूर्वेकडे पसरत गेलेल्या मैदानाच्या प्रवेशभागाचे नियंत्रण हा भाग करतो. वायव्य भारतातून पूर्वेकडे जाणारा मुख्य मार्गही याच प्रदेशातून जातो. या रस्त्याची पद्धती भारतीय राज्यकर्त्यांनी सतत कायम ठेवली आणि अगदी अलीकडच्या काळापर्यंत तो मार्ग ग्रँड ट्रंक रोड म्हणून ओळखला जात होता. हिमालयाच्या पायथ्याच्या टेकड्यांमध्ये कालसी असल्याने बहुधा या प्रदेशाचे ते नियंत्रक केंद्र होते. नामक टोळ्यांच्या वस्तीच्या क्षेत्राच्या सीमाप्रदेशातही ते असावे.

कंदहर (द्वैभाषिक ग्रीक ॲरेमिक कोरीव लेख). शर–इ–कुन, म्हणजे दक्षिण अफगाणिस्तानातील कंदहर हे जुने शहर, ही या कोरीव लेखाची जागा आहे. अलेक्झांडरच्या स्वारीनंतर प्रस्थापित झालेल्या संबंधामुळे हेलेनिक जगत व वायव्य भारत यांच्यातील व्यापार प्रस्थापित झाला म्हणून या जागेचे महत्त्व वाढले. भारताकडून दूर पश्चिमेकडील भागांमध्ये जाणाऱ्या दक्षिणेकडील मार्गावर कंदहरचा प्रभाव होता.[2] हा आज्ञालेख ॲरेमिक भाषेप्रमाणेच ग्रीक भाषेतही आहे. यावरून या भागात बरीच मोठी लोकसंख्या असावी या गोष्टीस पुष्टी मिळते.

लम्पक (अशोकाशी संबंधित असणारा ॲरेमिक कोरीव लेख). सध्या काबुलच्या वस्तुसंग्रहालयात असणारा लम्पक ॲरेमिक कोरीव लेख लम्पक किंवा लंबक या ठिकाणी सापडला होता. हे ठिकाण म्हणजे काबूल नदीच्या उत्तर

---

१. **एआय**, नऊ. पृ १४६.

२. तिसरे प्रकरण पाहावे

तीरावरील जलालाबादजवळचे आजचे लमघन असावे असे साधारणत: मानले जाते.[1] या स्तंभावरील कोरीव लेखात **देवानम्पियाने** हा स्तंभलेख कोरविल्याचा उल्लेख आहे. म्हणजे हा कोरीव लेख अशोकाच्या कालातील आहे.[2]

लौरिया-अरराज (एक ते सहा स्तंभशासने). उत्तर बिहारमधील या जागी हा स्तंभ आहे या भूमीशी बौद्धधर्माचे साहचर्य होते व त्यामुळे तिला धार्मिक महत्त्व प्राप्त झालेले होते, या वस्तुस्थितीमुळे बहुधा ही जागा महत्त्वाची ठरली. या प्रदेशातील हे स्तंभ म्हणजे पाटलिपुत्राहून नेपाळकडे जाणाऱ्या राजमार्गाच्या खुणा होत्या असेही सुचविण्यात आलेले आहे.[3]

लौरिया-नंदनगड (एक ते सहा स्तंभ शासने). ही जागाही उत्तर बिहार-मध्ये असून नंदनगड या खेड्याच्या आणि वरील जागेच्या जवळ आहे. या स्तंभाजवळ काही दफनांचे अवशेष दाखविणारी टेकाडे सापडलेली आहेत. ही बहुधा बौद्धपूर्वकालातील असावीत. हे अवशेष म्हणजे बुद्धाने उल्लेख केलेले व्रज्जींचे प्राचीन चैत्य असावेत असे मत मांडण्यात आलेले आहे.[4] अलीकडील उत्खननामध्ये यांतील एका उंचवट्यात आहत नाणी, तांब्याची ओतीव नाणी, छोट्या मृण्मय मूर्ती आणि इ. स. पू. पहिल्या शतकातील मातीच्या मुद्रा अशा अनेक प्रकारच्या वस्तूंचा मिश्र साठा आढळला आहे.[5]

महास्थान (अशोकपूर्व मौर्यकालीन कोरीव लेख). बंगालमध्ये बोग्रा जिल्ह्यातील महास्थानगड येथे हा कोरीव लेख सापडला. हे ठिकाण बहुधा (साम्राज्याच्या पूर्वविभागाच्या) स्थानिक प्रशासकाचे मुख्य ठिकाण असावे आणि या कोरीव लेखात सांगितल्याप्रमाणे त्या काळात त्याचे नाव पुण्ड्रनगड असे होते. पुण्ड्रनगडच्या **महामत्तांवर** दुष्काळनिवारण योजनेची जबाबदारी असल्याचे वर्णन आहे. आतापर्यंत या जागेच्या उत्खननात शुंगकालीन मृण्मय वस्तू आढळून आलेल्या आहेत.

---

१. कनिंगहॅम, **एन्शंट जॉग्रफी ऑफ इंडिया**, पृ. ४९.

२. हेनिंग, **बीएस्ओएएस्**, व्हॉ. तेरा, १९४९, भाग एक, पृ. ८०; अल्थिम, **वेल्टगेशिश्टं आझिअन्स इन ग्रीशिशन त्साइटआल्टर**, एक, पृ. २५-४३

३. स्मिथ, **अशोक**, पृ. १२०

४. कनिंगहॅम, **एन्शंट जॉग्रफी ऑफ इंडिया**, पृ. ५१४; **उदान कॉमेंटरी**, पृ. २३३, तळटीप.

५. एआय, नऊ पृ. १४८

मानसेहरा (खरोष्ठीमध्ये कोरलेली दीर्घ शिलाशासने). पाकिस्तानमधील वायव्य प्रांतातील हझारा जिल्हयातील एका खेड्यातील ही जागा आहे. एका महत्त्वाच्या तीर्थयात्रेच्या मार्गावर[1] ही जागा असून वायव्य सीमेकडून पाटलिपुत्राकडे व तेथून पुढे जाणाऱ्या एका राजमार्गावर ती होती. कदाचित उत्तर सीमेच्या नजीक ही जागा असल्यानेही तिची निवड झाली असावी.

मस्की (लघु शिलाशासन). हैद्राबादमधील रायचूर जिल्हयात मस्की ही जागा आहे. सुवर्णगिरी म्हणजे मस्की असे सुचविण्यात आलेले आहे. परंतू सुवर्णगिरीच्या स्थानाविषयीच्या चर्चेवरुन हे मत स्वीकारार्ह नाही हे स्पष्ट होईल.[2]

निगलि-सागर (स्तंभशासन). निगलि-सागर येथे स्तंभ उभारण्याचा हेतू त्यावरील कोरीव लेखावरुन स्पष्ट होतो. बुद्ध कोनाकमन याच्या स्तुपाच्या विस्तृतीकरणाची नोंद करण्यासाठी आणि नंतर अशोकाने या जागेला दिलेल्या भेटीची नोंद करण्यासाठी तो स्तंभ या स्तुपाजवळ मुळात उभारला होता.[3] कपिलवस्तूपासून सहा मैलांवर कोनाकमनच्या स्तुपाजवळ आपण तो स्तंभ पाहिला व त्याच्या शीर्षावर एक सिंह कोरलेला होता, असे ह्यूएन्त्संग लिहितो.[4] हा स्तूप किंवा हा सिंह अजूनपर्यंत सापडलेला नाही कारण हा स्तंभ मुळच्या जागेपासून हलविण्यात आलेला आहे. सध्या नेपाळच्या प्रदेशातील रुम्मिनदेइजवळ तो आहे.

पालकीगुण्डु (लघु शिलाशासन). गाविमठपासून चार मैल अंतरावर पालकीगुण्डु आहे. ही जागाही ब्रह्मगिरीच्या भोवतालच्या गटात मोडते.

पाटलीपुत्र (याचा उल्लेख एका आज्ञालेखात आहे. याच्या परिसरात कोणत्याही स्वरुपात एकही आज्ञालेख आढळलेला नाही हे आश्चर्य आहे.) पाटलिपुत्राच्या जागेचो ओळख निश्चित आहे व तिचे भौगोलिक महत्त्व सर्वांना परिचित आहे. मौर्यसाम्राज्याची तो राजधानी होती व अशोकाच्या काळी तिला तीनशे वर्षांचा मगधाच्या उदयापासूनचा दीर्घ इतिहास होता. युरोपीय आणि भारतीय वाङ्मयीन साधने आणि अशोकाचे आज्ञालेख यांच्यामध्ये पाटलिपुत्राचा उल्लेख

---

१. मॅक्फेल, अशोक, पृ. ७६

२. पृ. ३२६ पाहावे.

३. ब्लोख, ले एंस्क्रेपसिओं द अशोक, पृ. १५८

४. वॅटर्स, ऑन युआन च्वांग्ज ट्रॅव्हल्स इन इंडिया, व्हॉ. दोन, पृ. ६-७

आहे.[१] विस्तृत प्रमाणावर झालेल्या उत्खननावरून असे दिसते की सध्याच्या पटना या शहरात व त्याच्या आजूबाजूला असलेल्या काही जागी हे नगर असावे. ते बहुधा नदीजवळ असावे व अनेक शतकांमध्ये तिचा प्रवाह काहीसा बदलला असावा. पाटलिपुत्र नगराला वेढणारी व जिचा उल्लेख मेगॅस्थिनिसने केला होता, ती लाकडी तटबंदी या उत्खननांमुळे जमिनीच्या बाहेर आलेली आहे.[२] पर्सिपोलिसच्या प्रासादातील सभागृहाशी अनेक बाबतीत साम्य असणारे येथील प्रासादातील स्तंभयुक्त सभागृह व आरोग्यविहार हेही आढळून आलेले आहेत. याशिवाय साधारणत: मौर्यकालाशी संबंधित असणाऱ्या प्रकारची कुंभारी कला, मणी, मृण्मय वस्तू, नाणी यासारख्या विविध प्रकारच्या लहान लहान वस्तूही आढळलेल्या आहेत.

रजुल-मण्डगिरी (लघु शिलाशासन). येर्रगुडीपासून फार लांब नसणाऱ्या, कोरीव लेखांच्या दक्षिणेकडील पटात या जागेचा समावेश होतो.

रामपूर्वा (एक ते सहा स्तंभशासने). उत्तर बिहारमधील बेट्टिहाच्या उत्तरेस बत्तीस मैलांवर हे ठिकाण आहे. गंगानदी व हिमालय पर्वत यांच्यामध्ये असलेला हा प्रदेश अतिशय सुपीक असल्याने दाट लोकसंख्येचा असावा यात शंका नाही आणि त्यामुळेच आज्ञालेखांच्या दृष्टीने तो चांगला भाग ठरला असावा. यातच भर म्हणजे बौद्धधर्मीयांच्या दृष्टीने अनेक पवित्र स्थाने या प्रदेशात असल्याने बहुधा देशाच्या सर्व भागांतून इकडे यात्रेकरू आकर्षित होत असावेत.

रुम्मिनदेइ (स्तंभलेख) नेपाळमध्ये सीमेजवळच रुम्मिनदेइ मठाच्या जवळ रुम्मिनदेइ-स्तंभ उभा आहे. लुम्बिनीवन या बुद्धाच्या जन्मस्थानाच्या गौरवार्थ अशोकाने हा स्तंभ उभारला. रुम्मिनदेइ हे लुंबिनीचे आधुनिक नाव असल्याने हा स्तंभ प्रत्यक्ष जन्मस्थानच दाखवितो असे मानले जाते.[३] ह्युएन्त्संगच्या म्हणण्यानुसार याच्या शीर्षावर अश्व होता, तो विजेच्या धक्याने नष्ट झाला व स्तंभही मध्यभागी, फुटला.[४] आज स्तंभाचा खालचा भाग अजूनही उभा आहे व वरचा भाग दुभंगलेला आहे. स्तंभशीर्षाचा मात्र पत्ता लागत नाही.

---

१. स्ट्रॅबो, पंधरा १, ३६, अॅरियन, इंडिका, दहा, ब्लोख, ले एंस्क्रपसिओं द अशोक, पृ. १०४

२. वॅडेल, डिस्कव्हरी ऑफ दि एक्झॅक्ट साइट ऑफ अशोकाज क्लासिक कॅपिटल अॅट पाटलिपुत्र, पृ. ६३, एआय व्हॉ. नऊ, १४६, स्ट्रॅबो पंधरा, १, ३५, ३६.

३. कनिंगहॅम, एन्शंट जॉग्रफी ऑफ इंडिया पृ. ७११.

४. वॅटर्स, ऑन युआन च्वांगज ट्रॅव्हल्स इन इंडिया, व्हॉ. दोन, पृ. १४

रुपनाथ (लघु शिलाशासन). मध्यप्रदेशातील सलीमाबादजवळ कैमूर टेकड्यांवर रूपनाथ हे ठिकाण आहे. सध्या येथे असलेल्या शिवलिंगामुळे शैवांच्या दृष्टीने ती जागा पवित्र बनलेली आहे या जागेला धार्मिक महत्त्व असल्याने अशोकाच्या काळातही हिंदु यात्रेकरू येथे येत असावेत. ही जागा बहुधा एका महत्त्वाच्या मार्गावरही असावी. अलाहाबादकडून (प्रयागकडून) भडोचकडे जाणारा मार्ग नक्कीच रूपनाथवरून जात असला पाहिजे. कैमूर टेकड्यांकडे जाणारा चढ अलाहाबादपासून सुरू झालेला आहे. तेथून पठाराच्या माथ्यावरुन जबलपूरपर्यंत जाणारा भाग बराचसा सोपा आहे. जबलपूर नर्मदेच्या अगदी जवळ आहे आणि येथून हा मार्ग सरळ भडोचपर्यंत नर्मदेच्या खोऱ्यातून जातो. जबलपूरला दुसरा एक पर्यायो मार्ग पाटलिपुत्रपासून या टेकड्यांच्या कडेकडेने असावा. यावरून सहस्रामचे + महत्त्व काही अंशी स्पष्ट होते.

सहस्राम (लघु शिलाशासन). बिहारमधील शहाबाद जिल्ह्यात शोण नदीपासून फार लांब नाही व पाटलिपुत्राच्या नऋत्येस नव्वद मैलांवर अशा ठिकाणी हे गाव वसलेले आहे. आजच्या सहस्राम या गावापासून कोरीव लेखाची जागा फारशी दूर नाही. कैमूर टेकड्यांचा पायथा या जागेपर्यंत येऊन पोहोचलेला आहे. या ठिकाणी असलेल्या नगराच्या अस्तित्वावरून, पटन्यापासून शोणच्या खोऱ्यापर्यंत, तेथून पठारावरून जबलपूरपर्यंत व तेथून खाली नर्मदेच्या खोऱ्यातून भडोचपर्यंत एक मार्ग असावा, या आमच्या मतास पुष्टी मिळते. या पठाराच्या उत्तरेच्या कडेला सहस्राम हे त्या काळी महत्त्वाचे गाव असावे व पठारावरून सुरु होणाऱ्या काहीशा अनिश्चित प्रवासापूर्वीची मगधाची ती एक चौकी असावी.

सांची (दुफळीसंबंधीचा आज्ञालेख). बौद्धकालापासून गुप्तकालापर्यंत ही जागा 'काकनादबोत' या नावाने परिचित होती.[१] म्हणजे या जागेला तौलनिक दृष्ट्या बऱ्याच पुढच्या काळात सांची हे आजचे नाव दिले गेले. **धम्ममहामत्तांना** आणि अर्थातच संघाला उद्देशून लिहिलेल्या या कोरीव लेखांच्या फुटकळ अवशेषांवरून अशोकाच्या काळातही सांची हे बौद्धधर्मीयांचे महत्त्वाचे केंद्र असल्याचे दर्शविले जाते. शुंगकाळात या स्तुपाचा विस्तार झाला व आज दिसणाऱ्या कठड्यांच्या भिती बांधण्यात आल्या हे पुरातत्त्वीय पुराव्यांवरून स्पष्ट होते.[२]

---

१. कनिंगहॅम, **भिलसा टोप्स**, पृ. १८३, २४१, ३४७. फ्लीट, **कॉर्पस इन्स्क्रिप्शनम् इंडिकारम**, व्हॉ. तीन पृ. ३१.

२ **हिस्ट्री अँड कल्चर ऑफ दि इंडियन पीपल्**, व्हॉ. दोन, पृ. ४८८

\+ लेखिकेला या ठिकाणी रूपनाथ हा शब्द अभिप्रेत असावा.

सांची हे उज्जयिनीच्या जवळ असल्याने त्या जागेला अधिकच महत्त्व प्राप्त झाले यात शंका नाही. भिलसा म्हणजे प्राचीन काळातील विदिशा असे मानले जाते. तेथून थोड्या मैलांवर भोपाळजवळ हे गाव आहे.

सारनाथ (स्तंभलेख, महामात्रांना उद्देशून लिहिलेला दुष्काळीसंबंधीचा लेख). वाराणसीपासून साडेतीन मैलांवर हे ठिकाण आहे. बौद्धधर्मीयांना अतिशय महत्त्वाच्या वाटणाऱ्या जागी हा स्तंभ आहे कारण बुद्धाने आपले पहिले प्रवचन सारनाथ या ठिकाणी केले होते. सारनाथ येथील एका महत्त्वाच्या मठातील भिक्षुंना उद्देशूनही हा आज्ञालेख लिहिलेला असावा असे दिसते. ह्यूएन्त्संग लिहितो की, कोरीव लेख असलेला एक स्तंभ आपण एका स्तुपाच्या समोर पाहिला व हा स्तूप अशोकाने बांधला असे त्याला सांगण्यात आले होते.[1] सारनाथला धार्मिक महत्त्व तर होतेच पण ते एक महत्त्वाचे व्यापारी केंद्रही होते.[2] त्या काळात मोठ्या रस्त्यांचे प्रमाण फारसे नव्हते. हे गाव जरी गंगेच्या वरच्या भागात भागात असले तरी ते तीरावर असल्याने त्या काळात नदीतून चालणाऱ्या लहान लहान नावांच्या वाहतुकीवर त्या गावाचे बरेचसे नियंत्रण होते. प्रयाग (अलाहाबाद) आणि पाटलिपुत्र (पटना) यांच्या मध्ये ही जागा असल्याने दोन्ही भागांकडून येणाऱ्या मालाची देवाणघेवाण करण्याचे केंद्र म्हणून या गावाचे महत्त्व असावे. वायव्येकडून पाटलिपुत्राकडे जाणाऱ्या मुख्य मार्गाशी जी नगरे जोडली गेलेली होती त्यात याचा समावेश होत असला पाहिजे.

शाहबाझगढी (खरोष्ठीमध्ये कोरलेली दीर्घ शिलाशासने). पेशावरच्या युसुफझाइ भागातील मर्दनजवळ ही जागा आहे. ॲरियनने वर्णन केलेल्या बझरिआ किंवा बझिरा याच्याशी या जागेचा संबंध दाखविण्याचा प्रयत्न करण्यात आलेला आहे.[3] ह्यूएन्त्संग या जागेला पो-लु-शा म्हणतो. त्याच्या म्हणण्यानुसार दगडांनी बांधलेल्या एका प्राचीन नगराच्या अवशेषांवर हे गाव उभारलेले होते व ॲरियनच्या वर्णनावरून त्यास पुष्टी मिळते.[4] शाहबाझगढीच्या आजूबाजूच्या भागाचे अजून

---

१. वॅटर्स, ऑन युआन च्वांग्ज ट्रॅव्हल्स इन इंडिया, व्हॉ. दोन, पृ. ४६ तळटीप.

२. अंगुत्तर निकाय, एक. पृ. ३१३ जातकाज, चार, पृ. ३४२

३. ॲनाबासिस, चार, २७,२८

४. वॅटर्स, ऑन युआन च्वांग्ज ट्रॅव्हल्स इन इंडिया, व्हॉ. एक, पृ. २१७

उत्खनन झालेले नाही, त्यामुळे पुरातत्त्वीय साधनांची त्याला पुष्टी मिळत नाही. अशोकाच्या काळात या जागेवर जर एखादे गाव असेल व ते असण्याची बरीच शक्यता दिसते. तर ते जरी प्रत्यक्ष सीमेवर नसले तरी सीमाभागातील गाव म्हणून मानले जात असावे व सीमाभागातील आजच्या पेशावरसारखे त्याला महत्त्व असावे. तेही मुख्य राजमार्गांशी जोडलेले असावे.

सिद्दापूर (लघु शिलाशासन). ब्रम्हगिरीच्या पश्चिमेस एक मैलावर व जटिंग-रामेश्वरच्या कोरीव लेखाच्या जागेच्या दक्षिणेस तीन मैलांवर सिद्दापूर आहे कोरीव लेखांचा हा गट साम्राज्याची दक्षिणसीमा दाखवित असावा. याशिवाय इतर दृष्टिकोनांमधून असलेले त्यांचे महत्त्व आम्ही यापूर्वीच दाखविलेले आहे.

सोहगौरा (मौर्यकालीन ताम्रपटावरील कोरीव लेख). उत्तर प्रदेशच्या गोरखपूर जिल्ह्यात सोहगौरा हे गाव आहे.

सोपारा (दीर्घ शिलाशासन. आठव्या आज्ञालेखाचा एक भाग). महाराष्ट्राच्या ठाणे जिल्ह्यात असलेले सोपारा हे गाव म्हणजे एका प्राचीन सागरी बंदराची व गावाची जागा आहे. अशोकाच्या कारकिर्दीत ते महत्त्वाचे होते यात शंका नाही[1] शूर्पारक हे त्याचे प्राचीन नाव होते.[2] कोरीव लेखासाठी सोपारा हे फायदेशीर स्थान होते कारण ते सागरी बंदर असल्याने जाणाऱ्या येणाऱ्या लोकांची सतत रीघ असे व आज्ञालेख वाचले जात असावेत. शिवाय या बंदराला भेट देणाऱ्या परकियांनाही त्यामुळे अशोकाच्या धम्माचा परिचय होत असावा.

सुवर्णगिरी (लघु शिलाशासन). हैद्राबादमधील मस्कीच्या दक्षिणेस असलेले आजचे कनकगिरी हे गाव म्हणजे सुवर्णगिरी. या शब्दाचा अर्थ 'सोन्याचा पर्वत' आणि रायचूर भागातील सोन्याच्या खाणींच्या प्राचीन क्षेत्राशी त्याचा संबंध आहे. प्राचीन कालातील सोन्याच्या कारागिरीच्या खुणा आजही रायचूरमध्ये दिसतात. सुवर्णगिरी ही मौर्य साम्राज्याच्या दक्षिण विभागाची राजधानी होती.

ताम्रलिप्ति. बंगालच्या मिदनापूर जिल्ह्यातील आजच्या तामलुक या स्थानाशी मौर्यकालातील या सागरी बंदराचा साधारणतः संबंध जोडला जातो. गंगेच्या मुखावरचे ते मुख्य बंदर होते. श्रीलंकेमधील बखरी त्याचा उल्लेख तामलित्ति असा करतात[3] फा-हियान असे लिहितो की, श्रीलंकेला जाण्यासाठी

---

१. एन्शंट इंडिया, एक. ६, मॅक्क्रिंडलने उद्धृत केलेले पृ. ३०, ४०

२. ब्रह्म पुराण, सत्ताविस, ५८

३. महावंस अकरा, ३८: दीपवंस, तीन, ३३

तो ताम्रलिप्ति येथे जहाजावर चढला.[1] या जागी अशोकाने बांधलेले काही स्तूप आपण पाहिल्याची नोंद ह्यूए-त्संग करतो.[2] सागरगामी वाहतुकीप्रमाणेच गंगेतून वरच्या भागाशी होणारी नदीतील वाहतूकही हे बंदर नियंत्रित करीत असे. तामलुकवर मौर्यांचा ताबा असल्याचा, पुरातत्त्वीय अवशेषांचा पुरावाही उपलब्ध आहे.[3]

तक्षशिला. अशोकाच्या कालाविषयीच्या वाङ्मयीन साधनांमध्ये तक्षशिलेचा उल्लेख वारंवार केलेला आहे. ती उत्तर विभागाची राजधानी होती आणि मौर्य साम्राज्यातील महत्त्वाच्या नगरांपैकी ते एक नगर होते. येथील पुरातत्त्वीय अवशेष, उच्च दर्जाची कारागिरी व संस्कृती दर्शवितात. तक्षशिलेला असलेल्या महत्त्वाची अनेक कारणे सांगता येतील. पश्चिमेकडील प्रदेशाशी असलेल्या संबंधाच्या दीर्घ इतिहासामुळे ते एक बहुरंगी केंद्र बनलेले होते. एक विद्याकेंद्र व सुप्रसिद्ध गुरुंचे निवासस्थान म्हणून ते ओळखले जाई.[4] पाटलिपुत्राहून येणारा राजमार्ग, बॅक्ट्रिया, कापिश व पुष्कलावती (पेशावर) इकडून येणारा वायव्येकडील मार्ग आणि मध्य आशिया व काश्मीरकडून श्रीनगर, मानसेहरा व हरिपूर खोरे यावरून येणारा मार्ग असे तीन प्रमुख व्यापारी मार्ग या ठिकाणी एकत्र येत असत.[5] पश्चिमेकडे होणारी सागरी वाहतूक जेव्हा वाढली तेव्हा बॅक्ट्रिया आणि पेशावर मधून जाणाऱ्या खुष्कीच्या मार्गाचे महत्त्व कमी झाले आणि नंतरच्या काळात तक्षशिलेचा ऱ्हास घडवून आणणाऱ्या कारणांपैकी ते एक कारण होते.

उज्जयिनी. ही मौर्यसाम्राज्याच्या पश्चिम विभागाची राजधानी होती. तिला राजकीय महत्त्व तर होतेच पण तक्षशिलेप्रमाणेच येथेही अनेक मार्ग एकत्र येत असत. पश्चिम किनाऱ्यावरील बंदरांशी, विशेषत: भडोच व सोपारा या बंदरांशी हे नगर जोडलेले होते व त्या बंदरांमधून चालणाऱ्या बऱ्याचशा व्यापाराचे तेथून नियमन केले जात असे. दक्षिणेकडील काही मार्गांचा शेवट उज्जयिनीमध्ये होत

---

१. गाइल्स, दि ट्रॅव्हल्स ऑफ फा-हियान, पृ. ६५

२. वॅटर्स, ऑन युआन च्वांग्ज ट्रॅव्हल्स इन इंडिया, व्हॉ. दोन, पृ. १८९

३. एआय, नऊ, पृ १५५

४. फिक, दि सोशल ऑर्गनायझेशन इन नॉर्थ-ईस्ट इंडिया इन बुद्धाज टाइम, पृ. २००,

५. मार्शल, तक्षिला, एक, व्हॉ. पृ. एक.

असे व ते नगर पाटलिपुत्राशी जोडलेले होते. टॉलेमी त्याचा उल्लेख ओझेने असा करतो.[1] मौर्यकालात ते एक बौद्धधर्मीयांचे केंद्र होते आणि तेथील मठांचे महत्त्व लक्षात घेता त्याला एक मोठा इतिहासही होता.[2] उज्जयिनीच्या ईशान्येस चार मैलांवर असणाऱ्या कुम्हार टेकडी येथील एका उत्खननावरून, तेथे एक प्रेते पुरण्याची व स्मशानाची जागा असल्याचे आढळले आहे व तिचा काळ इ. स. पू. तिसऱ्या शतकाच्या मागे जातो.[3] अशोकाने जेथे 'नरक' बांधला होता त्या जागेवर एक स्तूप बांधण्यात आला होता व ती जागा उज्जयिनीपासून फारशी दूर नव्हती, असे ह्यूए-न्त्संग लिहितो.[4]

येरंगुडी (दीर्घ शिलाशासनें आणि लघु शिलाशासन). कर्नूल जिल्ह्याच्या दक्षिण सीमेवरील गुटीपासून आठ मैलांवर व सिद्दापूरच्या ईशान्येस ऐंशी मैलांवर येरंगुडी हे ठिकाण आहे. दीर्घ व लघु असे दोन्ही प्रकारचे आज्ञालेख येथे सापडलेले आहेत, यावरून या जागेला काही महत्त्व होते हे स्पष्टच आहे. या भागात कोणत्याही शहराचे अवशेष सापडलेले नाहीत, परंतु या जागेवर सीमेवरील गाव अस्तित्वात असेल व तेथून दक्षिणेकडील भारतीय राज्यांकडे जाणारा एक मार्ग असावा हे अगदी शक्य आहे.

---

१. टॉलेमी, **एन्शंट इंडिया**, ६३, मॅकक्रिडलने उद्धृत केलेले, पृ. १५४-५.

२. **महावंस** तेरा, ५०, एकोणतीस, ३५.

३. **एआय**, नउ, पृ. १६०.

४. **वॅटर्स, ऑन युआँन च्वांग ट्रॅव्हल्स इन इंडिया**, व्हॉ. दोन, पृ. २५० दुसरे प्रकरण पाहावे.

# चौथे परिशिष्ट

## मौर्यकालातील मृण्मय भांडी आणि नाणी

एखाद्या उत्खननाच्या जागेवरील विशिष्ट पातळीचा कालनिर्णय करण्यासाठी वापरण्यात येणाऱ्या अनेक पद्धतींपैकी एक पद्धती म्हणजे त्या जागेवर सापडलेल्या खापराचे पृथक्करण करणे. मौर्यकालाशी साहचर्य असणाऱ्या खापराच्या व तत्सम नित्योपयोगी वस्तूंच्या अस्तित्वावरून त्या कालापर्यंतच्या लोकवस्तीचे विविध स्तर अनेक उत्खननांमध्ये आढळून आलेले आहेत. मृण्मय भांड्यांचा आकार व त्यासाठी वापरण्यात आलेली माती या दोहोंच्या आधारे कालनिर्णय करण्यास मदत होते. संपूर्ण भांडी किंवा खापरे या स्वरूपात अवशेष सापडू शकतात.

मौर्यकालाशी साहचर्य असणाऱ्या मृण्मय भांड्यांचे अनेक प्रकार आहेत. उत्तरेकडील काळ्या चकचकीत भांड्यांमध्ये (येथून पुढे उ. का. च. असा याचा उल्लेख केला जाईल.) सर्वांत जास्त विकसित तंत्र दिसते. तांबड्या व करड्या आणि ओबडधोबड भांड्यांचेही अनेक प्रकार आढळतात. उ. का. च. भांडे वस्त्रगाळ मातीचे बनविलेले असते व त्याचा छेद घेतल्यास ते बहुधा करड्या गाचे व काहीवेळा तांबड्या रंगाचे असते.[1] काळ्याभोर रंगापासून ते गडद करड्या किंवा पोलादासारख्या धातूत दिसणाऱ्या निळसर रंगापर्यंत विविध प्रकारच्या छटा दाखवणारी, दर्जेदार चमक येण्याइतकी प्रक्रिया त्याच्यावर केलेली असते. काहीवेळा पृष्ठभागावर तांबडे–तपकिरी लहान लहान डाग उमटलेले दिसतात. त्याला असलेल्या विशेष तेजामुळे व चकचकीतपणामुळे ते इतर चकचकीत किंवा तांबड्या भांड्यावर काळ्या शिशाचा थर चढविलेल्या भांड्यापेक्षा वेगळे ओळखून काढता येते. थाळ्या किंवा लहान कटोरे म्हणून या भांड्यांचा प्रामुख्याने उपयोग केला जात होता.

गंगेच्या खोऱ्यात जेथे अशी भांडी विपुल प्रमाणात सापडतात, तेथे काही वेळा स्तरांचा कालनिर्णय करण्यासाठी त्यांचा उपयोग करणे अवघड होते कारण काही खापरे पावसामुळे धुपून गेलेली असतात. ही भांडी तयार करण्याची मूळ जागा अद्यापि निश्चित करता आलेली नाही पण अलीकडच्या मतांनुसार ती जागा गंगेच्या खोऱ्यात कौशांबी आणि पटना यांच्या परिसरात असावी

---

१. एन्शंट इंडिया, एक, पृ. ५५, व्हीलर आणि कृष्ण देव.

असे मानण्याकडे कल दिसतो.[१] या भागात ही भांडी विपुल प्रमाणात आणि ठिकठिकाणी आढळून येतात, त्यावरून हे अनुमान करण्यात आलेले आहे व्यापारी किंवा यात्रेकरू यांच्याकरवी पूर्व राजस्तानात व पश्चिम, मध्य आणि उत्तर भारतात या भांड्यांची थोड्या प्रमाणावर आयात होत असावी, असे एक मत मांडण्यात आलेले आहे.[२] वाङ्मयीन साधनांमध्ये मातीच्या भांड्यांचे मोठ्या प्रमाणावरील उत्पादन व त्यांची निर्यात याविषयी उल्लेख आहे, तो बहुधा मौर्यकालाशीच संबंधित असावा.[३] या भांड्यांची निर्यात करण्याच्या दृष्टीने कौशांबी हे नक्कीच उपयुक्त स्थळ असले पाहिजे. उ. का. च. भांडी जरी फारशी दुर्मिळ नसली तरी इतर प्रकारांपेक्षा ती अर्थातच अधिक महाग होती असे दिसते कारण अनेक ठिकाणी अशा भांड्यांमध्ये तुकडे सांधण्यासाठी तांब्याचे खिळे ठोकलेले आढळलेले आहेत व त्यावरून एखादा तडा गेलेल्या उ. का. च. भांड्यालाही मोल होते हे सूचित होते.

हे भांडे तयार करण्याच्या तंत्राची अद्यापि पूर्णपणे चिकित्सा झालेली नाही. हे तंत्रज्ञान ग्रीकांकडून उचलण्यात आले की ग्रीकांच्या आगमनापूर्वीपासून भारतीयांना ते परिचित होते हेही माहित नसल्याने भारतात ही प्रक्रिया कशी उपयोगात आणली गेली याविषयी निश्चिती नाही. ग्रीक पद्धतीचे काळे भांडे तक्षशिलेत सापडले आहे असा दावा मार्शल करतो. या भांड्यावरील चकाकीचा दर्जा हा उ. का. च. भांड्यापेक्षा संपूर्णपणे वेगळा आहे असे नाही. तक्षशिलेमध्ये भिरच्या टेकाडामध्ये उ. का. च. भांडे तुकड्याच्या रुपात सापडलेले आहे, त्याचा काल इ स. पू. ३०० आहे, त्यावरून ग्रीकांच्या आगमनापूर्वीही ही भांडी वापरली जात होती हे सूचित होते. भिरच्या टेकाडात अलिकडे झालेल्या उत्खननात ग्रीक स्तरावर अलेक्झांडरचे एक नाणे सापडले आहे. परंतु उ. का. च. खापरे त्याहून खालच्या स्तरात आढळली आहेत.[४] यावरून अलेक्झांडरच्या स्वारीपूर्वीपासून उ. का. च. भांडी उपयोगात आणली जात असत, असे सुचविता येईल. तथापि, ही खापरे कदाचित वरच्या स्तरावरून खालच्या स्तरावर विखरत गेलेली असण्याचाही संभव आहे. या क्षेत्रात यापुढे अधिक विस्तृत प्रमाणावर अनेक ठिकाणी उत्खनन झाले तरच या प्रश्नाचा निर्णय लागणे शक्य आहे. यापेक्षाही अधिक महत्त्वाची वस्तुस्थिती अशी आहे की, 'गंगेच्या खोऱ्यात ज्या विपुल प्रमाणात ही भांडी आढळलेली आहेत तितक्या प्रमाणात तक्षशिलेमध्ये वरच्या स्तरांवर आढळत नाहीत.

---

१. उपरोक्त, नऊ, पृ. १४२.

२. उपरोक्त, पृ. ११९.

३. एक जैन ग्रंथ, दि उवासग दसाओ, सहा, पृ. १६३ तळटीप.

४. एआय, दहा, पृ. २३

राजगीर येथे संपूर्ण मौर्यस्तरामध्ये उ. का. च. भांडी साध्या काळ्या भांड्यांबरोबर सापडली होती.[1] या दोन्ही भांड्यांचे आकार सारखेच होते. फक्त एकच फरक असा होता की उ. का. च. भांड्यांवर चकाकी येण्यासाठी जो थर चढविलेला होता तसा काळ्या भांड्यांवर नव्हता. येथील उ. का. च. भांड्यांमध्ये प्रामुख्याने किंचित कड असलेले थाळे व कटोरे यांचा समावेश होता.

मौर्यस्तरांमध्ये सापडलेली इतर बरीचशी भांडी करडी किंवा तांबडी दिसतात. शिशुपालगड येथे अगदी अलीकडे झालेल्या उत्खननात 'प्रथम कालखंड' या स्तराचा काळ इ. स. पू. ३००–२०० असा आहे व त्या स्तरात फिकी करडी किंवा तांबडी, साधी भांडी आढळली. क्वचित, चकाकी आणलेली भांडीही आढळलेली आहेत[2] भांडी भाजून काढण्याचे तंत्र चांगले विकसित झालेले असल्याचा हा पुरावा आहे. उ. का. च. भांड्यांचे अवशेषही सापडले. 'द्वितीय अ कालखंड.' या नंतरच्या स्तराचा काळ इ. स. पू. २०० ते इ. स. १०२ असून त्या स्तरात कुंभारी कलेचा अधिक विकसित प्रकार दिसतो. भांड्यात आणि भांड्यावर केलेले नक्षीकाम दिसते व अधिक प्रमाणावर उ. का. च. भांडी सापडतात.

अहिच्छत्रा येथील उत्खननात मौर्यस्तरामध्ये खापराचे प्रचंड प्रमाणावर वैविध्य आढळले.[3] इ. स. पू ३०० ते २०० हा काळ असणाऱ्या स्तर क्रमांक आठमध्ये साधी आणि सुशोभित अशी दोन्ही प्रकारची करडी व तांबडी भांडी आढळली. या आधीच्या काळातील साध्या भांड्यांपेक्षा ही साधी भांडी अधिक जड व अधिक फिक्कट आहेत.

तांबडे भांडे प्रामुख्याने रांजणासारख्या आकाराचे असून त्याच्या बाजू पातळ आहेत व ते वजनाला हलके आहे. विकसित तंत्र असल्याचा हा पुरावा आहे. आकार रांजणासारखा असला तरी त्याची मान फारशी चांगली नाही. या कालातील याहून अधिक वैशिष्टचपूर्ण, गडद पिवळसर रंगाची भाजून काढलेली भांडी आढळली होती. यांत दोन प्रकार आढळतात. एक प्रकार म्हणजे रांजणाच्या खांद्यापासून वर उंच होत गेलेली मान व तिच्या शेवटी आडवी सपाट कड असलेली भांडी. दुसरा प्रकार आजच्या कालातील हंडीसारखा असून त्यांना अगदी बारीक कड आहे, काही वेळा तीही नाही. अशी भांडी अर्थातच स्वयंपाका-

---

१. उपरोक्त, सात, पृ. ७१

२. उपरोक्त, पाच, पृ. ७९

३. उपरोक्त, एक, पृ. ४३.

साठी होती. अहिच्छत्रामध्ये या स्तरात सापडलेला याहून अधिक विशेष प्रकार सुशोभित भांड्यांचा आहे. आपल्या अभ्यासहेतूच्या दृष्टीने यांपैकी सर्वांत जास्त महत्त्वाचा प्रकार म्हणजे वृषभसदृश नक्षीकाम उमटविलेली भांडी. पुढच्या काळात हे नक्षीकाम बऱ्याच सार्वत्रिक प्रमाणात आढळते. मध्यभागी एका बिंदूत जोडलेल्या चार वृषभसदृश आकृती त्यात असून, हे नक्षीकाम त्या कालातील आहत नाण्यांवरील नक्षीकामासारखे होते याच स्तरातील करड्या मृण्मय लहान कृतींवरही हेच नक्षीकाम आढळले होते. आहत नाण्यांच्यासंबंधी याच परिशिष्टात आपण चर्चा करणार आहोत तेव्हा त्याचा आणखी तपशीलवार विचार करू.

आतापर्यंत झालेल्या उत्खननांमध्ये, दक्षिण भारतात कोठेही उ. का. च. भांड्यांचा पुरावा नाही हे लक्षात घेण्याजोगे आहे. मौर्यसाम्राज्यांतर्गत भागांमध्ये ही भांडी मोठ्या प्रमाणावर वापरली जात असत असे नव्हे तर साम्राज्याच्या इतर कोणत्याही भागांपेक्षा गंगेच्या खोऱ्यात ती अधिक प्रमाणात वापरली जात असत असे दिसून येईल आमच्या मते ज्या जागी मौर्यकालात वस्ती झालेली होती अशा जागांच्या नावांची यादी, या परिशिष्टाच्या शेवटच्या भागात दिलेली आहे. त्यासाठी आम्ही उत्खननात सापडलेली उ. का. च. भांडी व आहत नाणी यांचा पुरावा म्हणून उपयोग केलेला आहे. हा पुरावा अगदी कोटेकोर नाही याची आम्हाला जाणीव आहे. उ. का. च. भांड्यांचा उपयोग हा काही मौर्यकालापुरताच मर्यादित नाही. त्या भांड्यांचा उपयोग बहुधा मौर्यकालापूर्वी केला जात असावा व मौर्यकालानंतर तर तो नक्कीच केला जात होता. या ठिकाणी आम्ही एवढेच म्हणू शकतो की या भांड्यांचा सर्रास उपयोग होऊ लागला हे मौर्यकाळाचे लक्षण दिसते. मौर्यस्तरांवर साधारणत: ही भांडी अधिक विपुल प्रमाणात सापडतात.

## आहत नाणी

प्राचीन भारतीय नाण्यांचा उल्लेख स्थूलमाने आहत नाणी या संज्ञेने केला जातो. ही नाणी प्रामुख्याने चांदीची असून काही थोडी तांब्याचीही आहेत. वस्तुत: ही नाणी म्हणजे काही वेगवेगळ्या आकारांचे, क्षेत्रफळांचे आणि वजनांचे धातूचे तुकडे असून त्यावर एक वा त्याहून अधिक चिन्हे उमटविलेली असतात काही वेळा चांदीच्या आहत नाण्यांबरोबरच कोरीव काम नसलेली पण अशीच चिन्हे असलेली तांब्याची ओतीव नाणीही आढळलेली आहेत.[1] या नाण्यांवर सर्वांत अधिक असलेली चिन्हे म्हणजे हत्ती, वेदीमधील वृक्ष व पर्वत.

भारतातील आहत नाण्यांचे परीक्षण करण्यापूर्वी भारतात जागोजाग आढळून आलेल्या, विविध प्रकारच्या व मूलत: परकीय असलेल्या नाण्यांचा आम्हाला

१. ॲलन, कॅटलॉग ऑफ दि कॉइन्स ऑफ एन्शंट इंडिया, पृ. चौऱ्याहत्तर.

थोडक्यात उल्लेख केला पाहिजे. काही प्राचीन इराणी नाणी, प्रामुख्याने डरायसची सिग्लोइ ही नाणी इ. स. पू. ५००-३३१ या कालात पंजाबमध्ये प्रचलित होती असे एक मत आहे.[1] काही चांदीच्या सिग्लोइ नाण्यांवर भारतीय पद्धतीच्या आहत नाण्यांवरील चिन्हांसारखी प्रतिचिन्हे आहेत व कांहीवर ब्राह्मी व खरोष्ठी अक्षरे आहेत. यावरून सिग्लोइ व आहत नाणी एकाच वेळी प्रचारात होती असा एखादा कालखंड असावा हे सूचित होते. अलेक्झांडरने प्रसृत केलेल्या व भारतात सापडलेल्या नाण्यांपैकी पहिले नाणे तांब्याचे असून साधारणपणे चौकोनी आहे व त्यावर *ΑΛΕΞΑΝΔΡΟΥ* हा लेख आहे.[2] तक्षशिलेत भिरच्या टेकाडात अलेक्झांडरचे चांदीचे दोन टेट्रॅड्रॅक्मा मार्शलने शोधून काढले.[3] यापैकी एकावर *ΒΑΣΙΛΕΩΣ ΑΛΕΞΑΝΔΡΟΥ* असा लेख आहे. इ. स. पू. तिसऱ्या किंवा चौथ्या शतकाच्या स्तरात ही दोन्ही नाणी सापडली होती. याच स्तरामध्ये फिलीप ॲरिडोअसचे एक चांदीचे नाणेही सापडले. याचा काळ इ. स. पू. ३१७ हा आहे. चांदीची आहत नाणी, भारतीय वक्रपट्ट-नाणी व एक इराणी सिग्लोइ अशी तीन प्रकारची नाणी या नाण्यांच्या निधीत सापडली.

इ. स. पू. चौथ्या शतकात वायव्य भारतातील नाणेपद्धतीवर प्रभाव पाडणाऱ्या ग्रीक नाण्यांचा आणखी एक प्रकार म्हणजे अथेनियन 'घुबड' हा होय. मूलतः ती वेगवेगळ्या किमतींची व विशेषतः टेट्रॅड्रॅक्मा नाणी होती. अथेन्स शहराची देवता पलास ॲथेना हिच्या दृष्टीने घुबड पवित्र होते. अथेन्सचे मद्य आहे हे दर्शविण्यासाठी तेथील मद्याच्या रांजणांच्या कडयांवरही या चिन्हाचा उपयोग केला जाई. भूमध्यसमुद्राचा प्रदेश व त्याच्या पूर्वेकडील भाग यामध्ये वाणिज्याच्या दृष्टीने या नाण्यांना अतिशय महत्त्व होते व म्हणूनच वायव्य भारतातील टांकसाळीतून त्यांचे अनुकरण होत असावे, आणि याचे कारण हा किफायतशीर व्यापार होता हेच असावे असे मानले जाते.[4] भारतीयांनी केलेल्या अनुकरणात काही ठिकाणी त्याची हुबेहुब प्रतिकृती केलेली आहे तर काही ठिकाणी घुबडाची जागा गरुडाने घेतली आहे.

ग्रीक नाण्यांचा प्रभाव दाखविणारा चांदीच्या नाण्याचा पुढचा गट म्हणजे सोफायटिसची नाणी. ती भारतातच पाडली गेली असावीत असे मानले जाते.

---

१. रॅप्सन, **इंडियन कॉइन्स** पृ. ३

२. **उपरोक्त** पृ. ४

३. **अर्क्यालॉजिकल सर्व्हे रिपोर्ट**, १९२४-२५, पृ. ४७, ४८ छायाचित्र नऊ.

४. रॅप्सन, **इंडियन कॉइन्स**, पृ. ३

ॲरियन व स्ट्रॅबो[1] यांनी सोफैथिस असा ज्याचा उल्लेख केलेला आहे तोच हा असावा असे साधारणतः मानले जाते आणि अलेक्झांडरच्या मोहिमेच्या काळात पंजाबमधील साल्त टेकडयांच्या प्रदेशात तो राज्य करीत असावा असे म्हटले गेले आहे. सोफायटिसची ओळख अजून नक्की पटलेली नाही. या नाण्यावर

ΣΩΦΥΤΟΥ असा मजकूर आहे. दुर्दैवाने, यापैकी एकही नाणे अजूनपर्यंत भारतीय जागांवर सापडलेले नाही. अथेनियन घुबडाचे अनुकरण करताना जो अतिशय सारखेपणा आलेला आहे त्यामुळे सोफायटिस या भारतीय राजाने ती नाणी पाडली असावीत या मतास पुष्टी द्यावीशी वाटते. कदाचित त्या राजाने व्यापारी हेतू डोळयासमोर ठेवून ती नाणी पाडली असावीत. सोफायटिसच्या नाण्यांचा संबंध काही सेल्यूकिड नाण्यांशीही दिसतो, त्यावरून त्यांची छाप त्या नाण्यांवर पडली असावी हे सूचित होते. काही सेल्यूकिड नाण्यांवर हत्ती हे चिन्ह आढळून आलेले आहे. ज्यावेळी सेल्यूकिड लोकांना मौर्यांकडून पांचशे हत्ती मिळाले, तेव्हा मौर्य–सेल्युकिड मैत्री साजरी करण्यासाठी ही नाणी पाडली असावीत.[2]

या परकीय आणि परकीयांपासून स्फूर्ती घेतलेल्या नाण्यांच्या पार्श्वभूमीवर आहत नाणी प्रचारात आली. प्रथम धातूचे तुकडे कापले जात व नंतर त्यांवर छाप उमटविले जात, असे स्थूलमानाने ही नाणी पाडण्याचे तंत्र होते. तथापि यांपैकी काही नाण्यांवर अर्धेच चिन्ह उमटलेले आहे यावरून धातूच्या पत्र्यावर छाप मारल्यावर तो कापला असावा किंवा छाप निष्काळजीपणाने मारलेला असावा असे सूचित होते. एका गटातील नाण्यांच्या मागील बाजूवर [चिन्ह] हे चिन्ह सुरेख व संपूर्ण उमटलेले आहे. परंतु दर्शनी बाजू अपूर्ण आहे,[3] हे विचारात घेण्याजोगे आहे. नित्याचे चिन्ह मध्यवर्ती सत्तेचे असावे असे यावरून वाटते. धातूच्या संपूर्ण पत्र्यावर बहुधा त्याचे छाप उमटविले असावेत व नंतर त्याचे नाण्याच्या आकारांचे तुकडे कापले असावेत. काही वेळा अपूर्ण उमटलेले दुसरे

---

१. एन्. शास्त्री, **दि एज ऑफ नंदाज ॲंड मौर्याज**, पृ. १२६ सहा २
 २, स्ट्रॅबो, पंधरा, ६९९.

२. रॅप्सन, **इंडियन कॉइन्स**, पृ. ४, बाबलों, रूआ द सीरी...फलक, एक, १५.

३. ॲलन, **कॅटलॉग ऑफ इंडियन कॉइन्स**, क्लास एक, ग्रुप एक.

चिन्ह दुय्यम संस्थेचे असावे व तिच्या हातून नाणी व्यवहारात प्रसृत झाली असावीत.

आहत नाण्यांविषयी चर्चा करताना, ॲलनला असे वाटते की, नंदांचे घराणे हे पहिलेच राजघराणे असे होते की त्याने मोठ्या प्रमाणावर नाणी काढली व त्यातूनच त्यांच्या संपत्तीविषयीची आख्यायिका निर्माण झाली असावी.[१] अनेक अतिप्राचीन नाण्यांचे अवशेष पैल, सेत महेत व गोरखपूर या भागांमध्ये सापडलेले असल्यामुळे या भागात त्या नाण्यांचे मूळ असण्याची शक्यता आहे. आहत नाणी फार काळ अस्तित्वात नव्हती कारण इ. स. पू. दुसऱ्या शतकात झपाट्याने त्यांची जागा घडविलेल्या नाण्यांनी घेतली असे ॲलनचे मत आहे. कदाचित अशा प्रकारच्या नाणकपद्धतीची कल्पना इराणी सिग्लोइवर आधारलेली असावी आणि इ स पू पाचव्या शतकाच्या शेवटी किंवा चौथ्या शतकाच्या सुरुवातीला भारतात त्यांचा वापर सुरू झालेला असावा. ही नाणी एका नियमित मालिकेत पाडलेली असल्याने ही एखाद्या सरकारनेच चलनात आणली असावीत याविषयी ॲलनला खात्री आहे. उदाहरणार्थ सूर्य व सहा हातांचे चिन्ह अगदी नियमित आहे व ती एखाद्या राजाची वा उच्च अधिकाऱ्याची चिन्हे असावीत. मागील बाजूच्या चिन्हांमध्ये जो वेगळेपणा दिसतो त्याचे स्पष्टीकरण असे, की ती चिन्हे जिल्ह्याच्या वा स्थानिक राज्यकर्त्यांची असावीत. दर्शनी बाजूवरील पाच चिन्हे पाच नियंत्रक संघटनांची असावीत. बहुधा मेगॅस्थिनिसने सांगितलेल्या समित्यांसारख्या त्या असाव्यात अशी एक कल्पक सूचना त्याने केलेली आहे. काही नाण्यांवरील पर्यायी चिन्हे किंवा सराफांच्या म्हणून ओळखल्या जाणाऱ्या खुणा याविषयीच्या प्रश्नाबाबत तो असे सुचवितो की अशी जुनी नाणी परत नव्याने प्रचारात आली असावीत.

या नाणकपद्धतीचा वॉल्श यानेही तपशीलवर अभ्यास केलेला आहे. ही चिन्हे म्हणजे मोहेंजो–दारो येथील मुद्रांवरील चिन्हांचे रुप–सातत्य असावे असे मत तो देतो.[२] हे सातत्य प्रत्यक्ष नक्षीपेक्षा कल्पनेतच जास्त आढळते. मोहेंजो-दारोच्या काळापासून मौर्यकालापर्यंत या नक्षीकामाच्या परंपरेचे अखंड सातत्य आहे. त्या कालातील मुद्रांवरील नक्षीकामांचे नमुने आहत नाण्यांवरील छाप उमटविताना नजरेसमोर असावेत असे मानण्याची गरज असण्याइतके सातत्य आहे, असे

---

१ उपरोक्त, पृ. एक्याऐंशी.

२. अर्क्यालॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया, मेमॉयर्स, अं. ५९, पृ. २०.

सुचविण्याइतका फारच थोडा किंवा जराही पुरावा या क्षणी उपलब्ध नाही. या नाण्यांचा काळ इ. स. पू. चौथ्या शतकाच्याही बराच आधीचा असावा की काय याविषयी अनेक मते व्यक्त करण्यात आलेली आहेत. परंतु त्याविषयीचा पुरेसा पुरावा उपलब्ध नाही.[1]

ही नाणी मौर्यकालीन असावीत हे मत दुर्गाप्रसाद पुढील पुराव्यांच्या आधारावर मांडतात.[2] ꕥ हे चिन्ह ज्या नाण्यांवर आहे, त्यांची रासायनिक परीक्षा केल्यानंतर असे आढळून आले आहे की **अर्थशास्त्रात** नाण्यांमधील धातू-मिश्रणाचे जे प्रमाण सांगितलेले आहे तेच या नाण्यांच्या बाबतीतही आहे. याशिवाय सोहगौरा ताम्रपटावर असेच चिन्ह असून हा कोरीव लेख मौर्यकालीन आहे असे सर्वसाधारणपणे मानले जाते. ही चिन्हे म्हणजे सराफांच्या खुणा नसाव्यात असे **अर्थशास्त्रावरून** सूचित होते याविषयीच्या परिच्छेदात असा मजकूर आहे की राजकोषागारात साठविण्यासाठी किंवा व्यापारी उलाढालीसाठी अशा दोन हेतूंनी टांकसाळीत नाणी पाडली जात असत. म्हणजे त्यांच्यावरील चिन्हे राज्यामार्फत उमटविली जात असावीत. सराफांनी खुणा करण्याची गरज नव्हती.

तक्षशिलेतील चांदीच्या आहत नाण्यांचा निधी व तक्षशिलेतील उत्खननात आढळलेली इतर आहत नाणी यांविषयी मार्शलने चर्चा केलेली आहे.[3] ही चिन्हे व खुणा यांचा हरप्पा संस्कृतीमधील मुद्रांशी संबंध जोडता येईल हे वॉल्शचे मत साधारणपणे त्याला मान्य आहे. तांब्याच्या नाणक पद्धतीविषयी तो म्हणतो की ही तक्षशिलेचीच नाणकपद्धती होती कारण सिर्कप स्तरांत ही नाणी विपुलतेने सापडतात, त्या मानाने भिरच्या टेकाडात ती क्वचित आढळतात. ही स्थानिक नाणकपद्धती ग्रीकांच्या स्वारीनंतरही काही काळ व कदाचित शकांच्या विजया-नंतरही चालू राहिली असावी. चिन्हांचा अर्थ लावताना, उदाहरणादाखल म्हणून ꕥ हे चिन्ह धर्मराजिक स्तुपाचे निदर्शक असावे असे तो सांगतो. ᑌ हा आकार म्हणजे 'दिव्य शक्तीच्या शिंगांचे' चिन्ह आहे. ही कल्पना प्रागैतिहासिक मुद्रांवरही आढळते. हा अर्थ फारच ओढून ताणून लावलेला

---

१. देकोर्दमॉंशे, **जेए**, एकोणीस, १९१२, पृ. १७ तळटीप; केनेडी, **जेआरएएस**, १८९८, पृ. २७९ तळटीप; स्मिथ, **आयजी**, दोन, पृ. १८३; रॅप्सन **इंडियन कॉइन्स**, पृ. २.

२. **जेएएसबी**, तीस, अं. पुरवणी पृ. ४०–४५.

३. तक्षिला, दोन, पृ. ८४६, ७५६ तळटीप.

वाटतो. स्तुपाचे हे चिन्ह खरोखरच त्या अर्थाने दाखवावयाचे असते तर ते याहून अधिक पारंपारिक नक्षीकाम करून दर्शविले असते. या नाणकपद्धतीच्या कालाविषयी मार्शल लिहितो की, अर्ध्याहून अधिक 'दीर्घ पट्ट पद्धतीची व गोल अंतर्वक्र' प्रकारची नाणी स्तर क्रमांक तीन आणि चार येथे सापडली, त्यावरून ती पद्धती इ. स. पू. चौथ्या किंवा पाचव्या शतकातील असावी हे सूचित होते. म्हणजे इ. स. पू. ४०० च्या सुमारास प्रथम आहत नाणी प्रसृत झाली असावीत. सिर्कप स्तरातही ही नाणी थोड्या संख्येने आढळली. त्यावरून मौर्यसाम्राज्य मोडकळीला आल्यानंतर ही नाणी पाडण्याचे काम जरी बंद पडले असले तरी ती प्रचारात राहिली असावीत. भिरच्या टेकडात दोन मोठे निधी आढळले. ते प्रामुख्याने चांदीच्या आहत नाण्यांचे आहेत. यावरुन मौर्यकालात चांदीची नाणी मोठ्या प्रमाणात प्रचलित असावीत पण मौर्योत्तर कालात मात्र तक्षशिलेत तांब्याची नाणी अधिक विस्तृत प्रमाणात वापरात होती असे दिसून येईल.

अगदी अलीकडे कोसंबी यांनी आहत नाण्यांबाबत अभ्यास केलेला आहे. त्यांनी नाण्यांच्या एका मालिकेचे परीक्षण केले आहे व धातुशास्त्राच्या आधारे पृथक्करण केलेले आहे.[1] नाणे हाताळल्यामुळे त्यातील धातूची झीज होते या कल्पनेवर त्यांचे पृथक्करण आधारलेले आहे. झीज झाल्याने नाण्याचे वजन कमी होते. म्हणून, वापरात असलेल्या नाण्याच्या वजनात किती घट होते हे जर मोजता येणे शक्य असेल तर त्या नाण्याचा काळ कोणता याचा हिशेब करणे शक्य होईल. जर नाण्याचे मूळ वजन किती होते हे माहित असेल तरच ही पद्धती विश्वासार्ह मानता येण्याजोगी आहे. आहत नाण्यांच्या बाबतीत, त्यांचे मुळात किती वजन होते, याविषयी निश्चितता नाही. शिवाय नाण्यांचा निधी करून ठेवणे ही प्रथा त्या कालात सर्रास असल्यामुळे, झीज किती झाली, या आधारावर केलेले काला-विषयीचे हिशेब नेहमीच विश्वसनीय असतील असे नाही. एखादे नाणे किती वर्षे वापरात होते ते जरी या पद्धतीने दर्शविता येण्याजोगे असले तरी त्या नाण्याचा काल कोणता हे ठरविण्यासाठी इतर घटकांचाही विचार करणे अगत्याचे आहे. धातुशास्त्रावर आधारलेले पृथक्करण ही कल्पना जरी कितीही आकर्षक वाटली तरी या नाण्यांचा कालनिर्णय करण्याचा प्रयत्न करताना विविध संभाव्य पद्धतींचा एकत्रित विचार करणे आवश्यक आहे.

चिन्हांच्या अर्थाच्या संदर्भात, ☼ हे सूर्याचे चिन्ह, त्याचप्रमाणे ✲ हे षडरचक्र चिन्ह म्हणजे सार्वभौमत्वाचे प्रतीक आहे, असे कोसंबींनी सुचविलेले आहे. कमानींवरील अर्धचंद्र ☖ हे मौर्यांचे प्रतीक आहे व ते अनेक वेळा षडर-

---

१. जेबीबीआरएएस, चोवीस–पंचवीस, अं. पुरवणी, १९४८–४९.

चक्राबरोबर आढळते. त्यांच्या मते प्रत्येक चिन्ह हे एखाद्या राजवंशाशी संबंधित आहे. या चिन्हसमुहांमध्ये चौथे चिन्ह म्हणजे राजाची व्यक्तिगत निशाणी आहे कारण अशा वेगवेगळ्या प्रकारच्या नऊ निशाण्या आहेत. पांचवे चिन्ह हे नाणी प्रसृत करणाऱ्या मंत्र्यांचे आहे. मानवी आकृती आहेत पण चक्र नाही, अशी चिन्हे ती नाणी अल्पजनसत्ताक टोळ्यांची असल्याचे दर्शवितात. यांपैकी कोणतेही चिन्ह टांकसाळीचे प्रतीक असावे, ही गोष्ट त्यांना मान्य नाही. तक्षशिलेच्या निधीतील आधीच्या नाण्यांशी तुलना करता उत्तरकालीन मौर्यांच्या नाण्यांमध्ये बरीच भेसळ आहे असे त्यांचे मत आहे मौर्यांच्या साम्राज्यात ज्या भागांचा नव्याने समावेश झाला तेथे भेसळ असलेले चलन असावे व मौर्यांनी ते वापरण्यास परवानगी दिली असावी असे सुचवून ते वरील मताचे स्पष्टीकरण देतात. तीन लंबवर्तुळे व त्यांची केंद्रे जोडणारी रेषा ϴϴϴ हे चिन्ह अशोकाचे असावे असे कोसंबी म्हणतात कारण ते अनेक ठिकाणी आढळते. त्यावरुन दीर्घ कारकीर्द सूचित होते व त्यांच्या मते काहीवेळा बिंदुसाराने काढलेल्या नाण्यांवरही ते चिन्ह आढळते. त्यांच्या मते कमानींवरील मोर हे बिंदुसाराचे प्रतीक असावे व पुढे ते म्हणतात की मौर्यांशी संबंधित असणाऱ्या मोर या निशाणीमधून त्याचा उगम झाला असावा.

याच विषयावर दाणी यांनी आणखी संशोधन केलेले आहे व तक्षशिलेत सापडलेल्या दोन निधींविषयीचो मार्शलची अनेक मते त्यांनी खोडून काढली आहेत.[1] अलेक्झांडरची दोन सोन्याची नाणी व फिलिप ॲरिडेअस याचे एक नाणे, भिरच्या टेकाडातील मोठ्या निधीमध्ये सापडलेले असल्याने, त्याचा काल इ. स. पू. ३१७ निश्चित करण्यात आलेला आहे, हे आपण पाहिलेले आहेच. डायोडोटसचे एक नाणे लहान निधीत सापडलेले असल्याने त्याचा काल इ. स. पू. २४८ हा निश्चित केलेला आहे. भिरच्या टेकाडातील ज्याला 'कालखंड बी' असे दाणी संबोधतात त्यात हेलेनिस्टिक अवशेष आहेत. त्यावरुन मौर्यकालाच्या अखेरच्या काळात तक्षशिलेवर इंडो–बॅक्ट्रियन्सचा प्रभाव पडल्याचे सूचित होते. याच सुमारास तक्षशिलेची स्थानिक नाणी मोठ्या प्रमाणावर सापडण्यास सुरुवात होते. या जागेवर पट्ट–नाणी इतरत्र कोठेही आढळत नाहीत, असे पुढे दाणी स्पष्ट करतात व त्यावरून ही नाणी गंगा–यमुनेच्या प्रदेशातून येथे आली असावीत असे मत देतात. याशिवाय मोठ्या निधीमध्ये जो कण्ठा सापडला आहे तो सिर्कप येथील मण्यांशी जुळणारा आहे. यावरुन हा निधी मौर्यपूर्व नसावा असा अभिप्राय ते देतात. तो निधी इ. स. पू. ३१७ च्या पूर्वीचा नसला तरी त्यात ग्रीक नाणी साठविली आहेत त्यावरुन त्यानंतर बऱ्याच काळाने तो निधी केला गेला असावा हेही शक्य आहे. मार्शल सांगतात त्याप्रमाणे मोठा निधी हा लहान निधीच्या पूर्वी पुरलेला आहे

१. जेएनएसआय, सतरा, पार्ट दोन, १९५५, पृ. २७ तळटीप.

असेही नाही. नाण्यांचे दोन्ही निधी भिरच्या टेकाडात 'कालखंड बी' मध्ये सापडलेले आहेत व त्यांच्याबरोबर ज्या वस्तू आढळल्या आहेत त्यावरून हे दोन निधी पुरण्यामध्ये बराच मोठा काळाचा फरक नसावा हे दर्शविले जाते. अशा रीतीने हे निधी मौर्योत्तर असावेत असे दिसते व म्हणूनच तक्षशिलेत सापडलेला पुरावा, आहत नाणी मौर्यपूर्वकालात होती हे सिद्ध करण्यासाठी. वापरता येण्याजोगा नाही. यापुढे दाणी असे म्हणतात की तक्षशिलेतील स्थानिक चलन म्हणून पट्टनाणी वापरात होती व ती भिरच्या टेकाडात दाणी ज्याला कालखंड ए, म्हणतात तेथ सापडतात. या पृथक्करणावरून आहत नाणी प्रथम मौर्यांनी पाडली, हे सूचित होते. कदाचित पट्ट–नाणी मौर्यकालापूर्वी प्रचारात असण्याची शक्यता आहे.

चांदीच्या आहत नाण्यांखेरीज चांदीच्या वक्रपट्ट-नाण्यांचीही उदाहरणे आहेत. ॲलनच्या मतानुसार ही नाणी इराणी पद्धतीनुसार पाडली होती व ती बहुधा **सिग्लोइच्या वा स्टेटरच्या** दुप्पट किमतीची असावीत.[1] तक्षशिलेच्या लहान निधीत डायोडोटसचे एक नाणे सापडलेले असल्याने त्याचा काल इ. स. पू. २४८ म्हणजे सर्वसाधारणपणे उत्तरकालीन मौर्यांचा काल मानला जातो. या निधीत वरील प्रकारचे एकही नाणे सापडलेले नसल्याने ती नाणी आहत नाण्यांच्या पूर्वीची असावीत असे दिसते. ओम्फिसने अलेक्झांडरला चांदीच्या २०० नाण्यांचा नजराणा दिला असे सांगितले जाते. हा नजराणा बहुधा या नाण्यांच्या रूपाने दिला असावा असे ॲलन यांना वाटते. वर उल्लेखिलेल्या घटनेनंतर लवकरच नाण्यांची ती पद्धती नाहीशी झाली असावी असे ते सुचवितात. चांदीच्या नाण्यांपेक्षा तांब्याची आहत नाणी अधिक दुर्मिळ आहेत यांपैकी बऱ्याच नाण्यांच्या दर्शनी बाजूवर पाच चिन्हे व मागील बाजूवर चार चिन्हे आहेत.[2] साधारणपणे चांदीच्या आहत नाण्यांच्या दर्शनी बाजूवर एक व मागील बाजूवर सुमारे पाच चिन्हे आहेत.

मौर्यराजे व बौद्धधर्म यांचा निकटचा संबंध असल्याने एखाद्या तरी अवस्थेतील नाण्यांवरील चिन्हांचे बौद्धधर्मीयांची चिन्हे असे वर्णन केले जावे हे अपेक्षितच होते. फूशे यांचे मत असे आहे.[3] या नाण्यांवर हत्ती व बैल यांचा चिन्हे म्हणून वापर केलेला दिसतो व त्यावरुन बुद्धाची गर्भावस्था व त्याच्या जन्मवेळेची रास, वृषभ यांविषयीची पारंपारिक चिन्हे दर्शविली जातात असे त्यांचे मत आहे. हा अर्थ शंकास्पद वाटतो. कारण त्यावेळी भारतात नक्षत्रमंडळातील बारा राशींचा

१. **कॅटलॉग ऑफ इंडियन काइन्स**, पृ. २, ३.

२. **उपरोक्त**, पृ. अठ्याहत्तर.

३. **बिगिनिंग्ज ऑफ बुद्धिस्ट आर्ट**, पृ. २० तळटीप.

उपयोग केला जात होता याविषयी काही फारसा बळकट पुरावा नाही. घोडा व सिंह ही इतर दोन पारंपारिक चिन्हे असलेली नाणी अद्यापि सापडलेली नाहीत. शिशु-अवस्थेतील बुद्धाने सात पावले टाकली व त्या एक एक पावलाबरोबर कमळ उमलत गेले. त्या बुद्धाच्या जन्माचे चिन्ह म्हणजे कमळ व तेच निराळ्या प्रकारे, षडरचक्राच्या चिन्हाच्या रुपाने आहे असे फूशे वर्णन करतात. कुंपणातील वृक्ष हे चिन्ह म्हणजे संबोधि. कमानी म्हणजे स्तूप किंवा समाधी यांसाठी दुसरे चिन्ह असा अर्थ ते घेतात. आडवी यष्टि किंवा काठी व शिरोभागी छत्र आहे अशी

⏃ ⛫ ⛫ ही स्तूप दाखवणारी चिन्हे आहेत. या नाण्यांवर लेख

नसल्याने, त्याच्या कालाविषयी तर्क करताना त्यावरील चिन्हांचे महत्त्व व शास्त्रीय पृथक्करणाने जे काही ज्ञान प्राप्त होईल ते ज्ञान यावरच प्रामुख्याने अवलंबून राहावे लागते. मौर्यपूर्वकालात नाण्यांचा व्यवहारात वापर होत असे, असे आम्हाला वाटते. सुरुवातीची नाणी बहुधा वक्र-पट्ट प्रकारची असावीत. त्यानंतर मौर्यांच्या काळात आहत नाणी वापरात येऊ लागली असावीत. विनिमयाचे माध्यम व कायदेशीर चलन म्हणून नाण्यांचा मोठ्या प्रमाणावर उपयोग केला जात होता. **अर्थशास्त्रातही** पैशाचा हेतू सांगताना हेच सांगितले आहे.[1] हा पुरावा वस्तुस्थितीशी जुळणारा आहे. याच ग्रंथात नाण्यांचे दोन मुख्य प्रकार सांगितलेले आहेत. यांपैकी एक **पण** हे चांदीचे नाणे असून ते १, १/२, १/४ आणि १/८ या प्रमाणात असे. **माषक** हे दुसरे नाणे तांब्याचे असून त्याच प्रमाणात ते असे. त्याच्या १/४ भागाच्या तुकड्याला **काकणि** असे म्हणत. सोन्याच्या नाण्यांचाही उल्लेख आहे. परंतु ती अगदी विशेष प्रसंगी काढली जात असावीत व वापरात क्वचितच येत असावीत असे दिसते कारण बरीचशी देवाणघेवाण व वेतन यासाठी **पण** या चांदीच्या नाण्यांचा उपयोग केला जात असे.[2] ज्येष्ठ अधिकाऱ्यांचे खूप मोठे वेतनही **पणां**-मध्ये सांगितलेले आहे, सोन्याच्या नाण्यांमध्ये नाही. आहत नाणी फक्त चांदीची व तांब्याची आहेत व तांब्याची नाणी दुर्मिळ आहेत. चांदीची नाणी प्रामुख्याने निधीमधूनच उपलब्ध झालेली असल्याने असे होणे स्वाभाविकच आहे. तांब्याची नाणी किमतीने कमी असल्याने ती फार मोठ्या प्रमाणात उपयोगात आणली जात होती यात शंका नाही. उलट चांदीच्या नाण्यांना अधिक किंमत असल्याने, त्यांचा निधी करण्याची प्रवृत्ती होती. जर भविष्यामध्ये, एखाद्या उत्खननाच्या जागी बरीचशी तांब्याची नाणी विखरून पडलेली आढळली व कोसंबींच्या धातूशास्त्रीय पृथक्करणाची कल्पना त्यांना लावून पाहिली तर त्यातून लक्षणीय निष्कर्ष निघतील यांत शंका नाही.

**अर्थशास्त्रावरुन** असे दिसते की एक सुसंघटित टांकसाळ होती. तिचे अधिकारी नाण्यांची शुद्धता (त्याबाबतचा तपशील दिलेला आहे.) पारखून घेत

---

१. दोन १२.

२. दोन. ५.

असत व नकली नाणी निघण्याची शक्यता राहू नये म्हणून सावधगिरी बाळगीत.[१] व्यापारी व्यवहार, दंड, महसूल इत्यादी बाबींसंबंधीची वर्णने व अभिप्राय यांचा विचार केल्यास, या कालात पैशाच्या व्यवहाराचा अनुभव मोठा होता व पैशावर आधारलेली अर्थव्यवस्था ही कल्पना परिचित होती. असे स्पष्टपणे दिसते. यावरुन या भागात आहत नाणी हाच नाण्यांचा पहिला प्रकार वापरात नसावा हे सूचित होते. चांदीची वक्रपट्ट-नाणी, आहत नाण्यांच्या पूर्वीपासून असावीत व म्हणून ती मौर्यपूर्वकालात प्रचलित असावीत या ॲलनच्या मताशी आम्ही सहमत आहोत. तक्षशिलेतील नाण्यांच्या दोन निधींवरुनही ही वस्तुस्थिती स्पष्ट होते. ज्या निधीत फिलिप ॲरिडेअसचे नाणे आहे व ज्याचा काल इ. स. पू. ३१७ आहे त्या निधीतही वक्रपट्ट-नाणी आहेत. लहान निधीत डायोडोटसचे इ. स. पू. २४८ मधील नाणे आहे, आणि तो निधी मौर्यकालाच्या शेवटी जरी पुरलेला असला तरी त्यात एकही, वक्रपट्ट-नाणे नाही, त्यावरुन त्या वेळेपर्यंत हे नाणे प्रचारातून नाहीसे झाले असावे, असे दर्शविले जाते. आहत नाणी हाताळण्यास अधिक सोपी असल्यामुळे कदाचित मौर्यकालाच्या सुरवातीस त्यांनी वक्रपट्ट-नाण्यांची जागा घेतली असावी.

एखाद्या केंद्रीय अधिकाऱ्यामार्फत नाणी प्रसृत केली जात असावीत. साम्राज्याच्या पाच प्रमुख शहरांमध्ये बहुधा साम्राज्यीय टांकसाळी असाव्यात. ही नाणी म्हणजे मुळात व्यापाऱ्यांची प्रतीके असावीत व पुढे त्यांना हळूहळू राष्ट्रीय चलनाचा दर्जा प्राप्त झाला असावा, ही कल्पना आम्हाला मान्य नाही. त्यांवरील चिन्हांचा स्थानिक व्यापाराशी किंवा स्थानिक प्रशासनाशी संबंध असण्याची शक्यता आहे परंतु तेथेही अशी चिन्हे बहुधा टांकसाळीकडे पाठविली जात असावीत व राजाधिकाराच्या खुणांमध्ये त्यांचा अंतर्भाव केला जात असावा. तौलनिकदृष्टचा व्यापार प्रारंभिक अवस्थेमध्ये असल्याने स्थानिक व्यापारी इतर चिन्हांपेक्षा स्थानिक चिन्हांना पसंत करीत असावेत कारण त्यामुळे त्यांना त्यांच्या स्वत:च्या भागात पाडलेला पैसा, इतर भागांत पाडलेल्या पैशापेक्षा वेगळा ओळखता येणे शक्य होत असावे, हीही शक्यता दिसते. नाणी प्रसृत करण्याचा अधिकार फक्त राजटंकशालेला असावा, नाण्यांवरील चिन्हांवरुन राजाचा आणि राजघराण्याचा बोध तर होत असावाच पण श्रेणी, किंवा प्रांतांसारखे प्रशासकीय घटक यांसारख्या विविध संस्थांचाही बोध होत असावा.

आहत नाण्यांशी संबंधित असलेला गुंतागुंतीचा प्रश्न म्हणजे चिन्हांचा अर्थ उकलणे. कमानींवरील मोर म्हणजे मौर्यांच्या राजघराण्याचे चिन्ह असावे असे

---

१. उपरोक्त.

बरेचसे खात्रीपूर्वक वाटते. कमानींवरील चंद्रकोर व 'चंद्राकडून संरक्षिला गेलेला' म्हणजे चंद्रगुप्त हे नाव यांचा संबंध पूर्वीच जोडला गेलेला होता. टेकड्यांच्या पार्श्वभूमीवर चंद्र दाखवून हे चित्र रेखाटले आहे हे चिन्ह बिंदुसारासाठी दाखविले जात असावे, असे आम्हाला वाटते. बिंदु किंवा कण यांच्या पासून बाहेर विस्तारत जाणारा, असा या नावाच्या अर्थाशीही या कल्पनेचा संबंध आहे त्याचप्रमाणे हे सूर्यचिन्ह व षडरचक्र ही दोन्हीही याच चिन्हाची वेगवेगळी रुपे असावीत. वेदीतील वृक्ष म्हणजे अशोकाचे झाड हे अशोकाचे चिन्ह असावे हे अगदी स्पष्ट आहे. हे चिन्ह अशोकाचे असावे असे कोसंबींना वाटते. इतर कोणत्याही चिन्हापेक्षा अधिक ठिकाणी आढळते, या एकाच आधारावर हे मान्य होणे शक्य आहे. काही नाण्यांवर हे चिन्ह षडरचक्राबरोबर येते. षडरचक्र हे बिंदुसाराचे चिन्ह म्हणून मानले तर त्याच्या नाण्यांवर अशोकाच्या कारकिर्दीत परत ठसे मारले गेले असा किंवा बिंदुसाराच्या कारकिर्दीत अशोक उज्जयिनी येथे राज्यपाल होता तेव्हा ही नाणी पाडली, असा अर्थ ध्वनित होतो.

उ. का. च. भांडी किंवा वाहत नाणी उत्खननांमध्ये जेथे जेथे सापडली त्या स्थळांची यादी या परिशिष्टाच्या अखेरीस आम्ही येथे देत आहोत. मौर्य-कालात या जागांमध्ये वस्ती होती असे आम्हाला सुचवावयाचे आहे. यामध्ये पुढील जागांचा समावेश होतो. अमरावती, अहिच्छत्रा, अत्रंजिखेड, बहाळ, बैराट, बाणगड, बसाढ, भीत, बक्सर, गिन्याक, हस्तिनापूर, झूसि, कसरवाड, कौशांबी, महेश्वर, मथुरा, मसौन, नाशिक, पिप्रवा, पटना, राजघाट, राजगीर, राइर, रुपर, सांभार, सांची, सारनाथ, तक्षशिला आणि त्रिपुरी.



आहात नाण्यांवरील चिन्हे.



# पाचवे परिशिष्ट

## अशोकाच्या आज्ञालेखांचे भाषांतर

हुल्त्श आणि ब्लोख यांच्या अधिकृत भाषांतराशी ज्या वाचकांचा परिचय नाही व ज्यांना ही भाषांतरे सहजासहजी मिळू शकत नाहीत त्यांचा विचार हे भाषांतर करताना डोळ्यापुढे ठेविलेला आहे. त्यामुळे भाषांतर अक्षरशः नाही. अर्थामधील बदलांचे विस्तृत स्पष्टीकरण देणाऱ्या तळटीपा गाळून टाकण्यात आलेल्या आहेत. मूळच्या आज्ञालेखांमधील वाचनीय मजकूर देण्याला महत्त्व दिलेले आहे.

आज्ञालेखांचे खालीलप्रमाणे विभाग पाडण्यात आलेले आहेत.

**दिर्घ शिलाशासने** : चौदा आज्ञालेख व कलिंगमध्ये सापडलेले दोन वेगळे आज्ञालेख,

**लघु शिलालेख** : लघु शिलाशासने, राणीचा आज्ञालेख, बराबर गुहालेख, आणि कंदहरचा द्वैभाषी कोरीव लेख.

यांपैकी दुसऱ्या विभागातील लघु शिलालेख हे संपूर्णपणे बौद्ध समुदाय वा सर्वसामान्य बौद्धधर्मीय यांच्याशी संबंधित आहेत. यांमध्ये भब्र लेख, रुम्मिनदेइ स्तंभलेख व निगालिसागर स्तंभलेख व निगलिसागर स्तंभलेख आणि दुष्काळविषयीचा आज्ञालेख यांचा समावेश होतो.

**स्तंभलेख**–सात स्तंभशासने.

या भाषांतरासाठी प्रोफेसर ए. एल. बॅशॅम यांनी केलेल्या साहाय्याबद्दल मी त्यांची ऋणी आहे.

## दीर्घ शिलाशासने

### पहिले दीर्घ शिलाशासन

देवांच्या प्रिय प्रियदर्शी राजाने हा **धम्मावरील** लेख कोरविला आहे. येथे, कोणत्याही प्राण्याला ठार करून त्याचा बळी देण्यात येऊ नये. तसेच सण साजरा करण्यासही येथे परवानगी नाही. देवांच्या प्रिय प्रियदर्शी राजाला सण साजरे करण्यात अनिष्ट प्रकार दिसतात, परंतु काही विवक्षित सण साजरे करण्यास त्याची संमती आहे.

पूर्वी देवांच्या प्रिय प्रियदर्शी राजाच्या पाकशाळेत मांसासाठी रोज हजारो प्राण्यांची हत्या होत असे. परंतु आता, हा धर्मलेख लिहिण्याच्या वेळी दोन मोर व

एक हरिण, असे तीन प्राणी मारले जात आहेत. हरिण मारले जातेच असे नाही. यापुढे हेही तीन प्राणी मारले जाणार नाहीत.

## दुसरे दीर्घ शिलाशासन

देवांच्या प्रिय प्रियदर्शी राजाच्या साम्राज्यात सर्वत्र आणि त्याच्या सीमांवरील चोळ, पाण्ड्य, सत्यापुत्र आणि श्रीलंकेपर्यंतच्या प्रदेशात आणि अँटिओकस नावाचा ग्रीक राजा, आणि त्या अँटिओकसचे शेजारचे राजे यांच्या प्रदेशात सर्वत्र देवांच्या प्रिय प्रियदर्शी राजाने दोन वैद्यकीय सेवा उपलब्ध करून दिल्या आहेत. यांत मनुष्याची वैद्यकीय चिकित्सा आणि पशूची वैद्यकीय चिकित्सा यांचा समावेश आहे. मनुष्य किंवा जनावरे यांना उपयोगी पडणाऱ्या औषधी वनस्पती जेथे होत नाहीत तेथे बाहेरून आणून त्यांची लागवड केली आहे. तसेच कंदमुळे व फळे जेथे उगवत नाहीत तेथेही ती आणवून त्यांची लागवड केलेली आहे. रस्त्यांच्या बाजूने माणसे व पशू यांच्या उपयोगासाठी विहिरी खणल्या आहेत आणि झाडे लाविली आहेत.

## तिसरे दीर्घ शिलाशासन

देवांचा प्रिय, प्रियदर्शी राजा असे म्हणतो की :

मला राज्याभिषेक झाल्यानंतर बाराव्या वर्षी मी पुढील आज्ञा केल्या युक्तांनी (दुय्यम अधिकारी) राजूक (ग्रामीण प्रशासक) आणि प्रादेशिक (जिल्हा प्रमुख) यांच्याबरोबर दर पाच वर्षांनी. लोकांना धम्माची शिकवण देण्यासाठी आणि इतर हेतूंनी माझ्या साम्राज्यात सर्वत्र दौरे काढावेत. स्वतःच्या मातापित्यांचे, मित्र आणि नातेवाईक यांचे आज्ञापालन करणे, ब्राह्मण आणि श्रमण यांच्याशी औदार्याने वागणे प्रशंसनीय असते. जीवांची हत्या करणे चांगले नाही. मितव्ययी असणे इतकेच नव्हे तर कमीत कमी संपत्ती धारण करणे योग्य असते. अधिकाऱ्यांनी वरील गोष्टींची नोंद घ्यावी. जनतेला त्या गोष्टी सांगाव्यात व त्यांचे स्पष्टीकरण द्यावे असा आदेश मंत्रिपरिषदेने द्यावा.

## चौथे दीर्घ शिलाशासन

सजीवांची हत्या करणे आणि त्यांना इजा करणे, आप्तेष्ट, ब्राह्मण आणि श्रमण यांच्याविषयी अनादराने वागणे या गोष्टी पूर्वी फार वाढलेल्या होत्या. परंतु आज देवांच्या प्रिय प्रियदर्शी राजाच्या धर्माचरणामुळे रणभेरीचा आवाज हा धम्माचा आवाज बनला आहे. स्वर्गीय रथ, हत्ती, अग्निगोलक आणि इतर दिव्य देखावे यांचे प्रदर्शन लोकांना दाखविले जात आहे. त्याने दिलेल्या धम्माच्या शिक्षणामुळे सजीवांची हत्या आणि त्यांना इजा करणे यांच्यापासून दूर राहणे'

आप्त, ब्राह्मण आणि श्रमण यांच्याविषयी आदर बाळगणे, माता, पिता आणि वडीलधारी मंडळी यांच्या आज्ञा पाळणे, या सर्व गोष्टी गेल्या अनेक शतकांमध्ये नव्हत्या, इतक्या वाढल्या आहेत. हे आणि असेच **धम्माचरणाचे** इतर प्रकार वाढलेले आहेत आणि वाढतील.

देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा, त्याचे मुलगे, त्याचे नातू आणि पणतू **धम्माचारासाठी** जगाच्या अंतापर्यंत प्रयत्नशील राहतील आणि **धम्माच्या** ठिकाणी अढळ निष्ठा ठेवून त्याची शिकवण देतील. यासाठी **धम्माचारांच्या** शिक्षणाची चळवळ अत्यंत महत्त्वाची आहे. पण सद्‌गुणांशिवाय **धम्माचरण** होत नाही. सद्‌गुणांची वाढ होणे व त्यात खंड न पडणे अगत्याचे आहे. या हेतूने हा लेख कोरविलेला आहे. सद्‌गुणांच्या वाढीसाठी लोकांनी प्रयत्न करावा व आपल्या उणिवांविषयी संतुष्ट राहू नये. देवांच्या प्रिय प्रियदर्शी राजाच्या राज्याभिषेकानंतर बारा वर्षांनी या ठिकाणी हा लेख कोरविला.

## पाचवे दीर्घ शिलाशासन

देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा असे म्हणतो :

सत्कृत्य करणे फार कठीण असते. आणि जो सत्कृत्य करतो तो कठीण गोष्ट साध्य करतो. आणि मी अनेक सत्कृत्ये केलेली आहेत. आणि माझे मुलगे, माझे नातू व त्यांच्यानंतरचे माझे जगाच्या अंतापर्यंतचे वंशज यांनी जर माझे उदाहरण गिरविले तर तेही सत्कृत्ये करतील. पण एखाद्याने माझ्या सुधारणांकडे, अगदी एखाद्या भागाकडेही दुर्लक्ष केले तर ते अनिष्ट होईल कारण पापाचरण सोपे आहे.

पूर्वी **धम्मासाठी** अधिकारी नव्हते. माझ्या राज्याभिषेकानंतर तेराव्या वर्षी मीच प्रथम अशा अधिकाऱ्यांची नेमणूक केली. यवन, कांबोज, गांधार, रिष्ठि आणि पितिनिक व पश्चिमेकडील आणखी काही लोक यांच्यामधील सर्व पंथीयांसाठी हे अधिकारी **धम्माच्या** प्रतिष्ठापनेसाठी, **धम्माविषयी** आस्था वाढविण्यासाठी आणि **धम्मपरायण** लोकांचे कल्याण आणि सुख पाहण्यासाठी कार्य करण्यात मग्न आहेत. सेवक आणि सरदार, ब्राह्मण आणि धनिक गृहस्थ, गरीब आणि वृद्ध यांच्यामधील **धम्मपरायण** लोकांच्या कल्याणासाठी आणि सुखासाठी व त्यांच्या अडचणी दूर करण्यासाठी ते (**धम्ममहामत्त**) झटत आहेत. तुरुंगातील कैदी जर बेजबाबदारपणाने वागलेले असतील तर त्यांच्या कल्याणासाठी किंवा मुले असलेले, शारीरिक वा मानसिक पीडा असलेले, वृद्ध अशा कैद्यांच्या सुटकेसाठी ते कार्य करीत आहेत. या ठिकाणी (पाटलिपुत्रात) माझ्या स्वतःच्या, माझे भाऊ आणि बहीण यांच्या आणि इतर आप्तांच्या अंतःपुरांतही ते

सर्वत्र कार्य करीत आहेत. माझ्या साम्राज्यामध्ये सर्वत्र, **धम्माशी** संबंधित असलेल्या सर्व गोष्टींमध्ये, **धम्मप्रतिष्ठापना** करण्यामध्ये आणि **धम्मपरायण** लोकांमधील दानप्रवृत्त लोकांची व्यवस्था पाहण्यामध्ये **धम्ममहामत्त** गुंतलेले आहेत. या हेतूने हा **धम्मलेख** कोरविण्यात आलेला आहे. तो दीर्घकाल टिकावा व माझ्या वंशजांनी त्याप्रमाणे वर्तन करावे.

## सहावे दीर्घ शिलाशासन

देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा असे म्हणतो :

पूर्वी राज्याचे कामकाज आणि त्याविषयीच्या अहवालांची ने-आण नेहमीच जलद रीतीने होत नसे. पण मी आता अशी व्यवस्था केलेली आहे. कोणत्याही वेळी मग मी भोजन करीत असलो, किंवा अंतःपुरात असलो किंवा शयनगृहात असलो, किंवा पशुशाळेत अगर रथात, उद्यानात असलो, कोठेही मी असलो तरी जनतेच्या कामकाजाविषयी दुतांनी संपर्क साधावा. अशा प्रकारे मी कोठेही असलो तरी जनतेचे कामकाज पहातो. आणि मी कोणत्याही ज्या तोंडी आज्ञा देईन, मग त्या देणग्या वा जाहीरनामा यांच्याशी संबंधित असोत किंवा माझ्या अधिकाऱ्यांकडे ताबडतोब लक्ष घालण्याचे विषय सोपविण्याविषयी असोत, त्यासंबंधी जर मंत्रि-परिषदेत काही मतभेद अगर चर्चा झाल्यास मला त्यासंबंधी कोणत्याही ठिकाणी, कोणत्याही वेळी कळविण्यात यावे, अशी मी आज्ञा दिली आहे. केवळ कष्ट आणि कामकाज यांत मला समाधान नाही. कारण सर्व जगाच्या कल्याणासाठी मी प्रयत्न केले पाहिजेत व कष्ट आणि कामकाज ही त्यासाठी साधने आहेत असे मी मानतो. सर्व जगाचे कल्याण साधण्याचा प्रयत्न करणे याखेरीज खरोखर दुसरे कोणतेही चांगले काम नाही. आणि माझी कृत्ये कितीही महान असोत, सर्व जीवांचे मी जे ऋण लागतो ते फेडण्यासाठी ती केलेली आहेत. या जन्मातील त्यांच्या सौख्या-साठी मी काम करतो, त्यामुळे त्यांना पुढील जन्मी स्वर्ग मिळेल. या हेतूने हा **धम्मलेख** कोरविलेला आहे. तो दीर्घकाल टिकावा. माझे मुलगे, नातू आणि पणतू यांनी सर्व जगाच्या कल्याणासाठी झटावे. पण खूप परिश्रम केल्याशिवाय ते साधणार नाही.

## सातवे दीर्घ शिलाशासन

देवांचा प्रिय, प्रियदर्शी राजा अशी इच्छा करतो की, सर्व पंथांनी सर्व ठिकाणी नांदावे, कारण संयम आणि चित्तशुद्धीचा आग्रह सर्व पंथ धरतात. परंतु माणसांच्या इच्छा आणि भावना बदलत्या असतात. जे इष्ट आहे त्याचे व त्याच्या एखाद्या भागाचे आचरण ते करतील. परंतु एखादा मनुष्य जरी उदार असला

तरी संयम, चित्तशुद्धी, कृतज्ञता, अढळ निष्ठा त्याच्याजवळ नसतील तर तो हलकाच मानला जातो.

## आठवे दीर्घ शिलाशासन

पूर्वी शिकार आणि तत्सम करमणूकीसाठी राजा विहारयात्रा करीत असे. देवांचा प्रिय, प्रियदर्शी राजा, आपल्या राज्यारोहणाला दहा वर्षे झाल्यानंतर बोधिवृक्षाच्या दर्शनासाठी गेला. तेव्हापासून **धम्मयात्रांची** प्रथा सुरू झाली. अशा यात्रांच्या वेळी साधू आणि ब्राह्मण यांच्या सभा भरविल्या जातात, दाने दिली जातात, वृद्ध लोकांच्या सभा भरविण्याची व्यवस्था केली जाते, सोने वाटले जाते, ग्रामीण भागातील जनतेच्या गाठीभेटी घेतल्या जातात, **धम्माची** शिकवण दिली जाते आणि **धम्मविषयक** प्रश्नांची उत्तरे दिली जातात. देवांच्या प्रिय, प्रियदर्शी राजाला इतर कोणत्याही करमणूकींपेक्षा अधिक आनंद यातून मिळतो.

## नववे दीर्घ शिलाशासन

देवांचा प्रिय, प्रियदर्शी राजा असे म्हणतो : लोक तऱ्हेतऱ्हेचे समारंभ साजरे करतात. आजारीपणात, मुलामुलींच्या विवाहाच्या वेळी, मुलांच्या जन्माच्या वेळी, प्रवासाला निघताना अशा वेळी आणि इतर तत्सम प्रसंगी लोक अनेक समारंभ साजरे करतात. विशेषत: स्त्रिया विविध प्रकारचे क्षुद्र आणि निरर्थक समारंभ साजरे करतात. असे समारंभ करावेच लागले तरी त्यातून फारच थोडे निष्पन्न होते. परंतु अतिशय महत्त्व असलेला एक समारंभ म्हणजे **धम्म.** दास आणि सेवक यांच्याविषयी आस्था, गुरुजनांविषयी आदर, सजीवांच्या बाबतीत संयमपूर्ण वर्तन, श्रमण आणि ब्राम्हण यांना दाने यांचा या समारंभात समावेश होतो. या आणि अशा आचारांना **धम्माचा** समारंभ म्हणतात. पिता, पुत्र, बंधू, स्वामी, मित्र, परिचित आणि शेजारी या सर्वांना असे वाटले पाहिजे की, 'हे पुण्यकारक आहे. माझा उद्देश साध्य होईपर्यंत असाच समारंभ मीही साजरा करावा.'

(कालसीचा मजकूर) किंवा त्यांनी स्वत:शी असे म्हणावे की, इतर समारंभांच्या फलाविषयी संशय आहे, त्यामुळे फलप्राप्ती होईल किंवा होणारही नाही आणि ते समारंभ फक्त ऐहिक बाबींपुरतेच फलदायी ठरतात. पण **धम्माच्या** समारंभाचे फळ सर्वकाळ मिळणारे आहे. त्याचा उद्देश जरी या जन्मी साध्य झाला नाही तरी पुढील जन्मासाठी अनंत पुण्याची प्राप्ती होते. परंतु जर आपला उद्देश याच जन्मी साध्य झाला तर दोनही बाजूंनी फायदा होतो. कारण या जन्मी उद्देश साध्य होतो **धम्माच्या** समारंभामुळे अनंत पुण्याची प्राप्ती होते.'

(गिरनारचा मजकूर) याखेरीज ते म्हणतात. 'दान हे पुण्यकृत्य आहे.' परंतु **धम्मदान** किंवा **धम्माचा** प्रसाद यांची तुलना करता येईल असे इतर कोणतेही दान किंवा प्रसाद नाही. ' म्हणून, हे करावे, यातूनच स्वर्गप्राप्ती होऊ शकेल,' असा सल्ला मित्र, सहचर, आप्त, किंवा सहकारी यांनी देणे आवश्यक आहे आणि स्वर्गप्राप्तीपेक्षा अधिक महत्त्वाचे काय असू शकेल ?

## दहावे दीर्घ शिलाशासन

देवांच्या प्रिय प्रियदर्शी राजाला कीर्ती किंवा वैभव यांची हाव नाही परंतु त्याच्या जनतेने **धम्माच्या** आज्ञा निष्ठेने पाळाव्यात आणि **धम्माचा** मार्ग अनुसरावा यासाठी मात्र राजाला सांप्रत आणि भविष्यकाळातही कीर्ती आणि वैभव यांची इच्छा आहे. याच मर्यादेपर्यंत देवांचा प्रिय कीर्तीची आणि वैभवाची इच्छा करतो. देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा जे कोणतेही प्रयत्न करतो ते सर्व पारलौकिक जीवनाच्या दृष्टीने करतो, त्यामुळे सर्व माणसांची दुष्ट प्रवृत्तींपासून सुटका होईल कारण दुष्ट प्रवृत्तींमध्ये कोणतेही पुण्य असू शकत नाही. परंतु अतोनात प्रयत्न केल्याशिवाय व इतर सर्व गोष्टींचा त्याग केल्याशिवाय, नीच व उच्च स्थानावरील माणसांना हे अवघड आहे, उच्च स्थानावरील माणसांना विशेष अवघड आहे.

## अकरावे दीर्घ शिलाशासन

देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा असे म्हणतो :

**धम्मदानाशी** तुलना करता येईल असे दान नाही, अशी **धम्मस्तुती** नाही, असा **धम्मसहभाग** नाही असे **धम्ममित्रत्व** नाही आणि असा **धम्म** म्हणजे दास आणि सेवक यांच्याशी सद्वर्तन, माता व पिता यांच्या आज्ञा पाळणे, मित्र, परिचित आणि आप्त तसेच श्रमण आणि ब्राम्हण यांच्याविषयी उदारबुद्धी व सजीवांच्या हत्त्येपासून दूर राहणे. पिता, पुत्र, बंधु, स्वामी, मित्र, परिचित, आप्त आणि शेजारी यांनी असे म्हणावे की, ' हे पुण्यकारक आहे. हे आपण करावे.' असे केल्याने इहलोकात लाभ आहे आणि परलोकी **धम्मदानातून** होणारा अनंत पुण्यसंचय आहे.

## बारावे दीर्घ शिलाशासन

देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा दाने व इतर मानसन्मान देऊन सर्व पंथांचा आणि साधू व सामान्य लोक यांचा सन्मान करतो. परंतु दाने किंवा सन्मान ही सर्व पंथांच्या मूलभूत तत्त्वांच्या प्रगतीइतकी देवांच्या प्रियाला महत्त्वाची वाटत नाहीत. मुलभूत तत्त्वांची ही प्रगती वेगवेगळे स्वरूप धारण करते, परंतु तिचा पाया मात्र वाक्संयम हाच आहे म्हणून स्वत:च्या धर्मपंथांची वृथा प्रशंसा करू नये व इतरांच्या

धर्मपंथाला नको त्या प्रसंगी नावे ठेवू नयेत. तसे करण्याचे काही प्रसंग आले तर निदान त्यात सौम्यपणा तरी असावा. प्रत्येक प्रसंगी दुसऱ्या माणसाच्या धर्मपंथा-विषयी आदर बाळगावा; असे केल्याने तो आपल्या स्वत:च्या धर्मपंथाची अधिक छाप पाडतो व दुसऱ्या माणसालाही त्यात लाभ होतो. उलट, तसे न केल्यास आपल्या स्वत:च्या धर्मपंथाची छाप कमी होते व दुसऱ्या माणसाच्या धर्मपंथालाही हानी पोहोचते. शिवाय जो कोणी आपल्या धर्माची केवळ धर्मपरायणतेच्या पोटी, चांगली बाजू उजेडात आणण्यासाठी स्तुती करतो वा दुसऱ्या माणसाच्या धर्मपंथाची निंदा करतो तो स्वत:च्या धर्मपंथाची त्याहून अधिक गंभीर हानी करतो. म्हणून समान विचारांची प्रशंसा करावी त्यामुळे माणसे एकमेकांच्या धर्मपंथांची तत्त्वे ऐकतील व त्यांचे पालन करतील. सर्व धर्मपंथांची चांगली माहिती असावी, योग्य काय आहे तेच शिकविले जावे व त्यांच्या अनुयायांना सर्वत्र हेच सांगितले जावे की, 'देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा सर्व धर्मांच्या मूलभूत तत्त्वांच्या प्रगतीइतके महत्त्व दान वा सन्मान यांना देत नाही.' अशी देवांच्या प्रियाची इच्छा आहे **धम्ममहामत्त, स्त्रीधम्महामत्त,** राज्याच्या शेतजमिनीवरील अधिकारी व इतर वर्गातील अधिकारी असे अनेकजण या कामी गुंतलेले आहेत. याचा परिणाम असा झाला आहे की स्वत:च्या धर्मपंथाची छाप आणि **धम्माचे** वैभव वाढलेले आहे.

## तेरावे दीर्घ शिलाशासन

देवांच्या प्रिय प्रियदर्शी राजाच्या राज्यारोहणाला आठ वर्षे झाल्यावर त्याने कलिंग जिंकले. दीड लक्ष लोकांना कैद करण्यात आले. एक लक्ष लोकांची हत्या झाली व त्याहून कितीतरी पटीने लोक परागंदा झाले. त्यानंतर, आता कलिंग साम्राज्याला जोडले गेले, देवांच्या प्रियाने अतिशय कळकळीने **धम्माचरण** केले, **धम्माची** इच्छा केली आणि **धम्माची** शिकवण दिली. कलिंग जिंकल्यानंतर देवांच्या प्रियाला खंत वाटली कारण जेव्हा एक स्वतंत्र देश जिंकला जातो तेव्हा होणारी लोकांची कत्तल, हत्या आणि त्यांचे परागंदा होणे यांविषयी देवांच्या प्रियाला अतिशय दु:ख होते आणि त्याच्या मनावर भयंकर दडपण येते. जे तेथे मागे राहतात, मग ते ब्राम्हण, श्रमण वा इतर धर्मपंथांचे असोत, किंवा आपल्या वरिष्ठांविषयी निष्ठा असणारे, मातापित्यांची आज्ञा पाळणारे, गुरुजनांची आज्ञा पाळणारे, गृहस्थधर्मी असोत, जे आपल्या मित्रांशी, परिचितांशी, सहकाऱ्यांशी, आप्तांशी, दासांशी आणि सेवकांशी चांगल्या तऱ्हेने व प्रेमाने वागतात त्या सर्वांना हिंसा, खून, प्रिय व्यक्तींचा वियोग हे सर्व सहन करावे लागते, त्यांविषयी देवांच्या प्रियाला त्याहूनही अधिक खेद होतो. जे या सर्वातून निसटून जाण्याइतके सुदैवी असतात, आणि ज्यांचे प्रेम (युद्धाच्या क्रूर परिणामांमुळे) कमी झालेले नसते

त्यांनाही आपले मित्र, परिचित, सहकारी आणि आप्त यांच्या दुर्दैवामुळे दुःख सहन करावे लागते. सर्व माणसांचा या यातनांमध्ये जो सहभाग असतो त्याने देवांच्या प्रियाचे मन अतिशय दडपून जाते. ग्रीकांचा अपवाद सोडला तर ब्राम्हण आणि श्रमण यांचे संघ नाहीत अशी एकही भूमी आढळत नाही आणि जेथे लोक कोणत्या ना कोणत्या धर्मपथाचे अनुयायी नाहीत अशी एकही भूमी नाही. कलिंग साम्राज्याला जोडताना जितके लोक मारले गेले वा मेले वा परागंदा झाले त्यांच्या एक शतांश किंवा एक सहस्त्रांश लोकांनाही आज अशा यातना सहन कराव्या लागल्या तर देवांच्या प्रियाचे मन अत्यंत विदीर्ण होईल.

देवांच्या प्रियाचा असा विश्वास आहे की जो दुष्कृत्य करतो, त्याला जितकी क्षमा करणे शक्य असेल तर तितकी क्षमा करावी. आणि देवांचा प्रिय आपल्या साम्राज्यातील वन्य जमातींना मनमिळाऊपणाने वागवितो पण तो त्यांना असाही इशारा देतो की त्याला स्वतःला खंत वाटत असली तरी त्यांनी जर पश्चात्ताप केला नाही तर त्यांना ठार मारण्याची ताकद त्याच्यामध्ये आहे कारण सर्व लोकांनी सुरक्षित, संयमशील, समाधानी आणि सौम्य असावे अशी देवांच्या प्रियाची इच्छा आहे. **धम्मविजय** हा सर्वश्रेष्ठ विजय असे देवांचा प्रिय मानतो इतकेच नाही तर सहाशे योजने (सुमारे १५०० मैल) इतक्या दूर अंतरापर्यंतच्या सर्व सीमांवर देवांच्या प्रियाने हा विजय मिळविलेला आहे. तेथे अँटिओकस नावाचा ग्रीक राजा राज्य करतो आणि अँटिओकसच्या राज्याच्या पलीकडच्या भूमीवर टॉलेमी, अँटिगोनस, मगस व अलेक्झांडर या नावांचे चार राजे आहेत, आणि दक्षिणेकडे श्रीलंकेपर्यंत चोळ व पाण्डय आहेत. त्याचप्रमाणे येथेही साम्राज्यांतर्गत प्रदेशात ग्रीक आणि कांबोज, नाभक आणि नाभपक्ती, भोज आणि पितिनिक, आंध्र आणि पारिंद हे लोकसमूह आहेत आणि सर्वत्र देवांच्या प्रियाने दिलेल्या **धम्माची** शिकवण लोक अनुसरतात. जेथे देवांच्या प्रियाचे दूत जाऊन पोहोचलेले नाहीत तेथेही लोक त्याच्या **धम्मानुसार** होणाऱ्या वर्तनाविषयी आणि त्याचे **धम्मविषयक** हुकूम व शिकवण ऐकतात, आणि ते त्या **धम्माचे** आचरण करतात आणि करीत राहतील.

यामुळे काय झाले असेल तर सर्वत्र विजय मिळाला, आणि सर्वत्र मिळालेला विजय आनंददायक आहे. हा आनंद **धम्मविजयातून** मिळालेला आहे परंतु तरीही हा आनंद थोडासाच आहे कारण या विजयाचा परिणाम म्हणजे परलोकाशी संबंध हे त्याचे महत्त्व आहे असे देवांच्या प्रियाला वाटते.

हा **धम्मलेख** कोरविलेला आहे त्याचे कारण माझ्या कोणत्याही मुलांनी किंवा मला होणाऱ्या पणतवंडांनी नवे प्रदेश जिंकण्याचा विचार करू नये आणि

जे काही विजय त्यांना मिळतील त्यात त्यांनी संयमाने व सौम्य शिक्षा देऊन समाधान मानावे. फक्त **धम्माने** मिळणाऱ्या विजयाचाच त्यांनी खरा विजय म्हणून विचार करावा आणि **धम्मातील** आनंद हाच त्यांचा संपूर्ण आनंद असावा, कारण त्यालाच इहलोकी आणि परलोकी मूल्य आहे.

## चौदावे दीर्घ शिलाशासन

देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा याच्या आज्ञेने हा **धम्मलेख** कोरविलेला होता. तो संक्षिप्त, मध्यम लांबीचा व विस्तृत मजकुराचा असा वेगवेगळा दिसतो कारण प्रत्येक परिच्छेद सर्वत्र कोरलेला नाही. बरेचसे कोरून झालेले आहे आणि तरीही बरेचसे कोरावयाचे राहिले आहे. कारण साम्राज्य विस्तृत आहे. त्यात बरीच पुनरावृत्ती आहे कारण काही विषयांमध्ये सौन्दर्य आहे व लोकांच्या मनात ते ठसले पाहिजे. काही ठिकाणी परिच्छेद वगळल्यामुळे किंवा लक्ष न दिल्यामुळे किंवा कोरक्यांच्या चुकीमुळे लेख कोरविण्यात चूक झाली असेल.

## पहिला वेगळा आज्ञालेख (धौली आणि जौगडा)

देवांच्या प्रियाच्या आज्ञेवरून, तोसली/समाप येथील अधिकाऱ्यांना व नगर-न्यायाधीशांना अशा सूचना देण्यात येत आहेत.

मी जे काही उद्दिष्ट डोळ्यासमोर ठेवले आहे ते प्रत्यक्ष कृती करून किंवा परिणामकारक साधने वापरून साध्य करावे अशी माझी इच्छा आहे. या बाबतीत हीच मुख्य पद्धती आहे असे मला वाटते. आणि म्हणून तुम्हाला या आज्ञा आहेत. तुमच्या ताब्यात हजारो प्राणी आहेत. तुम्ही माणसांचे प्रेम संपादन करावे. सर्व माणसे माझी मुले आहेत आणि माझ्या मुलांचे जसे इहलोकी व परलोकी कल्याण साधावे व त्यांना सौख्य मिळावे अशी माझी इच्छा आहे तशीच या माणसांच्या बाबतीतही आहे. परतु तुम्हाला या तत्त्वातील गांभीर्य उमगणार नाही. तुमच्या-पैकी कदाचित एखाद्या माणसाला ते उमगेल पण त्यालाही अंशत:च उमगेल, संपूर्णपणे नाही. तुमच्यापैकी जे उच्च स्थानी असतील त्यांनीही याच्यावर सखोल विचार करावा. बऱ्याच वेळा एखाद्या माणसाला विनाकारण तुरुंगवास किंवा दिव्य सहन करावे लागते व त्यानंतर त्याची तुरुंगातून मुक्तता होते. काही माणसे पुढेही सहन करीत राहतात. नि:पक्षपाती आचरण होईल यासाठी तुम्ही झटावे. मत्सर, रागीटपणा, निष्ठुरता, अधीरता, आग्रहीपणा, आळस किंवा ढिलेपणा यांपैकी कोणतीही एक गोष्ट ज्याच्याजवळ असेल त्याच्याकडून असे आचरण होणार नाही. असे दोष टाळण्याचा तुम्ही प्रयत्न करावा. या सर्वांचे मूळ म्हणजे तुमची स्थिरबुद्धी असावी व तुमच्या कामात घाई होऊ नये. जो निरुत्साही आहे

तो कृती करणार नाही, आणि तुमच्या शासकीय कार्यासाठी तुम्ही धडपड करावी, कृती करावी आणि काम करावे, म्हणून ज्याला हे मान्य आहे त्याने तुम्हाला म्हणावे, 'देवांच्या प्रियाची अशी शिकवण आहे. ऋणातून मुक्त होण्याचा विचार करा, या शिकवणुकीप्रमाणे वागल्यास मोठे फल मिळते आणि न वागल्यास मोठे नुकसान होते. या आज्ञेचा अनादर केल्यास तुम्हाला स्वर्गही मिळणार नाही आणि राजकृपाही मिळणार नाही. या कामाला मी इतक्या मनापासून का वाहून घेत आहे ? कारण अशा आचरणामुळं तुम्ही स्वर्गलोकी पोहोचाल आणि माझ्या ऋणातून मुक्त व्हाल.

हा आज्ञालेख तिष्य नक्षत्राच्या आठव्या दिवशी प्रसृत करावा आणि तिष्यदिनांच्या मध्यंतरीच्या काळात एकादा जरी श्रोता असला तरी त्याच्यापुढे वारंवार तो मोठ्याने वाचावा. असे केल्याने माझ्या आज्ञांप्रमाणे वागण्यास तुम्ही समर्थ व्हाल. योग्य कारणाशिवाय कोणत्याही माणसांना तुरुंगवास किंवा दिव्य कधीही सहन करावे लागू नये म्हणून नगरन्यायाधीशांनी नेहमीच दक्ष राहावे यासाठी हा लेख या ठिकाणी कोरण्यात आलेला आहे. या हेतूने तापट किंवा निष्ठुर नसलेल्या एखाद्या अधिकाऱ्यास मी दर पाच वर्षांनी दौऱ्यावर पाठवीन, या प्रकरणी चौकशी केल्यानंतर...माझ्या आज्ञांचे पालन केले जात आहे असे तो पाहील. उज्जयिनीचा राजपुत्र अशाच प्रकारच्या अधिकाऱ्यांचा गट तीन वर्षांपेक्षा अधिक असणार नाही अशा अंतराने पाठवील. त्याचप्रमाणे तक्षशिलेतही अधिकारी दौऱ्यावर जातील तेव्हा आपल्या नित्याच्या कर्तव्याकडे दुर्लक्ष न करता याची चौकशी करतील आणि राजाच्या आज्ञांची अंमलबजावणी करतील.

## दुसरा वेगळा आज्ञालेख

देवांच्या प्रियाच्या आज्ञेवरून :

राजाचे फर्मान जाहीर करण्याची जबाबदारी ज्यांच्यावर सोपविलेली आहे त्या तोसली येथील राजपुत्राला व अधिकाऱ्यांना, समाप येथील अधिकाऱ्यांना अशी आज्ञा दिली जावी : मी जे काही उद्दिष्ट डोळ्यासमोर ठेविले आहे ते प्रत्यक्ष कृती करून किंवा परिणामकारक साधने वापरून साध्य करावे अशी माझी इच्छा आहे. या बाबतीत हीच मुख्य पद्धती आहे असे मला वाटते आणि म्हणूनच तुम्हाला या आज्ञा आहेत. सर्व माणसे माझी मुले आहेत आणि माझ्या मुलांचे जसे इहलोकी व परलोकी कल्याण साधावे व त्यांना सौख्य मिळावे अशी माझी इच्छा आहे, तशीच या माणसांच्या बाबतीतही आहे माझ्या सीमांवरील अजित लोकांनी माझी काय इच्छा आहे असे विचारले तर त्यांच्याविषयीचा माझा आदरभाव सांगून माझी जी इच्छा आहे ती त्यांना समजावून द्यावी. 'या बाबतीत

त्यांना कोणताही त्रास होऊ नये, राजावर त्यांनी विश्वास ठेवावा, आणि राजाशी होणाऱ्या व्यवहारातून त्यांना फक्त सुखच मिळावे आणि दु:ख मिळू नये अशी राजाची इच्छा आहे. राजा शक्य तितकी क्षमाशीलता दाखविल याची जाणीव त्यांना करून द्यावी, आणि राजामार्फत त्यांनी **धम्माचे** आचरण करावे आणि इहलोकी व परलोकी फल मिळवावे.'

माझी इच्छा, माझा निश्चय आणि माझे निश्चित वचन तुम्हाला कळविलेले आहे, त्याप्रमाणे तुम्ही वागलात तर त्यांच्या ऋणातून मी मुक्त होईन या हेतूने मी आज्ञा करीत आहे. या कृत्यांनी माझ्या कार्याची प्रगती होईल, आणि राजा हा पित्यासारखा आहे, आणि त्याला स्वत:विषयी जे वाटते तेच त्यांच्याविषयीही वाटते कारण ते त्याला त्याच्या स्वत:च्या मुलांप्रमाणेच आहेत हे त्यांना उमगेल आणि त्याविषयी त्यांची पुन्हा खात्री होईल. माझे दूत आणि विशेष अधिकारी तुमच्याशी संपर्क साधतील, आज्ञा पोहोचवतील आणि माझी इच्छा, माझा निश्चय व माझे निश्चित वचन तुम्हाला कळवितील. कारण सीमांवरील लोकांना विश्वासात घेण्यास, त्यांचे कल्याण साधण्यास व इहलोकी आणि परलोकी सौख्य मिळवून देण्यास तुम्ही समर्थ आहात. असे केल्याने तुम्ही स्वर्गलोकी पोहोचाल व माझ्या लोकांचे ऋण फेडण्यास मला मदत कराल.

सीमांवरील लोकांना आपलेसे करावे, त्यांच्यामध्ये **धम्माचा** प्रसार करावा यासाठी अधिकारी नेहमीच दक्ष राहतील, या हेतूने हा लेख येथे कोरविला आहे. तिष्य नक्षत्राच्या दिवशी दर चार महिन्यांनी हा आज्ञालेख जाहीर करावा, तिष्य-दिनांच्या मधल्या काळातही वेळोवेळी तो स्वेच्छेने जाहीर केला जावा आणि प्रसंगी जरी एकच श्रोता असेल तरीही जाहीर करावा. असे केल्याने तुम्ही आज्ञांचे पालन करू शकाल.

## लघु शिलालेख

लघु शिलाशासन (विविध मजकुरांचे संपादन)

सुवर्णगिरीहून आर्यपुत्र आणि अधिकारी यांच्या आज्ञेवरून : इसिलाच्या अधिकाऱ्यांचे कुशल चिंतून त्यांना अशी आज्ञा देण्यात येत आहे : देवांचा प्रिय, अशोक असे सांगतो : अडीच वर्षांहून अधिक काळ मी एक सामान्य बौद्ध उपासक झालेलो आहे पण पहिल्या वर्षी मी फारशी प्रगती केली नाही. आता एक वर्षापेक्षाही अधिक काळ मी बौद्धसंघाच्या जास्त जवळ गेलो आहे आणि अधिक उत्साही झालो आहे. या कालापर्यंत भरतखंडातील माणसांची संगत देव धरीत नसत, आता ते त्यांच्यात मिसळतात, आणि हा माझ्या प्रयत्नांचा परिणाम आहे. याहून अधिक म्हणजे जे मोठे आहेत त्यांनीच फक्त हे काहीतरी

मिळवावयाचे आहे असे नाही तर लहानांनाही जर त्यांना कळकळ असेल तर, हे मिळविता येण्याजोगे आहे आणि ते सुद्धा सहजपणे स्वर्गलोकी पोहोचू शकतील. लहान आणि थोर अशा दोघांनीही प्रगती करावी आणि शेजारच्या लोकांनाही ही प्रगती शाश्वत आहे हे समजावे. या कारणासाठी ही घोषणा केलेली आहे आणि ही गुंतवणूक वाढेल, भरपूर वाढेल आणि पुन्हा वाढली त्याच्या निम्मी वाढेल. हा मजकूर येथे व इतरत्र टेकड्यांवर कोरला पाहिजे आणि जेथे शिलास्तंभ असेल तेथे त्या स्तंभावर कोरला पाहिजे. तुमच्या आहारामध्ये सर्वत्र हा लेख प्रसृत केला पाहिजे. दौऱ्यावर असताना ही घोषणा केलेली आहे दौऱ्यावर २५६ रात्री घालविलेल्या आहेत.

देवांचा प्रिय असे म्हणतो. देवांचा प्रिय ज्या काही आज्ञा देतो त्यांचे काटेकोरपणे पालन झाले पाहिजे. राजुकाला (ग्रामीण अधिकारी) शिक्षण दिले पाहिजे आणि तो स्थानिक अधिकाऱ्यांप्रमाणे दवंडी पिटवून गावातील लोकांना गोळा करील व शिकवण देईल. 'माता-पित्यांची आज्ञा पाळा, गुरुजनांची आज्ञा पाळा. प्राण्यांवर दया करा. सत्य बोला. धम्माच्या या गुणांचे आचरण करावे.'

देवांच्या प्रियाच्या आज्ञांनुसार तुम्ही त्यांना असे शिक्षण द्याल, आणि त्याचप्रमाणे हत्तींना माणसाळविणारे, लेखनिक, ज्योतिषी आणि ब्राम्हण हे आपल्या हाताखालील उमेदवारांना प्राचीन परंपरेनुसार शिक्षण देताना, शिष्यांनी त्यांच्या गुरुंना ..योग्य गुरुंना मान द्यावा, असे शिकवितात याची खात्री करून घ्याल. कुटुंबातील नातेवाईकांनी परस्परांना आदराने वागवावे.

ही प्राचीन परंपरा आहे, दीर्घ आयुष्याला उपयोगी आहे आणि म्हणून तिचे पालन केले पाहिजे. कोरक्या कपढ (चपट) याने कोरले.

## राणीचा आज्ञालेख

देवांच्या प्रियाच्या आज्ञेवरुन, सर्व ठिकाणच्या अधिकाऱ्यांना अशी सूचना देण्यात येत आहे की, दुसऱ्या राणीने आंबराई, मठ यांचे दान केले, धर्मदान देण्यासाठी काही व्यवस्था केली वा इतर काही दाने दिली तर अशा कोणत्याही देणगीचा उल्लेख राणीच्या... तीवलची माता, कारुवाकी, दुसरी राणी, हिच्या नावाने करावा.

## बराबर येथील गुहालेख

एक. प्रियदर्शी राजाने, आपल्या राज्याभिषेकाला बारा वर्षे झाल्यानंतर आजीविकांना ही वटगुहा दिली.

दोन. प्रियदर्शी राजाने आपल्या राज्याभिषेकाला बारा वर्षे झाल्यानंतर आजीविकांना खलतिक पर्वतावरील ही गुहा दिली.

तीन. प्रियदर्शी राजाने, राज्याभिषेक झाल्यापासून एकोणीस वष...

## कंदहरचा द्वैभाषिक शिलालेख

(ग्रीक मजकूर)[1]. दहा वर्षे पूर्ण झाल्यानंतर, प्रियदर्शी राजाने लोकांना पावित्र्य (म्हणजे **धम्म**) दाखविले. आणि त्या वेळेपासून (पुढेही) त्याने लोकांना अधिक शुद्धाचरणी बनविले आणि संपूर्ण जगभर सर्व गोष्टींची भरभराट होत आहे आणि सजीवांच्या (भक्षणा) पासून राजा अलिप्त राहतो, आणि इतर लोक आणि राजाचे जे कोणी शिकारी व मच्छिमार (होते) त्यांनीही शिकार थांबविली आहे, आणि ज्यांचे (स्वतःवर) नियंत्रण नव्हते तेही शक्य तितका संयम बाळगू लागले आहेत, आणि माता, पिता व वडील मंडळी यांच्या आज्ञा पाळू लागले आहेत, पूर्वी अशी स्थिती नव्हती. आणि भविष्यकाळात, या सर्व गोष्टी करून, ते पूर्वीपेक्षा अधिक समंजसपणाने व चांगल्या तऱ्हेने जगतील.

(अॅरेमिक मजकूर)[2]. दहा वर्षे झाल्यानंतर आमचा स्वामी, प्रियदर्शी राजा याने लोकांना **धम्माचे** शिक्षण द्यावयाचे ठरविले. तेव्हापासून जगातील लोकांमधील पापे कमी झालेली आहेत. जे पापी होते त्यांच्यातील पाप नाहीसे झाले आहे, आणि सर्व जगात आनंद आणि शांतता आहे. आणि खाण्याशी संबंध आहे अशा इतर बाबतीतही आमच्या राजाने अगदी थोडी जनावरे मारली. हे पाहून इतर लोकांनीही जनावरांना मारण्याचे बंद केले आहे. जे मासे पकडीत असत त्यांच्या व्यवसायावर बंदी घालण्यात आली आहे. त्याचप्रमाणे ज्यांच्याजवळ संयम नव्हता ते आता संयम शिकले आहेत. मातापिता आणि वडील मंडळी यांच्या आज्ञा पाळणे, आणि यात अंतर्भूत असलेल्या कर्तव्यातील सारखेपणा आता आचरणात आला आहे. जे शुद्धाचरणी लोक आहेत त्यांच्यावर आता खटले भरले जात नाहीत. अशा प्रकारे सर्व माणसांच्या दृष्टीने **धम्माचे** आचरण महत्त्वाचे आहे. आणि ते सतत तसेच राहील.

---

१. जेए, दोनशे सेहेचाळीस, १९५८, पृ. २-३ मध्ये दिलेल्या मजकुराच्या आधारावर प्रा. बॅशॅम यांनी केलेले भाषांतर.

२. 'जेए, दोनशे सेहेचाळीस, १९५८, पृ. २२ यातील आंद्रे ड्यूपाँ-सोम्मेर यांनी केलेल्या भाषांतरावर आम्ही हे भाषांतर आधारलेले आहे.



कंदहर येथील ग्रीक व ॲरेमिक द्वैभाषिक कोरीव लेख

# लघु शिलालेख

(अशोकाच्या बौद्धधर्माच्या आस्थेविषयी प्रामुख्याने संबंधित असलेले)

## भब्रू लेख

मगधाचा राजा, प्रियदर्शी संघाला अभिवादन करून त्याचा उत्कर्ष आणि स्वास्थ्य चिंतितो. भदन्तहो बुद्ध, धम्म व संघ (म्हणजे बौद्धधर्म) याविषयी मला किती आदर आहे व माझी त्यावर किती श्रद्धा आहे हे तुम्ही जाणताच. भदंतहो, भगवान बुद्ध जे बोलले ते योग्यच बोलले. आणि भदंतहो, बौद्धधर्म दीर्घकाल टिकावा म्हणून मला ज्या गोष्टी वाटतात त्या सांगण्यास तुम्ही मला परवानगी द्या. धम्म, शिस्तीचा उत्कृष्ट गुण, उदात्त माणसाची परंपरा, भविष्याविषयीची भीती, मुनींच्या गाथा, मौनासंबंधीचे सूत्र, उपतिस्साचे प्रश्न आणि असत्य भाषणाविषयी भगवान बुद्धांनी राहुलला दिलेले इषारेवजा भाषण–धम्माविषयीची प्रवचने भदंतहो, अनेक भिक्षु व भिक्षुणी यांनी वारंवार ऐकावीत आणि त्यावर मनन करावे, तसेच सर्वसामान्य स्त्रीपुरुषांनीही करावे अशी माझी इच्छा आहे, मी हे कोरवून ठेवीत आहे कारण भदंतहो, त्यामुळे तुम्हाला माझी इच्छा कळेल.

## रुम्मिनदेइ स्तंभलेख

देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा, राज्याभिषेकाला वीस वर्षे झाल्यानंतर स्वतः त्या बुद्ध शाक्यमुनीच्या जन्मस्थानी आला आणि त्याने या स्थानाची पूजा केली. त्याने येथे दगडी वेदी बांधण्याची व दगडी स्तंभ उभारण्याची व्यवस्था केली. लुंबिनी या खेड्यात भगवान बुद्धाचा जन्म झाला म्हणून त्याला करातून सूट दिली, आणि महसूल म्हणून वसुलीचा (धान्याचा) एक अष्टमांश इतका हिस्सा ठरवून देण्यात आला.

## निगलिसागर स्तंभलेख

देवांच्या प्रिय, प्रियदर्शी राजाने, त्याच्या राज्याभिषेकाला चौदा वर्षे झाल्यानंतर कोनाकमन बुद्धाचा स्तूप वाढवून दुप्पट (त्याच्या पूर्वीच्या आकाराच्या)...आणि त्याच्या राज्याभिषेकाला...वर्षे झाल्यानंतर तो स्वतः येथे आला, त्याने पूजा केली...आणला...

## दुफळीसंबंधीचा आज्ञालेख

देवांचा प्रिय, कौशांबी । पाट (लिपुत्र) येथील अधिकाऱ्यांना अशी आज्ञा करतो.

बौद्धसंघात कोणीही फूट पाडता कामा नये. भिक्षु आणि भिक्षुणी यांच्या संघात ऐक्य प्रस्थापित झालेले आहे. आणि हे ऐक्य माझे मुलगे व पणतू आणि चंद्र

व सूर्य आहेत तितका काळ टिकून राहो. भिक्षु वा भिक्षुणी यांपैकी कोणी ही संघात दुफळी निर्माण करतील, तर त्याला शुभ्र वस्त्रे परिधान करावयास लावून, जेथे भिक्षु वा भिक्षुणी नाहीत अशा जागी घालवून दिले जाईल. कारण संघाचे ऐक्य टिकून राहावे व तो दीर्घकाळ टिकून राहावा अशी माझी इच्छा आहे. भिक्षुंच्या संघाला आणि भिक्षुणींच्या संघाला याची समज द्यावी. असे देवांचा प्रिय म्हणतो: या आज्ञापत्राची एक प्रत तुम्ही ठेवली पाहिजे व ती तुमच्या सभागृहात ठेवा, आणि एक प्रत सामान्य लोकांना द्या. सामान्य माणसाने उपोसथाच्या प्रत्येक दिवशी (कबुलीचा आणि प्रायश्चित्ताचा दिवस) ही आज्ञा मान्य करण्यासाठी आले पाहिजे. हीच गोष्ट खास अधिकाऱ्यांनाही लागू आहे. त्यांनीही या आज्ञेचे पालन करण्यासाठी व लोकांना ती समजावून देण्यासाठी उपोसथाच्या वेळी उपस्थित राहिलेच पाहिजे. तुमच्या **आहारामध्ये** अगदी याच मजकुरानुसार ही आता जाहीर केली पाहिजे. अगदी नेमका हाच मजकूर किल्ल्यांच्या भागातही (लष्करी नियंत्रणाखालील) तुम्ही प्रसिद्ध केलाच पाहिजे.

## स्तंभशासने

### पहिले स्तंभशासन

देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा असे म्हणतो : माझ्या राज्याभिषेकाला सव्वीस वर्षे झाल्यानंतर मी हा **धम्मलेख** कोरविला. **धम्माविषयी** आत्यंतिक प्रेम, सदैव सावधानता व आज्ञाधारकता, पापाची अतिशय भीती आणि भरपूर उत्साह असल्याशिवाय इहलोकी आणि परलोकी सौख्य मिळणे कठीण आहे. पण माझ्या शिकवणुकीमुळे **धम्माविषयीची** कळकळ व धम्पाविषयीचे प्रेम दिवसानुदिवस वाढले आहे आणि वाढत राहील. माझ्या अधिकाऱ्यांनीही, मग ते श्रेष्ठ, कनिष्ठ वा मध्यम स्थानावरील असोत ती शिकवण मान्य करावी आणि अस्थिर वृत्तीच्या माणसांना जिंकण्यासाठी तिचे पुरेसे आचरण करावे, त्याचप्रमाणे सीमांवरील अधिकाऱ्यांनीही करावे. कारण **धम्माच्या** आधारे संरक्षण, **धम्मानुसार** कारभार, **धम्माच्या** साधनाने लोकांना संतुष्ट ठेवणे, **धम्माने** साम्राज्याचे संरक्षण करणे हे माझे तत्त्व आहे.

### दुसरे स्तंभशासन

देवांचा प्रिय, प्रियदर्शी राजा असे म्हणतो : **धम्म** चांगला आहे. आणि **धम्म** म्हणजे काय ? थोड्याश्या चुकांबरोबर अनेक सत्कृत्ये, दया, दान, सत्य आणि पावित्र्य असणे म्हणजे धर्म.

वेगवेगळ्या रुपाने मी त्याचा परिचय करून दिलेला आहे. माणसे, पशू, पक्षी आणि मासे यांचे प्राणही वाचवून मी त्यांना अनेक फायदे मिळवून दिले आहेत. आणि इतर अनेक प्रशंसनीय कृत्ये मी केलेली आहेत. मी हा **धम्मलेख** एवढयासाठी कोरविला आहे की लोकांनी त्याप्रमाणे वागावे व तो टिकून राहावा. जो त्याप्रमाणे वागेल त्याचे भले होईल.

## तिसरे स्तंभशासन

देवांचा प्रिय, प्रियदर्शी राजा असे म्हणतो : आपण केलेली सत्कृत्येच तेवढी माणूस पाहतो व त्याला वाटते, 'मी सत्कृत्य केले,' पण दुसऱ्या बाजूस तो स्वत:ची दुष्कृत्ये पाहात नाही व 'मी दुष्कृत्य केले.' किंवा 'हे खरोखरच पाप आहे.' असे त्याला वाटत नाही. आता, या बाबतीत जागरुक राहणे हे काहीसे खरोखर कठीण आहे. परंतु तरीही माणसाने लक्षात घ्यावे आणि विचार करावा, 'क्रौर्य, कठोरता, क्रोध, गर्व आणि मत्सर ही खरोखर पापाची निर्मिती करणारी आहेत. माझ्या पतनास ती कारण होऊ नयेत.' आणि माणसाने याची खास दखल घेऊन विचार करावा की, 'इहलोकीच्या माझ्या सौख्यासाठी हे महत्त्वाचे आहे. आणि दुसऱ्या बाजूस परलोकीच्याही.

## चौथे स्तंभशासान

देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा असे म्हणतो : माझ्या राज्याभिषेकाला सव्वीस वर्षे झाल्यानंतर मी हा **धम्मलेख** कोरविला. हजारो लोकांच्यावर माझे **राजूक** (ग्रामीण अधिकारी) नेमलेले आहेत. **राजुकांनी** आपली कामे शांततेने आणि निर्भयपणाने पार पाडवीत आणि ग्रामीण लोकांच्या कल्याणात व सौख्यात त्यांनी भर घालावी व लोकांना फायदा मिळावा म्हणून मी न्यायदान व शिक्षा या बाबतीत **राजुकांना** स्वतंत्र अधिकार दिलेले आहेत. सुख व दु:ख कशामुळे होते ते, ते शिकतील आणि **धम्मपरायण** लोकांबरोबर ते ग्रामीण लोकांना, इह-परलोकी कल्याण साधता यावे, म्हणून उपदेश करतील. माझ्या आज्ञा पाळण्यास **राजुक** उत्सुक आहेत आणि माझ्या दूतांना माझ्या इच्छा माहीत असल्याने त्यांच्याही आज्ञा ते पाळतील. त्याचप्रमाणे हे दूत (चुकणाऱ्या **राजुकांना**) ताकीद देतील त्यामुळे मला समाधान देण्यास ते समर्थ ठरतील.

जसा एखादा मनुष्य आपले मूल अनुभवी दाईवर सोपवितो आणि ही अनु-भवी दाई मुलाची समाधानकारक रीतीने काळजी घेईल असा त्याला विश्वास असतो, त्याप्रमाणे ग्रामीण भागातील लोकांच्या काल्याणासाठी, सौख्यासाठी माझे

रज्जूक नेमण्यात आलेले आहेत. त्यांना आपली कार्ये निर्भयपणाने, आत्मविश्वासाने आणि हसतमुखाने करता यावीत म्हणून न्यायदान व शिक्षा या बाबतीत मी त्यांना स्वतंत्र अधिकार दिलेले आहेत. परंतु न्यायदानपद्धती आणि शिक्षा यांच्यात एकसारखेपणा असावा हे इष्ट आहे.

आतापासून ही माझी आज्ञा आहे : जी माणसे तुरुंगात आहेत किंवा ज्यांना मृत्यूदंड झालेला आहे त्यांना तीन दिवसांची सूट मिळावी. त्यांचे आप्त त्यांच्या जीवासाठी दयेचा अर्ज करू शकतील किंवा त्यांच्यासाठी अर्ज करण्यास कोणी नसेल तर पुढच्या जीवनात चांगला पुनर्जन्म लाभावा म्हणून दान करू शकतील किंवा उपोषण करू शकतील. त्यांना परलोकात फायदा मिळावा अशी माझी इच्छा आहे. आणि लोकांमध्ये संयम आणि दातृत्व यांसारखे विविध धम्माचरण वाढत्या प्रमाणावर होत आहे.

## पाचवे स्तंभशासन

देवांचा प्रियदर्शी राजा असे म्हणतो : माझ्या राज्याभिषेकाला सव्वीस वर्ष झाल्यानंतर खालील जातींच्या प्राण्यांच्या हत्त्येवर बंदी घातली : पोपट, मैना, लाल डोक्याची बदके (?), चक्रवाक, बदके, राजहंस, नंदीमुख (भाताच्या शेतात आढळणारे पक्षी ?) कबुतरे, वटवाघळे, मुंग्या, कासवे, अस्थिविरहित मासे वेदवेयक, गंगापुपुट (मासे ?), शकलमत्स्य, साळिंदर, खारी, हरणे, सरडे, पाळीव जनावरे, गेंडे, पांढरी कबुतरे, पाळीव कबुतरे, आणि जे उपयोगाचे नाहीत व खाल्ले जात नाहीत असे सर्व चतुष्पाद. शेळ्या, मेंढ्या व डुकरिणी जर गर्भिणी असतील अगर पिल्लांना पाजणाऱ्या असतील तर त्यांना ठार मारू नये, तसेच सहा महिन्याच्या आतील त्यांची पिल्लेही मारू नयेत. कोंबड्यांना निर्बीज करू नये. जीवजंतु असलेले भुसकट जाळू नये. सजीवांना ठार मारण्यासाठी किंवा कोणत्याही योग्य कारणाशिवाय अरण्ये जाळू नयेत. एका जनावराचे पोषण दुसऱ्या जनावरावर करू नये.

तीनही ऋतुंमधील पहिली पौर्णिमा, तिष्य नक्षत्रावर पौर्णिमा असेल तर तीन दिवस आणि शुक्ल पक्षातील चतुर्दशी व पौर्णिमा आणि वद्य पक्षातील प्रतिपदा आणि नित्याच्या उपासाचे दिवस या दिवशी मासे पकडू नयेत वा विकू नयेत. याच दिवसांमध्ये हत्तींसाठी राखलेल्या उपवनांमधील व मच्छीमारीसाठी असलेल्या जलाशयांमधील दुसऱ्या कोणत्याही प्रकारचे प्राणी मारू नयेत. प्रत्येक पंधरवड्यातील आठव्या, चौदाव्या व पंधराव्या दिवशी, तिष्य व पुनर्वसु नक्षत्रांच्या दिवशी प्रत्येक ऋतुतील पहिल्या तीन पौर्णिमांच्या दिवशी आणि

सणांच्यादिवशी बैल, बकरे, मेंढे, अस्वले आणि इतर प्राणी यांना खच्ची करण्याची जो रुढी आहे तिचे पालन करता कामा नये. तिष्य आणि पुनर्वसु नक्षत्रांच्या दिवशी, प्रत्येक ऋतुच्या पहिल्या पौर्णिमेला व त्या नंतरच्या पंधरवड्यामध्ये गुरांना आणि घोड्यांना डाग दिले जाऊ नयेत.

(माझ्या राज्यारोहणापासून त्याच्या या वर्षापर्नदिनानिमित्तच्या) मधल्या काळात माझ्या राज्यारोहणाला सव्वीस वर्षे झाली तेव्हा पंचवीस वेळा कैद्यांना तुरुंगातून सोडण्यात आले.

## सहावे स्तंभशासन

देवांचा प्रिय, प्रियदर्शी राजा असे म्हणतो :

माझ्या राज्याभिषेकाला बारा वर्षे झाली तेव्हा जगाच्या कल्याणासाठी व सौख्यासाठी मी एक धम्मलेख कोरविलेला होता. जो कोणी त्यानुसार वागतो तो विविध मार्गांनी धम्माची प्रगती करतो. मी माझ्या जवळच्या आणि दूरच्या नातेवाईकांना जशी सौख्यप्राप्ती करून देतो व त्यासाठी काम करतो–तसेच सर्व वर्गासाठी करतो व अशा प्रकारे जगाच्या कल्याणासाठी आणि सौख्यासाठी तरतूद करतो. विविध प्रकारांनी आदर दाखवून मी सर्व पंथांचा सन्मान करतो, आणि त्यांना स्वत: भेटणे सर्वात जास्त महत्त्वाचे आहे असे मी समजतो. माझ्या राज्याभिषेकाला सव्वीस वर्षे झाली तेव्हा मी हा धम्मलेख कोरविलेला होता.

## सातवे स्तंभशासन

देवांचा प्रिय प्रियदर्शी राजा असे म्हणतो : पूर्वी, लोकांची धम्माविषयीची आस्था वाढावी म्हणून राजाने साधनांचा शोध केला. परंतु धम्माविषयी अधिक भक्तिभाव वाढण्याच्या दृष्टीने लोकांकडून त्या प्रमाणात प्रतिसाद मिळाला नाही. म्हणून देवांचा प्रिय, प्रियदर्शी राजा असे म्हणतो : ही कल्पना माझ्या मनात आली. लोकांची प्रगती व्हावी म्हणून पूर्वी राजांनी मार्ग शोधले...पण त्यांची प्रगती झाली नाही...मग लोकांना धम्माचे अनुयायी बनविण्यासाठी आणि त्यांची धम्माविषयीची आस्था वाढविण्यासाठी लोकांना काय करावयास लावायला पाहिजे? धम्माविषयीच्या भक्तिभावातून मी त्यांची कशी उन्नती करू शकेन? मी त्यांना धम्माविषयीचे जाहीरनामे ऐकवीन, आणि धम्मज्ञानाची त्यांना शिकवण देईन. लोक जेव्हा हे ऐकतील तेव्हा ते त्याला मान्यता देतील आणि त्यांची उन्नती होईल आणि धम्माच्या बाबतीत त्यांची खूप प्रगती होईल...या कारणाने धम्माविषयक जाहीरनामे काढण्यात आले आणि धम्माच्या शिकवणुकीविषयी

आज्ञा काढण्यात आल्या आणि अनेक लोकांवर माझ्या **धम्ममहामत्तांची** नेमणूक करण्यात आली, ते त्यांना ताकीद देतील व त्यांना **धम्माचे** स्पष्टीकरण करतील.

हजारो लोकांवर **राजुकांची** (ग्रामीण अधिकारी) नेमणूक करण्यात आलेली आहे, ज्या लोकांना **धम्माविषयी** भक्तिभाव आहे त्यांना उत्तेजन देण्याच्या दृष्टीने मी **राजुकांना** आज्ञा दिलेल्या आहेत.

देवांचा प्रिय, प्रियदर्शी राजा असे म्हणतो : मनातील याच कल्पनेमुळे मी **धम्मस्तंभ** तयार केले, **धम्महामत्तांची** नेमणूक केली व **धम्माविषयीचे** जाहीरनामे काढले.

देवांचा प्रिय, प्रियदर्शी राजा असे म्हणतो : पशु आणि माणसे यांना सावली मिळावी म्हणून मी रस्त्यांवर वटवृक्ष लाविलेले आहेत. आंबराया लाविलेल्या आहेत आणि दर आठ कोसांवर विहिरी खोदल्या आहेत व धर्मशाळा बांधलेल्या आहेत. पशु आणि माणसे यांच्या उपयोगासाठी मी सर्वत्र अनेक पाणपोया घातलेल्या आहेत. पण हा फायदा महत्त्वाचा आहे, आणि पूर्वी माझ्याप्रमाणे इतर अनेक राजांनीही जगाच्या सुखसोयींसाठी खरोखरच अनेक प्रयत्न केले. परंतु लोकांनी **धम्माचे** अनुयायी व्हावे या हेतूने मी या गोष्टी केल्या आहेत.

देवांचा प्रिय, प्रियदर्शी राजा असे म्हणतो: लोकांच्या फायद्याच्या अनेक गोष्टींमध्ये माझे **धम्ममहामत्त** गुंतलेले आहेत. सर्व प्रकारच्या पंथांतील साधू व सामान्य लोक यांच्यामध्ये ते काम करीत आहेत. बौद्धसंघ, ब्राम्हण, आजीविक,... जैन ...आणि विविध पंथ यांच्यासाठीच केवळ मी काही खास **धम्ममहामत्त** नेमलेले आहेत. अधिकाऱ्यांच्या इतर काही श्रेणी आहेत व त्यांच्याकडे विविध कामे आहेत पण **धम्ममहामत्त** मात्र या आणि इतर पंथांच्या कार्यांत मग्न आहेत.

देवांचा प्रिय, प्रियदर्शी राजा असे म्हणतो : हे आणि इतर काही प्रमुख अधिकारी माझ्यातर्फे व माझ्या राण्यांच्यातर्फे दिली जाणारी दाने वाटण्यात गुंतलेले आहेत, आणि माझ्या अंत:पुरात, वेगवेगळ्या स्वरुपाची सत्कृत्ये करण्यास ते मदत करतात, येथे आणि सर्व प्रदेशांतही. आणि माझे मुलगे व इतर राजपुत्र यांना **धम्माचे** वैभव वाढविण्यासाठी आणि त्याचे अनुयायी बनण्यासाठी जी दाने द्यावयाची आहेत ती वाटण्याची व्यवस्था करण्याविषयीची आज्ञा मी त्यांना दिलेली आहे. अशा रीतीने सर्व जगभर **धम्माचे** वैभव वाढेल आणि दया, दान, सत्य, पावित्र्य, मार्दव आणि सद्‌गुण यांच्या रुपाने त्या **धम्माचे** पालन केले जाईल.

देवांचा प्रिय, प्रियदर्शी राजा असे म्हणतो : मी जी काही सत्कृत्ये केलेली आहेत त्यांना जगाने मान्यता दिली आहे व त्यांचे अनुकरण केले आहे. याचा

परिणाम म्हणजे मातापित्यांची आज्ञा पाळणे, गुरुजनांची आज्ञा पाळणे, वडील मंडळींविषयीचा अत्यादर, ब्राह्मण व श्रमण, गरीब व दुःखी, दास व सेवक यांच्याविषयीचा आदर यांमध्ये वाढ झालेली आहे व वाढ होत राहील.

देवांचा प्रिय, प्रियदर्शी राजा असे म्हणतो : कायदा आणि मतपरिवर्तन या दोन साधनांनी लोकांमधील **धम्माची** प्रगती साध्य करण्यात आलेली आहे. पण या दोहोंपैकी कायदा हा कमी परिणामकारक आहे. आणि मतपरिवर्तन अधिक परिणामकारक आहे. उदाहरणार्थ कायद्याच्या द्वारे मी असे जाहीर केलेले होते की जनावरांच्या काही जातींची हत्या करू नये, आणि इतरही काही कल्पना जाहीर केल्या होत्या. परंतु सजीवांना इजा करू नये आणि त्यांचा प्राण घेऊ नये याविषयी मन वळविल्यामुळेच लोकांमधील धर्मशीलता वाढली.

माझ्या मुलांच्या आणि पणतवंडांच्या कारकिर्दीत आणि जोपर्यंत सूर्य व चंद्र आहेत तोपर्यंत लोकांनी **धम्माचे** आचरण करावे म्हणून मी हे सर्व केलेले आहे. कारण **धम्माचरणामुळे** इहलोकी व परलोकी लाभ होतो. माझ्या राज्याभिषेकाला सत्तावीस वर्षे झाली तेव्हा मी हा **धम्मलेख** कोरविलेला होता. देवांचा प्रिय असे म्हणतो : जेथे जेथे दगडी स्तंभ व दगडी फलक आहेत तेथे हा **धम्मलेख** कोरविला जावा. त्यामुळे तो दीर्घकाळ टिकून राहील.



# सहावे परिशिष्ट

## मौर्यकालीन कला

मौर्यकालीन कलाकृतींचे अवशेष आणि इराणी इतिहासातील अखमोनीय कालातील कलाकृतींचे अवशेष यांच्यामध्ये शैलीच्या दृष्टीने इतके साम्य आहे की, त्या कलाकृती इराणी कारागिरांच्या आहेत असे मानणारे कलाइतिहासकार व त्या शुद्ध देशीच आहेत असे मानणारे त्यांचे विरोधक यांच्यामधील लढाईत या अवशेषांचा दारूगोळ्यासारखा उपयोग होतो आहे. या परिशिष्टात, या वादात शिरण्याचा आमचा हेतू नाही कारण तो वाद प्रामुख्याने कलात्मक प्रेरणेच्या प्रश्नाशी निगडीत आहे व त्यासाठी ग्रीक आणि अखमोनीय या दोन्ही कलांचा तपशीलवार विचार करण्याची गरज आहे. मौर्यकालीन समाजाच्या संदर्भात मौर्यकालीन कलेची जी अधिक समर्पक अंगे आहेत तेवढीच दाखवून देण्याची आमची इच्छा आहे.

अशोककालीन कलाकृतींच्या अवशेषांचे कोरीव लेखांशी साहचर्य असलेले आढळते. हे लेख तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी किंवा शहरांच्या परिसरात लिहून ठेविलेले होते. प्रामुख्याने आढळणारे कलावशेष म्हणजे स्तंभांची पशुशीर्षे. स्तंभांचे महत्त्व निश्चित करणे कठीण नाही.[1] एक रचना या दृष्टीने स्तंभाचे मूळ प्रागैतिहासिक कालातील अखंड दगडाच्या खांबात आढळते. साधारणतः दगडाच्या एकाच तुकड्यातून ते कापले जात व कुंपणामध्ये उभे केले जात व ही आवारे पवित्र मानली जात. जननेंद्रियाचे प्रतिक वा लिंग म्हणून काही वेळा त्यांची पूजा केली जाई. अशा स्तंभावर मजकूर कोरण्याचा फायदा असा होता की महत्त्वाच्या जागेशी मजकुराचे साहचर्य निर्माण होई याशिवाय, स्मिथने दाखवून दिले आहे त्याप्रमाणे[2] सहस्राम लेख असे सांगतो की खडक आणि स्तंभ यावर आज्ञालेख कोरावेत व जेथे स्तंभ उभा आहे तेथे कोरावेत.[3] यावरुन अशोकाच्या कारकिर्दीच्याही आधी काही स्तंभ उभारलेले होते, असे सूचित होते. या प्रकारच्या, कोरीव मजकूर नसलेल्या स्तंभाचा उपयोग धर्माचाराच्या हेतूने केला जात असावा.

---

१. या ठिकाणी आम्ही स्तंभांचा विचार स्थापत्यकलेचा भाग म्हणून करीत नसून स्वतंत्रपणे उभारलेल्या स्तंभाचा विचार करीत आहोत.

२. हिस्ट्री ऑफ फाइन आर्टस् इन इंडिया अँड सिलोन, पृ. २०

३. ब्लोख, ले एंस्क्रेपसिऑं द अशोक, पृ. १४९.

दरबारी कला आणि लोककला असा फरक मौर्यकालाबाबत कुमारस्वामी करतात.[1] स्तंभ व स्तंभशीर्षे यातून दरबारी कलेचे दर्शन होते. यामध्ये दगडाला चकाकी आणलेली आहे व ते मोठ्या तांत्रिक कौशल्याने कापलेले आहेत. ही कला प्रगत आहे आणि यथातथ्य नमुने व गतिमानता दाखविणारा असा हा पुढच्या कालातील कलाप्रकार आहे असे वर्णन ते करतात.

मौर्यकालीन दगडी कामाच्या पूर्वी लाकूड अगर इतर काही नाशवंत माध्यमे यांचा वापर करण्याची परंपरा अस्तित्वात होती यात शंका नाही. शहरांच्या बांधकामासाठी लाकडाचा उपयोग फार मोठ्या प्रमाणावर करण्यात येत असल्याने[2] शिल्प व कोरीव काम यांसाठी साधारणपणे त्याचा उपयोग होणे साहजिक आहे. शिशुपालगढ येथील मौर्यकालीन स्तरांच्या उत्खननात लाकडी कलावशेष उजेडात आलेले आहे आज ओरिसात सापडणाऱ्या झाडांच्या जातींच्या लाकडा_सारखेच ते असल्याचे परीक्षणावरून आढळून आलेले आहे.[3] अखमोनीय इराणच्या संपर्काच्या प्रभावामुळे काही अंशी लाकडांचा वापर कमी होत गेला असावा, परंतु याहून अधिक व्यवहार्य कारण गंगेच्या मैदानातील अरण्ये तोडली गेली हेच बहुधा असावे.[4]

स्तंभ दोन प्रकारच्या दगडांचे आहेत. काही स्तंभ मथुरेच्या प्रदेशातील लाल–पांढरे ठिपके असलेल्या वालुकाप्रस्तरापासून बनविलेली आहेत आणि इतर वाराणसीजवळील चुनारच्या खाणीतून काढलेल्या पिवळसर रंगाच्या व साधारणत: लहान काळे ठिपके असलेल्या रवाळ, कठीण वालुकाप्रस्तरापासून बनविलेले आहेत. वायव्य प्रांतात कोरीव कामासाठी वापरण्यात येणारा दगड परिचित होता यात शंका नाही कारण अखमोनीय केंद्रांशी त्याचा जवळचा संबंध होता. भिरच्या टेकाडात कोरीव आणि नक्षीकाम केलेल्या दगडाच्या अनेक वस्तू सापडलेल्या आहेत, त्यावरून दगड कोरणाऱ्या तक्षशिलेच्या कारागिरांचा वाटा त्यात असलाच पाहिजे. मौर्यांचे साम्राज्य प्रस्थापित झाल्यामुळे आणि दळणवळणात सुधारणा झाल्यामुळे मोठ्या शिलाखंडांची एका प्रदेशातून दुसरीकडे वाहतूक करणे शक्य झाले. त्याचप्रमाणे दगड कोरणारे कारागीर पाठविणेही शक्य झाले.

---

१. हिस्ट्री ऑफ इंडियन अँड इंडोनेशियन आर्ट, पृ. १६.
२. अर्थशास्त्र, दोन, ३६.
३. चौधरी आणि घोष, एआय व्हॉ. आठ, पृ. २८.
४. बॅशॅम, दि वंडर दॅट वॉज इंडिया पृ. ३४८.

स्तंभशीर्षाच्या शैलींमधील एकसारखेपणा पाहता एकाच प्रदेशातील कारागिरांनी ते सर्व कोरलेले आहेत हे सुचित होते. त्याचप्रमाणे दगडही वर उल्लेखिलेल्या दोन प्रकारांपैकीच आहेत. यावरून असे दिसून येते की, आज जेथे स्तंभ आढळलेले आहेत त्या वेगवेगळ्या जागी मथुरा आणि चुनार येथून दगड वाहून नेला आणि तेथे कारागिरांनी दगड कापून कोरला. हे कारागीर बहुधा तक्षशिलेहून येत असावेत आणि दगड हाताळण्याचा त्यांना अनुभव असावा. तक्षशिलेतील कपच्यांचे अवशेष असे सुचवितात की स्थानिक कारागिरांनी शिल्पकलेची घडण केली.[1]

धौलीचा दगडी हत्ती हा पशुशीर्षाच्या त्या परंपरेत बसणारा दिसत नाही. बहुधा स्थानिक कारागिरांनी तो कोरला असावा. पशुशीर्षे कोरणाऱ्या खास कारागिराची ती कलाकृती नसावी. खडकातून बाहेर येणारी हत्तीची प्रतिमा अतिशय प्रभावी आहे आणि जवळच असलेल्या कोरीव लेखाकडे लक्ष वेधले जावे हा हेतू बहुधा तिच्यामागे असावा.

मौर्यकालीन लोककलेचे नमुने स्थानिक कारागिरांच्या कामामध्ये दिसतात. यांमध्ये सम्राटाने पुढाकार घेतलेल्या शिल्पाचा समावेश नसावा, बहुधा नव्हताच. स्थानिक राज्यपाल व विशेष सधन नागरिक हे लोककलेचे आश्रयदाते होते. बेस नगर येथील यक्षी, परखन येथील यक्ष आणि दिदारगंज येथील चवरी ढाळणारा मनुष्य या प्रतिकृतींवरून हे दिसून येते. हे विशिष्ट नमुने मौर्यपूर्वकालातील असले वा नसले तरी कलेच्या दृष्टीने ते धौलीच्या हत्तीच्याच गटात बसणारे दिसतात. तांत्रिक दृष्टया स्तंभशीर्षापेक्षा त्यांच्या घडणीत कमी कौशल्य दिसते. त्यांतून बरीचशी भव्यता व शारिरीक सामर्थ्य प्रतीत होते.[2]

व्हीलरने असे सुचविले आहे की, राज्याने नोकऱ्या दिलेले मौर्यकालीन कारागीर कदाचित भारतात स्थायिक झालेले बेकार इराणी असावेत.[3] तुषास्प" सारखे इराणी किंवा इराणी कूळ असलेले भारतीय राज्यपाल मौर्यांनी पश्चिम अगर वायव्य प्रांतात नेमलेले होते ही वस्तुस्थिती पाहता हे संभवनीय दिसते. तथापि, जर या भागांमध्ये इराणी कारागीर फार मोठ्या संख्येने स्थायिक झालेले असतील तर अखमोनीय पद्धतीच्या कलावस्तू फार मोठ्या संख्येने सापडलेल्या नाहीत हेही आश्चर्यकारक आहे. मौर्यकालीन दरबारी कलेचे परीक्षण करताना, एखाद्या साम्राज्यरचनेचा कलाविष्कार हा क्वचितच राष्ट्रीय असतो हेही

१. मार्शल तक्षिला व्हॉ. एक, पृ. १०३.
२. कुमारस्वामी, हिस्ट्री ऑफ इंडियन अँड इंडोनेशियन आर्ट, पृ. १७.
३. एआय व्हॉ. चार, पृ. ९४.

लक्षात ठेविले पाहिजे. एखाद्या लहान राज्यापेक्षा कोणत्याही साम्राज्याचे स्वरुप नैसर्गिक रित्याच अधिक सार्वत्रिक असते, कारण त्यात सामाविष्ट झालेले भाग साम्राज्याच्या प्रस्थापनेपूर्वी परस्परांना परके असतात.

सारनाथचे सिंहशीर्ष हें परकीय कारागिरांचे काम असावे असे स्मिथने सुचवले आहे. कारण शंभर वर्षानंतर सांचीच्या दक्षिण प्रवेशद्वारावर अशाच पद्धतीचे शिल्प कोरण्याचा प्रयत्न झाला. तो फसला.[1] जेव्हा भारतीय कारागिरांवरच हे काम सोपविले तेव्हा ते तसाच नमुना तयार करू शकले नाहीत, असे येथे म्हणावयाचे आहे. या अपेक्षित यशाचा वा अपयशाचा बराचसा संबंध त्या शिल्पाच्या हेतूशी आहे हे या संदर्भात लक्षात ठेवणे अगत्याचे आहे. संपूर्ण वस्तूचा विचार न करता केवळ दक्षिण प्रवेशद्वारावरील शिल्पाची तुलना सिंहशीर्षाशी केली तर शिल्पकलेच्या दृष्टीने सिंहशीर्षाइतके ते भव्य व प्रभावी नसेल. तरीहा जर अगदी सिंहशीर्षाच्याच शैलीने हे प्रवेशद्वार सजविले असते तर कलाकौशल्याच्या दृष्टीने ते अधिक मोठे अपयश ठरले असते. सम्राटाचा संदेश असणाऱ्या सुडौल, प्रमाणबद्ध स्तंभाला उठाव देणे हा सारनाथच्या स्तंभशीर्षाचा हेतू आहे. त्यामुळे तेथे अलिप्ततेची आणि भव्यतेची वृत्ती शोभून दिसते. सांचीच्या शिल्पामागे एक संपूर्ण वेगळी कल्पना आहे आणि म्हणूनच तेथे एक अगदी वेगळी शैली आहे. ते स्मारक पवित्र मानले जात असल्याने त्याविषयी लोकमानसाला वाटणाऱ्या आदराचा तो अविष्कार आहे.

मौर्यकालीन जागांवर वेगवेगळ्या आकाराच्या मृण्मय वस्तू सापडलेल्या आहेत. मातीपासून मातृदेवतेची मूर्ती बनविण्याची, प्रागैतिहासिक कालापासूनची परंपरा सातत्याने चालू होती हे अहिच्छत्रा येथील मौर्यस्तरात आढळलेल्या वस्तूंवरून दिसून येते.[2] पाटलिपुत्रापासून तक्षशिलेपर्यंत अनेक ठिकाणी त्या मोठ्या प्रमाणावर सापडलेल्या आहेत. अनेक वस्तूंना डौलदार आकार आहे आणि तांत्रिक दृष्ट्या त्या अतिशय सफाईदार आहेत. त्यांचे रेखीव आकार आणि अलंकार स्पष्टपणे दिसतात. काही वस्तू साच्यातून बनविल्या असल्या तरी त्यांत फारच थोडा साचेबंदपणा आढळतो. तक्षशिलेमध्ये सापडलेल्या मृण्मय वस्तूंमध्ये साध्या मूर्ती, देवता असलेल्या नवसाच्या कोरीव वस्तू, खेळणी, फासे, अलंकार आणि मणी आहेत.[3] खेळणी म्हणजे चाके लाविलेली जनावरे आहेत. हत्ती हा त्यांत विशेष प्रिय दिसतो. दृष्ट लागू नये म्हणून रोमन मुले वापरीत असलेल्या ब्युलेसारखी गोल मोठी पदके अलंकारामध्ये आढळतात

● ● ●

१. हिस्ट्री ऑफ फाइन आर्ट इन इंडिया अँड सिलोन, पृ. १६.

२. घोष एआय, व्हॉ. चार पृ. १०६; कुमारस्वामी, हिस्ट्री ऑफ इंडियन अँड इंडोनेशियन आर्ट, पृ. २०.

३. मार्शल तक्षिला, व्हॉ. दोन, पृ. ४४०, ४५४, ४६०.

# संदर्भसूची

अदिकरम, इ. डब्ल्यू.–अर्ली हिस्ट्री ऑफ बुद्धिझम इन सिलोन कोलंबो, १९४६.

अग्निपुराण.–संपा. मित्र. कलकत्ता, १८७३-७९.

अय्यंगार, पी. टी. एस्.–हिस्ट्री ऑफ दि तामिळस टु. ए. डी. ६००, मद्रास, १९२९.

अय्यंगार एस् के.–दि बिगिनिंग्ज ऑफ साऊथ इंडियन हिस्ट्री. मद्रास, १९१८ अय्यंगार कमेमोरेशन व्हॉल्यूम.

ऐतरेय ब्राह्मण,–संपा. आगाशे, पुणे, १८९६.

ॲलन, जे.–कॅटलॉग ऑफ दि कॉइन्स ऑफ एन्शंट इंडिया (ब्रिटिश म्युझिअम). लंडन, १९३६.

आळतेकर, ए. एस्.–स्टेट अँड गव्हर्नमेन्ट इन एन्शंट इंडिया, बनारस, १९४९.

ॲलथिम, एफ्.–वेल्टगेशिश्ट आझिअन्त इन ग्रीशिशन त्साइटआल्टर ह्लालं १९३७-३८.

अंजारिया, जे. जे.–दि नेचर अँड ग्राऊंडस् ऑफ पोलिटिकल ऑब्लिगेशन इन दि हिंदु स्टेट. लंडन १९३५.

अंगुत्तर निकाय.–संपा. मॉरिस अँड हार्डी, लंडन १८८३–१९००.

अश्वघोष, बुद्धचरित.–संपा. कॉवेल, ऑक्सफर्ड, १८९३.

ओबोइयेर, जे.–आर्त ए स्तील द लेंद. पॅरिस, १९५१.

बाण. हर्षचरित.–संपा. फ्यूरर, मुंबई, १९०९.

बाबलों.–रूआ द सीरी ..पॅरिस, १८९०.

बारुआ. बी. एम्.–अशोक अँड हिज इन्स्क्रिप्शन्स, कलकत्ता, १९४८.

बॅशॅम, ए. एल्.–हिस्ट्री अँड डॉक्ट्रिन्स ऑफ दि आजीविकाज्, लंडन, १९५१ दि वंडर दॅट वॉज इंडिया, लंडन १९५४.

बंधोपाध्य, एन्. सी.–इकॉनॉमिक लाइफ अँड प्रोग्रेस इन एन्शंट इंडिया.

बार्नेट, एल. डी –अँटिक्विटिज् ऑफ इंडिया. लंडन, १९१३.

बॅरेट, डी.–स्कल्प्चर फ्रॉम अमरावती इन दि ब्रिटिश म्युझिअम्, लंडन, १९५४.

बेलोख बी.–ग्रीशिशं गेशिश्ट, तीन खंड, स्ट्रासबुर्ग १८९३--१९०४.

बेलॉक, बी.–ग्राइशिशे गेशिस्ट तीन खंड, स्ट्रासबुर्ग, १८९३-१९०४.

बील, एस.–बुद्धिस्ट रेकॉर्डस् ऑफ दि वेस्टर्न वर्ल्ड. लंडन, १८८३.

बेनिप्रसाद –दि स्टेट इन् एन्शंट इंडिया, अलाहाबाद, १९२८.

बेव्हन, इ. आर.–हाऊस ऑफ सेल्यूकस, लंडन, १९०२.

भांडारकर, डी. आर.–अशोक, कलकत्ता १९२५.

भांडारकर, आर. जी.– दि अर्ली हिस्ट्री ऑफ दि डेक्कन, कलकत्ता, १९२८.

भट्टाचार्य एस्.–सिलेक्ट अशोकन एपिग्राफ्स विथ अॅनोटेशन्स्, कलकत्ता, १९५२.

बिगॅडेड, पी, ए.–लाइफ अँड लिजेंड ऑफ गौदम. लंडन, १९१४.

ब्लोख, जे.–ले एस्क्रेपसिओं द अशोक. पॅरिस, १९५०.

बुश--लेक्लर्क.–ईसतुआर दे सेल्यूसीद्. पॅरिस, १९१३-१४.

बोस, ए –सोशल अँड रूलर इकॉनॉमी ऑफ नॉर्दर्न इंडिया, कलकत्ता, १९४२-४५.

ब्रेलोअर.–कौटिल्य स्टुडियन, बॉन, १९२७-३४.

ब्रह्मांड पुराण.– मुंबई, १९०६.

बर्कहार्डट् जे.–दि एज ऑफ कॉन्स्टंटाईन दी ग्रेट, लंडन, १९४९.

बर्गेस, जे.–रिपोर्ट ऑन दि अँटिक्विटिज् ऑफ काथियावाड अँड कच्छ, लंडन, १८७६.

बुहलर, जी.–इंडियन पॅलिओग्राफी, मुंबई, १९०४. ऑन दि ओरिजिन ऑफ दि इंडियन ब्राह्मी अल्फाबेट, स्ट्रासबुर्ग, १८९८.

काल्डवेल, आर.–ए कंपॅरेटिव्ह ग्रामर ऑफ दि द्रविडियन लँग्वेजेस्, लंडन, १८७५.

कॉन्झ, इ.–बुद्धिझम, इटस् एसेन्स अँड डेव्हलपमेन्ट ऑक्सफर्ड. १९५३

कुमारस्वामी, ए. के.–हिस्ट्री ऑफ इंडियन अॅण्ड इंडोनेशियन आर्ट लंडन, १९२७.

कॉडरिंग्टन, एच्. डब्ल्यू– ए शॉर्ट हिस्ट्री ऑफ सिलोन, लंडन, १९३९

क्यूमिंग, जे – (आणि इतर) रिव्हीलिंग इंडियाज् पास्ट, लंडन, १९३९.

कनिंगहॅम, ए.– एन्शंट जॉग्रफी ऑफ इंडिया, कलकत्ता १९२४. कॉइन्स ऑफ एन्शंट इंडिया लंडन १८९१. ए बुक ऑफ इंडियन एराज्. कलकत्ता १८८३.

दासगुप्ता. एस्. एन्.– हिस्ट्री ऑफ इंडियन फिलॉसॉफी. केंब्रिज १९२३–४९.

दातें जी. टी.–दि. आर्ट ऑफ वॉर इन एन्शंट इंडिया, लंडन १९२९.

डे, एन्. एल्.– जॉग्रफिकल डिक्शनरी ऑफ एन्शंट अँड मेडीएव्हल इंडिया लंडन १९२७.

दिव्यावदान,– संपा. कॉवेल आणि नील. केंब्रिज, १८८६.

दीपवंस,– संपा. ओल्डेनबर्ग, लंडन, १८७९.

दीघ निकाय,– संपा, ह्रीस डेव्हिड् आणि कार्पेंटर, पी. टी. एस. लंडन, १८९०–१९११.

डिरिंगर डी.–दि अल्फाबेट लंडन, १९४७.

दिक्षितार, व्ही आर.–मौर्यन पॉलिटी मद्रास, १९३२. वॉर इन एन्शंट इंडिया. मद्रास १९२९.

दत्त, एन्.–अर्ली मोनॅस्टिक बुद्धिझम. कलकत्ता १९४१.

एगरमाँट, पी. एच्. एल्.–दि क्रॉनॉलॉजी ऑफ दि रेन ऑफ अशोक मोरीय. लैडेन, १९५६.

इलियट–डाऊसन, एच् एम. अँड जे.–हिस्ट्री ऑफ इंडिया अॅज टोल्ड बाय इटस् ओन हिस्टोरियन्स. कलकत्ता १९५३.

फॅर्ग्युसन, जे.–हिस्ट्री ऑफ इंडियन अँड ईस्टर्न आर्किटेक्चर लंडन, १९१०.

फर्ग्युसन जे आणि बर्गेस, जे –केव्ह टॅंपल्स् इन इंडिया लंडन, १८८०.

फिक, आर.–दि सोशल ऑर्गनायझेशन इन नॉर्थ–इस्ट इंडिया इन् बुद्धाज टाइम, कलकत्ता, १९२०.

फिलिओझा, जे, आणि रनू एल्.–लेंद क्लासिक, पॅरिस, १९१७.

फुशे, ए, दि.–बिगिनिंग्ज ऑफ बुद्धीष्ट आर्ट पॅरिस १९१७. लार ग्रेंको बुद्धिक दयू गांधारा. पॅरिस, १९०५–१८, ला विअइ रूत दबाक्त्र आ तक्षीला पॅरिस, १९४७

फॅंकफोर्ट एच्.–आर्ट अॅंड आर्किटेक्चर ऑफ दि एन्शंट ओरिएंट हामंडस्वर्थ, १९५४.

गायगर डब्ल्यू,– दी दीपवंस अॅंड महावंस कोलंबो. १९०८.

घिर्शमन आर.,– लीरान पॅरिस, १९५१.

घोष, बी. के.–दि हिंदु आयडिअल ऑफ लाईफ; कलकत्ता १९४७.

घोषाल, यु. एन्.–दि अॅग्रेरियन सिस्टिम इन एन्शंट इंडिया. कलकत्ता १९३०, दि बिगिनिंग्ज ऑफ इंडियन हिस्टोरिओग्राफी कलकत्ता १९४४ स्टडीज इन इंडियन हिस्ट्री अॅंड कल्चर, मुंबई १९५७ कॉंट्रिब्यु-शन्स टु दि हिस्ट्री ऑफ दि हिंदु रेव्हेन्यु सिस्टिम, कलकत्ता १९२९.

गाईल्स, एच्. ए.–ट्रॅव्हल्स ऑफ फा–हियान. केंब्रिज, १९२३.

ग्लॅसेनॅप, एच्. फॉन–देअर जायनिस्मूस. बर्लिन, १९२६.

गोखले, बी. जी.–बुद्धिझम अॅंड अशोक, मंबई १९४९

ग्रन्वेडेल, ए.–बुद्धिस्ट आर्ट इन इंडिया. लंडन, १९०१.

गुहा, बी. एस.–आऊटलाईन ऑफ दि रेशियल हिस्ट्री ऑफ इंडिया कलकत्ता १९३७.

गुप्ता, पी. एल्.–ए बिब्लिओग्राफी ऑफ दि होर्ड ऑफ पंच–मार्कड् कॉइन्स इन एन्शंट इंडिया, मुंबई १९५५.

हरिवंस संपा.–किंजवडेकर, पुणे १९३६.

हर्झफेल्ड, इ. इ.–अर्किऑलॉजिकल हिस्ट्री ऑफ इराण, लंडन, १९३५.

हिरोडोटस.–हिस्ट्री लोएब क्लासिकल लायब्ररी, लंडन १९२१–२५.

हेमचंद्र.–अभिदानचिंतामणि. संपा, बोटलिक आणि राऊ, सेंट पीटसंबर्ग, १८४७.

हॉफिगर, एम्.–एल्युद सुर ल कौन्सिल द वैशाली, लोव्हाएं, १९४६.

हॉर्नर, आय्. बी.–वुमेन अंडर प्रिमिटिव्ह बुद्धिझम, लंडन १९३०.

हुलट्श, इ.–कॉर्पस इन्स्क्रिप्शनम इंडिकारम खंड एक, लंडन, १८८८–१९२५.

हुटन, जे. एच.–कास्ट इन इंडिया केंब्रिज; १९४६.

हुइ ली.–लाईफ ऑफ ह्यूएनत्संग भाषा. बील लंडन, १९११.

इत्सिग.–ए. रेकॉर्ड ऑफ बुद्धिस्ट प्रॅक्टिसेस् (ताकासुसु आवृत्ती) ऑक्सफर्ड १८९६.

जानकाज्.–संपा. फॉस्बोल, पी. टी. एस. लंडन, १८७७–९७.

जयस्वाल, के. पी.–हिंदु पॉलिटी, बंगलोर, १९५५.

जॉली, जे.–अर्थशास्त्र ऑफ कौटल्य, लाहोर, १९२३. रेस्ट उण्ट झिटं स्ट्रासबुर्ग, १८९६.

जौगेट, पी.–मॅसिडोनियन इंपिरिॲलिझम अँड दि हेलेनायझेशन ऑफ दि ईस्ट, लंडन, १९२८.

कौटल्य.–अर्थशास्त्रम् संपा. गणपती शास्त्री, त्रिवेंद्रम, १९२१–२५. भाषा. आर शामशास्त्री, म्हैसूर, १९५६.

कल्हण.–राजतरंगिनी, संपा. स्टाइन, मुंबई, १८९२.

कालिदास.–मालविकाग्निमित्रम्, संपा. सुरू, मुंबई. १८९२.

काणे, पी. व्ही.–हिस्ट्री ऑफ दि धर्मशास्त्राज्, पुणे, १९३०–४६. कात्यायनस्मृतिसारोद्धर. पुणे, १९३३.

कपाडिया, के. एन्.–हिंदु किन्शिप, मुंबई १९४७.

केर्न, एफ्.–अशोक बर्न. १९५६.

केर्न, एच्.–मॅन्युअल ऑफ इंडियन बुद्धिझम, स्ट्रासबुर्ग, १८९६.

कीथ ए. बी.–हिस्ट्री ऑफ संस्कृत लिटरेचर, ऑक्सफोर्ड. १९२८.

कोसंबी, डी. डी.–इंट्रोडक्शन टु दि स्टडी ऑफ इंडियन हिस्ट्री, मुंबई, १९५६.

कोनोव एस्–कौटल्य स्टडीज्, ऑस्लो, १९४५.

कृष्ण राव, एम्. व्ही.–स्टडीज् एन कौटल्य, म्हैसूर, १९५३.

कुरेशी, एम्. एच्.–ए गाईड टु राजगिर, दिल्ली, १९३९.

लंकावतारसूत्र,–संपा. सुझुकि, लंडन, १९३२.

लॅसेन, सी–इंडिशे आल्टरथुम्सकुंड, लायप्झिग आणि लंडन, १८५८–१८७४.

लॉ, बी सी.–सम क्षत्रिय ट्राइब्ज् ऑफ एन्शंट इंडिया, कलकत्ता, १९२४. ट्राइब्ज् इन एन्शंट इंडिया, पुणे १९४३. जॉग्रफी ऑफ अर्ली बुद्धिझम, लंडन १९३२.

लॉ. एन्. एन्.– आस्पेक्टस् ऑफ एन्शंट इंडियन पॉलिटी. ऑक्सफर्ड, १९२१ इंटर–स्टेट रिलेशन्स इन एन्शंट इंडिया, कलकत्ता १९२०.

लेवी एस्.–लेंद सिविलीझाऀसि पॅरिस १९३८. ल नेपाल. पॅरिस, १९०५–०८.

लोहुइझे द लीउ जे. इ व्हान–'दी सिथियल' पिरिअड... लेडेन, १९४९.

ल्यूडर्स, एच.– दास व्युर्फेलस्पिल इन आल्टेन इंडियन बर्लिन, १९०७.

महाभारत, संपा. जी. कृष्णाजी. मुंबई, १८८८.

महावंस, पी. टी. एस्. लंडन, १९०८.

महावस्तु, संपा. सनार पॅरिस १८८२–९७.

मनु, धर्मशास्त्र, संपा. जॉली, लंडन, १८८७.

मज्जिहम निकाय, पी. टी. एस्. लंडन, १८८८–८९.

मजुमदार, आर. सी.– (संपा.) हिस्ट्री ॲन्ड कल्चर ऑफ दि इंडियन पीपल, व्हा. दोन. दि एज् ऑफ इंपिरिअल युनिटी, मुंबई १९५१.

मजुमदार आर. सी– एन्शंट इंडिया, बनारस, १९५२. कार्पोरेट लाईफ इन इन्शंट इंडिया, पुणे, १९२२.

मार्शल, जे.–मोहेंजो–दारो अँड दि इंडस् सिव्हिलायझेशन. लंडन १९३१ तक्षिला, केंब्रिज, १९५१. गाईड टु सांची, कलकत्ता, १९१८.

महालसेकर, जी. डी.–डिक्शनरी ऑफ पाली प्रॉपर नेम्स, लंडन १९३७–३८.

मॅक्‌क्रिडल, जे. डब्ल्यू –एन्शंट इंडिया ॲज डिस्क्राइब्ड् बाय मेगॅस्थिनिस ॲंड ॲरिअन. कलकत्ता १८७७ एन्शंट इंडिया ॲज डिस्क्राइब्ड् बाय टॉलेमी, कलकत्ता, १९२७. एन्शंट इंडिया ॲज डिस्क्राइब्ड् इन क्लासिकल लिटरेचर, लंडन, १९०१. एन्शंट इंडिया ॲज डिस्क्राइब्ड् बाय क्तेसियस दि क्निडियन. लंडन, १८८२. दि इन्व्हेजन ऑफ इंडिया बाय अलेक्झांडर दि ग्रेट. लंडन, १८९६.

मॅक्‌फेल, जे. एम्.–अशोक. कलकत्ता १९२६.

मेयेर, जे. जे.–सेक्शुअल लाइफ इन एन्शंट इंडिया. लंडन, १९३०. दास आल्टइंडिश बुख फोन वेल्ट उण्ट् श्टाट्सलेबेन हॅनोव्हर, १९२५.

मेहता आर. एल. प्रि–बुद्धिस्ट इंडिया. मुंबई, १९३९.

मेंडिस, जी. सी.–दि अर्ली हिस्ट्री ऑफ सिलोन, कलकत्ता, १९४८.

मुकर्जी, आर. के.– हिस्ट्री ऑफ इंडियन शिपिंग, लंडन, १९१२. अशोक लंडन, १९२८. एन्शंट इंडियन एज्युकेशन, लंडन, १९४७.

मोरलंड, डब्ल्यू. एच –दि ॲग्रेरियन सिस्टिम ऑफ मुस्लीम इंडिया. केंब्रिज, १९२९.

मोतीचंद्र, सार्थवाह, पटना, १९५३.

मूर्ति, जी. एस. आणि अय्यंगार, ए. एन. के.–दि एडिक्टस ऑफ अशोक प्रियदर्शिन, मद्रास, १९५१.

म्यूलर, एम.–हिस्ट्री ऑफ एन्शंट संस्कृत लिटरेचर, लंडन, १८५९.

नारायण, ए. के.–दि इण्डो–ग्रीक्स, ऑक्सफर्ड, १९५७.

नाग के.–ले तेओरी दीप्लोमातीक द लेंद आँसीएन. पॅरिस, १९२३

नियोगी, पी.–कॉपर इन एन्शंट इंडिया.

निळकंठ शास्त्री, के. ए.–(संपा) दि एज ऑफ दी नंदाज् ॲंड मौर्याज् बनारस, १९५२. दि चोळाज्. मद्रास १९३५–३७.

निकम, के. ए. आणि मॅक्केऑन, आर.–दि एडिक्टस् ऑफ अशोक, शिकागो १९५९.

ओझा, जी. एच.–भारतीय लिपिमाला, अजमेर, १९१८.

ओल्डफिल्ड.–स्केचेस फ्रॉम नेपाळ–लंडन १८८०.

ओम्स्टेड, ए. टी.–हिस्ट्री ऑफ दि पर्शीयन, एंपायर, शिकागो, १९४९.

पार्गिटर, इफ्. इ.–दि पुराण टेक्स्ट ऑफ दि डायनॅस्टिज् ऑफ दि कलि एज. लंडन, १९३१.

परिशिष्टपर्वन्, संपा.–जाकोबी, कलकत्ता, १८८३–९१.

पार्कर, एच्.–एन्शंट सिलोन. लंडन, १९०९.

पांडे. जी. सी.–स्टडीज इन दि ओरिजिन ऑफ बुद्धिझम अलाहाबाद, १९५७.

पाणिनी, अष्टाध्यायी. संपा.– बॉटलिंक. लायप्झिग १८८७.

पतंजली, व्याकरण महाभाष्य, संपा.– कील्हॉर्न, ३ व्हॉल्स, मुंबई, १८९२.

पेरिप्लस.–दि एरिथ्रिअन सी. भाषा. मॅक्रिंडल, लंडन, १८७९. भाषां. स्कॉफ. लंडन, १९१२.

प्लुटार्क.–लाइफ ऑफ अलेक्झांडर, लंडन, १९१४–२६.

प्लिनी.– नॅचरल हिस्ट्री लंडन १९३८.

पॉलिबिअस.–हिस्ट्रीज्, लंडन. १९२२–२७.

प्राण नाथ.–ए स्टडी इन दि इकॉनॉमिक कंडिशन ऑफ एन्शंट. इंडिया. लंडन, १९२९.

प्रिन्सेप, जे.–एसेज ऑन इंडियन एँटिक्विटीज, लंडन, १८५८.

प्रझिलस्की, जे.– ला लेजांद द लॅंपेरर अशोक पॅरिस, १९२३.

रायचौधरी एच. सी.–पोलिटिकल हिस्ट्री ऑफ एन्शंट इंडिया कलकत्ता १९५३.

राघवन, व्ही.–कालिदास अँड कोटल्य. नागपूर, १९४६.

राधाकृष्णन, एस्.–इंडियन फिलॉसॉफी, लंडन १९२३–२७.

रॅप्सन, इ जे.–एन्शंट इंडिया केंब्रिज १९१६. इंडियन कॉइन्स, स्ट्रासबुर्ग, १८९७.

रे, एच. सी.–डायनॅस्टिक हिस्ट्री ऑफ नॉर्दर्न इंडिया, कलकत्ता, १९३१–३६.

रे, एन.–मौर्य अँड शुंग आर्ट, कलकत्ता, १९४५.

रामायण–संपा. मुधोळकर. मुंबई, १९१२-२०

रनू एल.–रिलिजन्स ऑफ एन्शंट इंडिया, लंडन १९५३ लसिविलायसिओं द लेंद एन्शन पॅरिस, १९५०.

रोलंड, बी –दि आर्ट अॅन्ड आर्किटेक्चर ऑफ इंडिया, लंडन, १९५३.

ऱ्हीस डेव्हिडस, टी. डब्ल्यू.–बुद्धिस्ट इंडिया लंडन १९०३. बुद्धिझम लंडन १९०७

राइस, बी. एल.–मायसोर अॅन्ड कूर्ग फ्रॉम दि इंस्क्रिप्शन्स, लंडन, १९०९.

रोस्ठोव्हटझेफ एम. आय.–दि सोशल अँड इकॉनॉमिक हिस्ट्री ऑफ दि हेलेनिस्टिक वर्ल्ड, ऑक्सफर्ड, १९४१.

श्मिडट इ. एफ.–पर्सेपोलिस शिकागो, १९५३.

श्लंबर्गर, डी आणि क्युरिएल, आर.–त्रेजोर मोनतेर पॅरिस, १९५३.

शूब्रिग, डब्ल्यू.–दि लेअिर देअर जैनाझ् गॉटिंगेन, १९२६.

सेन, ए सी.–अशोकाज एडिक्टस् कलकत्ता, १९५६.

सेनगुप्ता, पी.–एव्हरीडे लाइफ इन एन्शंट इंडिया. मुंबई, १९५०.

सनार, इ.–ले कास्त दाँ लेंद, पॅरिस १८९६. ले एन्स्क्रेपसिओ पियदस्सि पॅरिस, १८८१.

सरकार, डी. सी.–सिलेक्टा इन्स्क्रप्शन बेअरिंग ऑन इंडियन हिस्ट्री अँड सिव्हिलायझेशन. कलकत्ता, १९४२.

सिवराजपिल्ले, के. एन.–कॉनॉलॉजी ऑफ दि अर्ली तामिळस, मद्रास १९३२.

स्कंदपुराण, संपा. पौषीकर पुणे, १८९३.

स्मिथ व्ही.–अशोक ऑक्सफर्ड १९२४. अर्ली हिस्ट्री ऑफ इंडिया ऑक्सफोर्ड, १९२४. हिस्ट्री ऑफ फाईन आर्ट इन इंडिया अँड सिलोन. ऑक्सफर्ड, १९३०.

स्ट्रॅबो,–अॅनाबॅासिस (व्ही. मॅकक्रिंडल).

स्टाईन. ओ.–मेगॅस्थेनेस उण्ट कौटिल्य वीन १९२१.

तारानाथ, गेशिश्ट देस बुद्धिस्मुस इन इंडियन, सेंट पीटर्सबुर्ग १८६९.

टार्न, डब्ल्यू. डब्ल्यू.–हेलेनिस्टिक सिव्हिलायझेशन, लंडन, १९२७. ग्रीक्स इन बॅक्ट्रिया अॅण्ड इंडिया, केंब्रिज, १९५१.

टिमर, बी. सी. जे.– मेगॅस्थेनेस एन डे इंडिशे मात्शापिज अॅमस्टरडॅम १९३०.

थॉमस इ जे.–दि हिस्ट्री ऑफ बुद्धिस्ट थॉट, लंडन १९३३.

उपनिषदस्. छांदोग्य, मुण्डक, बृहदारण्यक, संपा. आगाशे पुणे १८९५

वालावलकर, पी. एच.–हिंदु सोशल इंन्स्टिटय़ूशन्स. बडोदे, १८४२

ला वाले पुसँ. एल. डे.–लेंद ओ तों दे मौर्य पॅरिस, १९३०

वंसथ्थपकासिनी, संपा. महालसेकर, पी. टी. एस. लंडन, १९३५.

वायु पुराण, संपा. मित्र, कलकत्ता १८७९–८८

विष्णु पुराण, संपा गुप्ता, गोरखपूर, १९५२.

विनयपिटक, संपा. ओल्डेनबर्ग, १८७२–८३.

व्हॉगेल, जे. पी.–बुद्धिष्ट आर्ट इन इंडिया ऑक्सफर्ड, १९३६.

वॅटर्स, टी.–ऑन युआन चांग्ज ट्रॅव्हल्स इन इंडिया. २ व्हॉल्स, लंडन, १९०४–०५

वॅडेल, एल. ए –डिस्कव्हरी ऑफ दि अेक्झॅक्ट साईट ऑफ अशोकाज क्लासिक कॅपिटल अँड पाटलीपुत्र, कलकत्ता १८९२.

वॉमिग्टन, इ. एच.–कॉमर्स बिटवीन दि रोमन अँपायर अँड इंडिया. केंब्रिज १९२८.

विन्स्टन, आर.–शार्लमेन, लंडन, १९५६.

वूल्नर, ए. सी.–अशोक, टेक्स्ट अँड ग्लॉसरी. कलकत्ता. १९२४.

युग पुराण,–संपा. मांकड, वल्लभविद्यानगर. १९५१.





मौर्यकाल
महत्त्वाची नगरे आणि
अशोकाच्या कोरीव
लेखांची स्थाने
शाहबाझगढी
मानसेहरा
तक्षशिला
कंदहार
कालसी
टोप्रा
मीरत
दिल्ली
हस्तिनापूर
बैराट
निगालीसागर
रामपुरवा
लौरिया-नंदनगढ
सारनाथ
पाटलीपुत्र
महास्थान
अलाहाबाद
सांची
उज्जैन
बराबर
राजगिर
भडोच
गिरनार
नर्मदा न.
सोपारा
महानदी
ताम्रलिप्ति
धौली
जौगढ
गोदावरी न.
मस्की
कृष्णा न.
गोविमठ
पालकीगुंडु
येरागुडी
ब्रह्मगिरी
सिद्दापूर
बंगाल चा
उपसागर
कावेरी
दीर्घ शिलाशासने
लघु शिलाशासने
आणि कोरीव लेख
स्तंभलेख
2000 फूट ऊंची
असलेले भूप्रदेश
मैल
0
२५०
५००

# सूची

# लघुरुपे

| | |
|---|---|
| ए बी ओ आर आय– | ॲनल्स ऑफ दि भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिटयूट |
| ए आय– | एन्शंट इंडिया |
| ए ओ– | ॲक्टा ओरिएंटालिया |
| बी एस ओ ए एस– | बुलेटिन ऑफ दि स्कूल ऑफ ओरिएंटल ॲंड आफ्रिकन स्टडीज |
| सी एच– | चॅप्टर |
| सी एच आय– | केंब्रिज हिस्ट्री ऑफ इंडिया |
| सी एच क्यू– | सिलोन हिस्टॉरिकल क्वार्टरली |
| सी आय आय– | कॉर्पस इन्स्क्रिप्शनम इंडिकारम |
| सी आर– | कलकत्ता रि व्ह्यू |
| इप इंड– | एपिग्राफिआ इंडिका |
| एच सी आय पी– | हिस्ट्री ॲंड कल्चर ऑफ दि इंडियन पीपल |
| हिस्ट नॅच– | हिस्टोरिया नॅचरॅलिस |
| आय ए– | इंडियन ॲंटिक्वेरी |
| आय सी– | इंडियन कल्चर |
| आय जी– | इंपिरिअल गॅझेटिअर |
| आय एच क्यू– | इंडियन हिस्टॉरिकल क्वार्टरली |
| इंड स्टड– | इंडिशे स्टडीएन |
| जे ए– | जर्नल एशियाटिक |
| जे ए ओ एस– | जर्नल ऑफ दि अमेरिकन ओरिएंटल सोसायटी |
| जे ए एस बी– | जर्नल ऑफ दि एसियाटिक सोसायटी ऑफ बेंगाल |

| | |
|---|---|
| जे बी बी आर ए एस– | जर्नल ऑफ दि बॉम्बे ब्रँच ऑफ दि रॉयल एसियाटिक सोसायटी |
| जे बी ओ आर एस– | जर्नल ऑफ दि बिहार अँड ओरिसा रिसर्च सोसायटी |
| जे एन एस आय– | जर्नल ऑफ दि न्यूमिस्टिक सोसायटी ऑफ इंडिया |
| जे आर ए एस– | जर्नल ऑफ दि रॉयल एसियाटिक सोसायटी |
| पी इ– | पिलर एडिक्ट |
| पी टी एस– | पाली टेक्स्ट सोसायटी |
| आर इ– | रॉक एडिक्ट |
| एस इ / एस आर इ– | सेंपरेट रॉक एडिक्ट |
| झेड डी एम जी– | झेट श्रीफ्ट देर डयूश्चेन मोर्गनलँडिश्चेन गेसेलश्चँफ्ट |

---

# छायाचित्रांची सूची



---

# नकाशांची सूची

# शुद्धिपत्र

पृष्ठ २६२, खालून चौथी ओळ पुढील प्रमाणे वाचावी.

हे नाव ɨLJ असे व जालीक हे नाव ƐJFɨ असे लिहिले जाते.

पृष्ठ २७५, दुसरा परिच्छेद पहिली ओळ

| चूक | बरोबर |
| --- | --- |
| नंबुद्वीप | जंबुद्वीप |

पृष्ठ १८१ पहिला परिच्छेद तिसरी ओळ

| डायोनिसिथिस | डायोनिसिअस |
| --- | --- |

पृष्ठ १६५ दुसरा परिच्छेद तिसरी ओळ

| अँग्रोनोमोड | अँगोरनोमोइ |
| --- | --- |

---

